ॐ

# देशभक्त कृष्णाजी प्रभाकर
उर्फ
# काकासाहेब खाडिलकर
यांचें
# चरित्र


लेखक

**काशिनाथ हरि खाडिलकर**

वकील सांगली.


किंमत ४ रुपये


शके १८७१ सन १९४९

# आत्मनिवेदन



गेल्या वर्षी याच दिवशीं तीर्थस्वरूप काकासाहेब दिवंगत झाल्यानंतर आम्ही सर्व मुंबईस घरीं जमलों असतां त्यांच्या थोर चरित्राबद्दलचे विचार आमचे मनांत सतत घोळत होते. त्यांच्यासारख्या उच्च ध्येयानें प्रेरित झालेल्या व मातृभूमीच्या स्वातंत्र्याकरितां आजन्म लढा देणाऱ्या देशभक्त कवीचें चरित्र जगाला कळणें लोकहिताचें आहे आणि हें घडण्यास कालावधि लागणें युक्त होणार नाहीं या विचारानें माझें मन व्यग्र झालें. मी ती. काकासाहेबांच्याकडे विशिष्ट भक्तिभावानें पहाणारा, त्यांचा निकटवर्ती आप्त असल्यानें हें चरित्रलेखनाचें काम करणें हें माझें कर्तव्यच आहे असें मला वाटलें.

ती. काकासाहेबांच्या चरित्रलेखनास सुरवात करतांना मी माझ्या लेखनशक्तीचा फारसा विचारच केला नाहीं. कारण त्यांचें चरित्रच सुवर्णासारखें उज्ज्वल असल्यानें माझ्यासारख्याच्या हातून कशीही घडण झाली तरी मूळ सोन्याचें मूल्य सुवर्णकाराच्या कौशल्यानें कमीजास्त होत नाहीं, तसेंच माझ्यामुळें काकासाहेबांच्या चरित्राचें मूल्य कमी होणार नाहीं असें मला वाटलें. ' सत्यसंकल्पाचा दाता भगवान् ' असा माझा विश्वास आहे. त्यामुळें माझ्या या संकल्पाला ती. काकासाहेबांच्याबद्दल प्रेमादर असलेल्या सर्वांनींच पाठिंबा दिला. ती. काकासाहेबांच्या वर्षश्राद्धाचे दिवसापर्यंत हें कार्य पुरें झालेंच पाहिजे असा दृढनिश्चय केला होता आणि त्याप्रमाणें आज हा संकल्प पुरा होत आहे याबद्दल मला आनंद होत आहे.

या लेखनकार्यांत मला माझ्या सर्व बंधूंचें—चि. नाना, केशवराव, सोन्याबापू व आप्पासाहेब आणि माझे भाचे चि. पुरुषोत्तम लिमये यांचें भरपूर आणि अतिशय मोलाचें असें सहाय्य झालें आहे. श्री. न. र. फाटक

त्यांनींही तितक्याच आपुलकीनें आस्थापूर्वक लेखनावर लक्ष देऊन अत्यंत उपयुक्त अशी मदत केली आहे. ती. काकासाहेब व आम्हां खाडिलकर मंडळींचे स्नेही प्रा. दत्तोपंत धारपुरे यांनीं हें हस्तलिखित वाचून योग्य त्या सूचना केल्या. अशा सर्वांच्या सहकार्यानें हें चरित्रलेखनाचें कार्य पुरें होत आहे. यांतील गुणदोषांची जबाबदारी कोणावर टाकण्याचा प्रश्नच उद्भवत नाहीं. मी स्वतः व इतर मंडळी ही दोषाची जबाबदारी टाळणार नाहींत. गुणाचें श्रेय दुसऱ्यास, असेंच सर्वजण मानतों; म्हणून याबद्दल जास्त लिहिण्याचें कारण नाहीं.

या लेखनाच्या कामीं आमचे शिरहट्टीपासूनचे स्नेही, सांगली हायस्कूल-मधील शिक्षक श्री. ल. आ. ऊर्फ भाऊराव भातखंडे यांचें मला सहाय्य झालें आहे, त्यांचा उल्लेख करणें हें माझें कर्तव्य आहे. तसेंच प्रुफें तपासणें वगैरे कामीं श्री. श्यामराव कुलकर्णी ( माईसाहेबकर्ते कै. नारायणराव यांचे चिरंजीव ) यांनींही आस्थेने मदत केली आहे. यापैकीं कोणाचे आभार मानणें त्यांना आवडणार नाहीं म्हणून तसा उल्लेख करीत नाहीं.

विशिष्ट मुदतींत ग्रंथाची छपाई होऊन पुस्तक तयार होणें ही एक महत्त्वाची जबाबदारी होती. " नवाकाळ "च्या आमच्या श्रीदत्तात्रय छाप-खान्यांत याच तारखेपर्यंत प्रसिद्ध होण्याकरितां " काकासाहेबांचा लेखसंग्रह भाग २ " आणि " काकासाहेबांच्या आठवणी " अशीं दोन पुस्तकें छापलीं जात असल्यानें या चरित्राची छपाई तेथें ठरलेल्या मुदतींत कशी होणार असा प्रश्न होता. पण या प्रश्नाचा फारसा विचार करावा लागला नाहीं. चित्रशाळा आम्हांस घरच्यासारखीच होती. दे. भ. मामासाहेब देव-गिरीकर, श्री. दामुअण्णा जोशी व श्री. देवकुळे यांना याबद्दल विचारलें असतां त्यांनीं एकदम, "काकासाहेबांचें चरित्र चित्रशाळेंतच छापलें गेलें पाहिजे" असें आपुलकीनें सांगितलें. त्यांनीं किती आस्थेनें, काळजीपूर्वक आणि अल्प-कालांत ठरलेल्या मुदतींत हें काम पुरें केलें आहे हें प्रत्यक्ष पुस्तक पाहूनच सर्वांचे लक्षांत येईल. चित्रशाळेंतील सर्व कामगारबंधूंना याबद्दल मी

धन्यवाद देतों. कव्हरपेजचे चित्र तयार करणारे मुंबईचे कमार्शियल आर्टचे कुशल आर्टिस्ट श्री. चितळे यांनीं परिश्रमपूर्वक सुबक चित्र तयार करून दिलें याबद्दल त्यांचें अभिनंदन करतों.

हा चरित्र–ग्रंथ तयार करतांना आणखी अनेकांचें सहाय्य झालें आहे. त्या सर्वांचाच उल्लेख करतां येणें शक्य नसलें तरी केसरी ऑफिस व लोक-मान्यांचे नातू श्री. जयंतराव टिळक यांनीं ऑफिसांतील माहिती व फोटो देऊन जी मदत केली त्यांचा आभारपूर्वक उल्लेख करणें मी माझें कर्तव्य समजतों. तसेंच मुंबईचे प्रसिद्ध ज्योतिषी श्री. विष्णुनाना गुर्जर यांनीं ती. काकासाहेबांच्या आयुष्यांतील महत्त्वाच्या प्रसंगांचें ग्रहमान दर्शन परि-शिष्टांत घालण्यास दिलें. त्यांचेही आभार मानतों.

या ग्रंथाचा प्रकाशन समारंभ ती. काकासाहेब यांचे सन्मित्र व देश-कार्यातील जन्माचे सहकारी दे. भ. गंगाधरराववजी देशपांडे यांचे हस्तें कै. काकासाहेबांच्या पहिल्या वर्षाच्या पुण्यतिथीच्या दिवशीं होत आहे ही अत्यंत समाधानाची गोष्ट होय !

अशा रीतीनें एका पुण्यश्लोक देशभक्ताचे कविकृष्णाचे अठरा अध्यायी चरित्र दुसऱ्या तशाच देशभक्तांकडून जनतेला मिळत आहे हा अपूर्व योग होय !

याला मी निमित्तमात्र झाला इतकें पुण्य मला पुरें—

ता. २६।८।१९४९ काशिनाथ हरि खाडिलकर

# अनुक्रमणिका


| अ.नं. | प्रकरण नांव | पृष्ठ |
|---|---|---|
| १ | देवकीनें वाहिला । यशोदेनें पाळिला | १ ते १७ |
| २ | जीवनाची घडण | १८ ते ३८ |
| ३ | राष्ट्रदेवतेच्या चरणीं | ३९ ते ५६ |
| ४ | क्रांतीच्या वातावरणांत | ५७ ते ७१ |
| ५ | नेपाळ रहस्य | ७२ ते ९० |
| ६ | राजकारणाची रणधुमाळी | ९१ ते १०९ |
| ७ | संकटांशीं झुंज | ११० ते १३० |
| ८ | महायुद्धाच्या छायेखालीं | १३१ ते १५३ |
| ९ | नाट्याचार्यांचा जयजयकार | १५४ ते १८८ |
| १० | अस्तोदय | १८९ ते २०२ |
| ११ | ॥ मामनुस्मर युध्य च ॥ | २०३ ते २२४ |
| १२ | ॥ न मे भक्तः प्रणश्यति ॥ | २२५ ते २४६ |
| १३ | तपश्चर्येची सांगता | २४७ ते २६७ |
| १४ | आदर्श संपादक | २६८ ते २९० |
| १५ | कृष्णाकांठचें दत्तमंदिर | २९१ ते ३०७ |
| १६ | वैदिक तत्त्वज्ञानाचा प्रसार | ३०८ ते ३२४ |
| १७ | स्थितप्रज्ञ | ३२५ ते ३४२ |
| १८ | मुक्ति | ३४३ ते ३५२ |
| | परिशिष्ट अ कुंडली परीक्षण | ३५३ ते ३५८ |
| | परिशिष्ट ब चिरोलच्या नाटकाबद्दल उतारा | ३५९ ते ३६० |
| | परिशिष्ट क तारीखवार जंत्री | ३६१ ते ३६६ |


✡

## : १ :

# देवकीनें वाहिला । यशोदेनें पाळिला ।



भाग्यवंत तूं बा सह्याद्रि ! पावन शिवप्रभु-चरणांनीं ।
दऱ्यादऱ्यांतुनि वीर प्रसविले, नररत्नांची तूं खाणी ॥
कवि, मुनि, त्यागी, उदरीं तुझिया, प्रकाश त्यांच्या तेजाचा ।
शिरीं शोभतो तुरा कीर्तिचा, जरि-पटका स्वातंत्र्याचा ॥

—नीलकंठ.

स्वातंत्र्य म्हणजे स्वर्गसुख. ह्या स्वर्गसुखाची प्राप्ति आपल्या देशबांधवांना करून देण्यासाठीं आजवर अनेक देशभक्तांनीं आपल्या जीवनाची वात अखंड तेवत ठेवली आहे. वास्तविक पारतंत्र्य म्हणजे शुद्ध नरकवास ! पण या पारतंत्र्यांतही जे कांहीं लोक जन्मले ते एकप्रकारें मोठे भाग्यवंतच म्हटले पाहिजेत. कारण ह्या दुर्दम्य संकटांतून उसळी मारून ज्यांनीं स्वातंत्र्याचें सौभाग्य कमावलें त्यांना दुर्भागी तरी कां म्हणावें ! "परवशता शत गुणें करी जाच ।" ही कव्युक्ति खरी आहे. त्या जाचामुळें सर्वसामान्य मनुष्य साध्या माणुसकीलाही मुकतो व परिस्थितीचा दास बनून स्वार्थांध बनतो. परवशतेचा हा प्रभाव प्रत्यहीं जाणवत असतांनाहि जो आंधळ्या

सामान्य जनतेला हात देऊन स्वराज्य-मंदिराकडे खेचून नेतो तो पारतंत्र्यांत जन्मला असला तरी दुर्भागी कसा? पारतंत्र्याच्या दरींतून स्वातंत्र्याच्या गिरि-शिखरावर नेणारे आघाडीचे वीर म्हणजे स्वराज्याचे बिनीवालेच होत. ह्या बिनीच्या वीरांना भाग्याचें " धनीपण " दिलें पाहिजे.

इ० स० १८५७ ते १८७२ हा काल म्हणजे स्वराज्याच्या पौर्णिमेचा पूर्ण लोप होऊन पारतंत्र्याच्या निबिड अंधःकाराचें साम्राज्य चोहोंकडे पसरलें आहे असा अवनतीचा काळ. पण ह्या अंधाऱ्या रात्रींतहि मार्गदर्शन करणारे तारे चमकत होतेच. महाराष्ट्रांत न्यायमूर्ति रानडे, नामदार गोखले, विष्णुशास्त्री चिपळूणकर, लोकमान्य टिळक असे एकापेक्षां एक तेजस्वी व थोर तारे आकाशांत उदयास येत होते व आशेचे किरण दाखवीत होते. खरोखर ते दैववानच होत. कारण ते परमेश्वरी कार्याकरितांच जन्मले होते. अशा दैववानांतच आमच्या चरित्रनायकाची गणना करावी लागेल.

आमचे चरित्र नायक—म्हणजेच आमचे पितृतुल्य चुलते—ती. कृष्णाजी प्रभाकर ऊर्फ काकासाहेब खाडिलकर. " आदर्श पत्रकार, मराठी नाट्याचे मुगुटमणि व प्रभावी वक्ते" म्हणून ते सर्व महाराष्ट्रांत प्रसिद्ध आहेत. पण सामान्य जनतेच्या ते जे नजरेंत भरले ते त्यांनीं आपल्या आंगच्या वरील सर्व गुणविशेषांना देशाच्या स्वातंत्र्यासाठीं राबविलें यामुळेंच. ' काळोखाचें—अन्यायाचें— पारतंत्र्याचें साम्राज्य सुरू आहे; सावध रहा.' अशा रणदुंदुभी वाजवून झोपी गेलेल्यांना त्यांनीं जागृत केलें. "स्वातंत्र्याची पहाट होणार" असे सनईचे सुस्वर स्वर त्यांनीं सर्वांना ऐकाविले. 'स्वराज्य—सूर्यास नमस्कार करण्यास सज्ज व्हा व उद्योगास लागा.' असा त्यांनीं चोहोंकडे नगारा दुमदुमविला. स्वराज्य—मंदिराच्या गिर्यारोहणाची—स्वातंत्र्याची बिकट वाट स्वतः आघाडीला राहून, बेडरपणें त्यांनीं जनतेला दाखविली. म्हणूनच त्यांना ' दैववान् ' म्हणून जनता मानाचा मुजरा आज करीत आहे. स्वतः स्वार्थत्याग करून जनतेचा स्वार्थ—अर्थात् लोकहित—साधणारा वीर

पुरुष म्हणून जनता आज कौतुकानें त्यांचेकडे पहात आहे. आपण कोणत्या खोल दरींत होतों व आतां केवढ्या उत्तुंग शिखरावर पोहोंचलों आहोंत हें निरीक्षण जनतेनें केलें म्हणजे तर ह्या थोर वाटाड्याबद्दल कृतज्ञतेनें अंतःकरण ज़ास्तच भरून येतें. हें कृतज्ञतेचें निरीक्षण म्हणजेच कवि कृष्णाच्या चरित्राचें स्मरण होय.

काकासाहेब खाडिलकरांचा जन्म पारतंत्र्यांत झाला व मृत्यु 'याचि देहीं याचि डोळां' स्वातंत्र्य पाहून झाला. खडतर आपत्तींशीं झगडा करीत असतां प्रतीत होणारें थोरांचे उज्ज्वल चारित्र्य हेंच त्यांचें चरित्र. या चरित्राला काकासाहेब ज्या खाडिलकर घराण्यांत जन्मले त्या घराण्याची पूर्वपरंपरा व पुण्याई शोभेशी व काकासाहेबांच्या अंगीकृत कार्यास पोषक अशीच होती. शिवछत्रपतींनीं स्थापिलेल्या स्वराज्याचें संगोपन ज्या पेशव्यांनीं कोंकणांतून येऊन केलें त्यांना सहाय्यभूत अशी पटवर्धन प्रभृति कितीतरी घराणी कोंकणांतून घाटमाथा चढली.

## कोंकणचें मूळ घराणें

चढण लीलेनें चढून जाणें हें तर कोंकणच्या लोकांचें वैशिष्ट्य ! सह्याद्रीनें शतकानुशतकें त्यांना हें शिक्षण दिलेलें आहे; किंबहुना सागराचें मीठ चाखणाऱ्या व सह्याद्रीच्या अंगणांत वावरणाऱ्या ह्या लोकांनीं भारत मातेच्या मिठाची खरी चाड राखली आहे हें गेल्या चार पांचशें वर्षांचा इतिहास पाहतांना सहज दिसून येईल. किंबहुना महाराष्ट्राचा सर्व इतिहासच सह्याद्रीनें निर्माण केला आहे. सह्याद्रीच्या झऱ्याचें पाणीच तसें तिखट आहे, आणि तसेंच प्रभावी आहे. सह्याद्रीच्या दोन्ही पाख्यांतून हें पाणी सतत वाहात आहे. हे दोन्ही ओघ एकमेकांत सरमिसळ होऊन एकच वीर्यसंपन्न ओघ होत जातो अशी इतिहासाची साक्ष आहे.

देशाच्या राजकारणांत कोंकणच्या वीरांनीं, बुद्धिवंतांनीं व मुत्सद्यांनीं भाग घेऊन आपल्या तलवारीच्या तसेंच लेखणीच्या तीक्ष्ण धारेनें कालानुरूप

बदल घडवून आणला आहे, राजकारण तेजस्वी बनविलें आहे, लुप्त होत चाललेली परंपरा पुन्हां नव्यानें प्रस्थापित केली आहे व मंद तेज झालेला वीरवृत्तीचा नंदादीप कोळीष्टक झाडून पुन्हा सतेज तेवता ठेवला आहे. देश आणि कोंकण यांचा हा अन्योन्य संबंध ह्याच सह्याद्रीनें अखंड सांधला आहे.

याच सह्याद्रीच्या पश्चिम खोऱ्यांत देवगड तालुका असून त्या तालुक्यांतील नारिंग्रें गांवच्या 'गिरावळ' नामक वाडीमध्यें खाडिलकर घराण्याचें मूळ वसतिस्थान आहे. रत्नागिरी जिल्ह्याच्या देवगड तालुक्यांतील नारिंग्रें गांवानजिकचा हा गिरावळ भाग कोंकणांतील इतर भागाप्रमाणेंच रम्य वनश्रीनें नटलेला आहे. समुद्राच्या खाडीनें हा वेष्टिलेला असल्यामुळें नारळी, पोफळी, फणस, आंबे यांनीं समृद्ध आहे. ह्या खाडीमुळेंच कदाचित् येथें राहणाऱ्या ब्राह्मणांनीं आपणांस खाडिलकर म्हणवून घेण्यास सुरुवात केली असावी. कोंकणच्या राहाणीची पद्धत म्हणजे हांके हांकेवर चारसहा घरें असावीं अशी आहे. कोठें वस्ती थोडी जास्त असली तरी प्रत्येक घराच्या भोंवतीं नारळीचीं झाडें हीं असायचींच. त्यामुळें कोंकणांत कोठेंहि हिंडा, एकाद्या उपवनांतून आपण वावरत आहों असा भास होतो.

आमचा गिरावळ भाग तर वनदेवीचा लाडकाच आहे असें म्हणावें लागतें. सूर्योदयाचे वेळीं ह्या टेकडीचें अगर सूर्यास्ताचे वेळीं ह्या टेकडीवरून सागराचें निरीक्षण करा; वनश्रीची अपूर्व शोभाच सर्वांच्या दृष्टीस पडेल. त्या ठिकाणीं पोटाची चिंता वाटतच नाहीं. 'थोडे श्रम कर कीं तुझ्या पोटाची काळजी घेण्यास मी उत्सुक आहें' असेंच तेथील वनश्रीनें नटलेली भूमाता सांगत आहेसें वाटतें. बालकाला स्तनपान देण्यास माता जशी उत्सुक असते तशीच ही गिरावळची भूमाता फळामुळांचें रसपान आपल्या बालकांना देण्यास नेहमीं उत्सुक आहे असा भास होतो. पोटा-

करितां परावलंबित्व पत्करण्याची कल्पनाच गिरावळसारख्या वनश्रीनें नटलेल्या कोंकण भागांत राहातांना होत नाहीं. स्वावलंबनाचें स्वातंत्र्याचें आल्हाददायक वारेंच तेथें खेळत आहेसें वाटतें. हे कोंकणचे लोक ह्या ओसाड देशावर येतात तरी कां असाही प्रश्न कित्येक वेळां मनांत येतो. पण खरेंच ! मनुष्याला पशूप्रमाणें फक्त पोट तेवढेंच नाहीं. त्याला बुद्धि आहे आणि ह्या बुद्धीचें तेज चोहोंकडे पडावें म्हणून सह्याद्रीचा माथा चढून ते देशावर आले असले तर त्यांत नवल तें काय ?

अशा ह्या निसर्गरम्य कोंकणांतून खाडिलकर मडळी देशावर प्रथम केव्हां आली याबद्दलची निश्चित माहिती अद्याप उपलब्ध झालेली नाहीं. तथापि पेशवाई कालामध्यें खाडिलकर मंडळींनीं देशावर येऊन वैभवप्राप्ति करून घेतली असे पुरावे मिळतात. कर्नाटकांत नरगुंदनजीक खाडिलकर मंडळींनीं लष्करी पेशांतील राजकाजाबद्दल कांहीं जमिनी इनाम मिळविल्या असल्याचा दाखला आहे. तसेंच इतिहासप्रसिद्ध घराण्यांना खाडिलकर घराण्यांतील पुरुषांकडून कर्ज मिळाल्याचे उल्लेख वैद्य घराण्याच्या जुन्या कागदपत्रांतून उपलब्ध झाले आहेत खाडिलकरांचे एक पूर्वज एकदा विजयदुर्गचे किल्लेदार होते अशी माहिती मिळते. तसेच इ. स. १७६९ चे सुमारास पेशवाईकालांत नागपूरकर श्रीमंत मुधोजीराव भोसले यांचे पदरीं ‘ सदाशिव हरी ’ नामक खाडिलकर घराण्यांतील एक पुरुष दिवाणपदावर होते अशी माहिती लागते.

**कर्तबगार वडील**

आपल्या चरित्रनायकांचे आजोबा विष्णुपंत प्रथम कोंकणांतून देशावर आले ते सुमारें शंभर वर्षांपूर्वी. कोल्हापूरच्या रेसिडेन्सींत कांहीं संस्थानी कामगिरीवर ते होते असें सांगतात. यांना दोन मुलगे होते. वडील पुत्र काशिनाथपंत व द्वितीय चिरंजीव प्रभाकरपंत. हेंच प्रभाकरपंत कवि कृष्णाचे वडील होत. पटवर्धनी संस्थानांतील कृष्णाकांठच्या सांगली

जवळील हरिपूर गांवाची 'मोकाशी' खाडिलकर घराण्यानें अगोदरच संपादन केली होती. प्रभाकरपंत प्रथम जे आले ते ह्या हरिपूरच्या खाडिलकरांचेकडे मदतनीस म्हणून आले.

सांगली संस्थानांत त्यावेळीं श्रीमंत तात्यासाहेब यांची कारकीर्द चालू होती. या काळांत जुन्या नव्या जमीन महसूल व्यवस्थेतील फरक व त्याची चौकशी वगैरे कामें नुकतीच सुरू झालीं होतीं. हरीपुरास मोकाशी खाडिलकर यांचेकडे आल्यावर प्रभाकरपंतांना उगार येथील जमीनजुमल्याच्या व्यवस्थेचें काम सांगण्यांत आलें. सांगली संस्थानच्या या नवीन घडामोडींत आपल्या अंगच्या कर्तबगारीला वाव आहे हें बरोबर हेरून त्यांनीं आपले बंधु काशिनाथपंत दादा यांना कोंकणांतून आणून त्यांना उगारच्या व्यवस्थेला नियुक्त केलें; व आपण सांगली सरकारच्या जमीन-महसूल खात्यांत प्रवेश मिळवला. या कामांत त्यांनीं कर्तबगारी पूर्णतया दाखवून दरबारांत आपलें महत्त्व प्रस्थापित केलें. ५।१० वर्षांत लौकिकाबरोबरच थोडी आर्थिक प्राप्तीहि केली. उगार गांवीं एक घर व जमीनजुमला मिळविला. दरबारांत पुढें त्यांचे इतकें वजन वाढले कीं तें सांगली संस्थानच्या "त्रिवर्ग" कारभाऱ्यांपैकीं एक झाले.

खाडिलकर घराण्यांत कर्तबगारीप्रमाणेंच परोपकारवृत्तीही मूलतःच आहे. प्रभाकरपंतांच्या कारकीर्दीचे अगोदर सांगलीस लक्ष्मीबाई खाडिलकर या नांवाच्या बाई गांवांतील गरीब विद्यार्थ्यांना रोज माधुकरी घालीत असत. पुढें गरीब विद्यार्थ्यांच्या अन्नदानाची ही व्यवस्था सरकारनें आपल्याकडेच घ्यावी अशी विनंती त्यांनीं सांगलीकरांना केली व आपल्याजवळचे धान्याचें कोठार त्यांचे हवाली केलें. तेव्हांपासून सांगलीस गरीब व लायक विद्यार्थ्यांना अन्नदानाची (म्हणजे पाटीची) प्रथा सुरू झाली. प्रभाकरपंतांनीं सरकारांना विनंति करून ह्या रमण्यांतील मंडळींना भोजनदक्षणा देण्याची प्रथा सुरू केली. सरकारतर्फे होतकरू मंडळींना मदत करण्याच्या

या कामगिरीचे जोडीस प्रभाकरपंतांनीं कोंकणांतील अनेक विद्यार्थ्यांना आपल्या घरीं आश्रय दिला होता.

प्रभाकरपंतांचा ऊर्जितकाल त्यांचेशीं संबंध आलेल्या सर्वांनाच फार उपयोगाचा होत होता. त्यामुळें त्यांनीं सांगलीच्या अनेक प्रतिष्ठित कुटुंबांतून मानाचा घरोबा निर्माण केला होता. भारतसेवक समाजाचे आजीव सेवक श्री. वामनराव पटवर्धन यांचे वडील श्री. नरसोपंत पटवर्धन, सांगली दरबारचे तैनातदार होते. त्यांची तैनात कांहीं कारणानें बंद झालेली होती. पण ती प्रभाकरपंतांच्या दरबारीं असलेल्या वजनामुळें पुन्हां सुरू झाली. त्या वेळचे दरबारी अधिकाऱ्यांशीं व रानडे, भावे, आपटे वगैरे वजनदार प्रतिष्ठित घराण्यांशीं त्यांचा निकटवर्ती ऋणानुबंध होता.

प्रभाकरपंत सांगलींत—आज ज्याला उकिडवे वाडा म्हणतात—त्या वाड्यांत मालकी हक्कानें राहात असत. ह्या वाड्याला त्या काळीं लक्ष्मीबाईचा वाडा म्हणत असत. मागील चौकांत निम्या भागांत प्रभाकरपंत व उरलेल्या निम्या भागांत रा. नरसोपंत पटवर्धन अशीं दोन बिऱ्हाडें तेथें होतीं. प्रभाकरपंतांना तारुआक्का, हरिपंततात्या व यमूताई अशीं तीन अपत्यें होतीं. प्रभाकरपंतांचें कुटुंब म्हणजे आमची आजी. हिचें नांव नर्मदाबाई असें होतें. व त्या मायदेव घराण्यांतील होत्या. आजीला आम्ही सर्व आईच म्हणत असूं.

### कृष्ण जन्म !

प्रभाकरपंत कोंकणांतून आले व आपल्या बुद्धिवैभवावर त्रिवर्ग कारभाऱ्यापर्यंतच्या मानाला चढले. त्यांनीं आपल्या हातून होईल तितकें जनतेचें हित करण्यांत कसूर केली नाहीं. उगारास शेती संपादन केली. अपत्यसौख्यहीं त्यांना योग्य तें लाभलें. पण असें असतां अगदीं अकल्पितपणें ते स्वर्गवासी झाले. खाडिलकर घराण्याला प्रतिष्ठा आणून देणारा प्रकाशदीप असा एकाएकीं विझला. आणि सबंध घराण्यावर अंधःकाराची

व दुःखाची दाट छाया पसरली. आपलीं मध्यम स्थितींतील घराणीं म्हणजे एकखांबी तंबूच असतात. तो खांब उभा आहे तोंपर्यंत झालरीच्या शामियान्याचें सौंदर्य मनाला रिझवितें. पण तो जर कां उन्मळून पडला तर त्याचे आश्रयास असलेलीं सर्व मंडळी घुसमटून जातात. आमच्या आजोबांच्या आकस्मिक मृत्यूनें हीच आपत्ति आमच्या कुटुंबावर कोसळली.

आजीचें दुःख केवढें मोठें! पदरांत तीन मुलें आणि तशांतच दिवस गेलेले! उगारास शेती होती खरी. पण त्याची व्यवस्था काशिनाथपंतदादांचेकडे होती व त्यांचेकडून उत्पन्न तर कांहीं मिळत नव्हतेंच उलट सरकारसाऱ्यासाठीं सांगलीहून प्रभाकरपंतांनाच रक्कम पाठवावी लागत होती. मग त्याचा तरी आधार कोठला? अशा स्थितींत कालच्या वैभवसंपन्न नर्मदाकाकू आज एकाएकीं निराधार झाल्या! सर्वांत थोरला मुलगा हरिपंततात्या म्हणजे आमचे वडील त्यावेळीं अवघे बारा वर्षांचे होते. ते तरी आईला काय धीर देणार? आजीपुढें अडचणींचे हे डोंगरच उभे होते. त्यामुळें स्वाभाविकरित्या करारी असलेली आजी दुःखामुळें अत्यंत उद्विग्न होऊन गेलेली होती. अशा स्थितींत वडिलांच्या मृत्यूनंतर थोड्या दिवसांनीं (म्हणजे कार्तिक व. अष्टमी शके १८५७, ता. २३।११।१८७२ रोजीं) ती. काकांचा जेव्हां जन्म झाला तेव्हां आईनें—म्हणजे आमच्या आजीनें—आपल्या मुलाकडे पाहिलेंही नाहीं! मातृसुलभ स्तनपानासही मुलगा पारखा झाला!!

वास्तविक दोन मुलींवर झालेला मुलगा म्हणून तो आईचा जास्तच लाडका असायचा; पण तोच जन्मापूर्वीच बापाच्या मुळावर आला असें जेव्हां मातेला दिसलें तेव्हां अशा मुलाच्या संगोपनांत एक तऱ्हेची उद्विग्नता आली असली तर ती त्या प्रसंगाला धरूनच होती. योग असा कीं ज्यानें पुढें नवरसपान मुक्तकंठानें सर्वांना करून दिलें त्याला स्वतःला मातेचें स्तनपान करावयास मिळणें जन्मल्यावेळींच मुष्किलीचें झालें. केवढा हा दैवविलास!

त्या बिचारीला काय माहीत कीं पतिनिधनाच्या दुःखामुळें ज्या अर्भकाचीं आपण आबाळ करीत आहों, तेंच बाळ सर्वांची काळजी वाहणारें व सर्वांना प्रिय असें ठरणार आहे. "पुत्र व्हावा ऐसा गुंडा, ज्याचा तिन्ही लोकीं झेंडा" अशा पुत्राचें मुखकमल पाहतांना मातेला स्वर्ग सुखाचा लाभ व्हावा; पण विधिघटनाच अशी कीं तीच चांगली गोष्ट उणेपणाची ठरली.!! ज्याच्यावर श्री व सरस्वतीनें वरदहस्त ठेवावा असा विधिसंकेत तोच जन्मतःच मातेच्या दुग्ध-पानालाही पारखा झाला ! ! दैवविलास म्हणतात तो हाच ! जें ज्याच्या हक्काचें तेंच त्याला मिळूं नये हाच तो योगायोग !!

अशा परिस्थितीमुळें आईनें जरी मुलाकडे पाहिलें नाहीं तरी त्यास दुसरी आई तावडतोब मिळाली. पटवर्धन मंडळींचें बिऱ्हाड शेजारींच होतें. हीं दोन कुटुंबें जवळजवळ एकाच घरचीं असल्यासारखीं राहात असत. वामनराव पटवर्धनांचा जन्म नुकताच दोन महिन्यांपूर्वी झाला होता. त्यांच्या मातुश्री सौ. मनूकाकू त्यावेळीं अजून बाळंतीण ह्या सदरांतच होत्या. आमच्या आजचें काकांच्या संबंधीचें वागणें पहातांच त्यांनीं नूतन अर्भकाला आपल्याकडे घेतलें व वामनराव पटवर्धनांचा जणूं जुळा भाऊ अशा रीतीनें स्तनपानादि त्याचें सर्व संगोपन त्यांनीं बराच काळपर्यंत केलें. ह्या घटनेचा मानसशास्त्रदृष्ट्या आपल्या मनावर परिणाम झाल्याचें काकांनीं आपल्या आत्मनिवेदनपर आठवणींत लिहून ठेविलें आहे. यामुळें पुढच्या आयुष्यांत छोट्या कृष्णाला एका घराऐवजीं दोन घरें आपलीशीं वाटूं लागलीं, व हा वामन-कृष्णाचा बंधुभाव जन्मभर टिकला.

## ओढाताणीचा संसार

प्रासंगिक आलेली आईच्या मनाची उद्विग्नता लौकरच ओसरली. कृष्णा तिच्यासह सर्वांचा लाडका झाला. कारण मन उद्विग्न झालें होतें तें थोडेंच कृष्णामुळें होतें ? सायंकाळच्या सुमारास एकाएकीं वीजप्रवाह बंद व्हावा, तसें तिच्या संसाराचें झालें होतें. प्रभाकरपंतांचें निधन ते भरभराटीच्या

शिंगेवर असतां झालें व अगदीं अकल्पित झालें ! निधन प्रसंगीं सांगलीच्या कारभाऱ्यांपैकीं ते एक होते. आईच्या पुढ्यांत जशीं चार छोटीं मुलें होतीं तशी ही घराण्याची मोठी प्रतिष्ठाही होती. ती टिकवून धरून संसार धकून नेण्यास तिच्याजवळ घराशिवाय काय होतें? त्यामुळें वैतागानें आलेली ती उद्विग्नता होती. वास्तविक प्रत्येक मनुष्यानें जरा पुढचा विचार करून राहिलें पाहिजे. पण आपल्या मृत्यूशीं आपल्या कुटुंबाचा निकटचा संबंध आहे हा विचार जुन्या काळीं योग्य तऱ्हेनें क्वचितच केला जात असे. सर्व गोष्टी ज्याच्या त्याच्या दैवाप्रमाणें होत असतात आणि तशाच त्या होत राहणार; हीच सर्वांची विचारसरणी मग प्रभाकरपंत त्याला अपवाद कसे ठरणार ?

प्रभाकरपंतांना या बाबतींत दोषही देतां येत नाहीं. त्यांनीं आपल्या-परीं उगार गांवास भरपूर शेती विकत घेतली होती व सांगलीस मालकीचें घर होतें. असें असलें तरी आईच्या डोळ्यांपुढें पूर्ण काळोखच होता. कारण उगारची शेती असली तरी ती सर्वथा थोरले दीर काशिनाथपंतदादा यांच्या व्यवस्थेखालीं होती व आजपर्यंत त्या शेतींतून सांगलीपर्यंत उत्पन्न तर कांहींच येत नसे. राहतां राहिलें सांगलीचें घर ! महिनेमहाल घरीं येणारी मिळकत बंद झाली. त्यामुळें उपाशी शरीराचा व्यापार जसा स्नायूमध्यें सांठविलेल्या शक्तीचा घांस घेत घेत चालतो तसाच नर्मदाकाकूंचा घर-संसार यापुढें चालणार होता हें उघड होतें. त्याप्रमाणें ताबडतोब कर्ज काढून तिनें जरी संसाराचें काम चालू ठेवलें तरी हा तुटपुंजा आधार आपणांस पैल तीरावर नीट रीतीनें नेईल ना? ही शंका तिच्या मनांत गडद अंधार निर्माण करीत होती.

अशा परिस्थितींत आजीनें आपला संसार फार धीरानें व कौशल्यानें चालविला. तिचा एक आधार, प्रभाकरपंत व स्वतः तिनें सांगलीस जोडलेलीं माणसें व त्यांच्याकडून संपादिलेलें प्रेम हा होय. पटवर्धन, गद्रे,

काळे, रानडे, बिवलकर कारभारी वगैरे प्रभाकरपंतांच्या अनेक मित्र मंडळींनीं आईला सर्व तऱ्हेनें धीर दिला व पुढच्या तिच्या संसारांत तिला हरएक प्रकारची मदत केली. पहिला मोठा प्रश्न तारुआत्याच्या लग्नाचाच होता. तो या ऋणानुबंधी मंडळीमुळें सुलभतेनें सुटला.

तारुआक्काचें वय वडील वारले त्या सुमारास सुमारें १० वर्षांचें होतें. जुना काळ लक्षांत घेतां मुलगी मोठी झालेली! तिचें लग्न हा आईचा निकटचा हृद्रोग होता. रानडे घराणें फार श्रीमंत म्हणून त्यावेळीं प्रसिद्ध होतें. प्रभाकरपंत शेवटीं आजारी असतांना एक दिवस श्री. दाजी रानडे आपला मुलगा बाळकृष्णपंत याच्या लग्नाची अक्षत देण्यासाठीं त्यांचे घरीं आले. हें लग्न अकस्मित ठरलें होतें. अक्षत घेत असतां प्रभाकरपंत म्हणाले, "बाळकृष्णाचें लग्न? अरे! मी तर आमच्या तारीसाठीं तुम्हांला विचारणार होतों!" पुढें हें लग्न झाल्यानंतर थोडयाच दिवसांत प्रभाकरपंत वारले व बाळकृष्णपंताची पत्नीही वारली. दुसऱ्या लग्नाचा प्रश्न पुढें उभा राहिला. तेव्हां प्रभाकरपंतांबरोबर झालेली वरील जुनी भाषा लक्षांत ठेवून श्री. दाजी रानडे यांनीं नर्मदाकाकूंच्याकडे निरोप पाठवून तारुबाईस आपण सून करून घेण्यास तयार असल्याचें सुचविलें व खरोखरीच त्याप्रमाणें त्यांनीं तिला आपली सून करूनही घेतली.

## हूड बालपण

आजीचा आणखी आधार म्हणजे तिचीं गुणी मुलें. थोरले चिरंजीव हरिपंत फारच सज्जन व शांत स्वभावाचे होते. त्यांच्या गोड सरळ स्वभावाची छाप कोणावर पडली नाहीं असें होत नसे. गणपतराव फडके, कोल्हटकर, तात्या केळकर, धोंडोपंत गोडबोले, गणपतराव कमतनूरकर ही त्यांची सहाध्यायी मंडळी. या मंडळींत तात्या थोर मनाचे म्हणून फार प्रिय होते. त्यांनीं पुढें आपल्या आयुष्यांत आपल्या अंगच्या सौजन्य, नेकी, दिलदारपणा व लोकांस उपयोगी पडण्याची वृत्ति 'इत्यादि गुणांवर

इतकी पुण्याई मिळविली कीं, तिचा आधार आजही आम्हां सर्व कुटुं-बियांना सदोदित प्रतीत होत असतो. मुलांच्या या गुणी स्वभावामुळें आईनें अडचणीच्या संसारांत मुलांचें, जसें होईल तसें, पोषण केलें तरी त्यांची कधींही तक्रार नसे.

छोटा हूड कृष्णा, याची मात्र क्वचित् तक्रार असे. उदाहरणार्थ एक प्रसंग सांगतां येईल. त्या काळीं भाकरी दुधांत केली म्हणजे ती निर्लेपांत चालत असे व ती भाजतांना तव्यावर पिठाकडून टाकीत असत. तिला पांढरी दशमी म्हणत असत. ही दशमी स्त्रियांना सोवळ्यांत चालत असे. ज्यांच्याकडे दूधदुभतें मुबलक त्यांच्या घरीं मुलांना मधल्या वेळीं खाण्यासही ह्या पांढऱ्या दशम्या नेहमीं मिळत. काकांचा मुक्काम वामनराव पटवर्धन यांच्या घरीं कायमचा असल्यानें तेथें त्यांना ही पांढरी दशमी नेहमीं मिळे. पण आईच्या संसारांत असें कुठें असणार ? "पटवर्धनांच्याकडे पांढरी दशमी आणि आम्हांला मात्र खा लाह्याचें पीठ !" अशी काका नेहमीं आईबरोबर तक्रार करीत ! पाण्यांत तयार केलेली भाकरीही पिठाकडून टाकली म्हणजे पांढरी दशमी होते ही सोपी आधुनिक रीत आईस माहीत नव्हती व त्या काळीं ती पटणारीही नव्हती !

काकांचें मराठी शिक्षण विष्णूच्या घाटावरील प्रसिद्ध दादा छापखाने यांच्या शाळेंत झालें. अभ्यासांत हुशार पण इतर वागण्यांत फार हूड अशी त्यांची ख्याति होती. त्या शाळेंत हस्ताक्षर व गणित विषय यांचें शिक्षण विशेष चांगलें देत असत. वामनराव पटवर्धन, गणपतराव अभ्यं-कर, यशवंतराव कोल्हटकर, वारखणकर जोशी, कृष्णराव दिवाण, काशी-नाथभट केळकर वगैरे माकण गल्लींतील बरींच मुलें त्यांचे या कालांतील सहाध्यायी होते. शाळा सुटल्यावर, अंघोळीच्या वेळीं कृष्णा नदीवर आणि पुन्हां सायंकाळीं आट्यापाट्या हुतुतू खेळण्यासाठीं वाळवंटांत असे हे बालमित्र नेहमीं एकत्रच असत. त्यावेळीं नळ नव्हते म्हणून नदीवर

स्नानास जाणें व कपडे तेथेंच धुऊन येतांना एकादी पाण्याची घागर घरीं आणणें हा थोरामोठ्यांच्या बायकांचाही नित्याचा क्रमच असे. शाळेसाठीं क्रीडांगणें अशीं त्यावेळीं नव्हतीं. त्यामुळें कृष्णाबाईचें वाळवंट सायंकाळीं शाळेच्या खिलाडू मुलांनीं फुललेलें असे व रात्रीं मुलें घरोघर परत गेलीं म्हणजे त्यांच्या आट्यापाट्यांच्या मनमुराद खेळामुळें जिकडे तिकडे वाळवंटांत गुढग्याइतके खड्डे पडलेले दिसत असत.

काकांचा स्वभाव लहानपणापासून फार हट्टी व तापट असे. पण म्हणून कीं काय आईचें प्रेम त्यांच्यावर सर्वांत अधिक असे. मातेच्या प्रेमाची ही उलटीच रीत आहे. अपत्य जितकें हूड, दांडगे, लोकविलक्षण, तितकी तिची त्याच्याबद्दलची आस्था अधिकाधिकच होत जाते. त्याच्या द्वाडपणामुळें तो चुकेल, फसेल, दुसऱ्यांना गोत्यांत आणील, आपण संकटांत सांपडेल, त्याला खावयास मिळणार नाहीं, त्याला कोणी विचारणार नाहीं अशा अनेक आपदा ती मनानेंच निर्माण करते. 'अतिस्नेहः पापशंकी' हेंच खरें ! त्या प्रत्येक संकटाच्या जाळ्यांतून त्यास मनानेच बाहेर काढून त्यास कोणत्यांही तऱ्हेचा चटका बसूं नये म्हणून आपल्या अमृततुल्य प्रेमानें त्यास सतत ती न्हाऊं घालीत असते.

छोट्या काकांचा हट्ट व आडदांडपणा सर्वांच्या विशेष ध्यानांत येई. आईच्या तर तो नित्याच्या परिचयाचा होता. 'हा शनेश्वर ऐकेल तर शपथ !' असें एक तऱ्हेनें कौतुकानें व एक तऱ्हेनें रागानें म्हणण्याचा आईवर नेहमीं प्रसंग येत असे. हरिपंत तात्यांचे खेरीज ते कोणालाच जुमानीत नसत. 'कृष्णा नकोरे असं करूं !' अशीं आर्जवें करितां करितां आईच्या नेहमीं नाकीं नऊ येत. एकाद्या गोष्टीचा नाद घेतला कीं जेवणाखाणाचें सुद्धां त्यांना भान राहात नसे. खेळण्याबागडण्यामुळें जेवायला वेळेवर न येण्याबद्दल वरचेवर आईकडून ते रागें भरून घेत असत. एकादेवेळीं आई त्यांना शिक्षा म्हणून कोंडूनही ठेवी. पण या गोष्टीची त्यांच्या मानी मनास चीड येत असे.

एकदां तर कोंडून घालण्याच्या शिक्षेविरुद्ध एकप्रकारें सत्याग्रह करण्याचे त्यांनीं ठरविलें. आईनें कोंडून घालतांच त्यांनीं खोलीला आंतून कडी घालून घेतली. मुलाला शिक्षा केली खरी पण किती झाले तरी आईचें आंतडें होतें तें! मूल जेवल्याशिवाय आई जेवेल कशी? आईच्या हृदयाची ही गुरुकिल्ली एवढ्या लहानपणींही त्यानें ओळखली. तास झाला दीड तास झाला तरी कृष्णा 'कडी काढ' म्हणत नाहीं तें कां? हें आईला समजेना. मुलगा उपाशी राहिलेलाही पाहवेना; तेव्हां 'पुन्हां असें वागणार नाहीं असें कबूल कर म्हणजे कडी काढतें' असें तोंडानें म्हणत ती कडी काढून दार उघडूं लागली. तों दार आंतून बंद! तेव्हां 'अरे कृष्णा–तुला भूक लागली नाहीं कां? दार उघड'–असें आई म्हणूं लागली. आंतून अगदीं शांतपणें उत्तर आलें 'तूं जेवून घे–मग मी दार उघडेन!' मुलाला उपाशी टाकून आई जेवेल कशी? 'तू जेव मग मी जेवीन. काढ कडी' असें आईनें म्हणावें व 'तूं जेवल्यावरच मी कडी काढेन' असें कृष्णानें आंतून उत्तर द्यावें असा क्रम चालला होता. शेवटीं आईनेंच 'बाबा चुकलें मी' असें कबूल केलें' तेव्हांच स्वारीनें कडी काढली व जेवण केलें.

तारुआत्याचें लग्न झाल्यानंतर क्रमानें हरिपंत तात्यांचें लग्न झालें. संस्थानी दरबारांतील प्रसिद्ध नारोपंत आपटे यांची पुतणी म्हणजेच त्यांचे धाकटे बंधु श्री. वामनराव आपटे यांची मुलगी अंबुताई इच्याशीं त्यांचा विवाह झाला. पुढें यमूताईचें लग्न आद्य नाटककार विष्णुदास भावे यांचे द्वितीय चिरंजीव गणपतराव भावे यांच्याबरोबर ठरलें. त्यावेळीं नाटकें व नाटककार यांच्याबद्दल आजच्याप्रमाणें प्रतिष्ठा नव्हती. पण विष्णुदासांनीं सरकारदरबारीं नांव कमावलेलें व मुलगाही गायनकला व चित्रकला यांत निष्णात! यामुळें सर्वांच्या मतें स्थळ योग्य असें वाटलें व महाराष्ट्राचे भावी शेक्सपियर काकासाहेब खाडिलकर यांची बहीण मराठी नाट्याचे भरतमुनी विष्णुदास भावे यांच्या चिरंजीवास देऊन या दोन नाटककारांचा संबंध घरोब्याचा झाला.

## पुराणश्रवणाचा नाद

आईवरची अशी एक एक जबाबदारी कमी होत होती तर कर्ज तितकेंच वाढत जात होतें. आणि तितकीच तिची काळजीही वाढत होती. तिच्या मनाला विरंगुळा व आधार यावेळीं एक ईश्वरभक्तीचाच होता. प्रभाकरपंतांच्या पासूनच घरांत श्रीदत्ताबद्दलचा भाव फार तीव्र असे. त्यानीं स्वतःच्या हातानें सबंध गुरुचरित्र लिहून तीच पोथी आपल्या नित्य पाठास ठेवली होती. काशिनाथपंत दादांचे द्वितीय चिरंजीव बाबुअण्णा यांचें लग्न झालेलें नव्हतें. ते दत्तभक्त होते. त्यांच्या नरसोबाच्या वाडीस नित्य खेपा होत व त्याचे बरोबर कृष्णाजीपंतकाका पुष्कळ वेळ देवदर्शनास जात असत.

आईचा पुराण श्रवणाचा क्रमही भावपूर्ण व बिनचूक चालत असे. तिच्याबरोबर पुराणास काकाही हजर असत. पण पुराणिकबुवांचें कथन नीरस वाटून ते बाहेर बागेंत खेळण्यास गेले तरी रात्रीं आईकडून त्या दिवशींचा पुराणाचा सर्व भाग रसभरित रीतीनें ऐकल्याशिवाय ते कधींही निजत नसत. या त्यांच्या पुराण श्रवणासंबंधींचा विषय काकांनीं आपल्या स्वतःच्या आठवणींत सांगितला आहे तो त्यांच्या भावी पौराणिक नाटककार या नात्याच्या कीर्तीचें बीज स्पष्ट करून दाखवीत असल्यामुळें फार उद्बोधक आहे. काका म्हणतात,

" आई ज्यावेळीं पुराणांतील गोष्टी सांगे तेव्हां मूळ कथेंत कोठें कांहीं अस्पष्टपणा असेल, अगर न्यून असेल तर रसाळपणाच्या जोरावर ती सफाईनें तें सर्व भरून काढीत असे. मी महाभारत वाचतांना माझ्या बुद्धीला महाभारतांत स्पष्ट नमूद नसलेल्या गोष्टी दिसत. पण ही प्रेरणा कां होते हें मात्र मला समजत नसे. पुढें माझे ध्यानीं आलें कीं, माझ्या लहानपणीं आईनें सांगितलेल्या गोष्टींचा ठसा माझे कोवळ्या मनावर उमटूं लागला, त्यामुळें

जोरकस पणाच्या काव्याचे माझे मनावर संस्कार झाले. आईनें केलेल्या रसभरित वर्णनांत त्याचा उगम आहे."

परमेश्वरावर भार टाकून शक्य तितक्या कौशल्यानें नर्मदाकाकू ऊर्फ आजी संसाराचा भार अशा रीतीनें रेटीत नेत होती. इतकेंच काय यांतच तिनें काकांची मुंजही करून टाकली होती.

काशिनाथपंत दादा उगारकडची शेती पहात. पण त्यांचें पहाणें म्हणजे सर्व जुन्या पद्धतीचें. एकतर हे मोठें म्हणून यांचेकडून खेड्यांतल्या सर्वांनीं शक्य तो आपला फायदा करून घ्यावा! दुसरें घरचें धान्य विकायाचें नाहीं अशी त्यांची समजूत. मग उत्पन्न तरी कसें येणार! कधीं मधीं कापसासारखें पीक. उत्पन्नासाठीं काढलें तर त्याच्या विक्रींत तीन तऱ्हा होत. एका खेपेस कापूस चांगला पिकला व त्यास गिऱ्हाईकही घरीं चालून आलें. भाव उत्तम होता. व्यापारी कापसाच्या किंमतीच्या सोन्याच्या लगडी घेऊनच घरीं आले. पण दादांना त्याहून जास्त दर येईल असें वाटलें. "मी गदगच्या बाजारांत जाऊन कापूस विकला तर मला दुप्पट पैसे येतील" असें म्हणून घरच्या बायकांचा आग्रह असतांही त्यांनीं घरीं चालत आलेल्या सोन्याच्या लगडी अव्हेरल्या. पुढें जास्ती दराची वाट पाहून थकल्यावर गाड्या घेऊन दादा गदगास पोंचले खरे! पण भाव एकाएकी पार उतरून गेल्यामुळें कापसाला अत्यंत कमी किंमत आली. गाडीभाड्याचा खर्च उलट डोक्यावर बसला. तो वजा जाता जी थोडी रक्कम हातीं पडली त्याची घरच्या बायकांना लुगडीं व केरसुण्या घेऊन दादा गदगाहून परत फिरले!

## तात्यांचा आधार

दादांच्या अशा व्यवस्थेंत शेताचा सरकारी साराही भरणें त्यांच्या हातून होत नसे. प्रभाकरपंत होते तोंपर्यंत तो ते स्वतः भरीत. पण त्यानंतर शेतसारा थकत चालला व दोन तीन वर्षांवर ही बाकी थकल्यानें, केवळ

## काकासाहेब खाडिलकर यांच्या कुंडल्या.

### सायन

२ राहू
१२
लग्न १
३
११
०
४
१०
५ गुरु
७
९ शनी शुक्र बुध
६ चंद्र मंगळ
८ सूर्य केतू

### निरयन

मिथुन १७-४४ राहू ३-१६-०४"
नेप्च्यून २३°-५७' मेष १४°-४२'
लग्न वृषभ २०°-११'-३८" प्लूतो (व) ११°-२७'-०८" ०१°सूचं १-३४"
कर्क १३°-४३'
श्री १५°-०७'-१६" मीन ९°-४५'
सिंह ९°-४३'-१७" हर्शल (व) ०५°-५०'-१"
दशम कुंभ ९°-४३'-१७"
कन्या ९°-४५' गुरु ००-४४'-५५" चंद्र २८-२९-23"
२०°-११'-३८" वृश्चिक १°सूच १-३४"
शनी १८°-९'-५४" मकर १३°-४३' शुक्र ७°-८'-३३"
तूळ १४°-४२' मंगळ ००°-८'-१९"
१७°-४४' धनु केतु ३°-१६'-०४" सुर्य ०३°-३३'-४५" बुध २४°-५६'-३७"

या कुंडल्यांतील ग्रहयोगांबाबत व सर्वसाधारण पत्रिकेबाबत मुंबईचे प्रसिद्ध ज्योतिषी विष्णु नाना गुर्जर यांनीं लिहिलेलीं टिपणें व फलाचिकित्सा **परिशिष्ट** अ मध्यें दिली आहे.

# गिरावळ(नारिंग्रे)चे खाडिलकर यांचा वंशवृक्ष.



सरकारसाऱ्याच्या पायीं उगारच्या जमिनींचा लिलाव झाला इतकें सर्व झालें तरी आई अगर हरिपंततात्या यांनीं याबद्दल कधींही तक्रार केली नाहीं. काशिनाथपंत दादा यानंतर सांगलीस आले म्हणजे त्यांना घरीं येण्यास ओशाळे वाटे. पण तात्या त्यांना आग्रहानें घरीं आणून त्यांचा मान राखीत असत.

सांगलीच्या घराचा लिलाव पूर्वीच झाला होता.व नारायण नाईक उकीडवे यांनीं घर ताब्यांत घेतलें होतें. येवढ्यांत हरिपंततात्या मॅट्रिक पास झाले. त्यांची पुढें शिकण्याची उमेद होती. कोल्हापूरच्या हायस्कुलांत हुषार विद्यार्थ्यांत त्यांची गणना होती. पण आतां त्यांना आईच्या मदतीस धांवून येणें जरूर होतें. तिनें आतांपर्यंत खूप कष्ट सोसले होते,—खूप दम धरला होता. यापुढें स्वतःच्या पुढच्या शिक्षणाबद्दलचा विचार करणें त्यांना शक्यच नव्हतें. नोकरी धरून आईच्या संसाराला मदत करावयाची हें एकच ध्येय त्यांच्या नजरेसमोर होतें. मॅट्रिक झाल्याबरोबर त्रिवलकर कारभाऱ्यांनीं त्यांना ताबडतोब सांगलवाडीस मास्तर म्हणून नेमून टाकलें. आणि अशा रीतीनें मिळवत्या झालेल्या आपल्या ज्येष्ठ पुत्रावर दमल्या भागलेल्या मातेनें एका अर्थी आपल्यावरचा संसाराचा भार—विशेषतः काकांच्या शिक्षणाचा भार सोपवून टाकला.



: २ :

# जीवनाची घडण.



**भवोहि लोकाभ्युदयाय तादृशाम् ॥**

कालिदास.

आईनें धीरानें दिवस काढले व हरिपंततात्यांचें शिक्षण पुरें करून त्यांना मिळविता केलें हें कांहीं लहानसहान काम नव्हतें. तात्यांचेंच काय पण आपल्या दोन्ही मुलींचीं लग्नेंही तिनें केलीं होतीं. दिवसानुदिवस संसार वाढतच होता. कृष्णाचें शिक्षण तर अजून पूर्ण व्हावयाचें होतें. आपण आपल्या कर्तृत्वावर नोकरींत लौकरच उत्तम नांव काढूं असा हुषार म्हणून नाणावलेल्या हरिपंतांना जरी विश्वास होता तरी कुटुंबाचा बोजा, कृष्णाचें शिक्षण व त्यांचा त्यावेळचा पगार या तिन्ही संकलित विचारांमुळें आईच्या मनांत कधींमधीं काळजी उत्पन्न होई. पण तात्या स्वतः त्या काळजीचें तात्काळ निरसन करीत असत. 'मी कृष्णाचें शिक्षण करीन' हें वाक्य त्यांच्या जीवनाचें जणु ध्येयवाक्यच होतें. आपल्या बंधूवर त्यांचें अकृत्रिम

प्रेम होतें. उलट छोट्या कृष्णाची तात्यांच्याबद्दलची भक्ति अलौकिक होती. क्रोधाविष्ट झाल्यावर सर्व पृथ्वीचा दामटून शाडूचा गोळा बनविण्याची भाषा बोलणारा भीम ज्याप्रमाणें धर्मराजापुढें उभा राहिला म्हणजे एकदम शांत होत असे तशी अक्षरशः काकांची स्थिति होती. काका रागावले म्हणजे इतरांनीं पराकाष्ठा केली तरी त्यांचें ऐकत नसत व जेवण्यासही येत नसत. पण तात्या आले आणि त्यांनीं "कृष्णा, जेवायला चल" येवढें नुसतें म्हटलें कीं ते अगदीं ताबडतोब पाटावर बसत असत. इतरांशीं वागणारे काका आणि तात्यांशीं वागणारे काका असा हा फरक सर्वांच्या चर्चेचा व आश्चर्याचा विषय नेहमींच होई.

तात्यांना प्रथम प्राथमिक शाळेंत नोकरी लागली. पण पुढें लवकरच त्यांना चांगली बढती देऊन हायस्कुलांत मास्तर म्हणून सांगलीस आणण्यांत आलें. छोटा कृष्णाही याच सुमारास हायस्कुलांत दाखल झाला होता. हायस्कुलांतील शिक्षकवर्ग फार चांगला होता. सर्व शिक्षक मेहनतीनें व दक्षपणानें मुलांना शिकवीत. म्हणून त्या कालच्या विद्यार्थ्यांत बहुश्रुतपणा व विषयज्ञान बऱ्याच वरच्या दर्जाचें असे. हायस्कुलांत आल्याबरोबर सुरवातीलाच सुप्रसिद्ध न्यायशास्त्री भिकूशास्त्री गोडबोले यांचे चिरंजीव आप्पाशास्त्री यांच्या शिक्षणाचा लाभ काकांना झाला. विद्यार्थी कृष्णाच्या मराठी भाषेची घडण अशा अधिकारी विद्वानाचे नजरेखालीं झाल्यामुळें त्यांच्या भाषेला घाटदार स्वरूप आलें.

## नाटकांचा छंद

हायस्कूलच्या शिक्षणाची कमान अशी वरवर चढत होती; तर इकडे नाटकें बघण्याचा कृष्णाचा नाद वाढतच होता. आतां खाडिलकरांचें बिऱ्हाड कोल्हटकर वाड्यांत व पटवर्धनांचें बिऱ्हाड कुंटे यांच्या वाड्यांत आलें होतें. त्या वाड्याच्या चौकांतील सोपा खूप मोठा व पुढें विस्तीर्ण अंगण, यामुळें कोणी नाटक मंडळी आली म्हणजे तिचे खेळ या वाड्यांत होत

असत. अगर जुन्या मुरलीधराचे देवळांतही नाटकें होत असत. तिकीट वगैरे कांहीं नसे, पण सूत्रधाराशेजारीं एक मोठें ताम्हन अगर ताट ठेवलें जात असे. त्यांत वाटेल त्यानें वाटेल तेवढी रक्कम टाकावी. चांगली कंपनी असली व खेळ लोकप्रिय झाला तर जमलेल्या चिल्लरीनें कधीं घागरही भरत असे असें म्हणतात.

कोल्हटकरांच्या वाड्यांच्या दोन बाजूंस या दोन जागा आहेत. आणि कधीं असेंही होई कीं दोन्ही वाड्यांत एकदम नाटकें चालत. कृष्णाला नाटकाचा फार नाद. त्यानें हमखास नाटकाला जावें. हीं मुलें अशीं नाटकाच्या नादाला लागलीं म्हणजे त्यांच्या मातांच्या छातींत अगदीं चर्र होत असे. एकादे दिवशीं मुलें नाटकांत पळून तर जाणार नाहींत ना ? अशी धास्ती त्यांना नेहमीं वाटत असे, त्यामुळें आईही कांहीं प्रसंगीं कृष्णाला नाटकाला जाण्यास बंदी करी.

याबाबतची त्यावेळची एक आठवण त्यांच्या स्वभावविशेषाची निदर्शक आहे. नाटकाचे ते इतके नादी कीं त्यांना एकदां आईनें नाटकास जाऊं दिलें नाहीं त्याचा त्यांना फारच राग आला व वड्याचें तेल वांग्यावर म्हणतात त्याप्रमाणें तो त्यांनीं बहिणीला त्रास देऊन उगवून घ्यायचें ठरविलें. बहीण बाळंतीण होती, त्या खोलींत ते गेले. तेथें एक मोठी पेटी होती व त्याला एक मोठें कुलूप होतें. तें कुलूप त्या पेटीवर 'धाड् धाड्' आपटण्याचा उद्योग स्वारीनें सुरू केला. अर्थात् बाळंतिणीला त्याचा उपद्रव फार होऊं लागला. तसें न करण्याबद्दल त्यास आईनें लोभावून सांगून पाहिलें, रागावून सांगून पाहिलें; पण त्यानें 'धाड् धाड्' कुलूप आपटणें चालूंच होतें. 'मला नाटकाला जाऊं दिलें नाहींस! थांब, अस्सा तुझ्या यमूला छळीन!' असें तोंडानें म्हणावयाचें व धाड्दिशीं कुलूप आपटावयाचें असा त्याचा क्रम सुरू होता. शेवटीं सर्वांना 'दे माय धरणी ठाय' असें त्यानें करून सोडलें, तेव्हां स्वारी थांबली!

नाटकें पाहण्याचा हा असा नाद, अचूक स्वभाव-परीक्षा आणि वर्गातील अभ्यासू वृत्ति या तीन गोष्टींची गुंफण 'बाल' कृष्णाच्या मनांत त्या लहान वयांतही वेगानें चालू होती. त्याचें दृश्य स्वरूप तो इंग्रजी तिसऱ्या इयत्तेंत असतांनाच एका छोट्या नाटकाच्या रूपानें बाहेर पडलें. पण या वयांतील अभ्यास सोडून नाटकें लिहिण्याची ही प्रवृत्ति वडील मंडळींना तितकीशी आवडली नाहीं व वर्गावरील नवे शिक्षक रा. बापू सरदेसाई यांनीं कृष्णास तसें दर्शविलें. त्यामुळें हें नाटक काकांनीं बाजूस टाकलें व पुढें ते अग्निमुखीं पडलें. कलमी आंब्याचें झाड लावून जरा मोठें झालें म्हणजे त्यास फळें येऊं लागतात. पण पुढें फलसंभार चांगला व्हावा म्हणून हीं पहिलीं फळें अकालींच तोडून टाकण्याची पद्धत आहे. बाल-वयांतील पहिली नाट्यकृति अशारीतीनें खुडून काढण्यांत छोट्या कृष्णाच्या भावी नाट्यवैभवाला वडील मंडळींनीं अनाहूतपणें हा हातभारच लावला असें म्हणण्यास हरकत नाहीं. नाहींतरी पहिली कृति देवाला अर्पण करण्याची भाविक पद्धत आहेच. काकाही तसेंच समजत होते.

## हुषार विद्यार्थी

रा. श्रीनिवास भिकाजी ऊर्फ बापू सरदेसाई यांची हायस्कुलांतील नवी नेमणूक कृष्णाच्या जीवनाचे दृष्टीनें फार महत्त्वाची आहे. श्री. सरदेसाई तरुण, तरतरीत व हुषार शिक्षक होते. त्यांचा पुण्यांतील नवीनच स्थापन झालेल्या 'न्यू इंग्लिश स्कूल'च्या संस्थापकाशीं व कार्यकर्त्यांशीं अगदीं निकटचा संबंध होता. सांगलीस येण्यापूर्वी त्यांचा बराच काल पुण्यांत व कोल्हापुरांत गेला होता. पुण्याचें वारें प्यालेले ते होते. यांच्या शिक्षणानें विद्यार्थ्यांची दृष्टि विस्तृत होत असे. शिकवण्याचे बाबतींत बापूसाहेब दक्ष असत. विद्यार्थ्यांचें लक्ष देशाच्या राजकीय परिस्थितीकडे वेधून त्यांचे अंतःकरणांत देशप्रेमाची—देशसेवेची प्रेरणा होईल असें जिवंत शिक्षण ते देत. त्यांचें शिकवण्यांत ज्वलंतपणा होता.

काकांनीं पुढील आयुष्यांत जी देशसेवा मनोभावें केली त्याचें बीज या बापूंच्या शिक्षणांत आहे. हरिपंत कांहीं काळ हायस्कूल शिक्षक होते, त्यांचा व बापूंचा ऋणानुबंध व घरोबा वाढला होता. त्यामुळें बापू सरदेसाई काकांशीं वडील बंधुत्वाच्या नात्यानें वागत असत. काका, वामनराव पटवर्धन, यशवंतराव शिंत्रे इत्यादि विद्यार्थ्यांचा त्यांच्याशीं गुरुशिष्य संबंध पुढें अखंड चार वर्षें राहिला. बापूसाहेब ' पुणें वैभव ' व मोरो शंकर रानडे यांच्या ' नाट्यकथार्णव ' या नियतकालिकांत वारंवार लेख लिहीत असत. या लेखनकार्याचे संस्कार त्यांच्या भजनीं लागलेल्या विद्यार्थ्यांवर होत असत. बापूसाहेबांना वाचनाचा नाद असल्यानें, अनेक ग्रंथ ते प्रयत्नपूर्वक संपादन करीत व या ग्रंथांचा उपयोग विद्यार्थ्यांनाही करूं देत. सांगलीचें नगर वाचनालय त्या कालाच्या मानानें बरेंच चांगलें होतें. हायस्कूलच्या शिक्षकांपैकीं कोणी तरी या वाचनालयाचे चिटणीस असत. हरिपंततात्या व त्यांचे स्नेही गणपतराव फडके हेही वाचनालयाचे पदाधिकारी असत. यामुळें काकांनीं वाचनाची होस भरपूर भागवून घेतली. विस्तृत व खोल व्यासंगी वाचन करण्याचे धडे बापूसाहेबांनींच त्यांना दिले.

काका वर्गांत हुषार विद्यार्थी म्हणवून घेत. वर्गाची स्कॉलरशिप त्यांनीं सहसा सोडली नाहीं. हा क्रम अगदीं अखेर सातवीपर्यंत चालला. शाळेच्या वादविवादमंडळांत ते आस्थेनें भाग घेत. ' त्या काळांत संपादन केलेलें वक्तृत्वकौशल्य व वाणीचा जोरकसपणा हे गुण आपल्या आयुष्याला लोकसेवेची दिशा लावण्याला कारणीभूत झाले ' असे उद्गार काकांनीं एका प्रसंगीं काढले आहेत. १९३७ सालीं सांगली हायस्कूलचे संमेलनप्रसंगीं काकांना पहिले मानाचे पाहुणे म्हणून सन्मानानें आमंत्रण करण्यांत आलें असतां ' त्रिसुपर्णाची शिकवणूक ' या विषयावर त्यांनीं विद्यार्थ्यांना उपदेश केला. या भाषणांत वरील उल्लेख काकांनीं केला आहे. जोरानें कार्य करूं

लागलें कीं कार्य होतें, अशी यशाची खूणगांठ विद्यार्थीदशेपासूनच काकासाहेबांनीं मनाशीं बांधली होती असें त्या भाषणावरून दिसून येतें.

"मी एक मोठा वक्ता आहें असें सांगण्यांत आलें. त्यांतला गौरवाचा भाग सोडून दिला तर मुलांमध्यें बोलण्याची मला संवय आहे एवढें खरें! त्या मुलांमध्यें बोलण्याच्या संवयीच्या जोरावर पुढील आयुष्यांत बाहेरगांवीं बोलण्याचा जेव्हां मला प्रसंग आला तेव्हां त्या प्रसंगांतूनही मी पार पडलों आहे. हें त्यावेळच्या संमेलनानें मजवर केलेले उपकारच आहेत. त्यावेळीं ही संमेलनांतील चढाओढ नसती तर तसा अभ्यास झाला नसता; व कदाचित् आयुष्याला निराळी दिशा लागली असती. पण ही संमेलनाची जी गोडी निर्माण झाली त्या गोडीच्या जोरावर पुढील आयुष्याची गाडी ढकलतां आली. मला जर कोणीं विचारलें कीं तुम्हीं लिहायला व बोलायला कसें शिकलां? तर मी सांगेन कीं असाच संमेलनांत बोलूं लागलों, ती गोडीच लागली. त्यावेळीं मी बोबडे बोलणारा होतों; पण आतां शब्दजीवी झालों आहे. त्या लहानपणच्या बोलण्यांतून उत्पन्न झालेल्या गोडीनेंच हें कार्य केलें आहे. पूर्व वयांतील कार्यांतील गोडीमुळें पुढच्या वयांतील कार्यें तडीस जातात.

खेळांत काय अगर बोलण्यांत काय यश मिळविण्याकरितां मी काय युक्ति करीत असे तें विचाराल तर खेळण्याच्या वेळीं (टेनिस) 'ग्रेसफुल' खेळण्याकडे माझी वृत्ति नसे, तें काम आबांचेकडे असे. माझी नेहमीं जोरानें खेळण्याकडे प्रवृत्ति असे. 'फास्ट सर्व्हिस' करायची; सपाटून जोरानें खेळायचें त्यामुळें नेहमीं आम्हांला—माझ्यामुळें—जय मिळे, पण स्तुति मात्र व्हायची आबांची! सपाटून जसा खेळत असे तसाच सपाटून बोलत असे. जोरानें बोलायचें हीच माझी युक्ति जोरानें बोलायला लागलों कीं बोलायला येतें. जोरानें काम करूं लागलों कीं कार्य होतें, हें विसरतां कामा नये. याच गोष्टीमुळें मला आतांपर्यंत कांहीं करतां आलें आहे."

हायस्कूलच्या वरच्या वरच्या वर्गांतून संस्कृत भाषेच्या वरिष्ठ अभ्यासाला जेव्हां सुरवात झाली तेव्हां कालिदास, भवभूति इत्यादि महान् नाटककारांची व काकांची ओळख होऊं लागली. श्री. अप्पाशास्त्री गोडबोले हे संस्कृत भाषेचे मोठे पंडित होते. त्यांचेपाशीं काकांनीं संस्कृत नाटकांचें सटीक वाचन केलें. विशेषतः भवभूतीचें उत्तररामचरित्र नाटक त्यांना फार आवडे व पुढें तें नाटक त्यांनीं मुखोद्गतच केलें होतें. सांगली हायस्कुलांतील त्यांचें जीवन व श्री. बापू सरदेसाई व वे. आप्पाशास्त्री गोडबोले यांचा निकट सहवास या गोष्टी काकांच्या मनांतील देशभक्तीला व नाट्यगुणाला अत्यंत अनुकूल वातावरण निर्माण करणाऱ्या होत्या. काकांच्या जाज्वल्य राष्ट्रप्रेमाची व नाट्य-कौशल्याचीं बीजें याप्रमाणें हळुहळूं त्यांच्यामध्यें या कालांतच दृढपणें रुजत होतीं.

काकासाहेबांची या वेळची स्नेही-मंडळी दादा छापखाने यांच्या शाळेंत शिकत असल्यापासून जी होती ती सर्व होती. काशीनाथभट केळकर मात्र मराठी शाळेंतूनच स्वतःच्या वडिलांच्या वेदशाळेंत दाखल झाले व पुढें त्यांनीं प्रख्यात वेदांती व घनपाठी अशी कीर्ति मिळविली. काकांच्या वरच्या वर्गांत आबासाहेब करमरकर व श्री. अण्णासाहेब लागू होते. तेही यांच्या स्नेही-मंडळींत मोडत. ही सर्व मंडळी एकाच गल्लींत—माकण आळींत—राहात असत. यामुळें या सर्वांचें बसणें, उठणें, खेळणें व अभ्यास करणें एकाच ठिकाणीं होत असे. नित्य खेळणें, तालीम करणें, नदींत पोहोणें व इतर बालसुलभ चळवळी करणें वगैरे गोष्टींत ही सवंगडी मंडळी सदा एकत्र येत असत.

पटवर्धनांचेकडे—म्हणजे कुंटे वाड्यांत—या सर्व बालगोपाळांचा कायमचा अड्डा होता. तेथें दरवर्षी हे मुलगे गणपती उत्सव करीत. घरचा नैवेद्य आणावयाचा व सामुदायिक आरती धुपारती जोरानें करावयाची हा नित्य क्रम असे. हायस्कूलचे विद्यार्थी सायंकाळीं सरकारी तालमींत जात. रामा

गुरव हे ह्या तालमीचे वस्ताद होते. काका, हरीभाऊ वारखणकर व कृष्णराव दिवाण हे नित्य या तालमींत जात असत. पोहोण्यांतही काकांचे हे.जोडीदार असत. काका या सर्व खेळांत अग्रेसर असत. यावेळीं इंग्रजी शाळेचें नुकतेंच हायस्कुलांत रूपांतर झालें होतें. आदल्याच वर्षी पहिली तुकडी मॅट्रिक परीक्षेला गेली होती. काका वगैरे मंडळींची ही दुसरी तुकडी. उच्च शिक्षण घेणारी म्हणून या मुलांचें सांगलीची जनता कौतुक करी व आदरानें यांचेकडे पाही.

असें चालू असतां एक दिवस काशिनाथपंतदादा उगारहून सांगलीस आले व घरीं न येतां ते नदीवर जाऊन बसले. त्यांना आपल्या भावजयीची भीति वाटत असे. तात्यांना ही बातमी समजताच ते घरीं राहण्यास आले तर 'त्यांना गत गोष्टीबद्दल कांहीं बोलणार नाहीं' अशी तात्यांनीं आईच्या-कडून प्रथम कबूली घेतली. मग ते नदीवर गेले व काशिनाथपंत-दादांची विनवणी करून त्यांना घरीं घेऊन आले. आपली मोठी इस्टेट सुखासुखी गेली यामुळें काशिनाथपंतदादा यांचें मन सुचिंत नसे. ते मनानें तसेंच शरीरानें खंगले होते. सरकारनें बिनकायदेशीरपणानें जमिनी लिलांव केल्या अशीच त्यांची दृढ समजूत होती. जमिनीसंबंधीचे कागदपत्र घेऊन त्यांनीं ते पुष्कळांस दाखविलें होते. तात्यांच्या सौजन्यामुळें काशिनाथपंत-दादांचा त्यांच्यावर फार लोभ होता व तात्यांना व काकांनाही काशिनाथ-पंत दादांबद्दल फार आदर वाटत असे.

काशिनाथपंतदादा घरीं येऊन राहिले खरे, पण या खेपेस त्यांची प्रकृति अधिकच नादुरुस्त झाली व मग आपण या दुखण्यांतून जगत नाहीं असें त्यांना दिसूं लागलें. जमिनी बेकायदा लिलांव झाल्या, त्या मिळविण्याची खटपट आतां आपल्या हातून होत नाहीं हें पाहून त्या-संबंधींचे आपल्या जवळचे सर्व कागदपत्र त्यांनीं कृष्णाच्या स्वाधीन केले व पुढची खटपट करण्यास बजावलें. ही हकीगत काकांनीं आपल्या

आत्मचरित्रपर आठवणींत दिली आहे. प्रभाकरपंतांनीं मिळविलेली इस्टेट; पण आपल्या हातून त्यांच्या मुलांना कांहीं मिळूं शकलें नाहीं ही टोचणीही त्यांच्या मनांत होता. या दुखण्यांत ते शेवटीं सांगलीसच निधन पावले. मरणाच्या अगोदर त्यांनीं हरिपंततात्यांच्या ज्येष्ठ मुलीच्या हातीं चार आणे देऊन "माझ्या हातून तुम्हांला कांहीं देणें झालें नाहीं पण परमेश्वर तुम्हांस कांहीं कमी पडूं देणार नाहीं" असा हृदयपूर्ण आशीर्वाद दिला.

### काकांचें लग्न

पुढें कांहीं दिवसांनीं काकांच्या लग्नाची चर्चा घरांत सुरू झाली. तो काल मुलांच्या लहानपणींच लग्न होण्याचा होता. त्या मानानें काकांचें लग्न उशिरांच झालें. सांगलीस तैनातदार लागू घराणें नांदत होतें. गणपतराव लागू व हरिपंततात्या यांचा विद्यार्थिदशेपासून स्नेह होता. ते दोघे कोल्हापूरच्या हायस्कुलांत एकाच वर्गांत होते. गणपतराव नोकरीनिमित्त कोल्हापुरासच कायमचे राहिले. तात्या सांगलीस नोकरी करूं लागले. तथापि उभयतांच्या स्नेहांत खंड पडला नव्हता. ते एकमेकांकडे जात येत असत. गणपतराव याची थोरली मुलगी वेणूताई उपवर झाली होती. गणपतरावांनीं आपले बालस्नेही हरिपंततात्या यांना सहज काकासंबंधीं विचारलें. जोडा अनुरूप होता. पूर्वीचा स्नेह व ऋणानुबंध होताच. ताबडतोब लग्न निश्चितच झालें. मध्यंतरीं सांगलीस श्रीमंत अण्णासाहेब लागू यांचेकडे कांहीं अडचण उत्पन्न झाल्यानें लग्नास विघ्न उत्पन्न झालें. म्हणून शंका काढण्यांत आली. पण उभयतां स्नेह्यांनीं त्याचें निरसन केलें. खंबीरपणानें लग्न करण्याचें ठरवलें व ठरल्याप्रमाणें लग्नसोहळा यथासांग उत्तम तऱ्हेनें उरकून टाकिला. वेणूताईंना गणपतरावजींनीं शालेय शिक्षण दिलें होतें. त्याकाळीं मराठी पांचवींतील मुलगी म्हणजे चांगलीच सुशिक्षित अशी गणली जात असे. आईला तर आपली सुशिक्षित सून हा एक कौतुकाचा विषय होता.

या लग्नानें आईला कृतकार्य होण्याचा आनंद झाला. त्या माउलीनें अत्यंत कौशल्यानें संसाराचा गाडा चालता ठेविला होता. कष्ट काढले होते. सर्व तऱ्हेच्या आपत्ति सहन केल्या होत्या. तिला आतां जरा हायसें वाटलें ! दोन्ही मुली आपापल्या घरीं सुखानें नांदत होत्या. मुलेंबाळें झालीं होतीं. हरिपंततात्यांनाही दोन मुलें झालीं होतीं. तात्यांची थोरली मुलगी वेणूआक्का ती. सौ. गौरकाकूंच्या वयाचीच होती. कांहीं दिवसांनीं तिचें लग्नहीं विट्यांचे वासुदेवराव लिमये वकील यांच्याशीं झालें. थोरले मेहुणे श्री. बाळकृष्णपंत रानडे श्रीमंत तात्यासाहेब सांगलीकर यांचेकडे खासगी नोकर होते. रानडे मंडळीवर श्रीमंत तात्यासाहेबांची बहाल मर्जी होती. यामुळें तारुआत्या ऐन भरभराटींत होत्या.

यमूआत्याची मात्र परिस्थिति निराळी होती. श्वशुर विष्णुदास भावे, मराठी रंगभूमीचे आद्य प्रवर्तक यांची राजाश्रयावर एक नाटक मंडळी चालली होती. ती १८५६ पर्यंत उत्तम स्थितींत होती. पुढें राजाचा आश्रय गेला. तथापि लोकाश्रयावर १८६१ पर्यंत तिनें भरभराटीचें सुख भोगिलें. नंतर कंपनी बंद करून ते सांगलीस कायमचे राहूं लागले. स्वहस्तें कळसुत्री बाहुल्या तयार करून त्यांचा ते खेळ करून दाखवीत असत. पण श्रीमंत तात्यासाहेबांच्या दरबारीं यांचें बस्तान ठीक बसलेंच नाहीं. भावे घराणेंही तैनातदाराचें होतें. तैनातीबद्दल श्रीमंतांशीं वारंवार कटकटी उत्पन्न होत. धाकटे मेहुणे, विष्णुदास भावे यांचे चिरंजीव गणपतराव भावे चित्रकार व गवय्ये होते. मधून मधून श्रीमंतांकडे नोकरीस जात असत. अशा स्थितींत यमूआत्या अभिमानानें पण शांत वृत्तीनें संसार चालवीत. या प्रकारें आईचा संसार त्यापूर्वींच कथन केल्याप्रमाणें कडेला लागला होता. खाडिलकर घराण्याच्या पूर्वापार पद्धतीप्रमाणें तात्यांचे घरीं आईचे भाचे म्हणजे तात्यांचे मावसभाऊ श्री. वासुदेवराव लिमये (आमचे गोविंदकाका) शिक्षणासाठीं होते. तसेंच उगारच्या सदाशिवराव

भाऊंचे मुलगे गणपतराव, दत्तोपंत वगैरे पुतणे शिक्षणाकरितां घरीं राहिलेले होते.

## पुण्यांतील उच्च शिक्षण

काका सन १८८९ सालीं मॅट्रिक पास झाले, ते उत्तम तऱ्हेचे मार्क मिळवून पास झाले. या पुढील शिक्षणासाठीं त्यांना पुण्यास जावें लागणार होतें. कॉलेजबद्दलच्या भव्य कल्पना, पुण्याची कीर्ति, चिपळूणकर, टिळक यांनीं स्थापिलेल्या तेथील नव्या संस्था, रानडे, भांडारकर वगैरे महान् व्यक्ति, या सर्वांच्या ओढीनें त्यांचें मन आतुरलें होतें हें जसें, तसेंच कृष्णेच्या वालुकामय प्रांगणांत मनमुराद खेळलेले व महापुरांत रोज पैलतीरावर जाणारे काका आजवर प्रेमानें कुरवाळणाऱ्या कृष्णामातेस सोडून बाहेरगांवीं जाणार म्हणून त्यांचें मन हुरहुरत होतें. कृष्णाबाईच्या मधुर व पवित्र जलाच्या पानानें आजपर्यंत त्यांचें आयुष्य किती चैतन्यमय झालें होतें! तिच्याच कांठावर ते कार्याची धडक शिकले, तिच्या महापुराच्या दुथडी वेगानें त्यांच्या हृदयांत जोष निर्माण केला आणि नागमोडी पदन्यास करीत करीत तिनेंच त्यांना कलामर्म शिकविलें. पुण्याला पुढच्या शिक्षणासाठीं जात असतां कृष्णामातेनें प्रेमानें दिलेली ही अमोल शिदोरी त्यांच्या पुढील आयुष्याची घडण तेजस्वी बनविणार होती, तिची स्वतःची कीर्ति वाढविणार होती व कृष्णाकांठचा कवि कृष्ण राष्ट्रप्रेमाच्या ललकारीनें महाराष्ट्र चेतनामय करून टाकणार होता.

सांगली सोडून काका बाहेर गांवीं जाणार म्हणून त्यांच्या प्रत्यक्ष आईला तर किती काळजी वाटली असणार? तिनें त्यांची शक्य ती सर्व व्यवस्थ करून दिली. तात्यांचा आनंद फार मोठा होता. आपणांस कॉलेजांत जातां आलें नाहीं पण आज आपला भाऊ कॉलेजांत जात आहे यांतच त्यांच्या हृदयाचा सर्व अभिमान सांठविला होता. तो हुषार आहे! नांव काढील! या भावनेचीं आंतरिक स्पंदनें त्यांचें मन नित्य फुलवून राहिलीं होतीं.



बालमित्र

१ श्रीयुत आबासाहेब करमरकर ( सराफ सांगली )
२ श्रीयुत काकासाहेब खाडिलकर,
३ श्रीयुत वामनराव पटवर्धन ( भारतसेवक )

दे. भ. काकासाहेबांची सही

पुण्याच्या वास्तव्याबाबत सोय करून देतांना त्यांना एकतऱ्हेनें सारखें कृतार्थ वाटत होतें.

पुण्यास शिक्षणास गेल्यावर तेथें कोणत्या कॉलेजांत नांव घालावयाचें हा प्रश्नच काकांच्यापुढें नव्हता. काकांनीं व त्यांच्या सर्व मित्रांनीं फर्ग्युसन कॉलेजमध्यें लगेच आपलें नांव दाखल केलें. मार्क चांगले असल्यामुळें तेथें काकांना स्कॉलरशिपही मिळाली.

पुण्यांतील सांगलीकरांचा वाडा म्हणजे सांगलीकर विद्यार्थ्यांची रेसिडेन्सी. सर्व एकत्र रहात, एकत्र खाणावळींत जेवत व एकाच कॉलेजांत शिक्षण घेत. या कॉलेज-शिक्षणाचे वेळीं गणपतराव अभ्यंकर, विनायकराव माईणकर, यशवंतराव कोल्हटकर इत्यादि मंडळींचा स्नेहसंबंध वाढला. पुण्यास आल्यावर या तरुण मंडळींच्या मनांत नवे वारे वाहूं लागले होते. मी मोठा होईन, विद्वान् होईन, श्रीमंत होईन, यशस्वी वकील, डॉक्टर होईन, मोठा खंदा लेखक होईन, राजकारण करीन, लोकजागृती करीन, देशोद्धार करीन, देशाचा पुढारी होईन, हेच विचार या तरुण मंडळींच्या मनींमानसीं उत्पन्न होत असत. अर्थातच सांगलीचे तरुण विद्यार्थी या वातचक्रांत सांपडलेले होते. त्यांच्या या विषयांवर चर्चा, गप्पा होत.

कृष्णाकांठ देशभक्तीच्या बीजाला अंकुरित होण्याला योग्य भूमि होती. वडील माणसें व प्राध्यापक या अंकुराची जोपासना करणारीं होतीं. यामुळें तरुण कॉलेज-कुमारांना आपल्या संकल्पित भावी आयुष्याचीं सुखस्वप्नें पडत असत. पण काल मात्र हीं सुखस्वप्नें व महत्त्वाकांक्षा फलदायी होतील किंवा नाहीं याची खात्री देणारा नव्हता. काकांच्या अंतः-करणाला पहिल्यापासून असलेली देशोद्धाराची ओढ अत्यंत तीव्र असल्यानें ती मात्र यशाच्या मार्गाला लागली. मन असें दोलावस्थेंत असतांनाच काका नवीनच स्थापन झालेल्या फर्ग्युसन कॉलेजमध्यें दाखल झाले व त्या कॉलेजच्या स्थापकांचा प्रभाव यांच्या तरुण मनावर पडत चालला.

सांगलीकरांच्या वाड्यांत राहणारे सांगलीचे विद्यार्थी पायींच कॉलेजास जात असत. या कॉलेज-शिक्षणाच्या काळांत काकांनीं इंग्रजी वाङ्मयाचा विशेषतः नाट्य-वाङ्मयाचा सूक्ष्म अभ्यास केला. टेनिसन हा त्यांचा आवडता कवि पाश्चात्य नाटककारांत शेक्सपियर आणि संस्कृत नाटककारांत कालिदास व भवभूति त्यांना विशेष आवडत असत, यांच्या नाटकांचा सखोल अभ्यास त्यांनीं या कालांतच केला. उत्तररामचरित्र तर ते तोंडपाठ म्हणून दाखवीत असतच. विद्यार्थिदशेंत त्यांनीं प्रकृतीकडे बरेंच लक्ष दिलें होतें. नित्य खेळ व तालीम ते न चुकतां करीत असत. काका फर्ग्युसन कॉलेजांत जसे पहिल्या वर्षी तसे पुढें बी. ए. च्या वर्गांतहि स्कॉलर होते.खेळांतहि ते पटाईत असत. डेक्कन कॉलेजमध्यें असतांना शरीर स्थूल झालें तरी सुरपाट्यांच्या खेळांत पाटींतून फुटतांना त्यांची चपळाई कायम होती व ती पाहून त्यांचे मित्र चकित होत असत. पुण्याच्या थंड हवेमुळें काकांचा सडपातळपणा जाऊन अंगावर मांस पुष्कळसें चढलें होतें. त्यांचा व्यायाम व खेळ ते डेक्कन कॉलेजमध्यें आले तरी नित्य सुरूच होता.

डेक्कन कॉलेजमध्यें त्या वेळीं श्री. तात्यासाहेब केळकर, श्री. कृ. कोल्हटकर, धुळयाचे शंकरराव देव हे त्यांचे सहाध्यायी होते. बेळगांवचे श्री. गंगाधरराव देशपांडे खालच्या वर्गांत होते. पुढें राजकारणांत लोकमान्य सांप्रदायांत वा गांधी युगांत हे काकांचे एक विचारी सहकारी झाले. डेक्कन कॉलेजच्या रेसिडेन्सींत राहतांना त्या वेळचे फेलो शिवरामपंत परांजपे यांच्याशीं काकांचा प्रथम परिचय झाला.

नाट्याचा अभ्यास चालूच होता. प्रत्यक्ष नाटक पाहण्याचा नाद तर त्यांना अगदीं लहानपणापासून होताच. उत्सवप्रसंगीं होणारीं ललितें, विष्णुदास भावे यांनीं पौराणिक कथांना नाट्यरूप देऊन बसवलेलीं पौराणिक नाटकें जशीं काकांनीं अनेक वेळां रात्रभर जागून पाहिलीं होतीं,

तशी पुण्याच्या रंगभूमीवर इंग्रजी नाट्यकृतींना मराठी पेहराव देऊन बसविलेलीं भाषांतरित नाटकेंही ते न चुकतां पहात असत. 'हॅम्लेट व अथेल्लो' हीं नाटकें मराठी रंगभूमीवर पाहिल्यावर त्यांचें आकर्षण आपणांस वाटलें असें त्यांनींच आपल्या एका आठवणींत लिहिलें आहे व 'सवाई माधवराव यांचा मृत्यु' या नाटकाचे प्रस्तावनेंतही नमूद केलें आहे.

नाट्य-वाङ्मयाचा जसा त्यांना जबरदस्त ओढा होता, तशीच श्रद्धायुक्त अध्यात्म विषयाची त्यांना गोडी होती. त्यामुळें काकांनीं बी. ए.साठीं 'तत्त्वज्ञान', हा खास विषय घेतला होता. त्यांचा अभ्यास मनाप्रमाणें होण्यासाठीं या विषयाचे प्रख्यात प्रोफेसर सेल्बी डेक्कन कॉलेजमध्यें असल्यानें काका डेक्कन कॉलेजमध्यें अभ्यासासाठीं आले होते. बी. ए. झाल्यावर कांहीं काल विश्रांति घ्यावी असा त्यांचा मानस होता. पण पास होतांच वडील बंधु हरिपंततात्या यांनीं त्यांचेसाठीं सांगली हायस्कुलांत नियुक्त करून ठेविली होती. त्याप्रमाणें विश्रांतीची कल्पना बाजूस सारून काकांनीं वडील बंधूंच्या इच्छेस मान देऊन शिक्षकाची नोकरी पत्करली.

पण त्याबरोबरच कॉलेजमध्यें असल्यापासूनच मनांत संकल्पित करून ठेवल्याप्रमाणें 'सवाई माधवराव यांचा मृत्यु' हें नाटक लिहावयास सुरवात केली. विचारवान् व विकारवश असे सवाई माधवराव यांचेवर, हॅम्लेट राजपुत्राचा व बाजीरावानें श्रीमंत पेशव्यांकडे पाठविलेला मंत्रतंत्रविशारद केशवशास्त्री यांवर, अथेल्लोंतील आयागोचा बेमालुम पोषाख त्यांनीं चढविला. दोन अमर भूमिका एकाच नाटकांत गोवून त्यांनीं आपलें नाटक सजविलें व शेक्सपियरवरही ताण केली. नाटक सांगलीस लिहून काढलें व आपल्या अद्वितीय नाट्यकृतीचा प्रारंभ केला. आरंभच इतका मक्कम होता कीं त्यावर त्यांच्या नाट्यमंदिराची भव्य इमारत उंच उंच चढत गेली व चिरस्थायी झाली.

हें नाट्यलेखन चालू असतांना काका हायस्कुलांतील शिक्षकाचें काम आस्थापूर्वक करीत होते. हा दोन वर्षांचा काल आपल्या आयुष्यांतील अतिशय चांगला काल असें तें नेहमीं सांगत. वडील बंधु हरिपंत सर्व कुटुंबाचा योगक्षेमाचा भार वाहत. काकांना त्यासंबंधांत कधींही लक्ष घालावें लागत नसे. यामुळें काका नाट्यलेखन व शिक्षण मनमोकळें करीत. उरलेला काळ ते पूर्वींप्रमाणें आपल्या मित्रपरिवाराबरोबर तालमींत जाण्यांत, कृष्णाकांठीं खेळण्यांत व पोहण्यांत घालवीत. काका हायस्कूलच्या वरच्या वर्गांना इंग्रजी, गणित व संस्कृत विषय शिकवीत. 'उत्तम शिक्षक' म्हणून त्यांचा लौकिक होता. ते विद्यार्थ्यांत फारसे मिसळत नसत.

सांगलीसारख्या संस्थानी जमान्यांत सरकारी व सामाजिक कामांत त्यावेळीं हायस्कूलच्या शिक्षकांना विशेष तऱ्हेचा मान होता, व महत्त्व होतें. आजपर्यंत सांगलीस नळ नव्हते. काकडवाडीहून नळानें पाणी आणण्याची योजना नुक्तीच मूर्त रूपांत आली होती. त्याचा प्रारंभ-समारंभ श्रीमंत धुंडिराज तात्यासाहेब यांच्या अध्यक्षतेखालीं करण्यांत आला. सध्यांच्या मोतीबाग बंगल्याच्या आवारांत एक फरशी करून त्यावर एक शिला 'श्री धुंडिराज नलिकोदकम्' या अक्षरांनीं सजविलेली बसवण्यांत आली. या सभेंत या शिळेबद्दल व योजनेबद्दल काकासाहेबांचें भाषण झालें. हेंच त्यांचें सांगलींतील पहिलें सार्वजनिक भाषण असावें असें वाटतें. या सुमारास काकांना पहिलें अपत्य झालें. या मुलीचें नांव ती. सौ. गौर-काकूंनीं आपल्या मातुःश्रीच्या स्मरणार्थ 'गंगू' असें ठेविलें. अशी दोन वर्षें पाहतां पाहतां निघून गेलीं.

पण काकासाहेबांसारख्या गरुडवृत्तीच्या तरुणास आहे या स्थितींत समाधान होणें शक्यच नव्हतें. आपले थोरले बंधु हरिपंततात्या यांनीं अत्यंत अवघड परिस्थितींत संसाराचा भार सहन करून आपणास उच्च शिक्षणाचा लाभ घेऊं दिला याचें सार्थक मास्तरकी करून

पूर्णत: होईल असें त्यांना कधींच वाटलें नाहीं. त्यांचें मन याहून विस्तृत कार्यक्षेत्राची अपेक्षा करीत होतें. त्या काळांतला अर्थोत्पत्तीचा हातखंडा धंदा वकिली! तो करण्यासाठीं कायद्याचें पूर्ण शिक्षण घेऊन कुटुंबाची आर्थिक पातळी जास्त उंचवावी असाही एक विचार त्यांच्या मनांत येत नसेल असें नाहीं. पण याहीपेक्षां त्या काळांत महाराष्ट्रांत ज्या महान् देश-प्रेमी व्यक्ति उदित झाल्या होत्या त्यांचे जनताजागृतीची खळबळ उत्पन्न करणारे विचार त्यांचे मनांत प्रभावीपणें घोळत असले पाहिजेत. निबंधकार विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्यासारखी देशोद्धाराची वाङ्मयसेवा करावी कीं पुण्यांत असतांना नित्य पाहिलेले केसरीकार टिळक यांचें स्वातंत्र्य-संपादनाचें खडतर राजकारण आपण अंगिकारावें अशासारखे विचार त्यांच्या मनांत गर्दी करीत असावेत.

सांगली व पुण्यांत त्यांनीं जें जिवंत शिक्षण घेतलें तें इतर विद्यार्थ्यां-प्रमाणें फक्त परीक्षा पास होण्याचे दृष्टीचें नव्हतें. त्यांच्या उपजत वीरवृत्त मनावर देशाच्या दुःस्थितीचे दुःखद परिणाम तीव्रतेनें होत होते. इंग्रज राज्यकर्त्यांनीं शांतता प्रस्थापित करण्याच्या निमित्तानें जें सुव्यवस्थेचें मोहजाल उत्पन्न केलें त्यानें पारतंत्र्याचे पाश जास्तच करकचून आवळून बसू लागले, याची जाणीव नव्या पिढीला होऊं लागली होती. काकांच्या-सारख्या तेजस्वी तरुणाला तर ही जाणीव जास्तच अस्वस्थ करीत असली पाहिजे. देशाच्या अशा परतंत्र स्थितींत राष्ट्रोद्धाराचें कर्तव्य करण्यास आपणास संधि प्राप्त व्हावी व तसें सुदैवानें झाल्यास आपण आपलें राष्ट्रासंबंधाचें कर्तव्य अंतःकरणपूर्वक पार पाडूं असा आत्मविश्वासाचा विचार त्यांच्या मनापुढें उभा असला पाहिजे. अशा विविध आंदोलनात्मक मन-स्थितींत काकासाहेब मुंबईस एल्‌एल्. बी.चा अभ्यास करण्यास गेले.

## वकिली कां देशभक्ति?

काकासाहेब बाह्यात्कारी वकील व्हावें या उद्देशानें मुंबईस एल्‌एल्. बी.च्या अभ्यासाकरितां गेले होते, तरी त्यांच्या मनाला अत्यंत उत्कटतेनें

देशसेवेचीच ओढ लागली होती. त्यांच्या अंतःकरणांत त्याबद्दल सारखी तळमळ चालली होती. मन त्याच विचारांत व्यग्र झालें होतें. देशाची राजकीय उन्नति साधूं पाहणारी राष्ट्रीय सभा नवीनच सुरूं होऊन कार्य करीत होती. त्यांच्या अनुषंगिक राजकीय, सामाजिक, औद्योगिक व प्रांतिक परिषदा उत्पन्न झाल्या होत्या. या सुमारास ‘ सनातन धर्मपरिषद् ’ प्रथमच भरली होती. नवीं नवीं वर्तमानपत्रें निघूं लागलीं होतीं. सामान्य जनतेंत सध्यांच्या राजकीय अवनतीच्या ज्ञानाचा फैलाव झपाट्यानें होत होता. अशा स्थितींत परकी सरकाराची नोकरी पत्करून स्वास्थ्य संपादन करण्यापेक्षां राजकीय जागृतीच्या शिक्षणाचा जनतेंत प्रसार करण्याची कामगिरी सुशिक्षित तरुणांनीं अवश्य केली पाहिजे असें काकांना वाटत होतें. राजकीय शिक्षण देऊन राष्ट्राभिमानाची ज्योत प्रत्येक जाणत्या मनांत पेटविण्याचे कार्यांत तरुणांनीं पुढाकार घेतला पाहिजे असें आग्रहानें त्याकाळीं त्यांनीं प्रतिपादिलें आहे.

प्रि. गोळे यांच्या ‘ ब्राह्मण आणि त्यांची विद्या ’ या ग्रंथाचें परीक्षण विविधज्ञानविस्तार या मासिकांत करितांना काकांच्या या मनो-विचाराचें चित्र स्पष्टपणें उमटलें आहे. त्या वेळचे पुढील विचार त्यांची मनस्थिति स्पष्ट करणारे आहेत. “ लोकांपुढें उदात्त कल्पना व उच्च मनोवृत्ति मांडण्याचें काम ब्राह्मणांचें आहे. ही थोर कामगिरी सोडून देऊन ब्राह्मणच जर स्वार्थपरायण झाले तर सर्व देश अत्यंत खंगत जाणार यांत संशय नाहीं.” “ आमचे थोर विचार आम्हांस सोडून गेले व हीन मनोवृत्ति बळावली म्हणून तर आम्ही स्वराज्यास मुकलों. ते थोर विचार, त्या उच्च मनोवृत्ति पुन्हां जागृत करून सर्व राष्ट्रभर त्यांचा फैलाव केल्याशिवाय आम्हांस गत्यंतर नाहीं.” “ स्वार्थाच्या अकटोविकट पायावर आम्ही खूप झालों कीं, उच्च विचारांच्या उंच शिखराकडे पाहण्यास आम्हांस भोंवळ येऊं लागेल, ही मनाशीं खूणगांठ बांधून

ठेवावी. या अनार्य स्वार्थपरायणतेंत आमच्या देशाची थोरवी नाहीं, आमच्या धर्माचें वैभव नाहीं." "राजकीय सुधारणेचा प्रयत्न करावयाचा तो शारीरिक सुख लुटावयास सापडेल म्हणून नव्हे किंवा आतेष्टांस साहेब चार बढतीच्या जागा देतील म्हणूनहि नव्हे. **राष्ट्रोन्नतीचे कामीं झटणाऱ्यांच्या नशीबीं नेहमीं छळच असतो. जिंकलेल्या लोकांनीं सुखाच्या मागें लागणें म्हणजे कर्दमांत पाय जोरजोरानें आपणहून रेटण्यापैकींच आहे."** "सुशिक्षितांचा वर्ग राष्ट्राकरितां आहे. राष्ट्र सुशिक्षितांकरितां नव्हे." यासारखे प्रेरक विचार त्या लेख-मालेंत जागोजागीं पेरलेले आहेत. हे काकांची त्या वेळची मनस्थिति स्पष्टपणें दाखवतात.

प्रि. गोळे यांच्या पुस्तकावरील या परीक्षणाच्या सुमारास सांगलीस असतांना लिहिलेलें 'सवाई माधवराव यांचा मृत्यु' हें नाटक व गौतमबुद्धाचे तत्त्वज्ञानावरील मननपूर्वक लिहिलेला 'गौतमबुद्ध' हा चरित्रपर प्रबंध विविधज्ञानविस्तार मासिकांत प्रसिद्ध झाला होता. या प्रसिद्धीचे कामीं त्यांचा व श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचा पुन्हां संबंध आला. तेहि यावेळीं मुंबईस वकिलीच्या अभ्यासासाठीं राहिले होते व त्यांचेंहि कांहीं लेखन याच मासिकांत प्रसिद्ध झालेलें होतें. त्या मासिकाच्या संपादकवर्गांत कोल्हटकरांचा दाट स्नेह होता. त्यांचे मार्फतच काकांचा या मासिकाशीं संबंध आला. याच मासिकांत अल्पवेतनावर लेखक या नात्यानें राहावें असें त्यांना वाटत होतें. कोल्हटकरांनीं काकांचें नाटक वाचलें व तें विविधज्ञानविस्तारांत प्रसिद्ध करण्यास योग्य झालें आहे असें वाटून तें प्रसिद्धहि केलें.

ह्या नाटकाची वैशिष्ट्यपूर्ण रचना व त्यामधील दोन अमर भूमिका त्या काळच्या वाङ्मयसेवकांच्या नजरेंत भरल्या. विशेषतः **श्रेष्ठ साहित्यिक नारायण बापूजी कानिटकर, सेवानंद बाळूकाका कानिटकर* यांचे**

देशसेवेचीच ओढ लागली होती. त्यांच्या अंतःकरणांत त्याबद्दल सारखी तळमळ चालली होती. मन त्याच विचारांत व्यग्र झालें होतें. देशाची राजकीय उन्नति साधूं पाहणारी राष्ट्रीय सभा नवीनच सुरू होऊन कार्य करीत होती. त्यांच्या अनुषंगिक राजकीय, सामाजिक, औद्योगिक व प्रांतिक परिषदा उत्पन्न झाल्या होत्या. या सुमारास 'सनातन धर्मपरिषद्' प्रथमच भरली होती. नवीं नवीं वर्तमानपत्रें निघूं लागलीं होतीं. सामान्य जनतेंत सध्यांच्या राजकीय अवनतीच्या ज्ञानाचा फैलाव झपाट्यानें होत होता. अशा स्थितींत परकी सरकाराची नोकरी पत्करून स्वास्थ्य संपादन करण्यापेक्षां राजकीय जागृतीच्या शिक्षणाचा जनतेंत प्रसार करण्याची कामगिरी सुशिक्षित तरुणांनीं अवश्य केली पाहिजे असें काकांना वाटत होतें. राजकीय शिक्षण देऊन राष्ट्राभिमानाची ज्योत प्रत्येक जाणत्या मनांत पेटविण्याचे कार्यांत तरुणांनीं पुढाकार घेतला पाहिजे असें आग्रहानें त्याकाळीं त्यांनीं प्रतिपादिलें आहे.

प्रि. गोळे यांच्या 'ब्राह्मण आणि त्यांची विद्या' या ग्रंथाचें परीक्षण विविधज्ञानविस्तार या मासिकांत करितांना काकांच्या या मनो-विचाराचें चित्र स्पष्टपणें उमटलें आहे. त्या वेळचे पुढील विचार त्यांची मनस्थिति स्पष्ट करणारे आहेत. "लोकांपुढें उदात्त कल्पना व उच्च मनोवृत्ति मांडण्याचें काम ब्राह्मणांचें आहे. ही थोर कामगिरी सोडून देऊन ब्राह्मणच जर स्वार्थपरायण झाले तर सर्व देश अत्यंत खंगत जाणार यांत संशय नाहीं." "आमचे थोर विचार आम्हांस सोडून गेले व हीन मनोवृत्ति बळावली म्हणून तर आम्ही स्वराज्यास मुकलों. ते थोर विचार, त्या उच्च मनोवृत्ति पुन्हां जागृत करून सर्व राष्ट्रभर त्यांचा फैलाव केल्याशिवाय आम्हांस गत्यंतर नाहीं." "स्वार्थाच्या अकटोविकट पायावर आम्ही खूष झालों कीं, उच्च विचारांच्या उंच शिखराकडे पाहण्यास आम्हांस भोंवळ येऊं लागेल, ही मनाशीं खूणगांठ बांधून

टेवावी. या अनार्य स्वार्थपरायणतेंत आमच्या देशाची थोरवी नाहीं, आमच्या धर्माचें वैभव नाहीं." "राजकीय सुधारणेचा प्रयत्न करावयाचा तो शारीरिक सुख लुटावयास सापडेल म्हणून नव्हे किंवा आप्तेष्टांस साहेब चार बढतीच्या जागा देतील म्हणूनहि नव्हे. **राष्ट्रोन्नतीचे कामीं झटणाऱ्यांच्या नशीबीं नेहमीं छळच असतो. जिंकलेल्या लोकांनीं सुखाच्या मागें लागणें म्हणजे कर्दमांत पाय जोरजोरानें आपणहून रेटण्यापैकींच आहे.**" "सुशिक्षितांचा वर्ग राष्ट्राकरितां आहे. राष्ट्र सुशिक्षितांकरितां नव्हे." यासारखे प्रेरक विचार त्या लेख-मालेंत जागोजागीं पेरलेले आहेत. हे काकांची त्या वेळची मनस्थिति स्पष्टपणें दाखवतात.

प्रि. गोळे यांच्या पुस्तकावरील या परीक्षणाच्या सुमारास सांगलीस असतांना लिहिलेलें 'सवाई माधवराव यांचा मृत्यु' हें नाटक व गौतमबुद्धाचे तत्त्वज्ञानावरील मननपूर्वक लिहिलेला 'गौतमबुद्ध' हा चरित्रपर प्रबंध विविधज्ञानविस्तार मासिकांत प्रसिद्ध झाला होता. या प्रसिद्धीचे कामीं त्यांचा व श्रीपाद कृष्ण कोल्हटकरांचा पुन्हां संबंध आला. तेहि यावेळीं मुंबईस वकिलीच्या अभ्यासासाठीं राहिले होते व त्यांचेंहि कांहीं लेखन याच मासिकांत प्रसिद्ध झालेलें होतें. त्या मासिकाच्या संपादकवर्गात कोल्हटकरांचा दाट स्नेह होता. त्यांचे मार्फतच काकांचा या मासिकाशीं संबंध आला. याच मासिकांत अल्पवेतनावर लेखक या नात्यानें रहावें असें त्यांना वाटत होतें. कोल्हटकरांनीं काकांचें नाटक वाचलें व तें विविधज्ञानविस्तारांत प्रसिद्ध करण्यास योग्य झालें आहे असें वाटून तें प्रसिद्धहि केलें.

ह्या नाटकाची वैशिष्ट्यपूर्ण रचना व त्यामधील दोन अमर भूमिका त्या काळच्या वाङ्मयसेवकांच्या नजरेंत भरल्या. विशेषतः श्रेष्ठ **साहित्यिक नारायण बापूजी कानिटकर, सेवानंद बाळूकाका कानिटकर यांचे**

वडाल, मार्मिक लेखक व समीक्षक आणि दिलदार रसज्ञ, यांना तर हें नाटक फारच पसंत पडलें. पण ह्या नाटकापेक्षां प्रि. गोळे यांच्या ग्रंथावरील टीकालेखमालेनें काकांचें मन अधिक स्पष्टपणें जाणत्यांना कळलें. यांत विखुरलेले मौलिक विचार, जाज्वल्य राष्ट्रोद्धाराची तळमळ व स्वकर्तव्याची जागती जाणीव, यामुळें ही लेखमाला तरुण मनाला पटणारी, खेचणारी व विचारचक्र उत्पन्न करणारी ठरली. या लेखमालेंत काकांचें अंतःकरण ओतलें गेलें आहे. या लेखकाचा पिंड देशभक्ताचा आहे हें स्पष्टपणें दिसून आलें. पारतंत्र्याची शृंखला तोडण्यासाठीं जरूर असलेली शरिराची, मनाची व बुद्धीची त्यांची तयारी झाली होती याचे ते निदर्शक होते. मुंबईस एल्‌एल्. बीचा अभ्यास करीत असतांना ही माला लिहिली गेली व प्रसिद्ध केली गेली. एल्‌एल्. बी.ची शेवटची टर्म भरीत असतांना श्रेष्ठ साहित्यिक श्री. कानिटकर यांची व त्यांची ओळख झाली. त्यांनीं पहिल्याच भेटींत काकांची मनमुराद स्तुति केली व पुण्यास केसरींत प्रवेश करण्याची शक्यता असल्याचेंहि सहज कळवून सोडिलें.

या वेळच्या आपल्या मनःस्थितीचें वर्णन काकांनीं आपल्या ‘ ॐकाराची उपासना ’ या पुस्तकांत पुढीलप्रमाणें केलें आहे. ‘ संसाराचे काळजीखालीं मन खचून गेल्यावर जीं स्वप्नें पडतात तीं सूचक असतात. काळजीचें ओझें मनाला असह्य वाटूं लागलें म्हणजे आत्म्याची शक्ति जागी होते आणि ‘ असें असें कर ’ म्हणून स्वप्नामार्फत अर्धवट मार्गदर्शन करीत. सेकंड एल्‌एल्. बी.ची टर्म संपल्यावर पुढें काय करावयाचें याची मला काळजी लागली होती. परीक्षेला बसण्याइतपत अभ्यास झालेला नव्हता. कोठें लिहिण्याची सोय होईल काय या विवंचनेंत मी होतों. ही विवंचना सुरू झाल्यानंतर स्वप्नांत ‘ केसरी ’ हीं अक्षरें दोनदां स्पष्ट दिसलीं. जागेपणीं लय लावला असतांनाहि तो प्रकार स्पष्टपणें अनुभवास आला. पुढें दे. भ. नारायण बापूजी कानिटकर यांची व माझी गांठ श्री. पागे गणपतराव यांचेमार्फत

डली व त्यांचेशीं या बाबतींत बोलतांना त्यांनीं केसरीचेंच नांव सुचविलें. ा चर्चेचे वेळीं कानिटकरांनीं 'लेखनाची हौस आहे तर बळवंतरावजींच्या ेसरींत कां जात नाहीं ?' असें स्पष्टच विचारलें. काकांनीं संमति दर्शविली ा कानिटकरांनीं काकांना पुण्यास येण्यास सांगितलें. टर्म पुरी होतांच ाकासाहेब ठरल्याप्रमाणें पुण्यास गेले व कानिटकरांना भेटले. त्यांनीं ुसऱ्या दिवशीं बळवंतरावजी टिळकांकडे जाण्याचें योजिलें व दुसऱ्या देवशीं ते दोघे योजिल्याप्रमाणें केसरी कचेरीकडे गेले.

त्यावेळीं केसरी विंचूरकर यांच्या वाड्यांत निघत होता. या भेटीपूर्वीच ानिटकरांचें व टिळकांचें काकांचे विषयीं बोलणें झालें होतें. केसरीकारांनीं ेविधज्ञानविस्तारांतील ही टीकालेखमाला स्वत: वाचली होती. यांतील ेचारप्रणालि व युक्तिवाद देशभक्तीच्या रसानें ओथंबलेला असल्याचें यांच्या दृष्टीस पडलें होतें. पहिल्याच भेटींत टिळकांनीं काकांना केसरी-ाठीं लेख लिहिण्यास सांगितलें. लेखाचा विषय सुचविला. विषयप्रति-ादनाच्या सूचनाही दिल्या व जरूर ती माहिती कोठें मिळेल तें सांगितलें.

तो दिवस रविवारचा होता. सोमवारीं दुपारीं लेख तयार करून टिळकांच्या ातीं देण्याचें ठरलें. लेखासंबंधीं सर्व माहिती गोळा करण्यांत रविवार ेघून गेला. सोमवारीं सकाळींच काकांनीं तो लेख लिहून पुरा केला. त्या ेळीं पुण्यांत सांगलीचे त्यांचे स्नेही गणपतराव अभ्यंकर शिकत होते. यांच्या बिऱ्हाडीं ते गेले. व तेथें त्यांना व आपले बाळमित्र वामनराव ाटवर्धन यांना तो लेख त्यांनीं दाखविला व त्यांच्याशीं चर्चा केली. या नुसंधानानें लेखांत अवश्य ती दुरुस्ती केली व या मित्रद्वयाला लेख ासंत पडल्यावर तो केसरीकार टिळक यांचेकडे दिला. दुसरे दिवशीं हणजे ता. १ सप्टेंबर १८९६ रोजीं काकासाहेबांचा हा पहिला लेख ग्रलेख म्हणून टिळकांनीं प्रसिद्ध केला. पहिल्याच लेखाला अग्रलेखाचा असा मान मिळाला.

केवढा यशस्वी आरंभ ! या लेखाचा विषय ' राष्ट्रीय महोत्सवांची आवश्यकता ' असा होता. राष्ट्रीय वृत्तीचा लेखक, केसरीकारांचें मार्गदर्शन व राष्ट्रीय महोत्सव हा विषय सर्वच उद्दीपक ! लेख फारच सुंदर उतरला. टिळकांना तो अग्रलेख म्हणून छापण्याइतका पसंत पडला यांतच त्याचें वैशिष्ट्य आहे. या लेखापासूनच ते केसरीच्या संपादकवर्गांत दाखल झाले. जन्मापासून पारतंत्र्याचा तिटकारा त्यांचे अंगीं बाणला होता. आपल्यासारख्या सुशिक्षिताच्या जीवनाला जें वळण लागावें, शिक्षणाचें ज्या तऱ्हेनें देशकार्यांत पर्यवसान व्हावें असें त्यांना वाटत असे, तसेंच विधिघटनेनें घडून आलें. त्यामुळें वकिलीच्या परीक्षेस बाजूस सारूनही मातृभूमीच्या सेवेची ही मिळालेली संधि त्यांनीं शूरवृत्तीनें स्वीकारली.



: ३ :

# राष्ट्रदेवतेच्या चरणीं.

जया यत्न फावेल तेणें करावा ।
महोत्सव या राघवाचा भरावा ॥
महायत्न देखोनिया काळ धाके ।
प्रतापे बळें गाजवावे तडाखे ॥

—समर्थ रामदास.

केसरीच्या संपादकीय खुर्चीवर काका विराजमान झाले ही त्या काळीं साधी गोष्ट नव्हती. ती त्यांच्याच काय पण राष्ट्राच्या जीवनांतील एक मोठी क्रांति होती. ढगांचें पटल फोडून विजेनें प्रकाश द्यावा, खांब फोडून नरकेसरीनें प्रल्हादाच्या मदतीसाठीं धावावें, किंवा संसाराच्या प्रेम-बंधनांना तोडून टाकून गौमतबुद्धांनीं विश्वोद्धाराच्या अंगणांत उभे रहावें, त्यासारखीच ती प्रचंड घटना होती. अशा क्रांत्या नेहमीं स्फोट स्वरूपांतच होतात व त्यामुळें जो तेजाचा लोट उठतो तो 'आजूबाजूच्या

मंडळींना दिपवितो, भांबावून सोडतो, प्रसंगीं कांहीं इजाही करतो. तथापि कोणत्याही क्रांत्या होतात त्या लोकांच्यापुढें जरी स्फोट-स्वरूपाच्या दिसल्या तरी त्यांतील घटनांचा कार्यकारणभाव क्षणिक उत्पत्तीचा असत नाहीं. लोकांच्या दृष्टीआड बऱ्याच कालपर्यंत या घटना आंतून क्रमाक्रमानें शिजत असतात. आंतून त्यांची एक प्रकारें उत्क्रांतीच चाललेली असते.

काकांची परिस्थिति यावेळीं अशीच होती. घरचा विचार केला तर वडीलबंधु हरीपंत तात्या नुकतेच सांगली संस्थानांत सबजज्जाच्या हुद्द्यावर चढलेले ! शिक्षणासाठीं बरेच कर्ज झालेलें ! वकील होऊन मुलगा वैभव-संपन्न व्हावा म्हणून आसावलेली आई ! लग्नानंतर अनेक वर्षें सांगलीस सासूबाईंच्याचकडे राहिल्यामुळें स्वतंत्र संसाराचीं स्वप्नें रचणारी पत्नी ! किती नाजुक व कठीण बंधनें हीं ! केसरीच्या संपादकाचे खुर्चीवर बसल्यानें त्यांनीं हीं सर्व पार तोडून टाकलीं. स्वार्थप्राप्तीसाठीं वकीली करण्याऐवजीं पारतंत्र्यांत खितपत पडलेल्या आपल्या देश-बांधवांच्या उद्धारासाठीं राष्ट्रदेवतेच्या चरणीं त्यानीं सरदारकी पत्करली. त्यावेळीं केसरी म्हणजे त्याग ! केसरी म्हणजे सरकारी रोष ! केसरी म्हणजे एक तऱ्हेचें असिधारा-व्रत ! यांत अर्थप्राप्ति कोठली ? व ऐहिक वैभव कुठलें ? काका केसरींत शिरले ते कोणाच्या सल्ल्यानें शिरले नाहींत. ते आपल्या आत्मप्रतीतीनें त्यांत दाखल झाले. या होऊं घातलेल्या घटनेस श्री. कानिटकरादि मंडळी निमित्तमात्र झाली. यामुळेंच आपण वकीलीचा शेवटाशीं आलेला अभ्यास सोडून परस्पर केसरी कचेरींत कामासही सुरवात केली ही गोष्ट आपली आई, पत्नी अगर वडीलबंधु यांना पसंत पडेल कीं नाहीं याची काकांना शंका वाटत होती; भय वाटत होतें.

### बंधूंचें प्रोत्साहन

हरिपंततात्या सरकारी नोकर होते. सबजज्ज होते तथापि त्यांच्या मनाची ठेवण काकांच्या मनाच्या घडणीप्रमाणेंच होती. अंतःकरणाच्या उदात्त-

बधुद्वय



श्री. हरीपंत तात्या



श्री. कृष्णाजीपंत काका

पगाच्या बाबतींत ते स्वतःच काकांचे आदर्श होते. विविधज्ञानविस्तारांतील 'ब्राह्मण व त्यांची विद्या' या ग्रंथावरील टीका-लेख त्यांनीं वाचलेले होते व त्यांत प्रतीत झालेलें काकांचें जळजळीत देशप्रेम व सडेतोड विचार त्यांच्या परिचयाचे होते. आपले बंधु हृदयाच्या कांहीं विशेष वरच्या पातळींतून जात आहेत हें पाहून त्यांच्या बंधुप्रेमी थोर मनांत साहजिकच सदृश सहसंवेदना उचंबळत होत्या. त्यामुळें जेव्हां काकांनीं याबद्दलची हकीकत तात्याना पत्रद्वारें कळविली तेव्हां झाल्या गोष्टीस आपली संमति असल्याचें त्यांनीं काकांना ताबडतोब कळविलें. केसरींतील काकांचे दोन लेख वाचून तात्यांना फार आनंद झाला. वडीलबंधूंच्या कौतुकानें व प्रोत्साहनानें आपणांस किती बरें वाटलें याचें वर्णन काकांनीं आपल्या आठवणींत केलेलें आहे.

आई अगर सौ. गौरकाकू यांची मनःस्थिति मात्र संमिश्र होती. त्यांच्या मनाचे मनोरे मोडले होते. वकीली, मान, पैसा, व अधिकार हीं सर्व-साधारण मनाला समजणारीं मूल्यें एका बाजूस व त्यागयुक्त देशसेवा दुसऱ्या बाजूस अशी पारड्यांत घालण्याची अगर तो ताजवा पेलून त्यांतील तरतमभाव समजण्याची धारणा देशांत किती जणांपाशीं असते ? तथापि सौ. गौरकाकू त्या काळच्या सुशिक्षितांत गणल्या जात. वर्तमानपत्रें व मासिकें यांच्यांतील लेख त्यांच्या वाचनांत येत. पतीचें लेखनकर्तृत्व त्यांच्या परिचयाचें होतें. टिळक व त्यांचा केसरी यांच्याबद्दल संबंध महाराष्ट्रास त्यावेळीं अभिमान वाटत होता. अशा स्थितींत टिळकांनीं काकांना वरदहस्तपूर्वक आपल्या केसरीच्या संपादकीय खुर्चीवर अधिष्ठित केले ही गोष्ट सर्व कुटुंबियांस व सौ. गौरकाकूंना विशेष मानाची अतएव आनंदाची वाटत होती. पण इतर चारजणीसारखा स्वतंत्र संसार व मोठा पगार केव्हां सुरू होईल कोण जाणे अशी हुरहूर त्या दोघींना वाटणें स्वाभाविक होतें. कारण ज्या परिस्थितींत काकासाहेबांनीं पुण्यास केसरींत प्रवेश केला त्या परिस्थितींत पुण्यास लौकर बिऱ्हाड मांडणें शक्य नव्हतें. व वेतनही अल्प होतें.

## नानाविध चळवळी

काका पुण्याचे सुप्रसिद्ध टिळकानुयायी भाऊसाहेब गोखले यांच्या चित्रशाळेजवळच्या वाड्यांत एक खोली घेऊन राहिले. त्यावेळीं केसरी कचेरी व्यतिरिक्त त्यांच्या ओळखीचे विशेष कोणी नव्हतें. सांगलीची पूर्वपरिचित मित्रमंडळी त्यांचेकडे एकादे वेळीं येत जात. काकाही केसरी कचेरीशिवाय प्रारंभीं कोठेंही फारसें जात नसत. केसरींत गेल्यापासून इतरांपेक्षां काकांचा चित्रशाळेचे व्यवस्थापक वासुकाका जोशी यांच्याशीं जास्त संबंध आला. उभयतांच्या विशिष्ट स्वभावामुळें तो उत्तरोत्तर वाढत गेला. पूर्वींपासूनच वासुकाका लोकमान्यांचे नजीकचे स्नेही व सल्लागारमंडळींत मोडत असत. त्यामुळें जरूरीच्या कामीं काकासाहेब चित्रशाळेंत जात असत. पुढें लोकमान्यांच्या नानाविध चळवळींत काका भाग घेत असतांना वासुकाकांशीं जास्तच संबंध येऊं लागला. तो नेपाळप्रकरणापासून फारच घनिष्ठ झाला व आमरण तसाच राहिला.

पुण्यांत यावेळीं रोज नव्या नव्या चळवळी, नवे नवे राजकीय, सामाजिक व औद्योगिक महत्त्वाचे प्रश्न उत्पन्न होऊन त्यांत टिळकांच्या योजनेप्रमाणें टिळक पक्षांतील प्रमुख मंडळींना भाग घ्यावा लागत होता. श्रीगणपति उत्सवांत व शिवाजीउत्सवांत व्याख्यानांची झोड उठवून द्यावी लागे. केसरींतील लोकांना व्याख्यान देणें व शिवाय व्याख्यानांचीं टिपणें घेऊन ती लिहून काढण्याचें कामहि अनेक वेळां करावे लागे. शिवाजी महाराजांच्या समाधीच्या जीर्णोद्धाराचीहि चळवळ टिळकांनीं याच सुमारास सुरू केली होती. १८९५ सालच्या पुण्यांत भरलेल्या राष्ट्रीय सभेच्या मंडपांत सामाजिक परिषद भरवावी किंवा नाहीं याबद्दलचें वादळ माजलें. वाद विकोपास गेला. पुण्यांतील पुढारी मंडळींत तट पडले गेले; या वादावादीचें पर्यवसान काय झालें हें प्रसिद्धच आहे. अर्थात् हा शांततेचा, स्वास्थ्याचा, काळ नव्हता. अशांतच महा-

राष्ट्रांत दुष्काळाची भर पडली. दुष्काळ निवारण्याच्या चळवळीला राजकीय स्वरूप प्राप्त झालें होतें. लोकमान्य टिळक त्यावेळीं मुंबई कायदे कौन्सिलचे लोकनियुक्त सभासद होते, व 'सार्वजनिक सभा' ही संस्था त्यांच्या तंत्रानें काम करीत असे. या संस्थेमार्फत त्यांनीं दुष्काळ निवारणाची चळवळ चालू केली. या सर्वांचा सविस्तर उल्लेख दर आठवड्याच्या केसरींत खडखडीत भाषेंत काका केसरींत आल्यानंतर करूं लागले.

सरकारी अधिकारी या दुष्काळाचे बाबतींत योग्य व आवश्यक तें कार्य करीत नाहींत अशी जोराची तक्रार वर्तमानपत्रांत व सार्वजनिक सभेंत केली जात होती. लोकमान्यांनीं आपले कार्यकर्ते या दुष्काळी भागांत पाठविले होते. याच कामासाठीं काकांना सोलापूर जिल्ह्यांत कार्य करण्यासाठीं पाठविण्यांत आलें होतें. सोलापूर व विजापूर हे प्रसिद्ध दुष्काळी जिल्हे! तेथील जनतेचे हाल फार! तालुक्यांतील दूरदूरच्या खेड्यांना देखील काका भेट देऊन आले. या कामामुळें काकांच्या बऱ्याच कार्यकर्त्यांशीं ओळखी झाल्या. त्यांच्या व्याख्यानांचा फारच परिणाम होत असे. या कार्यामुळें काकांच्या चित्ताकर्षक वक्तृत्वाची व कार्यकौशल्याची लोकमान्यांना पुरी खात्रीच झाली.

ह्या दुष्काळी चळवळीमुळें लोक व सरकार यामध्यें तीव्रतर संघर्ष होऊं लागला. केसरीमध्यें दुष्काळासंबंधींचे सडेतोड लेख येत. ते सरकारला झोंबत असत. खेडोपाडीं पाठविण्यांत आलेले प्रभावी वक्ते लोकांना दुष्काळ निवारण्याचे उपाय सुचवीत व प्रसंगीं सरकारी अधिकाऱ्यावर योग्य ती कडक टीका करीत. यामुळें सरकार चिरडीला आलें होतें. कांहीं प्रचारकांवर सरकारनें खटलेहि भरले. काकांनीं सोलापूर व विजापूर जिल्ह्यांत अत्यंत पद्धतशीर प्रचार सुरू केला होता. तर्कशुद्ध विचार, जळजळीत भाषा, सडेतोड निर्भय टीका व उपायांचें अचूकदर्शन यामुळें केसरींतील तद्विषयक त्यांच्या लेखांनीं एक प्रकारे दुजोरा मिळून अपूर्व लोकजागृतीचें कार्य केलें

दुष्काळाचे आपत्तीनंतर पुण्यास प्लेगाची भर पडली. पुण्यास या नवीन रोगानें जोरकस प्रवेश केला. लोकमान्यांच्या सूचनेनें व मातुश्री आणि वडीलबंधु यांच्या आग्रहाच्या बोलावण्यामुळे काका पुणें सोडून सांगलीस या प्लेगाच्या दिवसांत येऊन राहिले.

काका दुष्काळी कार्याकरितां विजापूर जिल्ह्यांत दौऱ्यावर असतां विजापूरचा मोडकळीस आलेला उध्वस्त किल्ला पाहून त्यांच्या कविमनावर परिणाम झाला. याचवेळीं 'कांचनगडची मोहना' या नाटकाची मध्यवर्ती कल्पना काकांच्या मनांत स्फुरली. ध्येयवादी नाट्यसृष्टीचा हा प्रथमारंभच होता. जनमताचे यथातथ्य प्रतिबिंब व जनतेंतील प्रक्षुब्ध विचारांचे पडसाद त्यांच्या नाटकांत वास्तविक स्वरूपांत दृग्गोचर होतात. त्या ध्येयपूर्ण व परिणामकारक नाट्यवाङ्मयाचा 'कांचनगडची मोहना हा' आरंभ होता. प्लेगमुळें पुणें सोडून ज्यावेळीं काका सांगलीस रहावयास आले त्यावेळीं त्यांनीं हें नाटक लिहून पूर्ण केलें. काकांचे बालमित्र वारखणकर जोशी यांच्या माडीवर काकांचें बसणें उठणें होत असे. त्याच माडीवर हें नाटक लिहिलें गेलें.

### पुण्यांत कहर

सांगलीस त्यांना फार दिवस राहतां आलें नाहीं. पुण्यास प्लेगचा कहर वाढला. रोग नवा, अपरिचित ! त्यामुळें लोक भयभीत झाले. सरकारलाही कांहींच अटकळ नव्हती. रोगप्रतिबंधक सुचतील ते उपाय सरकार योजूं लागलें. व्यवस्थेचें कार्य सोजीर लोकांवर सोंपविण्यांत आलें. अधिकारी रँडसाहेब ह्या कामासाठीं मुद्दाम नियुक्त केले होते. विलायतेंतून ताजा आलेला अधिकारी, हातांखालीं सोजिरांचा तांडा ! मग त्यांच्या लीला काय वर्णाव्या ! पुणें शहर त्रासून गेलें. लोकांना प्लेग पुरवला, पण ही सरकारी व्यवस्था नको असें होऊन गेलें. बायकांची अब्रू राहीना, वित्त टिकेना ! जीवित तर पळूं लागलेंच होतें ! मेलेल्यांचा तर खच पडला ! व्यवस्थेच्या जाचालो भिऊन लोक मृतांना दडवूं लागले. कांहीं महिने असा अतोनात

धुमाकूळ घालून प्लेग किंचित् शांत होऊं लागला व जनतेतील घबराट थोडा कमी झाला. अशांतच शिवाजी उत्सवाचा दिवस जवळ येऊं लागल्यानें टिळकांनीं काकांना तांतडीनें पुण्यास निघून येण्याबद्दल पत्र धाडलें.

काका पुण्यास आले पण लोकमान्य सिंहगडास गेले होते. केसरीकचेरींत गेल्याबरोबर अग्रलेख तयार व्हावयाचा आहे असें त्यांना दिसून आलें. दुष्काळ आणि प्लेगाच्या स्थितींतही लोकांमध्यें उत्साह उत्पन्न करून जनतेला कार्यप्रवण केलें पाहिजे हें चटकन् आकलन करून त्यांनीं " विभूतिपूजा " हा लेख लिहिला. ह्यावरून त्यांची संपादकीय दृष्टि किती तयार होती हें दिसून येईल.

या लेखाचा प्रारंभच मुळीं 'विभूतिपूजा' या विषयाच्या विवेचनानें त्यांतील 'पूजा' ही प्रवृत्ति देशोद्धारास कशी आवश्यक व स्वाभाविक आहे हें सुंदर रीतीनें दाखवून त्यांनीं पुढीलप्रमाणें अभिप्राय व्यक्त केला आहे.

' आल्हादजनक किंवा भयानक, कोमल किंवा उग्र, अथवा दोहोंचेंही योग्य मिश्रण झाल्यामुळें भव्य दिसणारें सृष्टीचें स्वरूप पाहून आणि थोर पुरुषांचीं पुण्यश्लोक चरित्रें ऐकून व त्यांचें मनन करून मनुष्यांत स्वाभाविक असलेली आश्चर्यबुद्धि आपोआप जागी होते. एकाद्याच्या कृतीविषयीं, किंवा एकाद्या वस्तूविषयीं आश्चर्य वाटलें म्हणजे त्या मनुष्याला किंवा वस्तूला नमस्कार करून आपली लीनता दाखवावी, त्यांची पूजाअर्चा करून आपलें प्रेम प्रगट करावें हाही मनुष्यधर्मच आहे. निर्जीव सृष्टींत कोठेंही ईश्वराचा अंश दृष्टीस पडला असतां त्याबद्दल आश्चर्य व प्रेम वाटणें ( म्हणजे हृदयांत भक्तीचा पाझर फुटणें ) यासारखा मनुष्यांत अत्युत्तम गुण दुसरा कोणताच नाहीं. विभूतिपूजा जेथें नाहीं असें राष्ट्र सांपडावयाचें नाहीं; व ज्या समाजांत ह्या गुणाचा लोप होत जातो तो समाज मरणोन्मुख झाला आहे असें समजावें. '

पुढें शिवाजी महाराजांचें विभूतिमत्त्व विशद करून व जनतेनें प्लेग व दुष्काळ या अडचणींच्या कालांतही वाढत्या उत्साहानें भाग घेतला याबद्दल काकांनीं या लेखांत अभिनंदनपूर्वक आनंद प्रदर्शित केला आहे.

शिवजयंति उत्सव संपत आहे तोंच पुण्यास एक अत्यंत खळबळजनक घटना घडून आली. ता. २२ जून १८९७ रोजीं गव्हर्नरच्या बंगल्यावरून मेजवानी घेऊन परत येत असतां उन्मत्त अधिकारी रँड व त्याबरोबर आयर्स्ट या दोन गौरवर्णीय अधिकारी व्यक्तींचा गोळ्या घालून वध करण्यांत आला. ही वधाची वार्ता वाऱ्याप्रमाणें अखिल भारतांत पसरली. अँग्लो इंडियन पत्रांनीं या खुनामागें पुण्याचे ब्राह्मण—विशेषतः चित्पावन ब्राह्मण—आहेत असा कंठशोषानें गिल्ला सुरू केला. रकाने भरभरून तशा मतलबाचा मजकूर येऊं लागला. सरकार पिसाळलें. दडपशाहीला सुरवात झाली. केसरींत टीकेची झोड उठली. याचाच परिणाम २७ जुलै रोजीं सरकारानें लोकमान्य टिळकांवर राजद्रोहाचा आरोप लादला व त्यांना अटक केली. ज्या लेखासाठीं टिळकांना अटक झाली तो लेख काकांनीं लिहिला होता.

### राजद्रोहाचा खटला

या वेळीं लोकमान्यांच्यावर जो हा खटला झाला तो करण्यास सरकारला अमुक कारण पाहिजे होतें असें थोडेंच होतें ? इंग्रज म्हणजे देवदूत आणि त्यांना परमेश्वरानें हिंदुस्थानाच्या कल्याणासाठीं पाठविलें आहे असें मोहजाल पसरून आधुनिक सुधारणेच्या पांघरुणाखालीं व सुव्यवस्थेची दांभिक भाषा वापरून सरकारनें जी लूट आणि जुलूम चालविला होता त्या विरुद्ध खणखणीतपणानें टिळक आपल्या वर्तमानपत्रांतून व व्याख्यानद्वारा तक्रार करीत असत. सरकारचें सत्यस्वरूप उघडें करून प्रजेला आपल्या स्वत्वाची जाणीव करून देणारा मनुष्य कितीही तत्त्वशुद्ध वागत असला अगर कायद्याच्या कक्षेंत कितीही कांटेकोरपणानें रहात असला तरी असा मनुष्य परकी सरकारास डोळ्यापुढें नकोसा असणारच !

टिळकांच्यामुळें जनतेंत अशांतता माजली, त्यांच्यामुळें अनेक तरुणांचीं डोकीं भडकलीं, त्यांच्यामुळेंच दहशतवादी खून होतात ही येथल्या नोकरशाहीची तक्रार ! अशा स्थितींत टिळकांना पकडून त्यांच्यावर खटला करण्यासाठीं कायदेशीररीत्या योग्य कारण घडलें आहे कीं नाहीं याचीही दरकार सरकारनें केली नाहीं. कोणताही केसरी घेतला तरी त्यांत जागे व्हा; स्वाभिमान, स्वधर्माभिमान, स्वराष्ट्राभिमान बाळगून आपली उन्नति साधून घ्या, असें लिहिलेलें असेच. ज्या लेखावरून १८९७ सालीं टिळकांच्यावर खटला भरण्यांत आला तो लेख अगर तें लिखाण म्हणजे शिवाजीउत्सव प्रसंगीं झालेल्या प्रो. भानू, प्रो. जिनसीवाले व लोकमान्य यांच्या भाषणांचीं टिपणें आहेत. आतां तीं वाचलीं म्हणजे त्यांत राजद्रोह कसा शोधून काढावा ही पंचाईत आपणाला पडते. पण सरकारनें खटला उभा करून तो न्यायासनापुढें मांडल्यावर टिळकांना कडकडून शिक्षा द्यायची असें ठरवूनच कोर्टाच्या खुर्चीवर चढलेल्या स्ट्रॅची साहेबांना त्यांत राजद्रोह दिसला.

सरकारी अधिकाऱ्यानें लुनशीपणानें टिळकांना १८ महिन्यांची सक्तमजुरीची शिक्षा सांगून नोकरशाहीच्या अंतःप्रेषाबरहुकूम आपलें अन्यायकर्म पार पाडलें खरें, पण त्यांत त्याला कायदा गुंडाळून ठेवावा लागला. त्यानें 'अप्रीति' या १२४ अ कलमांतील शब्दाचा अर्थच बदलला व अप्रीति म्हणजे प्रीतीच्या विरुद्ध मनोविकार असा अत्यंत मोघम व बेकायदेशीर अर्थ करून टिळकांना शिक्षा ठोठावली.

हेतु हा कीं येनकेन प्रकारेण एकदां या टिळकांना उचलून तुरुंगांत टाकिलें कीं आपल्यावरच्या सर्व आपत्ती बंद होतील, त्यांचे अनुयायी म्हणविणारे सर्व भीतीनें दडपले जातील आणि त्यांच्या केसरी पत्राची गर्जना बंद पडून आपल्या मागचा भुंगा संपेल !

इंग्रजी राज्यांत कायद्याचा देखावा भरपूर असल्यानें रीतसर सर्व कायदेशीर विधी कोर्टात होऊन टिळकांना शिक्षा झाली. शिवाय या

कज्जांत स्ट्रॅची साहेबांनीं अप्रीति या शब्दाची अशी व्याख्या करून ठेवली कीं सरकारनें वाटेल त्या कोणाही गृहस्थास धरावें व १२४ कलमाखालीं खुशाल शिक्षा द्यावी! या सर्व घटनांमुळें त्या वेळची देशांची परिस्थिति विशेषतः पुण्यांतील परिस्थिति मोठी नाजूक झाली होती. सर्व जनतेमध्ये भयाचें वातावरण पसरून राहिलें होतें, कोण केव्हां पकडला जाईल याचा नेमच नव्हता.

या कालांत केसरीच्या सर्व लेखनाची व्यवस्था काकाच पहात असत. टिळकांवरचा खटला मुंबईस चालू होता तोपर्यंत खटल्याच्या हकीकतीच्या प्रसिद्धीच्या दृष्टीनें मुंबईस गुर्जर यांच्या मदतीनें जादा केसरी काढण्याची व्यवस्था केली होती.

टिळकांना शिक्षा ता. १४ सप्टेंबर १८९७ या दिवशीं झाली. त्यांना पकडल्यावर व निदान त्यांना जबर शिक्षा दिल्यावर तरी जनता व टिळकांचे सहाय्यक यांच्यावर कांहीं परिणाम होईल अशी सरकारची अपेक्षा होती.

पण ही अपेक्षा फोल ठरली. केसरी ऑफिसांतील एक केसरी बाहेर नेला तरी दुसरा तयारच होता. टिळकांच्या खटल्याचें अपील हायकोर्टाच्या बेंचपर्यंत गेलें. तथापि तेथल्या न्यायाधिशांनीं सिद्धसाधकपणानें स्ट्रॅची साहेबांच्या विकृत विचारसरणींतच आपला सूर मिसळून अपील मान्य करून घेतलें नाहीं. यामुळें राजनिष्ठपणानें देशोद्धाराची चळवळ करणाऱ्या सर्वांची मोठी अस्थिर परिस्थिति झाली. यासंबंधाचें चित्र ता. २८-९-९७ च्या केसरींत काकांनीं पुढीलप्रमाणें दिलें आहे.

### शिक्षेचा अन्वयार्थ

"स्ट्रॅची साहेबांनीं राजद्रोहाची जी नवीन व्याख्या केली ती हायकोर्टाच्या फुलबेंचनें बहुतांशीं कायमच केली असें म्हणावयास हरकत नाहीं.

याप्रमाणें राजद्रोहाची नवीन, भयंकर, व वेळोवेळीं पालटणारी व्याख्या झाल्यामुळें प्रजापक्षावर सांप्रत भयंकर प्रसंग गुजरला आहे. या नवीन व्याख्येमुळें रा. टिळक यांना कारागृहवास सोसावा लागला इतकेंच नव्हे तर ज्या तत्त्वामुळें प्रजापक्ष अस्तित्वांत आला, ज्यामुळें राष्ट्रीय सभा भरवून निरनिराळया दर्जाच्या लोकांच्या मनांत टोंचून राहणारीं दुःखें इंग्रज सरकारपुढें बोलून दाखविणें शक्य झालें, ज्या तत्त्वामुळें निरनिराळया राजकीय चळवळी करून हिंदुस्थानांत लोकमत तयार करूं अशी उमेद पुढाऱ्यांस धरतां आली, त्या तत्त्वावर स्ट्रॅची साहेबांच्या भाषणामुळें काळेकुट्ट डांबर फासलें गेलें असें आम्हांस वाटतें. ''

याच लेखांत 'अप्रीति' शब्दाची वाटेल तशी ओढाताण करण्याची मुभा न्यायाधिशांस मिळाल्यामुळें कोणत्या हास्यास्पद आपदांची माळ लागेल याचें विवेचन काकांनीं मार्मिकपणें केलें आहे.

" ...गोरक्षणाचे पुढाऱ्यांचे कपाळीं कारागृहवास भोगावा लागेल, देशी कापड वापरा म्हणणारांना साडेतीन वस्त्रांचा पोशाख करून, लबाडी, चोरी, करणाराबरोबर काबाडकष्ट करावे लागतील, श्रीगणपती महोत्सवाचे वेळीं व्याख्यानें देणाऱ्यांना समाजाच्या अति नीच बदमाषांच्या पंक्तींत बसून जाड्या भरड्या भाकरीचा तुकडा मोडण्याचा प्रसंग येईल, ...बर्क शिकविणाऱ्या प्रोफेसराला फरासखान्यांतील बोलावणें केव्हां येईल याचा नेम नाहीं; हॅमडन, वाशिंग्टन, क्रॉमवेल, नेपोलियन, शिवाजी, बाजीराव, माधवराव यांचीं चरित्रें सरस भाषेनें लिहिणाऱ्या इतिहासकारांना १२४ अ या कलमाखालीं केव्हां पकडण्यांत येईल या धास्तींत दिवस कंठले पाहिजेत; स्वराज्याचा उपभोग घेणाऱ्या लोकांच्या सुखाचें वर्णन करणाऱ्या कवीनें पोलीस भेटावयास आला असतां भीतीनें गांगरून गेलें पाहिजे;...आमच्या कवितेंत, आमच्या नाटकांत, आमच्या कादंबऱ्यांत, आमच्या ऐतिहासिक पुस्तकांत, आमच्या वर्तमानपत्रांत कोठेंही उच्च विचार किंवा उदात्त

मनोविकार असतां कामा नये, कारण परसत्तेखालीं उच्च विचार व उदात्त मनोविकार यांचाही फैलाव प्रसंगविशेषीं राजद्रोही असूं शकतो--असें स्ट्रॅचीसाहेब यांचें मत आहे. ''

स्ट्रॅचीप्रणीत ही व्याख्या त्यानंतरच्या असल्याच एका खटल्यांत त्यावेळच्या न्यायाधिशांनीं मान्य केली नाहीं यावरून काकासाहेबांची वरील मर्मभेदक टीका कायद्याच्या दृष्टीनें किती बरोबर होती हें कळून येईल. टिळक तुरुंगांत गेल्यानंतरच्या कालांत स्ट्रॅचीकृत अर्थाचेंच थैमान अर्थात् माजलेलें राहणार होतें. टिळक तुरुंगांत असल्यामुळें आलेल्या या आपत्तीस कोणत्याही तऱ्हेनें भीक न घालतां प्राप्त परिस्थितींतून मार्ग काढून लोकांना दिशा दाखविण्याचें काम केसरीमार्फत काकासाहेबांनाच करावयाचें होतें. राजकीय चळवळ्यांच्या बद्दलच्या कुजकट विचारानीं भारून जाऊन स्ट्रॅची साहेबांनीं जी अप्रीति शब्दाच्या अर्थाची निंद्य फिरवाफिरव केली त्याचा मुद्देसूद आणि खणखणीत समाचार काकासाहेबांनीं केसरीच्या ता. ५-१० १८९७ च्या अंकांत घेतला असून प्रजापक्षानें स्ट्रॅची साहेबांच्या अर्थाचा धोका पत्करूनही अधिक जोरानेंच आपलें पाऊल टाकलें पाहिजे असा तेजस्वी आदेश दिला आहे. ते सदरील लेखांत म्हणतात--

" रयतेस राजकीय शिक्षण देण्याचे भानगडींत पडणाऱ्यास स्ट्रॅची साहेबासारखे न्यायाधीश अठरा महिने सक्तमजूरीची शिक्षा केव्हां देतील याचा नेम नाहीं हे खरें आहे. आमच्या दैवदुर्विपाकानें प्रिव्हीकौन्सिलांतही स्ट्रॅची साहेबांची व्याख्या कायम ठरली तर प्रजापक्षास अनुकूल असा नवीन कायदा करण्यास सरकारला सतत विनंति करून स्ट्रॅची साहेबांची व्याख्या सरकारकडून हाणून पाडण्याचे अविश्रान्त श्रम करण्यास आम्हीं तयार असलें पाहिजे. स्ट्रॅची साहेबांची व्याख्या बदलेतों निदान सरकारचें कृत्यावर तरी टीका करण्याची आम्हांस सवड आहे व अप्रीतीचा अर्थ मुक्रर ठरलेला नाहीं, हें नीट ध्यानांत धरून आम्ही आमचें नेहमींचें

काम अधिक नेटानें करण्यास झटलें पाहिजे. सरकारचे विरुद्ध मनोविकार उत्पन्न करण्याची आपली खटपट नाहीं असें मनोदेवता आम्हांस सांगत असल्यावर, कायदेशीर हक्काकरतां कायदेशीर पद्धतीनें आम्ही भांडत आहों अशी स्वतःची खात्री असल्यावर, मग राजकीय शिक्षणाचा फैलाव करण्याचें काम झपाट्यानें करण्यास कशाचीहि भीति नाहीं !

१२४ अ या कलमाचा अर्थ हायकोर्टाचे ठरावांत मुक्रर ठरलेला नसल्यामुळें, अंधारांतून चांचपडत जाण्याचें राजकीय चळवळ करणाऱ्यांचें नशीबीं आलें आहे. कर्तव्यापासून पराङ्मुख होऊन जनांत छीः थूः करून घेण्याची जर तुमची सोय नसेल, तर अंधार प्रदेशांतून जाण्याच्या योग्य कायद्याच्या ज्ञानाची काठी हातांत धरा, राजकर्त्यांच्या द्रोहास मनाला शिवूंही देऊं नका, मग अंधारांतील खांचखळग्यांत दुर्दैवानें पडण्याची पाळी आल्यास त्या प्रसंगांतून पार पडून जाण्याचें मानसिक धैर्य खात्रीनें तुमच्या अंगीं येईल. राज्यकारभारांत ढवळाढवळ करणाऱ्यांचे कपाळीं असले सोहाळे विधीनेंच लिहिलेले आहेत, तेव्हां त्यांना भिऊन काय उपयोग ? राष्ट्रीय सभेसारख्या राजकीय चळवळीच्या धंद्यांत पडणाऱ्यांनीं तुरुंगाबाहेरील आपल्या स्थितिस विकृति व कारागृहवासास प्रकृति समजल्यावाचून मनाचें केव्हांहि समाधान व्हावयाचें नाहीं. टाइम्स-सारखे नेटिव्हद्वेष्टे प्रजापक्षाची राखरांगोळी करण्यांत उद्युक्त झाले असतां तोडलेल्या तरूप्रमाणें प्रजापक्ष अधिकच जोरानें पाऊल टाकीत आहे असें इंग्लंडच्या प्रत्ययास जर आम्हीं आणून दिलें नाहीं, तर आजपर्यंतच्या सर्व उद्योगावर पाणी पडल्यासारखें होईल. ”

## तारेवरील कसरत

वरील आदेशांतील निर्भयपणानें स्वकर्तव्य करीत राहण्याचा प्रजापक्षास दिलेला आदेश केसरीच्या त्यानंतरच्या संचालनाच्या कामांत त्यांनीं स्वतः उत्तम रीतीनें अनुसरून दाखविला. त्यावेळीं गद्दूळ होऊन गेलेल्या

राजकीय वातावरणांत केसरीचें संपादन अत्यंत जबाबदारीचें होतें. संयमपूर्ण लेखनाची आवश्यकता फार होती. तारेवरची कसरतच होती ती ! पण ही जबाबदारी काकासाहेबांनीं लोकमान्यांच्या तोलानें तोलली हें स्पष्टपणें दिसून आलें. १८९७ सालची राष्ट्रीय सभा टिळकांच्या अनुपस्थितींत झाली. त्या अनुषंगानें काकासाहेबांनीं कॉंग्रेसच्या तत्पूर्वीच्या १२।१३ वर्षांतील कार्याचा आढावा घेऊन त्यास यावें तितकें यश कां आलें नाहीं याचें मर्म सांगितलें व कॉंग्रेसनें लोकजागृतीचें काम मोठ्या प्रमाणावर अंगावर घेणें किती जरूरीचें आहे तें दाखवून दिलें.

"आयर्लंड, इंग्लंड किंवा फ्रान्स या देशांत ज्याप्रमाणें लोकांचे पुढारी पार्लमेंटचें काम करून लोकमत उत्पन्न करण्याकरतां सर्व राष्ट्रभर प्रवास करण्यास तयार असतात, त्याप्रमाणें आमच्याहि पुढाऱ्यांनीं दरवर्षी राष्ट्रियसभेचें काम करून लोकमत जागृत करण्याकरितां राजकीय चळवळीचें काम करण्यास तयार असलें पाहिजे. राष्ट्रीय सभेच्या पुढाऱ्यांनीं वरील प्रकारच्या राजकीय मोहिमा ( Political Campaigns ) दरवर्षी करून इतर राष्ट्रभक्तांना लोकमत जागृत करण्याचा कित्ता घालून दिला असतां राष्ट्रीय सभेच्या उद्योगांस यश येण्याचा संभव आहे."

टिळक तुरुंगांत गेल्यानंतर केसरी कचेरींत दुसरीच एक अडचण उत्पन्न झाली. केसरी आर्यभूषण छापखान्यांत छापला जात असे. पण खटल्यानंतर केसरी छापण्याची जबाबदारी आर्यभूषणचे व्यवस्थापक अंगावर घेईनात. शेवटीं फार प्रयत्नानें विठ्ठल छापखान्यांत तो छापला जाऊं लागला. या सर्व परिस्थितीमुळें लोकमान्य टिळक व केसरी यांचेबद्दल जनतेंत सहानुभूति व आदर वाढतच गेला. टिळकावर खटला झाला तरी पण रँड साहेबाचा खून कोणी केला याचा तपास अद्याप लागावयाचा होता. एका केसरीवर खटला करून सरकार थांबलें नव्हतें. तर पुणें वैभव, प्रतोद, व मोदवृत्त इत्यादि वृत्तपत्रांवरही त्याच वेळीं त्याच स्वरूपाचे

खटले झाले होते. टिळकातर्फे प्रिव्हिकौन्सिलपुढें झालेल्या शिक्षेविरुद्ध अपील होऊन तें नामंजूर झाले होतें. त्यामुळें तर जनतेंत असंतोष फार प्रखर स्वरूपांत उत्पन्न झाला. प्रक्षोभ वाढत चालला. सरकारच्या न्यायनीतीवरील जनतेचा विश्वास उडाला.

दरम्यानच्या काळांत केसरींत प्रिव्हिकौन्सिलची रचना व कार्यपद्धति यावरील माहितीपूर्ण लेख प्रसिद्ध करण्यांत आले होते. पण या विरुद्ध निकालानें इंग्रजी न्यायदानपद्धतीवरील हिंदी प्रजेचा विश्वास संपूर्णपणें ढळला, असें केसरींत लिहावें लागलें. या रीतीनें १८९७ सालच्या रँडच्या खुनानंतर वर्तमानपत्रावरील खटले व लोकमान्य टिळक, नातूबंधु इत्यादींचा तुरुंगवास यापासून वाढूं लागलेली दडपशाही ज्यास्तच वाढत गेली. याच काळांत पि. कों. मधील १२४ अ कलमाचीं दुरुस्त बिलें कौन्सिलांत सरकारनीं मंजूर करून घेतलीं. अशा एकंदर परिस्थितींत केसरीपत्र चालविणें किती धोक्याचें व जबाबदारीचें होतें, याचें आतां ज्यास्त विवेचन करण्याचें कारण नाहीं. तो काळच अत्यंत नाजूक होता. सरकारच्या मनांतील केसरीविरुद्ध बळावलेलें संशयाचें पिशाच्च पुढें रँडच्या खुनाचा पूर्ण तपास होऊन चाफेकर बंधूंना फांशीची शिक्षा झाल्यावरच सुटलें.

या सुमारास हिंदुस्थानच्या गव्हर्नर–जनरल पदावर लॉर्ड कर्झन या तडफदार महत्त्वाकांक्षी तरुणाची नेमणूक झाली. या कर्झनविषयीं विस्तृत माहितीपूर्ण लेख काकांनीं केसरींत लिहिले. दरम्यान टिळकासारख्या विद्वान् देशभक्ताला तुरुंगांत विनाकारण डांबलें याचे विरुद्ध हिंदुस्थानांत व बाहेर देशांतील मोठमोठ्या मंडळींत चिकित्सा होऊं लागली. त्यांच्या सुटकेचे प्रयत्न हिंदुस्थानांत व परदेशांत चालू झाले. प्रो. मॅक्समुलरसारख्या जगन्मान्य विद्वानानें मनापासून प्रयत्नांची पराकाष्ठा केली. सुटकेच्या दिशेनें विचारचक्र चालू झालें. भवति न भवति होऊन अखेर सर्वांच्या इच्छेला मान मिळून शिक्षेची

मुदत संपण्यापूर्वी ६ महिने अगोदर म्हणजे ६ सप्टेंबर १८९८ रोजीं लोकमान्यांना तुरुंगांतून सोडण्यांत आलें.

या काळांत अनेक राजकीय प्रश्न उद्भवले. कर्झनसाहेबासारख्यांनीं दर्पयुक्त वक्तव्यें केलीं. शिवाजीउत्सवासारखे जे अनेक लोकजागृतीचे कार्यक्रम झाले किंवा चाफेकर बंधु व पुढें द्रविडबंधु यांचेबद्दल ज्या अनेक प्रक्षोभाच्या घटना घडल्या त्या सर्व बाबतींत काकासाहेबांच्या लेखणीनें बहुमोल कामगिरी केली. त्यांच्या देशहिताच्या तळमळीनें लिहिलेल्या मुद्देसूद व जोरदार लेखांनीं लोकमताला योग्य दिशा लागली. संकटकाळीं केसरी किती निष्ठेनें देशकार्य करितो हें काकासाहेबांनीं लोकांच्या प्रत्ययास आणून दिलें. परंपरेचा अभिमान, जळजळीत देशाभिमानाची शिकवण, विषयाकडे देशहितैक दृष्टीनें पाहण्याची मनाची ठेवण, प्रतिपाद्य गोष्टी वाचकांच्या नजरेपुढें ठळकपणें राहतील अशी शब्दरचना हे काकासाहेबांच्या लेखनसामर्थ्याचे मुख्य गुण होते. निश्चित विचार खणखणीत भाषेंत घोळून घोळून परिणामकारक रीतीनें मांडणें अशी त्यांची लेखनशैली होती.

### ‘पुनश्च हरिः ॐ’

लोकमान्य तुरुंगांतून सुटून आले, तरी त्यांना केसरीच्या संपादनाची धुरा लागलीच आपल्या खांद्यावर घेतली पाहिजे असें वाटलें नाहीं. तें काम पूर्णतया पूर्वीप्रमाणें काकाच जबाबदारीनें करीत होते. टिळकांनीं दोन महिने सिंहगडावर विश्रांतीसाठीं काढले. डिसेंबरमध्यें भरावयाच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनासाठीं मद्रासला गेले, नंतर सिलोनपर्यंत प्रवास केला. दरम्यानच्या काळांत राष्ट्रीय सभेंतील टिळक पक्षांतील लोकांविषयीं अँग्लो-इंडियन पत्रकारांनीं सारखी कोल्हेकुई चालविली होती. टिळकांना सरकारानें सहा महिने आधींच सोडलें ही गोष्ट या हितशत्रु पत्रकारांना झोंबत होती. “ राष्ट्रीय सभेला टिळक व गोखले यांसारखे लोक हजर राहतात

यावरून ती सभा कशा प्रकारची आहे हें आम्हांस कळून चुकलें आहे." असा प्रचार ग्लोबसारखीं पत्रें वेळीं अवेळीं करीत असत. पुण्यांत द्रविड-बंधूंचे खून झाले. तेव्हांपासून असलाच प्रचार सुरू होता. या सर्व खुनामागें फार मोठा कट असावा अशी कल्पना टाइम्ससारख्या पत्रांत येत होती. १८९८ च्या फेब्रुआरी ८ रोजीं चाफेकरबंधूंची बातमी सरकारला पुरविणाऱ्या द्रविडबंधूंचा खून पुण्यांत झाला अशा-रीतीनें खुनांतून खून निघूं लागले. इंग्रजी पत्रांनीं पुन्हा कटाचें तुणतुणें सुरू केलें. सारखा टाहो फोडूं लागले. द्रविडबंधूंनीं, सरकारांने जाहीर केलेली पूर्ण रक्कम आपणास दिली नाहीं याबद्दल, इंग्रजी पत्रांतून तक्रार केली होती. पुढें त्यांचा खून झाला. द्रविडबंधूंच्या घरभेदीपणाबद्दल देशी पत्रांतून टीका येत होती. द्रविडबंधूंच्या खुनाच्या आदल्याच दिवशीं ७ फेब्रुआरीस केसरीच्या अंकांत 'द्रविडास आपल्या कृत्याचा जाब दिला पाहिजे' अशा अर्थाचें लेखन आलें होतें.याचा विपर्यास करून केसरीनेंच या खुनास चिथा-वणी दिली असा आक्रोश या इंग्रजी पत्रांनीं सुरूं केला. पण याबद्दलचा आधार या खटल्यांत तर निष्पन्न झाला नाहींच व पुढें कोठेंही मिळण्याचा तिळमात्र संभव नव्हता. त्यामुळें ही सर्व अँग्लोइंडियन पत्रांची टीका केवळ द्वेषमूलक व फोल ठरली.

दक्षिण हिंदुस्थानचा प्रवास करून टिळक परत आले त्यावेळीं त्यांची प्रकृति बरीच सुधारली होती. लोकमान्य प्रवास आटोपून परत आले, तरीही केसरीचें डिक्लेरेशन आपलें नांवें केलें नव्हतें. त्यामुळें तें कधीं कधीं प्रसंगोपात्त केसरींत लिहीत असत. अखेर ४ जुलै १८९९ रोजीं टिळकांनीं केसरीपत्रावर संपादक म्हणून आपलें नाव घातलें, व वैदिक भावना व परंपरादर्शक 'पुनश्च हरिः ॐ' या सार्थ मथळ्याखालील लेखानें वाचकांचें लक्ष वेधून घेतलें. त्यांत त्यांनीं केसरी पुन्हां आपले हातीं घेतां आला याबद्दल परमेश्वराचे आभार मानले असून आपल्या गैरहजेरींत केसरी चालविणाऱ्या आपल्या सह-

काऱ्यांचें, नाना रूपानें प्रसंगीं द्रव्यसहाय्य केल्याबद्दल व सहानुभुति दाखविल्याबद्दल आपल्या निष्ठावान् अनुयायांचें व केसरीच्या प्रांतोप्रांतीं पसरलेल्या वाचकवर्गाचें ऋण मान्य केलें आहे. आपल्या अनुपस्थितीस आपलीं वर्तमानपत्रें, केसरी, मराठा जबाबदारीनें चालविणाऱ्या आपल्या मदतनीसांचा उल्लेख करतांना काकासाहेबांबद्दल हार्दिक शाबासकी पुढील शब्दांत दिली आहे.

" सांधा जितका बेमालूम जडेल किंबहुना सांधा केला आहे कीं नाहीं याचीच परीक्षकास भ्रांति पडेल तेव्हांच त्यांत सांधा लावणाराचें कसब दृष्टीस येतें. तशा प्रकारचा बेमालूम सांधा वरील गृहस्थांनीं जडविला होता हें केसरीच्या वाचकांना कळून आलेंच आहे. रा. रा. खाडिलकर यांचें नांव जबाबदार प्रकाशकांत जरी दाखल केलें नव्हतें तरी केसरींतील बहुतेक एडिटोरियल लेख त्यांच्याच हातचे आहेत हे येथें सांगणें जरूर आहे. "



## : ४ :

## क्रांतीच्या वातावरणांत.



"क्रांतीचें ध्येय काय? पापाचा नाश व पुण्याची अभिवृद्धि झपाट्यानें व्हावी म्हणूनच क्रांति हवी असते."

—खाडिलकरांचा रुद्र.

काकासाहेबांनीं केसरींत प्रवेश केला तेव्हांच देशसेवेचें कंकण त्यांनीं बांधून घेतलें असल्यानें आपल्या गुरूकडून झालेला हा गौरव म्हणजे आणखी अधिक कार्याच्या अपेक्षेनें दिलेलें प्रोत्साहनच होय असें ते समजले असल्यास नवल नाहीं. ही नवी जबाबदारी पार पाडण्याकरितां आपली दृष्टि विशाल होणें जरूर आहे असें त्यांना वाटणें साहजिक होतें. 'पुनश्च हरि: ॐ' या लेखापासून केसरीवर 'संपादक' म्हणून लोकमान्यांचें नांव दिसत होतें तरी खरी संपादकीय जबाबदारी काकांवेवर पूर्वीप्रमाणेंच त्यांनीं पूर्ण विश्वासानें सोंपविली होती.

ही जबाबदारी पार पाडण्याकरतां भोंवतालच्या परिस्थितीचें ते काळजीपूर्वक निरीक्षण करीत होते. पुण्यांत प्लेगनें पोळलेला समाज त्यांना दिसत होता तर भोंवतालीं विजापूर वगैरे जिल्ह्यांत दुष्काळानें पीडलेला समाज दीनवाणा होऊन पाहात आहे असें दृश्य त्यांच्या डोळ्यांसमोर येत होतें. प्लेग-दुष्काळाप्रमाणेंच परकीय भांडवल, मुंबईच्या मजुरांचें रक्तशोषण करून, दरिद्री महाराष्ट्राला आणखी भिकारी बनवीत आहे हेंहीं दृश्य त्यांना भेडसावीत होतें. दारिद्र्य, दुष्काळ व दडपशाही यांचा वरवंटा सर्व देशभर सारखाच फिरत होता. या सर्वांच्या सुखदुःखांना वाचा फोडण्याची व त्यावर मार्गदर्शक होतील असे उपाय सुचाविण्याची जबाबदारी आपल्यावर आतां जास्तच येऊन पडली आहे असें त्यांना वाटूं लागलें होतें. गांव, तालुका, जिल्हा, प्रांत व सर्व देश अशी त्यांची दृष्टि चौफेर पाहूं लागली होती.

ह्या त्यांना प्राप्त झालेल्या विशाल दृष्टीनें जनतेला कार्यप्रवण कसें करावें याचें चिंतन करतांना श्रीसमर्थ रामदासांच्या क्रांतिकारी उक्ति व कृति त्यांच्या डोळ्यांसमोर येत होत्या. 'मराठा तितुका' मेळवावा' या शिकवणीचें विशाल स्वरूप 'भारतीय तितुका एकवटावा' या शिकवणुकीनें जनतेपुढें मांडण्याची वेळ आली आहे हें त्यांनीं ओळखलें. अडाणी मावळ्यांनाही वीर बनविण्याची शिवप्रभूची क्रांतिकारक योजकता भरतखंडाला परिचित करून देण्याकरितां आपल्या लेखणीचें सर्व कौशल्य दाखविलें पाहिजे हें त्यांनीं जाणलें होतें. देशाच्या अन्तर्गत सर्व घटना स्वराज्योन्मुख झाल्या पाहिजेत आणि पारतंत्र्याचे पाश तोडून टाकण्याकडे सर्वांच्या प्रवृत्ति धावल्या पाहिजेत, क्रांतीशिवाय हें घडणार नाहीं; लोकमान्यांना कारावासांत टाकून परकीय सरकारनें आपल्या शक्तीची पहिली सलामी दिली आहे तर ती स्वीकारून प्रतिपक्षावर उलट डाव करण्याची क्रांतिकारी धमक जनतेच्या अंगीं आहे हें सर्वांच्या प्रत्ययास

आणून दिलें पाहिजे; लोकमान्यांनीं प्रसृत केलेली क्रांतिकारी राष्ट्रीय चळवळ फक्त महाराष्ट्रांतच न राहतां सर्व भरतखंडांत तिचा फैलाव झाला पाहिजे; अशा विचारानें काकांचें अन्तःकरण भारून गेलें होतें.

लोकमान्यांच्या पहिल्या तुरुंगवासांत अगर त्यानंतर टिळकांच्या राजकारणाचा सांधा जोडण्याचें कार्य—दडपशाहीनेंही जनतेचें धैर्य खचूं न देण्याचें कार्य—जसें त्यांना करावयाचें होतें, तसेंच दडपशाहीमुळें चिडलेल्या तरुणांचें मन आकर्षून घेण्याचेंही धोरण राखायचें होतें. दे. भ. शिवरामपंत परांजपे यांचा ' काळ ' नुकताच सुरू झाला होता व तो सरकारचा ' काळ ' ठरणार असें त्यांतील क्रांतिवादी जाज्वल्य लेखांवरून सर्वांना वाटूं लागलें होतें. देशांतील तरुणांत क्रांतिकारक वृत्ति वाढत होती व त्यावेळीं जनतेला योग्य मार्गदर्शन केसरींतून करण्याची आपली जबाबदारी काका कौशल्यानें पार पाडीत होते.

तरुणांची क्रांतिकारी वृत्ति कार्यप्रवण व यशस्वी कशी होईल याचें चिंतन ते करीत होते. याचमुळें लोकमान्यांचे बरोबरीनें व स्वतंत्रपणें काम करणारे दे. भ. शिवरामपंत परांजपे व वासुकाका जोशी यांच्याशीं असल्या बाबतींत बरेंच जुळतें असें काकांचें धोरण होतें. कारण तिघांचीही वृत्ति बंडखोरीची व क्रांतिकारक होती. तिघांचे स्वभाव वेगळे, काम करण्याची पद्धत वेगळी, विचारांची बैठक निरनिराळी, पण सर्वांच्या कार्याचें पर्यवसान क्रांतीच्या विचारांत दृग्गोचर होणारें असें असल्यामुळें तिघांचीं मनें एक झालीं होतीं; तीं इतकीं कीं काळ पत्र सुरू करतांना काकांचा सल्ला व सहाय्य शिवरामपंतांनीं घेतलें होतें व काकांनींहीं हें आपलेंच पत्र आहे अशा दृष्टीनें त्यांत लक्ष घातलें होतें. काकांचें बिऱ्हाड या सुमारास भाऊसाहेब गोखले यांचे वाड्यांत असे. ' काळा 'च्या पहिल्या लेखाची चर्चा व घडण काकासाहेब राहात असलेल्या या माडींतच झाली.

## क्रांतिकारक काळ

'काळ' पत्र सुरू झालें व बंडखोर वृत्तीची रणदुंदुभी महाराष्ट्रांत दुमदुमूं लागली. काळ पत्राची छाप तरुणांचे मनावर असतांनाही केसरीनें त्या तरुणांच्या उत्साहाला योग्य वळण लागेल असें विचारी धोरण आखलें. क्रांतीचे विचार कोणाला आवडत नाहींत? क्रांतीचीं रसभरित वर्णनें कोणाला वाचावींशीं वाटत नाहींत? प्रक्षोभकारक घटनांनीं कोणाचे डोळे दिपत नाहींत? पण ती क्रांतीची प्रवृत्ति खरी फलदायी व्हायची तर दूरदृष्टीची भक्कम बैठक तिला असणें जरूर आहे. परकीय सत्ता घालवायची तर क्रांतिदेवतेची उपासना केलीच पाहिजे; पण ही क्रांति केवळ व्यक्ति-स्वरूपाची, कूपमंडूकपणाची असतां कामा नये. ह्याकरितां आपल्या सर्व प्रांतांतून व सरहद्दीवर घडणाऱ्या घटनांकडे आपलें लक्ष पाहिजे असें काकांनीं दाखवून दिलें. सरहद्दीवरील पठाणांच्या कटकटीचा अन्वयार्थ काय तें पाहण्यास केसरींतून त्यांनीं लोकांना शिकविलें. इतकेंच नव्हे तर सरहद्दीबाहेर परराष्ट्रांत काय घडामोडी चालू आहेत व त्यांचे आपल्या देशावर काय परिणाम घडत आहेत तिकडेही काकांनीं केसरीद्वारें जनतेचें लक्ष वेधलें.

दहशतवाद्यांचा क्रांतिवाद, वैचारिक क्रांतिवाद व व्यावहारिक क्रांतिवाद अशा स्वरूपाचें क्रांतीच्या उत्क्रांतीचें स्वरूप या वादाला होतें. चाफेकर, द्रवीडबंधू वगैरे दहशतवादी गटाच्या अचाट कृत्यामुळें जनतेचें मन ते एकदम काबीज करीत असत. ह्या वीरवृत्तीचें पोषण केलें पाहिजे अशा वैचारिक क्रांतीच्या धोरणानें लिहिलेले शिवरामपंतांचे लेख तरुणांचीं अंतःकरणें भारून टाकीत असत. त्यामुळें काळांतील क्रांतिसूचक लेख उत्सुकतेनें तरुण वाचीत असत. पण ह्या तरुणांच्या उत्साहाचा हिरमोड न करतांही त्याला योग्य मर्यादा दाखविल्या नाहींत तर क्रांतीचें कार्य सफळ होणार नाहीं अशी काकासाहेबांची दृष्टि होती. क्रांतीला तात्त्विक

विचारांची व दूरदृष्टीच्या योजकतेची बैठक देण्याचें कार्य काकांना करावें लागत होतें.

### स्वराज्योन्मुख नाट्यकला

स्वातंत्र्योत्सुक जनतेच्या प्रक्षोभकारक वृत्तींना विचारी वळण देण्याचें व जे अद्यापही जागे झाले नाहींत त्यांना जागे करण्याचें दुहेरी कार्य देशापुढें होतें. त्याचें मार्गदर्शन करण्याची संधि 'केसरी'मुळें जशी काकांना मिळाली तशीच नाट्यकलेच्या सेवेमुळेंही मिळाली. आपली देशसेवेची बुद्धि केसरीद्वारें जसें ते प्रगट करीत, तसेंच नाट्यकलेचाही उपयोग देशोद्धाराचे कार्यांतच झाला पाहिजे असा त्यांचा ठाम निश्चय होता. आपली बुद्धि व कला त्यांनीं देशाला वाहिली होती. त्यामुळेंच दुष्काळी जनतेच्या सहाय्याकरितां त्यांनीं जेव्हां विजापूर जिल्ह्यांत संचार केला तेव्हां तालिकोटचा किल्ला पाहतांच त्यांचें कविमनांत लगेंच स्फुरण चढलें.

स्वराज्य मिळवावेसें आपणाला वाटतें तसेंच मोंगलाईमुळें त्रस्त झालेल्या जनतेलाही पूर्वीच्या काळीं वाटत असलेंच पाहिजे, त्या पूर्वकाळीं त्यांनीं कसा विचार केला असेल, कसा आचार केला असेल, त्यांत भाग घेणा-रांच्यावर सुखदुःखाचे कसे प्रसंग आले असतील, त्या संकटांत हिमतीनें ते कसें वागले असतील त्याचें शब्दचित्र त्यांचे डोळ्यांपुढें—त्यांच्या कवि-मनापुढें—तो ऐतिहासिक किल्ला पाहिल्यावर—सारखें नाचूं लागलें असल्यास नवल नाहीं. त्या विचारांनाच 'कांचनगडची मोहना' या नाटकानें त्यांनीं नाट्यपूर्ण असें स्वरूप दिलें.

शिवरायाच्या वेळच्याच काय पण त्यापूर्वीच्याही काळाच्या ऐतिहासिक घटनांच्या आधारें जनतेचीं मनें स्वराज्योन्मुख करण्याचीं व आपल्या-सारखीं साधीसुधीं माणसें सुद्धां एकविचारानें भारलीं तर तीं आपलें

कार्यें नित्य व्यवहारांतही कसें करूं शकतात याचीं हृदयंगम वर्णनें कादंबरीस्वरूपांत परिणामकारक होतील असें त्यांना वाटत होतें. कादंबरीच्या ह्या कलेचाही उपयोग करावा असें 'कांचनगडची मोहना' हें नाटक लिहिण्यापूर्वी काकांना वाटत होतें. कादंबरी लिहिण्याचा एक प्रयत्न त्यांनीं इंग्रजी पांचवींत असतांना 'गंगू' नामक कादंबरीचीं कांहीं प्रकरणें लिहून केला होता. 'हिरवा महाल' या कादंबरी स्वरूपांत 'कांचनगडची मोहना' नाटकाचें कथानक वाचकांपुढें ठेवावें असें त्यांना वाटत होतें, पण पुढें तो बेत त्यांनीं बदलला व 'कांचनगडची मोहना' या नाट्यस्वरूपांतच त्यांनीं आपले विचार मांडले.

'सवाई माधवरावांचा मृत्यु' हें त्यांचें विविधज्ञानविस्तारांतून प्रसिद्ध झालेलें पहिलें नाटक लिहितांना काकांची मनःस्थिति व परिस्थिति जी होती त्यापेक्षां भिन्न मनःस्थितींत व परिस्थितींत 'कांचनगडची मोहना' हें नाटक त्यांनीं लिहिलें. कॉलेजमध्यें असतांना भवभूति व शेक्सपीयरसारख्या पौर्वात्य व पाश्चात्य श्रेष्ठ नाटककारांची पकड त्यांच्या मनावर बसली होती. त्या श्रेष्ठ नाटककारासारखी थोर नाटय कृति आपल्या हातून घडावी अशी 'वाङ्मयीन दृष्टि' व तळमळ त्यांचे मनांत वावरत होती.

पण 'कांचनगडची मोहना' नाटक लिहितांना त्यांची मनःस्थिति भिन्न वातावरणांत होती. विजापूरच्या दुष्काळी दौऱ्याचे वेळीं जनतेची अनुकंपनीय अशी परिस्थिति कशी झाली आहे तें चित्र त्यांचे डोळ्यांपुढें होतें. पारतंत्र्याचे पाश तोडण्याची तरुणांची महाराष्ट्रभर चाललेली धडपड त्यांना दिसत होती. विजापूरच्या गोलघुमटाच्या दर्शनानें पूर्वजांचा स्वातंत्र्यप्राप्तीच्या धडपडीचा अलौकिक इतिहासही त्यांचे कानांत घुमत होता. अशा पार्श्वभूमीवर स्वराज्य गमावलेला पण स्वातंत्र्य मिळवूं पाहणारा 'प्रतापराव' कांचनगडच्या मोहनेंत त्यांनीं निर्माण केला व सुशिक्षित वर्गाच्या मनांत इंग्रजीभाषारूपी वाघिणीच्या दुधानें जे स्वातंत्र्याचे नवे विचार स्फुरण

पावत होते व जी तरुणाची मानसिक धडपड चालू होती त्याला त्यांनीं दृश्यस्वरूप दिलें.

विजापूरकरांना धूळ चारून विजयनगरचें तक्त पुनः स्थापण्याची पुरेपूर शक्ति स्वतःच्या मनगटांत असलेल्या—पण तापट स्वभावामुळें—शत्रूच्या विश्वासघाताला बळीं पडलेल्या प्रतापरावाच्या हताश मनाची तळमळ दाखविणारा चौथ्या अंकांतील तिसरा प्रवेश वाचतांना व पाहातांना—त्यावेळच्या तरुणांच्या मनांत उचंबळणाऱ्या विचारांचीच प्रचीति प्रत्येकाला आल्याशिवाय राहात नसे. पांचव्या अंकांत " आज मरण हें आम्हां सर्वांच्या कपाळीं लिहिलेंच आहे " अशा तयारीनें रणधुमाळींत जाणून बुजून उडी घेणाऱ्या प्रतापरावांच्या तोंडीं काकांनीं घातलेलें भाषण तर वाचकांची व प्रेक्षकांची चित्तवृत्ति तल्लीन करणारें आहे. स्वातंत्र्यासाठीं धडपडणाराला शूरवीर कसें व्हावें लागतें, वीरकन्या, वीरपत्नी, वीरमाता कसें बनावें लागतें ह्याची शिकवण व जाणीवच ह्या प्रसंगानें काका जनतेला देत आहेत. असे हे प्रसंग पाहात असतां कोणालाही वाटल्याशिवाय राहात नाहीं. आपल्या सभोंवतालचें वातावरण व तत्कालीन परिस्थितीनें उत्पन्न झालेलें पण सरळ बोलून दाखवितां न आल्यामुळें मनाची कुंचंबणा करणारे विचार प्रतापराव प्रभृति भूमिकांच्या रूपानें त्यांनीं नाट्यसृष्टींत प्रत्यक्ष बोलून दाखविले असें प्रेक्षकांना वाटत असे. आपल्या मनांतील विचारच काकासाहेब बोलून दाखवीत आहेत व आपण ह्या परिस्थितींत कसें वागावें हें काकासाहेब आपणाला सांगत आहेत असें हें नाटक वाचतांना प्रत्येकाला वाटत असे. नाटकांतील दुसऱ्या अंकांतील पहिल्या प्रवेशांत खानाचा वकील आला असतां प्रतापरावानें त्याची थैली नाकारली त्या प्रसंगीं खालील रक्त उसळविणारे विचार प्रतापरावाच्या तोंडीं घातले आहेत:—

" प्रतापराव:—........(थैली घेऊन फाडून टाकतो.) जा, विजापूरला जा; आमच्या देशाच्या पैशावर चैन करणाऱ्या तुमच्या पादशहाला

माझा साफ निरोप सांगा, प्रतापराव कांचनगडावर तुमचा अधिकार मानीत नाहीं !.........

राघो०:— प्रतापराव, राघोजीरावाचा तुम्हीं अपमान केला आहे. पादशहाच्या विरुद्ध बंड—

प्रताप०:—बंड ? कोण कोणाविरुद्ध बंड करतो ? पादशहानेंच आमच्या-विरुद्ध इतकीं वर्षे एकसारखी बंडफितूरी केली; आतां त्याला शिक्षा करण्याची वेळ आली आहे; बंडखोरांना तुम्ही सामील झालेले, कसला तुमचा मान ठेवायचा ? ”

अशा स्वातंत्र्योन्मुख क्रांतिकारी विचारानें भारलेलें हें नाटक काकांनीं आपलें नांव त्यावर छापलेलें नव्हतें, तरी नाट्यप्रेमी रसिकांचें त्याचेकडे लक्ष गेलें. कोणाचें नाटक हें माहीत नसतांनाही तें वाचावें व प्रयोगरूपानें करावें असें पुष्कळांना वाटलें. ह्या नाटकाचें छपाईच्या दृष्टीनें आणखी एक वैशिष्ट्य होतें. चित्रशाळेंत तोंपर्यंत फक्त शिलाप्रेसवरचीं पुस्तकें छापलीं जात. टाइपवर छापलेल्या पुस्तकांचा हाच प्रारंभ !

या नाटकाचें दुसरें वैशिष्ट्य म्हणजे हें नाटक उमरावतीच्या श्रीमंत दादासाहेब खापर्डे या लोकमान्यांच्या रसिक सहकाऱ्याला काकांनीं अर्पण केलें आहे. कारण दादासाहेब खापर्डे यांचा व काकांचा लोकमान्यांमुळें व केसरीवरील खटल्यामुळें जो संबंध आला त्यांत रसिक व क्रांतिकारी अशी दुहेरी वृत्ति असलेले सरदारी बाण्याचे ते गृहस्थ आहेत असें त्यांना आढळून आलें. काकांच्या तेजस्वी लेखणीचें कौतुक करणारे व अभिमान बाळगणारे ते लगेच झाले. ह्या प्रेमळ सहानुभूतीमुळें कृतज्ञता बुद्धीनें काकांनीं आपलें नाटक त्यांना अर्पण केलें.

त्यावेळीं नटश्रेष्ठ गणपतराव जोशी यांच्या शाहूनगरवासी नाटक मंडळीनें प्रथम या नाटकाचे प्रयोग केले. कोल्हापूरच्या एका क्लबाकडून

या नाटकास अडीचशें रुपये बक्षीस मिळालें. हें नाटक पाहिल्यापासूनच लोकप्रिय झालें. याचें कारण त्यांत दिसून येणारी स्वातंत्र्याच्या लढ्याची तळमळ व क्रांतिवृत्ति हें होय. याच सुमारास शिवरामपंत परांजपे यांचें मानाजीराव नाटक शाहू नगरवासी मंडळीनें बसविलें. शेक्सपियरच्या मॅकबेथचें 'मानाजीराव' हें रूपांतर आहे. या नाटकाच्या तालमी घेण्यासाठीं शिवरामपंतांचे स्नेही म्हणून काका कंपनींत जात असत. कंपनींत बेळगांवचे नाटककार किरात, दादासाहेब खापर्डे वगैरे मंडळी मधून मधून येत. किरातांशीं हा नव्यानें आलेला संबंध वाढून पुढें अत्यंत घरोब्याचा झाला.

याच क्रांतिवादी वृत्तीमुळें प्रो. शिवरामपंत यांनीं नवीनच सुरू केलेल्या 'काळ' पत्रांत काका मधून मधून लिहीत असत. पंतांची शैली अगदींच निराळी पण एकदां तर असें झालें कीं, आख्खें काळपत्र एक टाकीं लिहून काढण्याचा प्रसंग काकांचेवर आला. प्रो. शिवरामपंत यांच्या विरोधगर्भ शैलीचें अनुकरण करण्याचें अपूर्व कौशल्य काकांनीं या प्रसंगीं दाखविलें. टिळकपक्षीयांत पंत व काका पट्टीचे प्रक्षोभक वक्ते, उच्च श्रेणीचे देशभक्त व परिणामकारी शैलीचे लेखक अशी ख्याति होती.

त्यांच्या लेखनशैलींत जसा फरक होता तसाच वक्तृत्वशैलींतही फरक होता. वक्तृत्वकला पंतांना आपण होऊन माळ घालीत असे तर काका तिला माळ घालायला लावीत असत. लेखनशैलींत फरक पण परिणाम मात्र दोघांचा एकाच स्वरूपाचा! राजकारणांत असो वा सार्वजनिक कार्यांत असो तुटून पडतांना तोफखानी मारा करून प्रतिपक्षाला ते चीत करीत.

## काकासाहेबांचा क्रांतिवाद

या कालांत लोकमान्य निरनिराळ्या परिषदांसाठीं व राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनाकरतां परप्रांतीं जात. त्यावेळीं केसरीच्या सर्वच व्यवस्थेकडे

काकांना दक्षतेनें पहावें लागे. लोकजागृतीकरतां सभा भरविणें व त्यांत भाषणें करणें हा तर त्यांचा नित्याचाच क्रम होता. त्यावेळीं काकासाहेब गीता व दासबोध यांतील तत्त्वज्ञानाचा आधार घेऊन आपले क्रांतिकारक व प्रक्षोभक विचार जोरकसपणानें मांडीत असत. प्राप्त परिस्थितींतून कांहींतरी धडक मारून मार्ग काढला पाहिजे असें क्रांतिकारी विचार त्यावेळीं देशविमोचनाच्या कार्यांत भाग घेणाऱ्या अनेकांच्या मनांत सर्वकाळ थैमान घालीत होते. क्रांतिसंबंधाच्या अशा विचारांची सर्वसाधारण ठेवण सामान्य जनांना एकाच तऱ्हेची दिसत असली तरी त्यामध्यें फार महत्त्वाचे फरक होते. हे फरक नीट लक्षांत येण्यास त्या वेळच्या क्रांतिवादी मनोवृत्तीची थोडी चिकित्सा करणें जरूर आहे.

परवशतेच्या पाशाची बोंचणी मनाला त्रास सतत देत असल्यानें महाराष्ट्रांत सत्तावन सालच्या बंडानंतर पुन्हां विष्णुशास्त्री चिपळूणकरापासून स्वातंत्र्यासाठीं लोकजागृति व चळवळ करण्याच्या प्रयत्नाचा प्रारंभ झाला. स्वातंत्र्यप्राप्तीच्या उपाययोजनेच्या बाबतींत देशभक्तांचे मनांत अनेक विचार येत. आपलें स्वातंत्र्य कशानें गेलें व तें परत कशानें प्राप्त होईल याविषयीं नित्य भवति न भवति चाले. कित्येकांचें मत राजकारणांत सौजन्य, राज्यकर्त्यांच्या भलेपणावर विश्वास व सनदशीर चळवळीचा लोकांचे मार्गे लावलेला सततचा भुंगा असल्या उपायांचा इंग्रजासारख्या प्रबळ राज्यकर्त्याविरुद्ध कांहींही उपयोग होणार नाहीं असें होतें. क्रांतिकारी मनोवृत्तीला हे मार्ग अत्यंत दुबळे वाटत. संघशक्ति निर्माण करण्याकरितां लोकजागृति करावी, पण चळवळ परिणामकारक होण्यासाठीं प्रसंगीं शस्त्रग्रहणाची तयारी असावी असा कित्येक तरुणांच्या मनाचा वारा वाहत होता.

त्या काळांत लोकमान्यांजवळ अशा सर्व मतांचे लोक जमत व या प्रश्नाची चर्चा चाले. टिळक-पक्षीयांत कमीजास्त प्रमाणांत या क्रांति-

वृत्तीचे अनेक अनुयायी होते. दे. भ. शिवरामपंत परांजपे व वासुकाका जोशी वगैरे मंडळी जहाल क्रांतिवादी होती. शस्त्रावांचून स्वातंत्र्य संपादणें शक्य नाहीं असें वाटून त्या दिशेनें प्रयत्न व्हावा असें शिवरामपंत प्रतिपादीत व त्याचा ध्वनि त्यांच्या लेखनांत व भाषणांत उमटे. लोकमान्य तेजस्वीपणांत तिळभरही कमी नव्हते, इतकेंच काय त्यांनीं चाफेकर-बंधूंच्या चौकशीचे बाबतींत ब्रुइन साहेबांच्या तोंडावर '**वेळ अनुकूल आली तर मी बंड करीन**' असें सांगितल्याचें प्रसिद्धच आहे. पण ते अधिक व्यवहारी, विचारी व व्यापक बुद्धीचे होते.

काकासाहेबांची मनोभूमिका या विचारपरंपरेच्या मध्यांत होती. काकासाहेबांच्या सशस्त्र क्रांतिवादाचें स्वरूप सामान्य कल्पनेपेक्षां किंचित् निराळें होतें. ते त्या काळीं सशस्त्र क्रांतिवादी होते तरी व्यक्तिगत अत्याचार देश-स्वातंत्र्य संपादन कार्यांत फारसे उपयोगी पडतील असें त्यांना मनापासून वाटत नव्हतें. काकासाहेब हे भावनाप्रधान असले तरी त्यांच्या भावनांवर बुद्धीचा पगडा असल्यानें त्यांचा क्रांतिवाद विवेकी व हिशेबी असा होता.

सशस्त्र क्रांतिवाद व दहशतवाद यांतील फरकाची कल्पना त्यांचे डोळ्यांपुढें प्रथमपासूनच होती. दहशतवादी अन्यायाच्या चिडीनें पण निराशेंतून उत्पन्न होतो व शत्रूला शासन करणें एवढ्याच प्रयत्नांत तो असतो. 'बॉंब गोळ्याचा खरा अर्थ' या त्याच्या पुढें—कांहीं वर्षांनीं लिहिलेल्या—केसरींतील लेखांत, निराशेंतून दहशतवादी कसे उत्पन्न होतात याची मीमांसा त्यांनीं पुढीलप्रमाणें केली आहे:—

"लोकांच्या उन्मत्तपणाच्या कल्पनेनें बॉंब गोळ्याची उपपत्ति नीट लागत नाहीं. सरकारच्या कृत्यामुळें प्रजाजनांत संताप किती वाढत चालला आहे व प्रजाजनांच्या योग्य इच्छेचा ताल सरकारच्या धोरणानें कसा सोडला आहे हें दाखविणारें यंत्र बॉंब गोळा होय. प्रजेची निराशा व या

निराशेमुळें उत्पन्न होणारा संताप याची पराकाष्ठा मापण्याचें जर कोणतें साधन असेल तर ते बाँब गोळ्यामारखे अत्याचार होत.''

दहशतवादी हा स्वत:पुरता पराक्रम गाजवितो, शत्रूचा बळी घेतो व वेळीं आत्मबलिदान करतो. लोकस्थितीचा किंवा अंतिम साध्याच्या दृष्टीनें साकल्यानें होणाऱ्या आपल्या कृत्याच्या परिणामाचा तो फारसा विचार करीत नाहीं. असला दहशतवाद काकासाहेबांच्या क्रांतिवादांत नव्हता. काकासाहेबांच्या कल्पनेचा क्रांतिवादी, आपलें साध्य डोळ्यांपुढें ठेवून, तें मिळविण्यास योग्य साधन कोणतें याचा विचार करून आपलीं कृत्यें आंखतो. त्यामुळें त्याच्या प्रत्येक कृत्यांत, प्रतिपक्षाच्या बलाबलाच्या दृष्टीनें तोडीस तोड देणाऱ्या साधनांची चिकित्सा, जनतेची सहानुभूति, कार्याच्या आखणींतील योजकता व कालाची अनुकूलता वगैरें गोष्टींकडे त्याचें अवधान अवश्य राहतें.

काकासाहेबांच्या क्रांतिवादाकरितां शस्त्रें पाहिजेत. ही भूमिका मान्य असली व प्रसंगीं ती अमलांत आणणें भाग वाटत असलें तरी प्रतिपक्षाच्या हातांतील शस्त्रांच्या तोडीचीं शस्त्रें निर्माण करतां येतील कां असा विचार अशा क्रांतिवादीयांना प्रथम करावा लागतो. एखाद दुसरें शस्त्र तयार करण्यानें त्यांच्या क्रांतिवादाची पूर्तता होत नाहीं; त्यांचा क्रांतिवाद व्यक्तीच्या तयारीपेक्षां समूहाच्या तयारीची अपेक्षा जास्त करीत असतो. त्यांच्या क्रांतिवादाला साधनाच्या समर्पकतेइतकीच समाजजागृतीची व जनशक्तीची आवश्यकता असते.

याप्रमाणें राजकारणांत नवें तेज उत्पन्न करणारे व लोकांना स्वातंत्र्योन्मुख करणारे क्रांतिकारक विविध विचार जनतेपुढें मांडण्याचें काम चालू असतां काकासाहेब थोडे दिवस विश्रांतीकरितां सांगलीस आले. संपादकीय व्यवसाय करीत असतां कायद्याच्या ज्ञानाची जरूरी व महत्त्व त्यांना प्रत्ययास आलें होतें. लोकमान्य टिळकांचें मतही वृत्तपत्राच्या धंद्यांत

वकीली परीक्षा झालेली बरी असें होतें. या गोष्टींचा विचार सांगलीस होऊन इ. स. १९०० सालीं काकासाहेब पुन्हां एल्एल्. बी.च्या परीक्षेसाठीं मुंबईस गेले. पण त्यांच्या मनांत क्रांतिवादाचे विचार जोरांत सुरू असल्यानें अभ्यास पुरा होण्यासारखें मनःस्वास्थ्य त्यांना नव्हतेंच. त्यांचे मनांत दुसरेच विचार चालू होते.

## गनिमी काव्याचें युद्ध

या वेळीं दक्षिण आफ्रिकेंत बोअर लोकांनीं प्रबळ व शस्त्रसंपन्न इंग्रजाविरुद्ध युद्ध चालू केलें होतें. केवळ मूठभर बोअर लोकांनीं शक्तिमान् इंग्रजी फौजेला यशस्वीपणें तोंड दिलें होतें. या यशाचें मुख्य कारण बोअर लोकांनीं गनिमी काव्याचा अवलंब केला होता हेंच होय. काकांचा पिंडच मूळचा लढाऊ. युद्धाच्या हालचाली, डावपेंच व शत्रुपक्षाच्या धोरणाचा अचूक अंदाज या विषयांत त्यांची बुद्धि असामान्यपणें चालत असे. बोअर युद्धाच्या स्फूर्तिरम्यकथा वाचावयास सांपडतांच त्यांचेकडून एल्एल्. बी.चीं नीरस पुस्तकें बाजूस मारलीं गेलीं यांत नवल कसचें ? कायद्यांतील 'अ' विरुद्ध 'ब' याचे ऐवजीं 'जनरल किचनेर विरुद्ध जनरल बोथा' अशी उभारणी त्यांची लढाऊ बुद्धि करीत असे. न्यायकोर्टांतील हिकमतीपेक्षां लढायांतील डावपेंच त्यांना जास्त लक्षांत येत. कोर्टांत न्याय्य बाजू पडतांना जी चीड येते त्यापेक्षां जास्त प्रखर चीड साधनाभावीं व द्रव्याभावीं बोअर लोकांची सत्याची बाजू पडतांच काकांना येई.

अशा स्थितींत कायद्याचीं बुकें पुढ्यांत ठेवूनच त्यांनीं या युद्धाचा सूक्ष्म अभ्यास केला व केसरीसाठीं 'गनिमी काव्याचें युद्ध' हे लेख लिहिले. फी भरलीच होती म्हणून परीक्षेला बसले पण जो व्हावयाचा तोच परिणाम झाला. काका अयशस्वी झाले. परीक्षेच्या यशाची माळ त्यांच्या गळ्यांत पडली नाहीं हें खरें! पण महाराष्ट्र वाङ्मय सरस्वतीच्या कंठांत 'गनिमी

काव्याचें युद्ध' या रम्य युद्धकथेची स्फूर्तिसुगंधयुक्त कुशल लेखमाला रुळत राहिली.

लोकमान्यांवरील राज्यद्रोहाच्या खटल्यापासून या देशाच्या स्वातंत्र्याच्या प्रयत्नांच्या व त्यांतील अडचणींच्या विचारानें त्यांचें क्रांतिप्रवण मन व्यग्र झालें होतें. भारताच्या स्वातंत्र्यासाठीं अखिल राष्ट्र जागृत झालें पाहिजे, परराष्ट्रीय राजकारणाकडे भारतीयांनीं उघड्या नजरेनें लक्षपूर्वक निरीक्षण केलें पाहिजे, यशाचे मार्ग अचूक ओळखले पाहिजेत, अन्य राष्ट्रांतील राजकारणी वारे आपणांस अनुकूल वा प्रतिकूल याची छाननी केली पाहिजे, राष्ट्रांतील आपल्या चळवळीला परदेशीय घडामोडीपासून कसा फायदा करून घ्यावा याचें मनन केलें पाहिजे, वगैरे विचार गनिमी काव्यावरील ही लेखमाला लिहितांना त्यांच्या डोळ्यांपुढें प्रामुख्यानें होते. बोअर युद्धाच्या निमित्तानें काकांनीं आपली स्वातंत्र्यासाठीं चाललेली धडपड, या ध्येयसिद्धीसाठीं आंखलेले कार्यक्रम, यासंबंधांत आपणाकडून आजपर्यंत झालेल्या चुका इत्यादि सर्व विषयांचा अत्यंत बारीक दृष्टीनें विचार करून ही लेखमाला निर्माण केली.

या लेखमालेचा प्रमुख उद्देश, इंग्रजासारख्या प्रबळ व साधनसंपन्न प्रतिपक्षाशीं मूठभर दरिद्री पण स्वातंत्र्यप्रेमी बोअर लोकांनीं कशी यशस्वी झुंज दिली, व हिंदमातेच्या स्वातंत्र्याच्या चाललेल्या क्रांतिकारक चळवळींत आफ्रिकेच्या युद्धांत उपयोगांत आणलेलीं साधनें व डावपेंच यापासून काय बोध घेतां येईल, हा होता. आफ्रिकेंत उपयोगांत आणलेले गनिमी काव्याचे डावपेंच हिंदुस्थानच्या इतिहासांत पूर्वी उपयोगांत कसे आणले गेले व त्यामुळें कोठें कसें यश मिळालें याचें उद्बोधक वर्णन 'गनिमी काव्याचें युद्ध' यांतील एका लेखांत त्यांनीं पुढीलप्रमाणें केलें आहेः—

'लष्करी धोरणाची दूरदृष्टि, डावपेंचानें कार्य साधण्याची हाव व गनिमी काव्याची पद्धत यांचा जर राजपुतान्यांत उदय झाला असता, तर

मुसलमानी बादशाहीची दिल्लीस स्थापना होण्याची आशाच नको होती. समान शस्त्रें, लोकांची पूर्ण मदत, डोंगर, किल्ले आणि जंगल यांचा पाठिंबा, इतकी सिद्धता असल्यावर गनिमी काव्यानें स्वराज्य स्थापितां येतें ही गोष्ट हिंदुस्थानचे इतिहासांत श्री शिवाजीमहाराजांचे प्रथमतः लक्षांत आली ! त्यांचें इतिहासांत जें इतकें महत्त्व आहे तें एवढ्याकरितांच होय. रजपूत शूर खरे, पण त्यांस ही युक्ति सुचली नाहीं किंवा ग्राह्य वाटली नाहीं हें देशाचें दुर्दैव होय; व शिवाजीमहाराजासारखा अपूर्व धोरणी पुरुष जर यावेळीं निपजला नसता तर हें दुर्दैव तसेंच कायम रहातें. महाराजांचें राज्यकार्यपटुत्व, स्वधर्मावर विलक्षण निष्ठा, अत्यंत पवित्र आचरण इत्यादि गुण एका बाजूस ठेवले आणि केवळ त्यांच्या लष्करी पद्धतीकडे लक्ष दिलें, म्हणजे वाचकांचे असें ध्यानांत येईल कीं रामदास आदिकरून साधुसंतांच्या आशीर्वादानें व कृपाप्रसादानें, एक विचारानें भरलेल्या महाराष्ट्र मंडळांतील निरनिराळ्या टोळ्यांस गनिमी काव्याच्या पद्धतीनें विजापुराविरुद्ध हलावयास लावून व अखेरीस सर्वांची संघशक्ति निर्माण करून, महाराजानीं स्वराज्याची स्थापना केली.'

ही लेखमाला मुंबईस लिहिली व केसरींत क्रमाक्रमानें प्रसिद्ध केली. या लेखमालेंतील विचारांच्यामागें काकासाहेबांच्या मनाची भूमिका संयमी क्रांतिकारकाची होती. स्वराज्यसंस्थापक श्री शिवछत्रपतींचा आदर्श काकांचे पुढें होता. त्यामुळें सशस्त्र क्रांतीचे विचार टिळकांच्या परिसरांत वावरणाऱ्या लोकांच्या मनांत कशा स्वरूपाचे होते याचें प्रतिबिंब या लेखमालेंत आहे. अर्थातच हा विषय त्यावेळीं अत्यंत गुप्त राखण्यांत आलेला होता. पण या बाबतींत प्रयत्न कोठपर्यंत चालू होते याची कांहीं कल्पना यानंतर लवकरच उद्भवलेल्या नेपाळ प्रकरणामुळें आली.



## : ५ :

# नेपाळ–रहस्य



या त इषुः शिवतमा शिवं बभूव ते धनुः ।
शिवा शरव्या या तव तया नो रुद्र मृडय ॥

—रुद्र

लोकमान्यांच्या १८९७–९८ च्या कारावासानंतर पुढील दोन वर्षांच्या क्रांतिकारक कालांत ते मद्रास व लखनौ या भागांत काँग्रेसच्या अधिवेशनासाठीं गेले. हे दौरे लोकमान्यांनीं आपल्या विश्रांतीच्या कालांत केले. १८९९ ला लखनौला गेले त्यावेळीं त्यांचा प्रवास संपत आला होता. मध्यंतरीं त्यांनीं सिलोन व ब्रह्मदेश या प्रदेशांतही दौरे केले. यावेळीं वासुकाका जोशी त्यांचेबरोबर होते. अर्थातच हे दौरे केवळ देश पाहण्याच्या उद्देशानें केलेले नसून हिंदुस्थानच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रयत्नास उपयुक्त अशी माहिती किंवा मदत कोठें मिळण्याची शक्यता आहे काय असा चौकशीचा हेतु त्यांच्या मुळाशीं होता. यानंतर कलकत्ता काँग्रेस झाली.

त्यावेळींही वासुकाका कलकत्त्यास लोकमान्यांचे बरोबर होते. तेथील मुक्कामांतच नेपाळ प्रकरणाच्या विचारांचा प्रारंभ झाला.

पुण्यास परत आल्यावर वासुकाका जोशी यांच्या सल्ल्यानें लोकमान्यानीं काकासाहेबांस या कामगिरीवर नियुक्त केलें. पण यांपैकीं कोणीही या रहस्याची माहिती आजवर उघडरीतीनें अगर तपशिलानें कोणासही सांगितली नव्हती. शिवरामपंत परांजपे, दादासाहेब खापर्डे वगैरे कांहीं खास मंडळीस मात्र या प्रकरणाची माहिती होती.

१९४७ सालीं आपली भारतमाता स्वातंत्र्यसंपन्न झाल्यावर या भूतकालीन क्रांतिवादी प्रयत्नाची माहिती प्रकाशांत आली. वासुकाका जोशी यांचे चरित्रांत त्याचा उल्लेख आहे. काकासाहेबांनींही अगदीं अलीकडे मृत्युपूर्वी कांहीं महिने सांगितलेल्या आपल्या आत्मनिवेदनपर वृत्तांतांत याबाबतचा तपशील दिला आहे.

## माताजी

या रहस्यमय प्रकरणाचा प्रारंभ अकल्पितपणें झाला. १९०१ च्या कलकत्ता अधिवेशनाला लोकमान्य टिळक व वासुकाका जोशी हे कलकत्त्यास गेले असतां तेथें त्यांना एका बंगाली मुलींच्या शाळेला भेट देण्याचें आमंत्रण आलें व ते त्याप्रमाणें ती शाळा पाहण्यास गेले. शाळेची व्यवस्था 'माताजी' नांवाच्या एक बाई पाहत. भेटीसाठीं गेले असतांना त्या दोघांशीं माताजी मराठींत बोलूं लागल्या. बंगाली मुलींच्या शाळेची व्यवस्थापिका शुद्ध महाराष्ट्र बोलींत बोलते याबद्दल तें तर आश्चर्यचकितच झाले; पण यापेक्षांही अधिक आश्चर्य हें कीं लोकमान्यांच्या अंगीकृत कार्याच्या दृष्टीनें माताजीनें नेपाळचें बोलणें काढलें व नेपाळ-नरेशांची ओळख करून देण्याची तयारी दाखवून महाराष्ट्रांतून कोणी तरी नेपाळला जावें असें त्यांनीं सुचविलें.

मातार्जींचें पूर्ववृत्त असें कीं त्या मूळच्या तंजावरच्या. लहान वयांतच त्यांना वैधव्य आलें. उत्तर हिंदुस्थानांत त्या यात्रेला गेल्या. यात्रेंत हिंडत असतांना त्या नेपाळांत गेल्या. पशुपतेश्वराचें दर्शन झाल्यावर त्या नेपाळ नरेश वीर समशेरजंग बहादूर याच्या नजरेला पडल्या. त्यांचें सौंदर्य त्या नरेशाच्या मनांत ठसलें. त्या त्यांचेजवळ राहिल्या. पुढें या नरेशांचा खून झाला व दुसरे नरेश सिंहासनावर आले. त्यावेळीं महाराजांनीं दिलेलें जडजवाहीर घेऊन त्या हिंदुस्थानास परतल्या. मार्गांत दरभंगाच्या महाराजांजवळ त्यांनीं तें जडजवाहीर ठेविलें व त्या कलकत्त्यास आल्या. कलकत्त्यास त्यांनीं मुलींची शाळा काढली.

कलकत्त्याला जरी त्या राहूं लागल्या तरी त्यांचे नेपाळचे संबंध सुटले नाहींत. नेपाळचे कर्नल इंजिनियर कुमार नृसिंह यांची व मातार्जींची चांगलीच ओळख होती. त्या ओळखीच्या जोरावर नेपाळांत हिंदुस्थानचें कांहीतरी कार्य व्हावें अशी मातार्जींची मनीषा होती.

या भेटीचे प्रसंगीं मातार्जींशीं लोकमान्यांचें जें संभाषण झालें त्यानें लोकमान्यांचे नेपाळविषयक कौतुक जागृत झालें व नेपाळला जाण्यासाठीं ते दोघेही निघाले. पाटणामार्गें रेल्वेनें ते चाललेले होते पण सरहद्दीच्या रेल्वे स्टेशनवर संस्थानांत जाणाऱ्यांना अवश्य असलेला परवाना जवळ नसल्यानें त्यांना परतावें लागलें. कारण फक्त पशुपतेश्वराच्या यात्रेच्यावेळीं मात्र प्रवाशांना परवान्याशिवाय नेपाळांत जाऊं देत असत.

नेपाळहून परत आल्यावर वासुकाका जोशी यांनीं नेपाळची व मातार्जींची साद्यंत हकीकत काकांना सांगितली व हें कार्य काकांच्या क्रांतिवादी विचारसरणीस अनुरूप असल्यामुळें या कार्यांत भाग घेण्यास ते तयार झाले. नेपाळच्या सर सेनापतींची गांठ मातार्जींनीं घालून द्यावी असें मातार्जींना पत्रानें कळविण्यांत आलें. नेपाळचे महाराज हे केवळ

नामधारी नरेश व खरी सत्ता सेनापतीच्या हातीं असते. त्या काळीं सेनापतिपदावर चंद्रसमशेरजंग बहादूर हे होते. पत्रव्यवहारांत सेनापतिसाहेबांची गांठ पडण्याची व्यवस्था करण्यांत आली, व उभयतां काका कलकत्त्यास गेले. तेथें सेनापतीच्या गांठीस कालावधि लागला पण अखेर गांठ पडली. त्यावेळीं नेपाळचे कांहीं विद्यार्थी शिक्षणासाठीं जपानला पाठविण्याची सूचना वासुकाकांनीं केली व पुढें त्याप्रमाणें विद्यार्थी जपानला पाठविण्यांतही आले.

या मुलाखतींत सेनापतीनें विचारलें कीं, 'अहो तुम्हांला कौलें तयार करितां येतील काय?' लोकमान्यांचे बहिर्जी नाईक श्री. वासुकाकांनीं बेधडक होय म्हणून सांगितलें. त्यावेळीं नेपाळ नरेशांच्या राजवाड्याचें बांधकाम चालू होतें. त्या राजवाड्यावर घालण्यासाठीं मंगलोरी कौलें पाहिजे होतीं. तीं तयार करण्याच्या निमित्तानें उभयतां काकांनीं नेपाळला जावें असें ठरलें व ते कलकत्त्याहून पुण्यास परतले. परत आल्यावर वासुकाका काकासाहेबांस म्हणाले कीं "तुम्ही जर नेपाळांत गेलांत तर जास्त उपयोग होईल. कारण तुम्ही मजपेक्षां अधिक शिकलेले आहांत व वाटाघाटी करितांना तुम्ही जेवढें बोलूं शकाल व कार्य करूं शकाल तेवढें मला जमणार नाहीं. तेव्हां नेपाळला तुम्हीच जावें हें अधिक बरें!" वासुकाकांचें हें म्हणणें काकांना पटलें व कौलांच्या कारखान्यासाठीं त्यांनीं नेपाळास जावें असें सर्वांचे विचारें ठरलें. कौलें तयार करण्याची विद्या आपल्याजवळ नाहीं हा विचार त्यांच्या मनाला फारसा महत्त्वाचा वाटला नाहीं.

नेपाळांत जाऊन तेथें रायफली तयार करण्याचें यंत्र आणावयाचें व हत्यारें तयार करावयाची अशी मूळ कल्पना होती. नेपाळला जाण्यापूर्वी त्या यंत्राबद्दलची माहिती घ्यावयाची होती व पुढील व्यवस्था करावयाची होती. यंत्राचे नकाशे त्यावेळीं ग्वाल्हेरला असणारें एक मेकॅनिकल इंजि-

नियर केतकर यांजकडे होते. केतकरांना नेपाळच्या चंद्रशेखर महाराजांनीं आपला जुन्या पद्धतीच्या शस्त्रास्त्रांचा कारखाना दाखविला आणि हा तुम्हीं चालवावा अशी इच्छा प्रदर्शित केली, पण पगारासंबंधानें त्यांचें जमलें नाहीं. केतकरसाहेबांजवळ जे नकाशे होते ते मिळवण्यासाठीं त्यांना २५० रु. देण्याचें ठरलें. काकासाहेबांनीं ती रक्कम अमरावतीस श्री. दादासाहेब खापर्डे यांजकडून घेतली व केतकरांना देऊन नकाशे आपल्या ताब्यांत घेतले.

लोकमान्यांच्या सूचनेप्रमाणें दादासाहेबांनीं काकासाहेब यांचे बरोबर जाऊन त्यांची सेवाशुश्रूषा करणेंसाठीं आपल्या घरीं असलेल्या अनेक आश्रित विद्यार्थ्यांपैकीं रंगनाथ तिखे या नांवाच्या एका मुलाला पाठविण्याचें ठरवलें. जर्मनीच्या क्रप्स कारखान्याचे एजंट त्यावेळीं कलकत्त्याला होते. त्यांच्या-मार्फत यंत्राची ऑर्डर दिली. यंत्रासाठीं पांच हजार रुपये उभे करावयाचे होते. त्या कामीं छत्रे सर्कशीच्या मालकांनीं मदत केली. त्यांच्याकडून यंत्रासाठीं घेतलेले पैसे पुढें नेपाळकडून परत मिळाल्यावर ते त्यांना काकांनीं परत केले. नेपाळला जाण्यापूर्वी काका सुमारें तीन महिने छत्रे यांचे सर्कशीबरोबर होते. तेथें असतांना काका घोड्यावर बसण्यास शिकले. बंदूक चालविण्याची विद्या त्यांनीं यापूर्वींच अवगत केली होती. ती त्यांनीं सांगलीस असतांना संपादन केली होती. "सांगलीस असतांना गाडगीळ सराफ यांचेकडे बंदूक होती. ती घेऊन सांगलीचे शिनप्पा कोतवाल, गाडगीळ वकील व मी असे तिघेजण सांगलीहून हरीपूरच्या वाटेवर जात असूं. वाटेंत ओहोळ लागतो. त्या ओहोळाच्या दोन्ही बाजूंस दरड असे. एका दरडीवर नारळ ठेवून दुसऱ्या दरडीवर उभे राहून नारळावर नेम धरून तो फोडावयाचा अभ्यास आम्ही त्यावेळीं करीत असूं. ज्याचे गोळीनें नारळ फुटे त्याला २ काडतुसें मिळत." असें त्यांनीं आपल्या आत्मनिवेदनांत नमूद केलें आहे.

नेपाळला जाण्याची अशी पूर्व तयारी झाल्यानंतर पावसाळा उलटल्यावर काकासाहेब कलकत्त्याला माताजीकडे गेले. तेथें माताजीकडेच उतरले. दोन माणसांच्या स्वयंपाकापुरतीं भांडीं त्यांनीं बरोबर घेतलीं होतीं. कलकत्त्यास ते स्वतःच स्वयंपाक करीत. नेपाळला गेल्यावर कांहीं दिवस ते स्वतःच स्वयं-पाक करीत. पुढें तेथें त्यांनीं तेथलाच एक स्वयंपाकी ठेविला. कलकत्त्याहून नेपाळला ज्या इसमाबरोर जावयाचें होतें, तो येण्यास कांहीं दिवस उशीर लागला. दरम्यानच्या काळांत ते माताजीकडे असल्यानें माताजी सकाळ-संध्याकाळ भरपूर गप्पा मारीत व नेपाळची माहिती देत. नेपाळकडील मनुष्य नंतर आला व त्याजबरोबर काका नेपाळला गेले. नेपाळमध्यें कौलें तयार करण्याचा एक भाग असल्यानें काकासाहेबांनीं कलकत्त्यास जातांना जबलपूर येथें कांहीं दिवस वास्तव्य केलें. तेथील कौलांचा कारखाना लक्ष-पूर्वक पाहून कौलें तयार करण्याच्या कलेचें मर्म समजावून घेतलें. त्याच-प्रमाणें त्यांनीं आणखी एक कौलांचा कारखाना पाहिला होता. जबलपूरला कौलांकरितां कोणत्या प्रकारची माती वापरतात ती पाहून तिचा नमुनाही बरोबर घेतला होता.

कलकत्त्याहून नेपाळला जातांना माताजींनीं नेपाळचे कर्नल इंजिनियर कुमार नरसिंगराणा यांना ओळखीचें पत्र दिलें होतें. कौलांच्या कारखा-न्यांची माहिती असलेला मनुष्य म्हणूनच त्यांची ओळख करून देणेंत आली. कौलांच्या निमित्तानें दरबारांत प्रवेश करून घ्या व पुढचा मार्ग कसा काढावयाचा तें तुमचें तुम्हांलाच कळून येईल असें काकांना सांगण्यांत आलें होतें.

### नेपाळच्या स्वतंत्र भूमींत

काकासाहेब इतक्या तयारीनें नेपाळच्या वाटेस लागले. आजपर्यंत सह्याद्रीच्या पठारांत आपली तेजस्वी लेखणी ते परजीत होते पण आतां

जनतेनें प्रत्यक्ष शस्त्र परजावें म्हणून त्याच्या निर्मितीसाठीं हिमालयाची चढण ते चढत होते. क्रांतीच्या योजनेचे जे विचार 'गनिमी काव्याच्या युद्धाच्या' लेखमालेंत त्यांनीं दिग्दर्शित केलें त्या तुल्यबल शस्त्रनिर्मितीचा प्रत्यक्ष प्रयत्न करण्याच्या कामगिरीवर ते चालले होते. हिमालयाची वाट चालत असतां हिमालयाच्या वनश्रीनें त्यांच्या कविमनाचें आकर्षण होत असलें तरी त्याचा विचार करण्याचे ऐवजीं आपल्या क्रांतियोजनेबद्दल 'काय होईल, कसें होईल' याच विचारानें ते भारले असणें साहजिक होतें. पण त्यांचें महत्त्वाकांक्षी मन नेहमीं पूर्ण आशावादी होतें.

नेपाळच्या स्वतंत्र भूमींत पाऊल ठेवल्यावर स्वातंत्र्यवृत्तीचे मुगुटमणि श्रीशिवछत्रपतींची आठवण त्यांना झाल्याशिवाय कशी राहील? मोंगलांच्या मगरमिठींतून मराठयांना सोडवून स्वातंत्र्याचा झेंडा उभारणाऱ्या वीरांचें स्मरण त्यांना झाल्याशिवाय कसें राहील! अज्ञान मावळ्यांना एकत्र करून स्वराज्य स्थापन करणाऱ्या शिवप्रभूच्या योजकतेचें मनन हिमालयांतील तपस्व्याच्या दिव्य दृष्टीनें ते करीत होते. कारण शिवप्रभूनें जें गनिमी काव्याचें युद्ध केलें व जें युद्धतंत्र बोअर युद्धानें आधुनिक कालांतही यशस्वी आहे असें सिद्ध केलें, त्या तऱ्हेच्या लोकमान्य टिळकांच्या योजनाबद्ध प्रयत्नांतील पहिल्या प्रयत्नाचा मान आपल्याला मिळाला आहे व तें मोठें कार्य आपण पार पाडलेंच पाहिजे याच विचारानें त्यांचें मन भारावलें होतें.

या विचारांच्या स्फूर्तिप्रद साहचर्यांत काका नेपाळांत पोंचले. काकासाहेब काटमांडूला राहात होते, कारण तेंच राजधानीचें शहर होतें. काटमांडूपासून तीन मैल पूर्वेला पशुपतेश्वर आहे. काटमांडूला एक दक्षिणी 'ब्राह्मण संस्थानिक' होते. त्यांचें तीन लाखांचें उत्पन्न होतें. 'भट संस्थानिक' असें त्यांना म्हणत. त्या वेळीं त्या घराण्याचे मालक लहान होते. काकासाहेबांनीं आपलें बिऱ्हाड त्यांच्याच वाड्यांत ठेवलें होतें.

ते आप्पा कुलकर्णी व रंगनाथ तिखे यांचेसह राहात असत. घर चार मजली होतें. चौथ्या मजल्यावर स्वयंपाक, तिसऱ्या मजल्यावर निजणें बसणें, दुसऱ्या मजल्यावर अडगळ व खालचा मजला मोकळा असे. काटमांडूला सर्वांचीच अशी राहाण्याची पद्धत होती, कारण खालच्या मजल्यावर व आजूबाजूस घाण फार असे. पाणी मुबलक असे, पण गारठ्यामुळें चार आठ दिवसांनीं सर्व मंडळी स्नान करीत असत.

सकाळीं दहाचे सुमारास जेवणें आटपून सर्व कौलांच्या कारखान्याकडे जात असत. तो कारखाना बिऱ्हाडाचे जागेपासून मैल दीड मैल होता. संध्याकाळीं सहाला परत येत असत. कारखान्यांत तीन चारशें मजूर होते. कारण काका जाण्यापूर्वीही वेगळ्या तऱ्हेचीं कौलें करण्याचा दरबारचा कारखाना चालूच होता. काका गेल्यावर तेथें मंगलोरी कौलें करण्याचा त्यांनीं प्रयत्न चालू केला. काटमांडूची वस्ती त्यावेळीं अठरा वीस हजारावर असेल. हें शहर डोंगरांत बसलेलें आहे. कोंकणासारखीं लांब लांब घरें आहेत. काटमांडू व पशुपतेश्वर येथील सर्व देवस्थानें दक्षिणी ब्राह्मणांकडेच आहेत याचें मुख्य कारण नेवारी ब्राह्मण मांसाहारी आहेत. प्रत्येक ब्राह्मण कुटुंबाला त्यावेळीं एक हजार रुपये उत्पन्न असे. देवपूजा करून राहाणें याशिवाय ते दुसरा व्यवसाय करीत नाहींत. खाण्यापिण्याची तेथें समृद्धि होती. रुपयास मण तांदूळ अशी स्वस्ताई होती. वनगाईचें उत्तम दूध एक आण्यास शेरभर मिळे. अशा अन्नधान्याच्या समृद्धीच्या प्रदेशांत ते गेले होते. हिमालयाच्या निसर्गरम्य साम्राज्यांत ते वावरूं लागले होते पण त्यांचें लक्ष मात्र स्वातंत्र्यप्राप्तीच्या प्रयत्नांतच दंग होतें.

नेपाळची कामगिरी यशस्वी होण्यास मंगलोरी कौलें तयार करण्याचें काम यशस्वी होणें जरूर होतें. ही त्यांना नवी विद्या होती. हें काम कसें पार पडतें याची काकासाहेबांना धागधूग वाटत होती. यावेळीं त्यांचे

हाताखालीं काम करण्यास मदतनीस म्हणून हणमंतराव ऊर्फ अप्पा कुलकर्णी होते. हे अप्पा कुलकर्णी मूळचे करवीरचे असून कोल्हापुरास यापूर्वीच त्यांनीं 'शिवाजी क्लब' स्थापन केला होता, व राष्ट्रोद्धाराचें कार्य सुरू केलें होतें. ते वासुकाका जोशी यांच्या परिचयाचे होते. त्यांच्या सांगण्यावरून ते नेपाळांत गेले होते. कौलांच्या कारखान्याची त्यांनींही थोडी माहिती संपादन केली होती.

## आशानिराशा

काकांनीं कौलें तयार करण्याच्या कामास सुरवात केली तरी प्रारंभीं भट्टया जमतां जमेनात. कौलांचें काम साधतें कीं नाहीं अशी चिंता मनास सारखी लागून राहिली. काकासाहेबांनीं आपल्या त्या काळच्या मनःस्थितीचें वर्णन आपल्या आत्मनिवेदनांत पुढीलप्रमाणें केलें आहेः—

"कौलांची भट्टी बरोबर साधून मनपसंत कौलें तयार होईनात. त्यावेळीं मन कावरेंबावरें झालें. कौलें तयार करितां येतात असें सांगून नेपाळांत आलों आणि तीं जर जमलीं नाहींत तर येथल्या लोकांना काय वाटेल अशी सारखी मनाला रुखरुख वाटत होती. परमेश्वराचें अधिष्ठान आपल्या या उद्योगाला आहेच. आपण आपल्याकडून प्रयत्नाची शिकस्त करीत आहों, यश आलेंच पाहिजे अशी पूर्ण श्रद्धा होती; पण यश येईना. अखेरचा प्रयत्न म्हणून शक्य ती काळजी घेऊन भट्टी लावली. आणि अनन्यगतिक होऊन परमेश्वराची प्रार्थना केली. माझी लाज परमेश्वरानेंच राखावयाची होती. त्याची काकुळतीनें प्रार्थना केली कीं तुझ्या भरंवशावर येथपर्यंत आलों आतां येवढी लाज राख! अगोदरची खबरदारी म्हणून म्हणा, परमेश्वरास प्रार्थना पोंचली म्हणून म्हणा, भट्टी उलगडून पाहिली तों कौले उत्तमच साधलीं आहेत असें दिसून आलें. पुढें अडचण राहिली नाहीं. कौलें अपेक्षेप्रमाणें तयार झालीं व नेपाळ नरेशांच्या प्रासादावर चढलीं."

कौलाचें काम सुरू असतांना शस्त्राच्या यंत्राच्या कामासाठीं काकासाहेबांच्या कलकत्त्याला वरचेवर खेपा होत होत्या. मुंबईकडेही एकादेवेळीं जात येत होते. कलकत्त्याच्या क्रप्स कारखान्याच्या एजंटानें यंत्राचे कागद नेपाळकडेही पाठविले होते पण अर्थातच त्याला नेपाळकडून उत्तर गेलें नव्हतें. क्रप्स कंपनीच्या एजंटाकडे कलकत्त्यास काकासाहेबांनीं एका यंत्राची ऑर्डरही दिली होती व याबद्दल पांच हजार रुपये रक्कमही भरली होती. पण त्या एजंटाचें असें म्हणणें होतें कीं एका यंत्राचे ऑर्डरनें भागणार नाहीं. निदान ५।६ यंत्रें तरी घ्यावयास पाहिजेत. तरच ही ऑर्डर घेतां येईल.

काकासाहेब मध्यंतरीं सांगलीस आले असतांना क्रप्सच्या एजंटाचें वरील-प्रमाणें एक पत्र आलें व त्याचेकडे भरणा केलेली रक्कमही त्यानें मनि-ऑर्डरनें परत सांगलीस पाठविली होती. नेपाळांत काका ' कृष्णराव ' यासारखे मद्रासी धर्तीवर नांव लावीत व त्याच नांवानें एजंटाशीं त्यांचा यासंबंधींचा पत्र-व्यवहार होता. यामुळें मनिऑर्डरही पण ' कृष्णराव ' यांच नांवानें सांगलीस आली. या नांवावर आलेली मनिऑर्डर आपणांस कशी मिळते याबद्दल त्यांना धागधुग वाटत होती. पण विशेष आयास न करितां ती त्यांना मिळाली.

काकासाहेब सांगलीहून नेपाळास जातांना कलकत्त्याला गेले. आणि एजंटाला असें समजावून सांगितलें कीं यंत्र काम कसें काय देतें हें पाहण्या-साठीं तूर्त एकाच यंत्राची ऑर्डर दिली आहे. एक यंत्र पसंत पडलें म्हणजे तुमच्या म्हणण्याप्रमाणें आणखी यंत्रांची ऑर्डर देऊं. एजंटाची समजूत पडली व त्यानें एका यंत्राची ऑर्डर स्वीकारली. कलकत्त्याच्या या खेपेंत सदर एजंटानें काकासाहेबांना एक अगदीं छोटें पिस्तूल दाखविलें व त्याच्या गोळ्याही दिल्या. हें पिस्तूल नेऊन तें नेपाळच्या इंजिनियरला दाखवा असें त्यानें काकांना सांगितलें, कारण पिस्तूल तयार करण्याचें यंत्रही मागवावें

असा त्याचा आग्रह होता. तें पिस्तूल सामानांत छपवून नेपाळास जात असतां वाटेंत कोठें झडती वगैरे होऊन पिस्तुलाचा तपास लागतो कीं काय अशी सारखी भीति त्यांना या प्रवासांत वाटत होती. पण तसा प्रकार न होतां पिस्तूल नेपाळपर्यंत पोचलें व तें कर्नल इंजिनियरच्या हातीं देण्यांत आलें. अशारीतीनें रायफलच्या यंत्राची ऑर्डर देण्याचें काम संपलें व यंत्र केव्हां येते याची मार्गप्रतीक्षा सुरू झाली.

काकासाहेबांनीं आपल्या आत्मनिवेदनांत नेपाळांतील राहणी व व्यवस्थे-बद्दल पुढीलप्रमाणें वर्णन केलें आहे:—

"नेपाळांत कौलांचें काम पूर्ण झालें, यांस तीन वर्षांचा काळ पुरा होत आला होता. या अवधींत एका दक्षिणी ब्राह्मण कुटुंबाच्या घरांत मी राहत होतों. महाराष्ट्रीय ब्राह्मण मांसाशन कोणत्याही प्रकारचें करीत नसल्यामुळें त्यांच्याकडे नेपाळांत पशुपतेश्वराच्या पूजेचें काम वर्षानुवर्षें चालत आलेलें आहे. कांदा लसूणही हे दक्षिणी ब्राह्मण खात नसत. पण मी कांदा खात असे त्याचें त्या लोकांना आश्चर्य वाटे. नेपाळांत असतांना मला एकदां थंडीताप जडला व कांहीं महिने त्यानें माझी पाठ पुरवली. या तापांत तोंडाची चव गेली होती आणि भाताबरोबर लोणचें खावयास मिळावें असें फार वाटत होतें. त्या देशीं लोणचें कोठून असणार? पण पुजाऱ्याचें घरीं लोणचें जपून ठेविलें होतें. त्यांतील थोडेसें मला या आजारीपणांत मिळालें. तिकडून परत आल्यावर लोणचें खातांना नेपाळच्या या लोणच्याची आठवण मला किती तरी दिवस होत होती.

नेपाळांत असतांना बाहेर जातांना मी सुरवार वापरीत असे व पायांत बूट घालीत असे. अंगांत कोट व डोक्यावर टोपी असे. महाराजांच्या भेटीला जातांना तेथील दरबारी पद्धतीचा पोषाख वापरावा लागे. महा-राजांकडे जातांना मी कोटाच्या आंत दरबारी पद्धतीचा पोषाख घालीत

असे. नेपाळांत बर्फ फार पडतें. सकाळीं उठावें तोंपर्यंत रस्ते व खिडक्या बर्फानें आच्छादलेल्या असत. त्यामुळें तेथें बूट घातल्याशिवाय बाहेर पडावयाची सोयच नसे. 'टाईल भट' या नांवानें मी तेथें ओळखला जात असे आणि राजवाड्यांतून महाराजांचें बोलावणें येई तें टाईल भट या नांवानें येई; दरबारी कागदपत्रांत माझें नांव देण्याचा प्रश्नच नव्हता. कारण कर्नेल इंजिनियर कुमार नरसिंगराणा यांचे मार्फतच दरबारशीं माझा संबंध होता. नेपाळांत असतांना मी जो स्वयंपाकी ठेविला होता तो गांजेकस होता. 'बायकांचें बंड' या नाटकांतील जंगल्याचें पात्र या गांजेकस स्वयंपाक्यावरूनच रेखाटलें आहे. 'बायकांचें बंडांतील' भौगोलिक पार्श्वभूमि नेपाळकडची आहे."

## आगपेट्यांचे कारखानदार ?

कौलांचें काम संपल्यावर त्याबद्दल एकुण तीन हजार रुपये कर्नेल इंजिनियर यांजकडून मिळाले. त्यांपैकीं एक हजार रुपये हणमंतराव ऊर्फ आप्पा कुलकर्णी यांना काकांनीं दिलें. कौलें राजवाड्यावर घालण्याचें काम संपलें. पण रायफलांच्या कारखान्याच्या कामाची जोडणी अजून व्हाव-याचीच होती. म्हणून काकांनीं नेपाळांत राहणेंही अवश्यच होतें. कौलांच्या कारखान्याचें काम संपल्यावर या तज्ज्ञ कारखानदारांनीं नेपाळांत आग-पेट्यांचा कारखाना काढावा अशी सूचना दरबारकडून याचमुळें करण्यांत आली. त्या कारखान्याची उभारणी करण्यासाठीं काकांनीं पुन्हां नेपाळांत यावयाचें व शस्त्रांचें यंत्र तोंपर्यंत येईल तें चालू करावयाचें असा संकेत होता. बंदुकांच्या यंत्राचें सामान जर्मनीहून हिंदुस्थानापर्यंत येऊन पोचलें होतें. नेपाळची वाट चालू लागलें होतें.

काका नेपाळांत असतांना वासुकाका जोशी एकदां आले होते व कांहीं दिवस राहिलेही होते. श्री. दादासाहेब खापर्डे यांचेकडून आलेला मुलगा रंगनाथ तिखे हाही बहुतेक काळ तेथें होता. तो मध्यंतरीं एकदां उमरावतीस

जाऊन परत आला होता. अप्पा कुलकर्णी तर सतत काकांचे सहकारी म्हणून होते. त्याच्या ओळखीनें कोल्हापूरचा दामू जोशी हाही नेपाळांत येऊन दाखल झाला होता. त्यावेळीं बेलापूर येथें एक स्वामी मठ करून राहिले होते. हे स्वामी 'बेलापूरचे स्वामी' या नांवानें ओळखले जात. सत्तावनच्या बंडापैकीं पेशव्यांचे शूर सेनापति तात्या टोपे अगर खुद्द नानासाहेब पेशवे तें हेच होत असें कुजबुजलें जात होतें. दक्षिणेकडचे कांहीं संस्थानिक या स्वामीचे भजनी होते. आप्पा व दामू हे स्वामींच्या भक्तांपैकीं होते. पेशवाईच्या बंडवाल्या पुढाऱ्यांपैकींच स्वामी आहेत असें ते मानीत असता वासुकाकांच्या १९०१ च्या दिल्लीदरबारच्या कामागिरीनंतर अप्पांच्या ओळखीनें दामू नेपाळांत आल्यावर नेपाळची एकंदर हकीकत त्याला आप्पांकडून कळली होती. दामू जोशी सातआठ महिन्यांनीं परत कोल्हापुरास गेला होता.

नेपाळांतील कोलांचें काम संपत आलें. त्या सुमारास जर्मनीहून मागविलेले बंदुका तयार करण्याचें यंत्र हिंदुस्थानांत येऊन त्यानें नेपाळची हद्द ओलांडली. ते गाड्यावर चढून नेपाळचा रस्ता चालूं लागले. क्रप्स कंपनीचा एजंट कलकत्त्याहून आपल्या देशास परत जाणार होता. त्यानें काकांना मुंबईस भेटावयास बोलाविलें होतें. नेपाळची सरहद्द पायरस्त्यानें गांठून नंतरचा प्रवास करावयाचा असल्यामुळें नेपाळहून मुंबईच्या भेटीच्या ठरलेल्या तारखेपूर्वी दोन महिने काकासाहेब निघाले होते. यावेळीं त्यांचे मनांतील विचार त्यांनीं असे वर्णन केले आहेत.

"नेपाळहून येत असतांना वाटेंत बंदुका तयार करण्याचें यंत्रही पाहावयास सांपडावें अशी इच्छा होती, त्याप्रमाणें मार्ग आक्रमतांना यंत्र पाहिलें. मां ज्यावेळीं तें पाहिलें त्यावेळीं पेटारे गाड्यावर होते. पण गाडा वाट चालतांना मोडून पडलेला होता! त्यामुळें दुसऱ्या वाहनाची वाट यंत्र पाहत होतें. यंत्राच्या मोडलेल्या गाड्यानें जणूं काय भावी घटनांची सूचना देण्याचें काम चालवलें होतें!"

मुंबईस आल्यावर काका क्रप्स कंपनीच्या एजंटास भेटले व पुढच्या ४।५ यंत्रांच्या ऑर्डरीविषयीं बोलणें केलें. हीं यंत्रें येण्यास कांहीं वर्षांचा अवधि लागणार होता. ही आल्यावर आगपेट्यांच्या कारखान्यासाठीं नेपाळांत जावयाचें व शस्त्रास्त्रें तयार करण्याचा कारखाना सुरू करावयाचा अशी योजना मुक्रर झाली होती. पण नेपाळबद्दलच्या योजना अपेक्षेप्रमाणें झाल्या नाहींत. निराळ्याच गोष्टी घडून यावयाच्या होत्या. सरकारला ह्या प्रकरणाचा थोडा सुगावा लागला असावा; त्यामुळें पुढील योजना थंडावल्या.

नेपाळहून दामू जोशी कोल्हापुरास परत गेल्यावर तेथें त्याला कोल्हापूर प्रकरणांत अटक झाली व त्याचा अतोनात छळ झाला. दामूला माहीत असलेली नेपाळची हकीकत कळावी म्हणून हा छळ मांडला होता. त्या छळाला दामूनें किंचितही दाद दिली नाहीं. पुढें त्यांचेवर निराळेंच अस्त्र कोल्हापूरच्या महाराजांनीं सोडलें. कांहीं कालानंतर दामूकडे वारंवार ते अशी साखर पेरूं लागले कीं आपण शिवाजीमहाराजांचे अवतार असून त्यांच्याप्रमाणेंच आपणांस भारताचें स्वातंत्र्य प्रस्थापित करावयाचें आहे. तेव्हां असल्या गुप्त प्रयत्नाची जी कांहीं माहिती असेल ती आपणाजवळ सांगण्यास मुळींच हरकत नाहीं. हें ऐकतांच दामू विरघळला व त्यानें नेपाळ प्रकरणाची सर्व विदित असलेली हकीकत अखेरीस महाराजांजवळ सांगून टाकिली.

त्यानंतर, पूर्वी चालू असलेल्या चौकशीची सर्व यंत्रें जोरांत फिरूं लागलीं. कोल्हापूरच्या महाराजांकडून ही माहिती ब्रिटिश सरकाराकडे गेली आणि पुढें चिरोल साहेबांना कळली. कृष्णराव व क्रप्स कंपनीकडून आलेलें यंत्र यांचा जारीनें तपास चालू झाला. नेपाळ सरकारकडेही पृच्छा करण्यांत आली. नेपाळ सरकारनें यंत्रांची वासलात लावली होती. त्याप्रमाणें पशुपतेश्वराची पूजा करणारा जो महाराष्ट्रीय ब्राह्मण होता त्याची पूर्वीच

तेथून रवानगी करण्यांत आली होती. यंत्राची आपणास मुळींच माहिती नाहीं असें दरबारनें स्पष्ट सांगितलें व काकासाहेबांबद्दलच्या चौकशीस नेपाळ दरबारकडून असें उत्तर आलें कीं आमच्याकडे कौलाच्या कारखान्यावर 'कृष्णराव' नांवाचा मनुष्य होता हें खरें आहे. पण तो असल्या भानगडींत पडणारा नव्हता, याची आम्हांला पूर्ण खातरजमा आहे. दरबारच्या या उत्तरानें म्हणजे चंद्रसमशेर महाराजांच्या या जबाबानें काकासाहेबांना या प्रकरणांतून सोडविलें; व अशा रीतीनें नेपाळ येथील शस्त्रास्त्रांच्या कारखान्याच्या उद्योगाची कायमची इतिश्री झाली!

### वंगभंगाच्या वातावरणांत

नेपाळांतून एकप्रकारें यश व एकप्रकारें अपयश घेऊन काकासाहेब १९०४ च्या अखेरीस पुण्यास आले. नेपाळांत असतांना त्यांना जडलेल्या मलेरियानें त्या सालच्या पावसाळ्यांत त्यांना पुन्हां पछाडलें व मधून मधून त्यांना त्याचा त्रास होत होता. अशा स्थितींत कांहीं काळ विश्रांति घेऊन या रोगाचा कायमचा बंदोबस्त करण्यासाठीं कांहीं औषधोपचार करण्याकरितां काका सांगलीस घरीं राहावयास आले व पुढें ५–६ महिने ते सांगलीसच होते. एल्‌एल्‌. बी.च्या परीक्षेबद्दल विचार सुटल्यासारखाच होता. देशसेवेच्या कार्याकडे मन गुंतलेलें व वयही ३० च्या पुढें गेलेलें यामुळें पुन्हां परीक्षेकडे त्यांचें मन घेईना. पण संसारापायीं झालेल्या कुटुंबाच्या कर्जाच्या जबाबदारींतून त्यांना अजून मुक्त व्हावयाचें होतें.

अशा मनःस्थितींत काकासाहेब असतांना हिंदुस्थानाच्या राजकीय चळवळींतील अत्यंत प्रक्षोभक घटना, वंगभंग, ही घडून आली. कर्झन साहेबानें एका प्रांताचीं दोन शकलें करून देश दुभागण्याचा प्रयत्न केला. पण त्यानेंच तो एक संघ झाला. या अचानकें उत्पन्न झालेल्या प्रक्षोभाचा फायदा घेऊन लोकमान्य टिळक व बंगालचे पुढारी यांनीं वंगभंगाची

जोराची चळवळ सुरू केली. त्याकरितां ताबडतोब काकासाहेबांना पुण्यास येण्याबद्दल लोकमान्यांनीं पत्र लिहिलें.

यावेळीं हिंदुस्थानांतील राजकारणाची स्थितीहि जास्त गंभीर झाली होती. १९०३ च्या मद्रासच्या अधिवेशनानंतर राष्ट्रीय सभेचें कार्य परिणामकारक व सततचें होत नाहीं यामुळें त्या सभेच्या त्यावेळच्या पुढाऱ्यांविरुद्ध लोकमान्यांची जोरदार तक्रार होती. राजकीय चळवळ ही कांहीं पुष्पशय्या नव्हे. आरामीनें करण्याची गोष्ट नव्हे. पैसा व आयुष्य सर्व या कार्याकडे खर्ची पडलेंच पाहिजे; पण मेथा, बानर्जी वा आनंदाचार्लू यांना हें पटत नव्हतें, अशी लोकमान्यांची तक्रार होती. स्वतः टिळक ताईमहाराज प्रकरणामुळें अत्यंत व्यग्र मनःस्थितींत होते. क्लेमेंट साहेबाच्या निकालाच्या वेळीं टिळकांना त्यांच्या आयुष्यांतील अत्यंत त्रासाचा काळ असा वाटत होता.

कर्झनशहाची दडपशाही वाढत्या प्रमाणांत होती. बंगाल व इतर प्रांतीं कांहीं ठिकाणीं गुप्त संस्था व त्यांच्या गुप्त चळवळीस प्रारंभ झाला होता. देशांत झालेल्या अभिनव जागृतीमुळें लोकांच्या मनांत असंतोष धुमसूं लागला होता. कर्झनशहाची अरेरावी वृत्ति व उपमर्दकारक उक्ति जनतेच्या जिव्हारीं लागल्या होत्या. राजकीय चळवळीच्या मेघांचा गडगडाट चाललाच होता. त्यांतच जागजागीं अत्याचाराच्या विजाही चमकूं लागल्या. त्याचेविरुद्ध सरकारनें दडपशाहीचें अग्न्यस्त्र सोडलें! दडपशाहीमुळें बिघडलेलें हें वातावरण बंगाल, महाराष्ट्र अशा कांहीं प्रदेशांत जास्त धूसर व भयकारी होत होतें. रौलॅट रिपोर्टांत या दहशतवादी बॉंबच्या चळवळीचा जो इतिहास दिला आहे त्यांतलि चुकीच्या किंवा अतिशयोक्तीच्या हकीकती बाजूस ठेवूनही, त्यावेळीं इंग्रजांचें राज्य उलथून पाडण्याकरितां दहशतवादी वृत्तीचे अत्याचारी व बॉंबकटवाले देशांत उत्पन्न झाले व त्या कालांत त्यांची वाढही होत होती हें स्पष्ट आहे. सर्व बंगालभर व

महाराष्ट्र वगैरे कांहीं ठिकाणीं असल्या गुप्त कटवाल्यांची पाळेंमुळें खोल रुजलेलीं होती.

पुण्याच्या प्लेगाच्या वेळच्या सरकारी जुलूमजबरदस्तीमधून दहशतवादी प्रवृत्तीचा प्रारंभ पुण्याकडे झालेला होता. 'कोल्हापूर प्रकरणांत' बाहेर आलेल्या माहितीप्रमाणें पुण्याप्रमाणेंच कोल्हापूर, नाशिक वगैरे ठिकाणच्या तरुणांमध्यें हा दहशतवाद रुजवला जात होता. लोकमान्य टिळकांचे कानावर या तरुण मंडळींची बाजू मधून मधून घातली जात होती. लोकमान्यांना हे मार्ग तात्काल फलदायी अगर उपयुक्त होतील असें वाटत नव्हतें; तरीसुद्धां त्यांनीं कोणाचा निषेध केला नाहीं. तसेंच प्रत्यक्ष प्रोत्साहनही दिलें नाहीं. अगदी खासगी मंडळींत ह्या तरुणांच्या मनःस्थितीबद्दल व परिस्थितीबद्दल ते काळजी व्यक्त करीत.

काकासाहेबांच्या क्रांतिवादाच्या तत्त्वज्ञानामध्यें हा व्यक्तिगत दहशतवाद बसण्याजोगा नव्हता. अर्थात् या नव्या सांप्रदायाशीं त्यांचा प्रत्यक्ष संबंध येणें फारसें शक्य नव्हतें व तो तसा आलाही नाहीं. त्यांनीं बंगाल्यांतील बाँबच्या मीमांसेचे जे लेख पुढें केसरींत लिहिले, त्या लेखामुळें काकासाहेब दहशतवादी अत्याचाराला प्रोत्साहन देणारे होते असा गैरसमज होण्याचा संभव आहे पण तसे ते नव्हते, असें पुढें त्यांनीं लिहिलेल्या त्या वेळच्या त्या लेखावरूनही दाखवितां येईल. त्या लेखांतही ह्या दहशतवादाबद्दल त्यांनीं पसंती दाखविली नाहीं; पण 'मुद्याचा प्रश्न' म्हणून 'बाँब उत्पन्नच कां होतात याची चिकित्सा त्यांनीं केली आहे; व सरकारच्या दडपशाही व अन्यायी वर्तनामुळें तरुणांच्या भावना भडकून बाँबकटवाले व दहशतवादी उत्पन्न होतात त्याची जबाबदारी सरकारवरच आहे अशी लोकपक्षाची बाजू त्यांनीं मांडली हें पुढील उताऱ्यावरून लक्षांत येईल.

काकासाहेबांनीं केसरीच्या 'दुहेरी इशारा' या लेखांत अत्याचारी वृत्तीबद्दल पुढीलप्रमाणें चिकित्सा केली आहेः—

'बाँब गोळ्यानें एकाद्या अधिकाऱ्याचा खून होण्यापर्यंत राजकीय असंतोषाची मजल आली हें लक्षांत आणून सदर राजकीय असंतोषाची जीं मूळ कारणें असतील तीं लौकर काढून टाकणें हें शहाण्या व मुत्सद्दी सरकारचें कर्तव्य आहे. अत्याचार करणारांस शिक्षा होऊं नये किंवा त्याच्या अत्याचाराचा निषेध होऊ नये असें आम्ही बिलकूल म्हणत नाहीं. बाबत सामाजिक असो किंवा राजकीय असो; अत्याचार तो अत्याचारच! आणि सदर अत्याचार करण्याकडे प्रवृत्ति होण्यास मूळ कारण कांहीं असलें तरी सदर अत्याचारास कायद्यानें जें शासन व्हावयाचें तें झालेंच पाहिजे. परंतु असले अत्याचार कांहीं प्रसंगीं अपरिहार्य असतात, हें लक्षांत आणून त्यापासून योग्य तो बोध घेणें हेंच खरें मुत्सद्दीपणाचें लक्षण होय!

'पण अशा कारणानें उद्भवलेल्या चळवळीमुळें देशांतील एखाद्या माथेफिरूचें—आणि देश आहे तेथें माथेफिरू आहेतच—संतापानें डोकें फिरून तो जर एकाद्या अघोर कृत्यास प्रवृत्त झाला तर त्याचा दोष वर सांगितल्याप्रमाणें राजकीय चळवळ करणाराकडे लावणें कधींही योग्य होणार नाहीं...दादाभाई नौरोजी यांनीं कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेंत सांगितल्या-प्रमाणें राजकीय सुधारणा करण्याच्या कामीं कितीही निराशा झाली तरी प्रजेचे खरे पुढारी कधींही संतापानें किंवा त्वेषानें बिथरून जात नाहींत. पण पुढाऱ्यांच्या अंगचा हा गुण देशांतील प्रत्येक मनुष्याच्या अंगीं कोठून असणार? विशेषेंकरून ज्या वेळीं राजकीय स्थिति सुधारण्याकरितां केलेले अनेक प्रयत्न राज्यकर्त्यांच्या हट्टामुळें किंवा दुराग्रहामुळें निष्फळ झालेले असतात तेव्हां देशांतील एकाददुसऱ्या इसमाचें डोकें फिरून जाऊन तो अत्याचारास प्रवृत्त झाल्यास त्यांत कांहीं अस्वाभाविक आहे काय?"

काकासाहेबांच्या अशा मतामुळें नेपाळांत शस्त्रानिर्मितीकरितां गेले असतांना सुद्धां ते या नव्या उत्पन्न झालेल्या गुप्त मंडळांत मुळींच नव्हते; पण केसरी व इतर वर्तमानपत्रांमध्यें अशा प्रसंगीं राष्ट्रीय दृष्टीनें आलेल्या

लेखानें अत्याचाराचें समर्थन केलें जातें अशी सरकारची तक्रार असे. सरकारच्या त्या वृत्तींतूनच राजद्रोहाचे खटले निघाले व काकासाहेबांचे बद्दलचें सरकारचे गैरसमज शिल्लक राहिले.

कोल्हापूर प्रकरणानंतर नेपाळची माहिती अर्धवट बाहेर आली होती. कोल्हापूरच्या महाराजांनीं याचा फायदा घेऊन टिळक व त्यांच्या पक्षांतील कार्यकर्ते यांच्या विरुद्ध पुढें अनेक कारवाया चालविल्या. गुप्त पोलिसांनीं काकासाहेबांना व आणखी इतर पुढाऱ्यांनाही अत्याचाराच्या भानगडींत गोवतां येतें कां तें पाहिलें. पण वस्तुस्थितीपुढें त्यांचा इलाज चालला नाहीं. हा सरकारी ससेमिरा काकासाहेबांच्या मागें कित्येक वर्षें राहिला. नाशिकला झालेल्या १९०९ सालांतील जॅक्सनच्या खुनाचा खटला संपेपर्यंत काकासाहेबांच्यामागें हा त्रास होता. नेपाळ प्रकरणामुळें सुरू झालेला हा त्रास १९१० नंतरच्या राजकारणांत जे फरक पडत गेले त्या काळांत बेताबेतानें कमी झाला; तरी १९१० पर्यंत काकासाहेबांना तो तीव्रतेनें जाणवत होता.



## : ६ :

# राजकारणाची रणधुमाळी

" निःशस्त्र, दुबळे, आपआपसांत भांडणारे व
जुटीच्या शिस्तीला पारखे झालेले असे
जेव्हां प्रजाजन असतात तेव्हां त्यांच्या
उद्धाराचें काम परमेश्वर प्रथमतः आपल्या
प्रतिभासंपन्न अतएव लाडक्या लेखकांच्या
मार्फत करीत असतो. "

—काकासाहेब खाडिलकर.

नेपाळांतून परत आल्यावर काकासाहेब थोडे दिवस सांगलीस येऊन परत गेल्याबरोबर पुण्यांत कायमचें बिऱ्हाड करण्याचें त्यांनीं निश्चित केलें; व १९०५ चे सुमारास ती. सौ. गौरकाकू, ती. आई, गंगू व शांता या दोन मुली, अशी कुटुंबीय मंडळी पुण्यास आणण्यांत आली, व पूर्वीपासून ज्यांचेकडे बिऱ्हाड होतें त्या श्री. भाऊसाहेब गोखले यांचे वाड्यांत पुढील भागांत खाडिलकरांचें बिऱ्हाड थाटलें. हें बिऱ्हाड येथें सुमारें

१९११ पर्यंत होतें; व पुढें तें तेथून मुंजाबाच्या बोळांत श्री. आळवणी यांच्या वाड्यांत गेलें; व ते १९२० च्या सुमारास पुणें सोडून मुंबईस बिऱ्हाड नेईतोंपर्यन्त त्याच टिकाणीं होतें.

काकासाहेब नेपाळांतून परत आले ते एका तऱ्हेनें अल्पसें कां होईना यश घेऊन स्वदेशांत आले असें म्हणतां येईल. पिस्तुलें तयार करण्याचें, नमुन्याचें यंत्र आपल्या ऑर्डरप्रमाणें आल्याचें व त्या यंत्रानें हिंदुस्थानची हद्द ओलांडून नेपाळच्या हद्दींत प्रवेश केल्याचें त्यांनीं स्वतः पाहिलें व मगच ते हिंदुस्थानांत आले. मध्यंतरीं या कारस्थानाची माहिती सरकारला कळली व त्यांचे कडून नेपाळ सरकारकडे चौकशी झाल्यामुळें काकासाहेबांनीं दोनतीन वर्षें नेपाळांत राहून जें काम रंगारूपास आणलें होतें तें सर्व धुळीस मिळालें. हें असें झालें नसतें तर ते थोडी विश्रांति स्वगृहीं घेऊन व लोकमान्य आणि वासुकाका यांच्याशीं पुढील गोष्टींचा विचारविनिमय करून ते परत आपल्या कामावर जाणार होते.

तेथील कौलांच्या कारखान्याचें काम संपलें असल्यामुळें काकासाहेबांना आगपेट्यांचे कारखानदार बनण्याची सूचना दिली गेली होती. ज्या निधडे-पणानें कांहींएक माहिती नसतां त्यांनीं प्रथम कौलांचे कारखानदार होण्याचें कबूल केलें व पुढें सुंदर कौलें तयार करून राजवाड्यावर घातली त्याच साहसी आत्मविश्वासानें आगपेट्यांच्या कारखानदाराची भूमिका वटविण्याचेंही त्यांनीं कबूल केलें होतें. हिंदुस्थानांत आल्यावर या आग-पेट्यांच्या कारखान्यासाठीं लागणारें ज्वालाग्राही रसायन व अत्यंत सुलभ-पणें पेट घेणारें काष्ठ–द्रव्य यांचा अभ्यास ते करीत असतील तोंच हा आगद्रव्यांचा कारखाना नेपाळास काढतां येणार नाहीं असें निश्चित झालें.

### ज्वालाग्राही परिस्थिति

तथापि या आगप्रसार करणाऱ्या तज्ज्ञ कारखानदाराची जरूरी

हिंदुस्थानांत होती. चिपळूणकर टिळकांनीं गुलामगिरींत खितपत पडलेल्या हिंदुस्थानाला डिवचून जागें करण्याचा व त्याच्यामध्यें आपल्या निलाजऱ्या स्थितीबद्दल क्षोभ उत्पन्न करण्याचा मोठा उद्योगधंदा आरंभिलाच होता. काकासाहेबांना पुन्हां नेपाळांत जातां आलें नाहीं पण ते आपल्या केसरीकचेरींत म्हणजे स्वदेशभक्तीची ज्योत पेटविणाऱ्या उद्योगमंदिरांत नित्याप्रमाणें रुजू झाले.

चेंडू जोरानें खालीं हापटला म्हणजे तो अधिकच वर जातो. शब्दाला प्रतिशब्द दिला म्हणजे वाद वाढतो तसेंच राष्ट्रीय चळवळीचें होत होतें. राष्ट्रीय चळवळ थांबावी म्हणून खुनशीपणानें सरकार दडपशाही करीत होतें आणि अशी दडपशाही सुरू झाली व जुलमाचा नाच सुरू झाला म्हणजे देशप्रेमाचा आवेग जनतेमध्यें अधिकच उसळत असे. राष्ट्रविमोचनाच्या कार्यांत लोकमान्य टिळकादिकांना खरोखर मोठें साहाय्य झालें असेल तर ते सरकारचे अक्कलमंद दडपशाहीवाले अधिकारी यांचेंच होय. यांच्याच उन्मत्त अरेरावीनें काकासाहेब काम करीत असणाऱ्या लोकमान्यांच्या केसरी नामक आगकारखान्यास भरपूर ज्वालाग्राही द्रव्य पुरविलें.

नेपाळांतून ते परत आले त्यावेळीं कर्झनशहा आपल्या घमेंडीच्या शिगेवर होते. त्यांचे मर्मभेदक प्रलाप जनतेच्या जिव्हारीं लागत होते. त्यांची जुलमी कारकीर्द लोकांचें मन कावरेंबावरें करीत होती. अशांतच त्यांनीं बंगाली लोकांचें हृदय चिरून बंगालचे तुकडे करून टाकले. ही निर्दयपणाची कमाल होती, ही घमेंडीची परमावधि होती. यानें सबंध बंगाल खडबडून उठला, व तो झंझावाताप्रमाणें पेटला.

लोकमान्य टिळक काय अगर राष्ट्रभावनेच्या चेतनेसाठीं धडपडणारे हिंदुस्थानांतील इतर सर्व पुढारी काय, ही आपत्ति राष्ट्राच्या पूर्ण कारणीं लावण्यासाठीं विजेच्या जलदाईनें पुढें झाले. टिळकांच्या अंगांत जणुं चैतन्या-

मीच शिरला होता. फाळणीमुळें जितका बंगाल चेतला तितकाच केसरी-द्वारें, व्याख्यानद्वारें व प्रत्यक्ष भेटींच्याद्वारें सबंध हिंदुस्थान लोकमान्यांनीं पेटवून दिला. लोकमान्यांचे बिनीचे वीर या नात्यानें, केसरीच्या तोफेवर बसून, काकासाहेब आपल्या जळजळीत लेखांची सरबत्ति प्रतिपक्षावर अव्याहत करूं लागले. तसेंच अनेक परिषदा, सभा व मेळावे यांच्यामधून अत्यंत प्रक्षोभकारक असे व्याख्यानरूपी बॉंबगोळेही टाकूं लागले.

काकासाहेबांच्या वक्तृत्वकलेचें परमोच्च टोक त्यावेळीं त्यांचीं व्याख्यानें ऐकण्याचें ज्यांना भाग्य लाभलें त्यांना पाहण्यास मिळालें यांत शंका नाहीं. या प्रचारानें महाराष्ट्र दुमदुमून गेला. या अग्निमंथनांतून स्वदेशी व बहिष्कार हीं दिव्य अस्त्रें व वंदेमातरम् हा महामंत्र बाहेर पडला. जिकडे तिकडे संप सुरू झाले; जिकडे तिकडे परदेशी कापडाच्या होळ्या सुरू झाल्या; सरकारबद्दलच्या असंतोषानें सर्व हिंदुस्थान कोंडून गेला. लहान-मोठे, कांहीं अधिकारी व पदवीवाले, संस्थानिक व शेतकरी, हिंदु व मुसलमान, जहाल व मवाळ, एकजात सर्व हिंदी लोकांनीं सरकारविरुद्ध असंतोषाचा पेट घेतला.

लाल, बाल, पाल हीं नांवें हिंदुस्थानभर देवदूतासारखीं वाटूं लागलीं. सुरेंद्रनाथ बानर्जी यांच्यासारखे वाक्-केसरी गर्जूं लागले. यांतच १९०६ सालची कॉंग्रेस कलकत्त्यास राष्ट्रपितामह दादाभाई नौरोजी यांच्या अध्यक्षते-खालीं भरून त्या सभेंत हिंदुस्थानला स्वराज्य पाहिजे अशी खणखणीत मागणी करण्यांत येऊन तें मिळविण्यासाठीं अर्जे-विनंत्यांचा मार्ग सोडून राष्ट्रीय शिक्षण, मद्यपाननिषेध, स्वदेशी व बहिष्कार अशा चतुःसूत्रीच्या स्वावलंबी पण लढाऊ मार्गाचा अवलंब करण्याचें ठरलें. त्याप्रमाणें देशभक्ति-प्रेरित अनेक संस्था या कालांत सर्व देशभर स्थापन झाल्या. अनेक पेढ्या निघाल्या. अनेक कारखाने निघाले. विजापूरकरांचें राष्ट्रीय शिक्षणाचें समर्थ विद्यालय याच काळांत निघालें.

सरकारविरुद्ध राष्ट्रीय लढ्याची आघाडी अशी अफाटपणानें वाढली. अर्थातच सरकारलाही या डिवचणीमुळें चेव आला असल्यास नवल नाहीं. त्यांचे तर्फे दडपशाहीस अधिकच जोरांत सुरवात झाली. प्रत्येक देश-भक्तांच्या मागें गुप्त हेरांचा भुगा सुरू झाला. भाषणबंदीचे हुकूम सुटूं लागले. वर्तमानपत्रांकडून जामीन घेतले व लालाजीसारख्या प्रथम श्रेणींतील देशभक्तांस कांहीं काल हद्दपार केलें. याच कालांत महाराष्ट्रांत भालाकार भोपटकरांवर 'नरकाचा दरबार' या लेखासाठीं खटला होऊन त्यांना सहा महिने सक्तमजुरीची शिक्षा झाली.

## सुरतेचा लढा

कॉंग्रेसमधील बहिष्काराचा ठराव व त्यानंतर तेवत राहिलेला जनतेंतील क्षोभ यामुळे देशांतील मवाळाग्रणींचें धाबें दणाणून गेले. ब्रिटिश सरकार त्यांना गोंजारूं पहात होते, व चळवळ्या मंडळींना दडपून टाकण्यास उत्तेजन देत होतें. फेरोजशहा मेथा व गोखले यांना कॉंग्रेसनें बहिष्काराचा ठराव पास केल्यामुळें अगदीं खालींवर होऊन गेलें होतें. कॉंग्रेसचा लगाम आपल्या हातून सुटला असें त्यांना वाटत होतें. बहिष्काराची भीति दाख-विल्यानें जात्या कृपाळू सरकार साहजिकच रागावून हिंदुस्थानचें हित साधण्याचें त्यांच्या जें मनांत आहे तें बाजूस सारून उलट सर्व सनदशीर चळवळींचाही तें उच्छेद करील असें त्यांचें म्हणणें होतें.

त्यामुळें या हिंदच्या मवाळाग्रणींनीं अनेक उलाढाली केल्या, नागपूरची कॉंग्रेस सुरतेस आपल्या बालेकिल्ल्यांत आणली व सरकार खूष होईल, अशी कॉंग्रेस प्रवेशाची शपथ व बहिष्कारविरहित स्वदेशीचा ठराव या दोन गोष्टी दडपून पास करून घेण्याचें ठरविलें. लोकमान्य व त्यांचा राष्ट्रीय पक्ष यांना कॉंग्रेसची ही पिछेहाट अर्थातच मान्य नव्हती. त्यांनीं फेरोजशहा मेथा व गोखले वगैरे मंडळींचीं मनें वळविण्याचा अति-शय प्रयत्न केला. लालाजी, चुनीलाल सरैया, सुरेन्द्रनाथ बॅनर्जी वगैरेंच्या

मार्फत कॉंग्रेसच्या कँपांत खूप मध्यस्थी केली. पण सर्व व्यर्थ झालें; व शेवटीं ही सुरतेची कॉंग्रेस उधळली गेली.

लोकांमध्यें यामुळें अधिकच जागृति झाली, आणि राज्यकर्त्यांबद्दल आधिकच चेव वाढला. काकासाहेब सुरतेच्या कॉंग्रेसला लोकमान्य टिळकांना सर्व तऱ्हेची मदत करण्यास उपस्थित होते. केसरीमधील यावेळचे त्यांचे लेख फार सुंदर रीतीनें सर्व परिस्थितीची कल्पना देतात. केसरीच्या ता. ३१-१२-१९०७ च्या अंकांत काकासाहेब लिहितात—

"लजपतराय झाले, चुनीलाल झाले, विदुर झाले, श्रीकृष्ण झाले; कोणाचेच हातून शिष्टाईचें काम रेटेना. कारण भाऊबंदकीचें भांडण अखेरपर्यंत भांडून वेगळें सरण्याचें कंकण हातीं बांधून सर मेथा आणि गोखले तापी नदीच्या कांठीं आसन घालून बसले होते. ते भांडणाचें आसन सोडीनात. हा कृष्ण मध्यस्थीस आला आहे खरा, पण हाच आंतून सूत्रें हालवून राष्ट्रीय पक्षाची उठावणी करतो, अशा वाटाण्याच्या अक्षता राष्ट्रीय सभेंतील कांहीं वृद्ध व लोकप्रिय मध्यस्थांच्या शिष्टाईला लावण्यांत आल्या.

गुरुवारीं रात्रीं व शुक्रवारीं सकाळीं राष्ट्रीय सभेंतील आतिष्टांना ते लोक दुराग्रहाच्या दुर्भेद्य आसनावर उभे राहून सामना देण्यास तयार झाल्यामुळें, निदान कांहीं काळ तरी रामराम ठोकण्याचा प्रसंग येणार म्हणून नॅशनॅलिस्ट पक्ष शोकाकुल झाला होता. पण "अपरिहार्य अर्थाचे" प्रसंगीं शोक करणें उचित नव्हे, तर आपणाला न रुचणारें कर्म असलें तरी, देशहिताकडे लक्ष देऊन तें आचरलेंच पाहिजे, या भगवद्गीतेंतील उपदेशाकडे लक्ष देऊन नॅशनॅलिस्ट पक्ष कामास लागला."

यावेळीं बंगालप्रांत सर्वांत पुढें होता. तेथें प्रसिद्ध क्रांतिकारक बारींद्रबाबू थरारून उठले होते. आपल्या साथीदारांसह बंगालचा जिल्हान् जिल्हा त्यांनीं हिंडून जागृत केला. अविनाश भट्टाचार्य व भूपेंद्रनाथ दत्त यांच्या सहाय्यानें



कीचकवधाचे लेखक

त्यांनीं युगांतर पत्र काढलें व 'अनुशासनसमिति' नामक गुप्त संस्था स्थापून तिच्या ५०० शाखा ठिकठिकाणीं उघडल्या. महाराष्ट्रांतही नाशिक,कोल्हापूर, वगैरे ठिकाणीं गुप्त चळवळींच्या संस्था अस्तित्वांत होत्या. निरनिराळ्या संस्थानांतून ह्या गुप्त चळवळींचें पोषण होत आहे अशा संशयी वृत्तीनें सरकार वागत होतें. त्यामुळें संस्थानांतही गुप्त हेरांचा सुळसुळाट होऊन लोक भीतिग्रस्त झाले होते.

**' कीचकवधाची ' पकड**

अशा अत्यंत खळबळीच्या काळांत देशोद्धारास पूर्णतेनें वाहून घेणाऱ्या राष्ट्रभक्तांना आपल्या संसाराकडे कितपत लक्ष देतां येणार ? काकासाहेबांचेंही तसेंच झालें. अर्थात् ही संसाराची जबाबदारी सौ. गौरकाकूंवरच टाकली गेली. त्या वेळच्या केसरीच्या सांपत्तिक स्थितीच्या मानानेंच केसरी ऑफिसांतील सर्वांचे पगार होते, व मिळेल त्या पैशांत संसार उत्तम तऱ्हेनें चालविणें ही सौ. काकूंकडे कामगिरी होती.

या कालांतच थोरली मुलगी गंगूताई हिचें लग्न झालें व त्याबद्दल पूर्वव्यवस्था त्यांचे थोरले बंधु ( माझे वडील ) ती. तात्यासाहेब व आमचे खाडिलकर घराण्याचे सांगलीचे एक स्नेही तात्या गद्रे यांनीं केली. ती. तात्या यांचेबद्दल काकासाहेबांना किती आदर व प्रेम वाटत असे याबद्दल उल्लेख आलाच आहे. ज्या कालांत हे कौटुंबिक व्यवहार घडले त्या कालांतील कठोर परिस्थितीची कल्पना केल्यास आपलें कर्तव्य करणाऱ्या प्रत्येक कुटुंबियाचे खंबीर मनःस्थितीबद्दल कोणासही आदरच वाटेल. या कालांत तात्यांच्याप्रमाणेंच काकासाहेब किती खंबीर मनःस्थितींत होते हें याच सुमारास त्यांनीं कर्झनशाहीवर कीचकवधासारखें नाटक लिहिलें यावरून दिसून येईल.

लोकजागृति व पारतंत्र्याबद्दल तिटकारा ज्या ज्या मार्गांनीं जनतेमध्यें उत्पन्न करितां येईल ते सर्व मार्ग—त्यामुळें उद्भवणाऱ्या आपत्तीची पूर्ण

जाणीव असूनही—अनुसरावयाचे असा आग्रही बाणा काकासाहेबांचा होता. त्यांनीं स्वतःच पुढें एकदां म्हटल्याप्रमाणे ते " पहिल्यानें नाटककार " असल्यानें कर्झनशाहीचा धुमाकूळ पाहतांच महाभारतांतील कीचक त्यांच्या कविमनापुढें उभा राहिला. व त्याप्रमाणें त्यांनीं आपलें अत्यंत तेजस्वी कीचकवध हें नाटक लिहून रंगभूमीवर आणलें. केसरींतून लिहितांना एकदां त्यांची उग्र लेखणी सुरू झाली म्हणजे प्रतिपक्षाच्या हल्ल्यांचे बारा बाण ते आपल्या एकाच प्रखर बाणानें छेदून टाकीत व व्याख्यानास उभे राहिले म्हणजे अवघा श्रोतृसमाज प्रज्वलित करून सोडीत. या दोन अस्त्रांपेक्षांही ' कीचकवधाचे ' जें नाट्यास्त्र त्यांनीं यावेळीं सरकारवर सोडलें त्याचें तेज कांहीं अवर्णनीयच होतें.

नोकरशाहीबद्दल पराकाष्टेचा संताप लोकांमध्यें अगोदरच उत्पन्न झालेला होता. हिंदुस्थानच्या जनतेला कस्पटाप्रमाणें लेखून तिला पायाखालीं तुडविणारा मदांध अरेराव कर्झनशहा लोकांच्या डोळ्यांत सारखा सलत होता, हृदयांत टोचत होता. अशावेळीं कीचकवध नाटक रंगभूमीवर आलें. पहिल्याच प्रवेशांत दुर्योधनाच्या फुसीची दारू पिऊन उन्मत्त झालेला घमेंडानंदन कीचक एका चढावावर भीम व दुसऱ्यावर अर्जुन यांच्या नांवांना तुडवीत व पांडवांचींच छत्रचामरें आपल्या डोक्यावर मिरवीत व भगवान् कृष्णाची बहीण, पंचकन्यांपैकीं अग्रणी व हिंदुमात्राच्या हृदयाला अत्यंत पूज्य अशा 'द्रौपदीदेवीचा' हलकट उल्लेख करून " द्रौपदीपति कीचक महाराज की जय " अशा ललकारीमध्यें जेव्हां रंगभूमीवर उभा राहतो तेव्हां प्रेक्षकांच्या डोळ्यांपुढें आपली मातृभूमीच सैरंध्रीरूपानें प्रत्यक्ष उभी आहे असे वाटे व तिची ही अवहेलना पाहून त्यांच्या हृदयाचे बंद तटातट तुटून जात. यावेळीं काकासाहेबांनीं कीचकाच्या तोंडीं पुढील भाषण घातलें आहे. तें सत्तेनें मदांध बनलेल्या अरेराव नोकरशाहीच्या चढेल वृत्तीचेंच द्योतक आहे:—

" कीचकः—माझ्या प्रतिज्ञेची मला आठवण रहावी म्हणून कौरवेश्वरानें माझ्या पायांतील चढावावर 'भीम' अशीं अक्षरें लिहून ठेवलीं आहेत. गदायुद्धांत मृतप्राय होऊन भीम जमिनीवर पटल्यावर डाव्या पायाचा अंगठा त्याच्या नरडीला लावून त्याचा प्राण मी घेईन. माझ्या बाणांनीं रथांतून खालीं फेकून दिलेल्या अर्जुनाच्या मस्तकावर माझ्या उजव्या पायाची लाथ बसावयाची असल्यामुळें उजव्या पायांतल्या चढावाच्या टाचेखालीं अर्जुन सांपडला आहे. आणि अक्का, तुझ्या वहिनीला सांग, मनांत उगीच मत्सरबुद्धि आणूं नकोस.–द्रौपदी स्वयंवर झाल्यावर पांच पांडवांशीं जेव्हां द्रौपदीचें लग्न लागलें, त्या समारंभांत जामात रुसले असतां द्रुपद राजानें 'द्रौपदीपति' ही पंचाक्षरें हिऱ्यावर कोरून पांच पांडवांना पांच अंगठ्या नजर केल्या. द्यूताचे वेळीं त्या अंगठ्या सार्वभौम सुयोधनाच्या मालकीच्या झाल्या. भावी युद्धानंतर जिंकलेल्या द्रौपदीचा मी एकटाच पति होणार, म्हणून कौरवेश्वरानें "द्रौपदीपति" ह्या अक्षरांच्या पांचही अंगठ्या, ह्या वीराच्या, ह्या भाग्यशाली व पराक्रमी हाताच्या पांचही बोटांत घातल्या आहेत. ह्या अंगठ्या माझ्या हातांत घातल्यावर भर दरबारांत शंभर कौरवांनीं "द्रौपदपति" "द्रौपदीपति," असा माझ्या नांवाचा जयजयकार केला!"

हें सर्व भाषण ऐकत असतां प्रत्यक्ष कर्झनशहा भारतमातेचा अपमान करीत आहे अशीच भावना प्रेक्षकांच्या मनांत उसळून कीचकाला खाऊं कीं गिळूं ह्या भीमवृत्तीनें प्रेक्षक भारले जात असत. तसेंच तिसऱ्या अंकांतील दुसऱ्या प्रवेशांत कीचक–द्रौपदीला वसंतबागेंत गाठून जेव्हां तिची धमकीवजा मनधरणी करतो त्या वेळीं ब्रिटिशांच्या हिंदुस्थानविषयक सहानुभूतीचें हिडिस स्वरूपच तो उघडें करीत आहे असें वाटतें. काकासाहेबांनीं यासंबंधांत पुढीलप्रमाणें संभाषण योजलें आहे.

" कीचकः–...माझ्या नाटकशाळेंत सर्वांना सारखाच मान व सार-

खाच दर्जा दिलेला आहे. हें पहा सैरंध्री, ह्या कीचकानें आजपर्यंत कोणा-च्यींच आर्जवें केलीं नाहींत; पण तुला म्हणून तुझ्या हिताची गोष्ट सांगतों. तूं जर आपण होऊन आपखुशीनें माझ्या नाटकशाळेंत आलीस आणि जर माझें मन प्रसन्न करून घेतलेंस, तर–मी तुझ्यावर हा उपकार करीत आहे,–ह्या उपकाराला तूं पात्र आहेस–असें मात्र आपल्या वर्तनानें मला दाखविलें पाहिजे;–तर हें पहा, मी द्रौपदीला देखील तुझ्या ताब्यांतील–तुझ्या हाता-खालीं वागणारी–दासी करीन. पहा नीट विचार कर, हा जो मी तुझ्या-वर विश्वास टाकीत आहे, त्याची जोखीम पुरती ओळखून तुला वागलें पाहिजे; नाहीं तर तुझ्याविषयींची माझ्या मनांतील सहानुभूति—

वेळीं अवेळीं प्रदर्शित होणाऱ्या आपल्या पाजी ढोंगी सहानुभूतीचें चऱ्हाट पुढें वळतांना कीचक म्हणतो—

"कीचकः–सैरंध्री, असल्या ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी सांगण्याचा आव घालून तूं आपलें नुकसान करून घेत आहेस;–तुला माझ्या नाटकशाळेंत आलेंच पाहिजे. ही गोष्ट ठरलेली असून कालत्रयीं ती फिरणारी नाहीं. मग उगीच पापपुण्याचें चऱ्हाट वळून, माझ्या मनांतील तुजविषयींची सहानुभूति—.

सैरंध्रीः—कसलीरे मेल्या सहानुभूति? आग लागो तुझ्या सहानु-भूतीला! सहानुभूति, सहानुभूति, म्हणून आम्हां सर्वांना तुझ्या रांडाच बनाविणार कीं नाहीं? ह्या गाढवाला आपल्या ह्या असल्या सहानुभूतीचा दिमाख दाखवायलाही लाज वाटत नाहीं!"

द्रौपदीचें हें झणझणीत उत्तर ऐकतांच प्रत्येकास आपलेंच मन द्रौपदी बोलत आहेसें वाटत असे. अशाही स्थितींत आमच्यांतलेच कांहीं मूर्ख व लोंचट लोक सरकारची नाटकशाळा होण्याचा मान मिळविण्याकरतां कसे धडपडत असत हें सौदामिनीच्या पात्रानें काकासाहेबांनीं फार उत्तम तऱ्हेनें रंगविलें आहे. विद्याधरासाठीं सिद्धार्थ जेंव्हां तिच्याकडे क्षुद्रवृत्तीसाठीं वशिला लावतो तेंव्हां "महादासीसाहेब" "महादासीसाहेब" या त्याच्या

सौदामिनीला उद्देशून उच्चारलेल्या शब्दांचा पुनरुच्चार, सरकारी पदव्या धारण करणाऱ्याचें घामट स्वरूप उघडें करून प्रेक्षकांना ओकारी आणीत असे. गोऱ्या अधिकाऱ्यांची हांजी, हांजी करण्याची वृत्ति किती हीन आहे, हें सौदामिनीच्या रूपानें काकासाहेबांनीं दाखविल्यामुळें नोकरीघाले फार चिडले.

उन्मत्त सत्ताधाऱ्याच्या पापकृत्याचा शेवट त्या उन्मत्ताच्याच शेवट केल्याशिवाय होत नाहीं ही विचारसरणी,—सैरंध्री, बल्लव व कंकभट यांचें या विषयासंबंधींचीं जीं संभाषणें नाटकांत आहेत त्यांत—जोरदारपणें काकासाहेबांनीं सूचित केली आहे. तिसऱ्या अंकांत वल्लभ ( भीम ) कंकभटास ( धर्मराजास ) पुढीलप्रमाणें प्रश्न करतो—

" बल्लवः—...देव आणि धर्म ह्यांना न जुमानतां आपली पापी चैन लहर लागेल त्याप्रमाणें चालविण्याची याला घमेंड आहे. निरपराधी साधु-तुल्य पांडवांना पिढ्यानुपिढ्या कष्टमय स्थितींत लोटून देण्याचें अतर्क्य पाप करावयाला हे कीचक व अनुकीचक तयार झाले आहेत, तर अशा स्थितींत अजातशत्रु धर्ममहाराज, कीचकाचा वध करायला ह्या भीमाला आपली संमति मिळणार नाहीं काय ?

कंकः—मी कधींच परवानगी देणार नाहीं असें नाहीं,—पण अद्याप वधापूर्वीचे सगळे उपाय संपले नाहींत. "

तसेंच पांचव्या अंकांत सर्व उपाय थकल्यावर कीचकवधास संमति देतांना कंकभटाचें पुढीलप्रमाणें उद्गार काढण्यापर्यंत मतपरिवर्तन झालें आहे.

कंकभटः—' केवळ कीचकाकडे पाहिलें म्हणजे कीचकवधांत अधर्म होत आहेसें मला वाटत नाहीं. '

शेवटीं कीचकवध करतांनी भीम पुढीलप्रमाणें उद्गार काढतो.

भीमः—' धर्मराज ! जित्याची खोड मेल्याशिवाय जावयाची नाहीं—

द्रौपदी, कीचकवधाशिवाय पांडवांना गत्यंतर नसल्यामुळें मी याला आतां यमसदनास पाठवितों. '

दडपशाहीचा नंगानाच घालणाऱ्या उन्मत्तांना ताळ्यावर आणण्याला इतर कोणतेंही मार्ग उपयोगी पडत नाहींत; तर शेवटीं इतर उपाय थकून नाइलाजानेंच कीचकवधांत त्याचा शेवट होतो; असें त्या वेळच्या नोकरशाहीला अत्यंत परिणामकारक रीतीनें काकांनीं दाखवून दिलें आहे. व जनतेलाही अप्रत्यक्षपणें पारतंत्र्याच्या जाचांतून सुटण्याचा अखेरचा निरुपायाचा जालीम मार्ग सूचित केला आहे.

सरकारच्या अन्यायी वागणुकीबद्दल द्वेष उत्पन्न करण्याचें काम अनेक लेख व अनेक व्याख्यानें यांनींही जें झालें नसतें तें त्याकाळीं एका ' कीचकवध ' नाटकानें काकासाहेबांनीं परिणामकारक रीतीनें करून दाखविलें व त्यामुळेंच या नाटकाची पकड जनतेच्या मनावर अद्यापही सारखी टिकून आहे. कीचकवधांत त्यांनीं जसें पराकोटीचें नाट्यकौशल्य दाखविलें तसेंच आपली अलौकिक निधडी छातीही प्रदर्शित केली.

## तंगसंसार

त्यावेळचा काळ अत्यंत नाजूक होता. गुप्त पोलिसांचा सर्वत्र शिलशिलाट होता. नेपाळच्या रहस्यासंबंधांत काकासाहेब सरकारच्या काळ्या यादींत होतेच. त्यांत त्यांचा टिळकांशीं व शिवरामपंतादिकांशीं संबंध ! व केसरींतील जळजळीत लेख ! म्हणून केव्हां काय होईल याचा मुळींच नेम नसे. एका बाजूस राष्ट्रीय उत्तुंग भावनेचा उद्रेक व दुसऱ्या बाजूस ही अशी सरकारी गुप्त हेरांनीं निर्मिलेली नाजूक परिस्थिति ! त्या दिवसांत संपादकांना काय पगार असणार ! आर्थिक पेंचही त्यांच्यापुढें होताच.

त्यावेळीं काकासाहेबांच्या संसाराची जबाबदारी सांपत्तिक दृष्ट्या कांहीं लहानसहान नव्हती; आम्हां पुतण्यांपैकीं सतत मी व पुढें माझ्या बंधूपैकीं

एकदोघे जण यांच्या शिक्षणाची जबाबदारी त्यांचेवर होती. त्याशिवाय विद्यार्जनाकरितां कांहीं काल काकासाहेबांचे भाचे श्री. वासुदेवराव भावे, चुलत बंधू श्री. विष्णुपंत खाडिलकर, आमचे नजीकचे नातेवाईक नख-चित्रकार श्री. परशरामपंत खाडिलकर व क्वचित् प्रसंगीं दूरचे आतेबंधू श्री. केशवराव पेंडसे व इतर नात्यांतील मंडळी व आश्रित मंडळी कोणी ना कोणी तरी विद्यार्जनाकरितां सतत घरांत असत.

चि. अप्पा व विनायक हे दोघेही मुलगे त्या काळांत लहान होते तरी पण सौ. गंगूताईच्या लग्नानंतर तिचा पाय दुखावून कित्येक महिने तिचे आजारीपण व डॉक्टरी उपाय हे चालू होते. पुढें सौ. गौर-काकूंच्या दोघी बहिणी यमूमावशी बहिणामावशी—त्यांचे वडील श्री.गणपत-राव लागू यांचे मरणानंतर—इकडेच येऊन राहिल्या. पण अशा अनेक तऱ्हेच्या जबाबदाऱ्या सौ. गौरकाकूसारख्या संसारदक्ष गृहिणीमुळें पार पाडल्या गेल्या.

अशा स्थितींत राजकीय जबाबदाऱ्या डोक्यावर असतांना हा संसार चालवितांना काकासाहेबांसारख्या कडक स्वभावाच्या सद्‌गृहस्थास त्रास होणें क्रमप्राप्तच होतें. अशा विविध ताणामुळें त्यांचा अगोदरच तापट असलेला स्वभाव एक तऱ्हेनें अत्यंत स्वयंनिष्ठ व दुसऱ्या तऱ्हेनें अतिशय स्फोटक झाला. ते जरूरीपेक्षां जास्त घरांत कोणाशीं बोलत नसत. घरीं त्यावेळच्या त्यांच्या कांहीं नित्य ठराविक चौकशा असत. कोणी आजारी पडलेसें वाटलें तर त्याला वैद्य, डॉक्टर यांचेकडे जाऊन औषध घे म्हणणें, शाळेच्या जरूरीचा कांहीं प्रश्न केला तर त्याचें उत्तर देणें व घरच्या महिनेमाल हिशेबाच्या वेळीं सौ. काकूंशीं कांहीं चर्चा करणें किंवा क्वचित् ती. आईनें अवांतर एखादा प्रश्न केला तर तेवढ्यापुरतें तिला उत्तर देणें ह्यापलीकडे कोणाशींही ते फारसें बोलत नसत. कुणी परका येऊन त्याच्या माडीवर गप्पा चालल्या असें क्वचितच घडत असे.

संसाराची अशी तंग परिस्थिति असतांही राष्ट्रसेवा हीच त्यांच्या त्यावेळच्या जीवनाची प्रमुख धून कशी होती याचें प्रत्यंतर यावेळीं सुरू केलेल्या " राष्ट्रमत " दैनिकाच्या हकीगतींत दिसणारें आहे. साताहिक केसरी जरी आपल्या पक्षाचा संदेश खेड्यापर्यंत पोहोंचवीत असे तरी त्याचा जास्त परिणाम होण्यास जितके पुनः पुनः लोकजागृतीचे विचार लोकांपुढें जातील तितका अधिक फायदा, अशा विचारानें लो. टिळक व राष्ट्रीय पक्षाच्या मंडळींनीं नॅशनल पब्लिशिंग कंपनी या नांवाची एक लाख रुपये भांडवलाची संस्था स्थापन केली व तिचे मार्फत मुंबईस "राष्ट्रमत" दैनिक सुरू केलें.

या राष्ट्रमत दैनिक सुरू करण्याच्या कामीं काकासाहेबांचे विशेष स्नेही,— सीतारामपंत दामले, गंगाधरराव देशपांडे, वीर वामनराव जोशी—वगैरे मंडळी प्रमुख होती. त्यांचे सांगली हायस्कुलांतील गुरु बापू सरदेसाई हे व्यवस्थापक होते. सीतारामपंत दामले पहिले संपादक झाले. दैनिकाची व्यवस्था मुंबईस उत्तम तऱ्हेनें केली गेली. नागपूरपासून कर्नाटकापर्यंत असलेले राष्ट्रीय पक्षांतील तरुण लेखक व कार्यकर्ते एकत्रित करण्यांत आले होते. लोकमान्य टिळकांच्या हातांनीं ' राष्ट्रमत ' हीं पाहिली अक्षरें जुळविण्याचा समारंभ करून मोठ्या धडाक्यानें दैनिक सुरू झालें.

या सुमारास लोकमान्यावर खटला झाला व दडपशाहीस ऊत आला. दैनिक चांगलें चालविलें जात असलें तरी पैशाची अडचण असे. लोकमान्यांनीं राष्ट्रमत दैनिकावर जबाबदारीनें नजर ठेवण्यास गंगाधरराव देशपांडे यांस सांगितलें होतें. पैशाची व्यवस्था करतांना दैनिकांतील कांहीं मंडळी काकासाहेबांकडे मदत मागण्यास आली. त्यावेळीं काकासाहेबांनीं जें वर्तन केलें तें त्यांच्या उच्च मनोवृत्तीचें व कर्तव्यतत्परतेचें द्योतक आहे. तसाच तो प्रसंग सौ. गौरकाकूंचा मोठेपणा दर्शविणारा आहे.

काकासाहेबांच्या सांपत्तिक स्थितीबद्दल यापूर्वी लिहिलेंच आहे. पण

मदतीबद्दल सूचना येतांच लगेच काका माडीवरून खालीं गेले व सौ. काकूकडून तिचे सोन्याचे दागिने एका फडक्यांत बांधून आणून ते त्यांनीं त्या आलेल्या मंडळीपुढें ठेवले व रोख रक्कम देण्यासंबंधांतील आपलें असमर्थत्व सांगून सौ. काकूनें ते दागिने स्वखुषीनें दिले आहेत ते घ्या असें काकासाहेबांनीं विनविलें. तें पाहून आलेली मंडळी आश्चर्यचकित झाली व दागिने न घेतां परत गेली.

पण काकासाहेबांच्या मनांत ही गोष्ट राहिली व पुढें राष्ट्रमताकडून ६०००रु. चा जामीन मागितल्यामुळें पत्र बंद झाल्यावर त्याच्या कर्जफेडीची जबाबदारी—आपल्या स्नेह्यांनीं काढलेलें तें पत्र असल्यानें—आपली आहे असें गंगाधरराव यांना सांगून कर्जफेडींत त्यांनीं अंशतः भाग घेतला. काकासाहेबांच्या सार्वजनिक जीवनांत अडचणीचे वेळीं सौ. काकू तत्परतेनें त्याच्या साथी उभी राहिली, असे आणखी प्रसंग यापुढील आयुष्यांत आले आहेत. पण त्या सर्वांत हा प्रसंग विशेष संस्मरणीय आहे.

### बंगाल्यांत बॉंबस्फोट

संसारीजीवनाप्रमाणेंच राजकीय वातावरणही सर्व तऱ्हेनें तंग स्थितींत असतां गंडस्योपरिपीटिकेप्रमाणें बंगालमध्यें १९०८ च्या मे महिन्यांत खुदीराम बोस व प्रफुल्लचंद्र चाकी यांनीं मिसेस केनेडी व त्यांची मुलगी यांचा बॉंब टाकून खून केला. या बॉंबमुळें सगळ्या जगाचें लक्ष हिंदुस्थानकडे वळलें. १८५७ नंतर इंग्लंडांत या बातमीइतका दुसऱ्या कोणत्याही गोष्टीनें घबराट उत्पन्न केला नव्हता. सरकारनें अक्राळविक्राळ स्वरूप प्रगट केलें. झडत्या आणि धरपकडीचें सत्र सुरू झालें.

‘ हिंदस्वराज्य ’, ‘ विहारी ’, ‘ अरुणोदय ’ यासारख्या अनेक पत्रांवर खटले होऊन संपादकांना पटापट शिक्षा होऊं लागल्या. नोकरशाहीनें भांबावून जाऊन असे आसुरी उपाय अमलांत आणणें वास्तविक योग्य

नव्हतें. बॉंब हा रोग नसून रोगाचें लक्षण होतें हें सरकारनें ध्यानांत घेतलें नाहीं व त्यामुळें हिंदुस्थानचा रोग उलट वाढेलच असा, दडपशाहीच्या वरवंट्याचा उपाय, अमलांत आणला.

पण प्रथम टिळकांनीं व नंतर काकासाहेबांनीं ५।७ लेख केसरीमध्यें लिहून ही गोष्ट सरकारच्या व जनतेच्या नजरेस धीटपणानें आणून हिंदुस्थानांत बॉंबचा प्रादुर्भाव होण्यास नोकरशाहीचा जुलमी कारभारच कसा कारणीभूत आहे तें निदर्शनास आणून दिलें. शिवरामपंत परांजपे यांनीं " हिंदुस्थानांत बॉंब येण्यास मूळ कारण इंग्रजच " अशा शीर्षकाखालीं लेख लिहिला. केसरीमध्यें "दुहेरी इषारा," "बॉंब गोळ्याचा खरा अर्थ" "हे उपाय टिकाऊ नव्हत," "बॉंब गोळ्यांचें" रहस्य वगैरे अत्यंत समर्पक व विविध उदाहरणांनीं युक्त असे लेख काकासाहेबांनीं लिहून बॉंबच्या घटनेची खरी जबाबदारी कोणावर आहे हें स्पष्ट केलें. याच लेख-मालेंत ता ९–६–१९०८ रोजीं त्यांनीं एक स्फुट सूचना केसरीमध्यें लिहिली. तींत वरील लेखांचा सारांश सुंदर रीतीनें पुढीलप्रमाणें दिला आहे.

" बोलूनचालून इंग्रजांचें राज्य परकीय राज्य आहे. बरें तेंही मोंगली राज्याप्रमाणें राज्यकर्त्यांनीं हिंदी समाजांत मिसळून जाऊन चालविलेलें नसून तें नेहमीं परकीप्रमाणेंच चालविणार. शिवाय नुसती राज्यसत्ता हातीं ठेवूनहि त्यांचें समाधान नाहीं तर या देशाचा व्यापार व उद्योगधंदेहि त्यांस बळकावयास किंवा बुडवायास हवेत. बरें इतकें करूनहि रयतेवरील करांचें ओझें हलकें ठेवावें, तर त्याचा उलटच प्रकार दिसून येतो ! सारांश, जुन्या पद्धतीचें कां होईना, स्वराज्य गेलें, कर्तृत्व लोपलें, व हिंमत खचली. नव्या पद्धतीचें शिक्षण नाहीं, हक्क नाहींत, लोकमतास मान नाहीं, सुबत्ता नाहीं, समाधान नाहीं.

दारिद्र्य, दुष्काळ व द्रव्यशोष या तीन 'द' काराचा दपटशा मागें लागलेला. यांतून राष्ट्राचें डोकें वर उचलण्याचा यथाशक्ति प्रयत्न करूं

लागलें कीं, इंग्रजी राज्यपद्धतीच्या वरवंट्यानें डोकें टेंचलेंच ! अशा स्थितींत हिन्दुस्थानांत आतां बॉंबपक्ष व गुप्तमंडळ्या उद्भवल्या, ही गोष्ट शोचनीय असली तरी बिलकुल आश्चर्याची नाहीं. उलट युरोपांतील कोण-च्याही देशांत अशी स्थिति झाली असती तर तेथील लोकांनीं हिंदी लोकांइतकी सहनशीलता व क्षमावृत्ति केव्हांही दाखविली नसती. सर्वांस सर्व गोष्टींपेक्षां जीव प्यारा असतो, हा न्याय सामान्यतः खरा आहे. पण धर्म, नीति, परोपकार, स्वाभिमान, कुटुंबाची व राष्ट्राची अब्रु, देशभक्ति इ. उच्च कल्पनांची किंमत प्राणाहूनहि अधिक आहे, असें व्यक्तीस वाटा-वयास लावणें, ही त्याच्या आत्मिक उन्नतीची साक्ष आहे.

या मनोवृत्तींचा उदय राष्ट्रांत होऊं लागला म्हणजे त्याबरोबरच या मनोवृत्तींच्या ओघासाठीं वाट करून देणें खऱ्या राज्यकर्त्यांचें कर्तव्य आहे. तें न करतां या मनोवृत्ति जेथें जेथें उद्भवतील तेथें तेथें त्या जुलमाच्या व जबरीच्या भारानें बुजवून टाकण्याचा अगर मोठे मोठे बांध घालून जेथल्या तेथें अडवून टाकण्याचा प्रयत्न झाला कीं, ह्या देशाचें—प्रजेचें व राज्य-कर्त्यांचें—दुर्दैव ओढवलें म्हणून समजावें. जगाच्या इतिहासानें प्रस्थापित केलेल्या या सिद्धांताकडे राज्यकर्त्यांनीं आजपर्यंत दुर्लक्ष केल्याचें फळ बंगाली बॉंबच्या रूपानें बाहेर पडलें आहे. ''

बॉंबगोळ्यांच्या प्रादुर्भावासंबंधींची ही स्पष्टोक्तिपूर्ण व सत्य कारण-मीमांसा अर्थातच सरकारास फार झोंबली असल्यास नवल नाहीं. कारण सत्य असलें तरी तें अप्रिय असेल तर तें कोण ऐकून घेतो ? त्यांतून परकी सरकार तर आपल्या जुलमाची सत्यबाजू बाहेर येऊं नये म्हणून डोळ्यांत तेल घालून धडपडणार ! प्रत्यक्ष बॉंबगोळे पडत असतां त्याचा वरील-प्रमाणें तात्त्विक दृष्टया अप्रत्यक्ष पाठपुरावा होत आहे असें वाटून सरकार चिडलें व त्याचें पर्यवसान लो. टिळक व काळकर्ते दे. भ. शिवरामपंत परांजपे यांचेवर राजद्रोहाचे खटले भरण्यांत झालें.

## लोकमान्यांना हद्दपारी

लो. टिळकांवर ज्या दोन लेखांबद्दल खटला झाला ते ता. १२ मे व ता. ९ जूनचे दोन लेख लो. टिळकांचे नसून ते काकासाहेब खाडिलकर यांच्या वरील लेखांपैकींच होते. लो. टिळकांवरील हा राजद्रोहाचा खटला हिंदुस्थानच्या इतिहासांत अत्यंत गाजलेला असून लोकमान्यांनीं केलेलें बचावाचें भाषण त्यांच्या विद्वत्तेची व वकिली कौशल्येची साक्ष देणारें आहे. या बचावाच्या कामीं व त्या वेळच्या इतर घडामोडींत श्री. काकासाहेब, श्री. वासुकाका जोशी वगैरे लोकमान्यांच्या निकटवर्तियांनीं अत्यंत परिश्रम घेतले. पण सरकारनें लो. टिळकांस कडक शिक्षा करणेचें ठरविलेंच होतें. त्याप्रमाणें त्यांना ६ वर्षें काळेपाण्याची शिक्षा व दंड करण्यांत आला व त्यांना ताबडतोब ब्रह्मदेशांत मंडालेच्या किल्ल्यांत पाठविण्यांत आलें.

या शिक्षेचा परिणाम श्री. काकासाहेब व इतर टिळकपक्षीयांवर अतिशय झाला हें सांगणें नकोच. टिळकांच्या शिक्षेनंतर मुंबईत दंगे झाले व सर्व देशांत अत्यंत प्रक्षुब्ध वातावरण उत्पन्न झालें. बंगाल्यांत क्रांतिकारकांच्या हालचाली वाढल्या. महाराष्ट्रांतही नाशिकच्या गुप्त कटासारख्या कांहीं क्रांतिकारक चळवळी उघडकीस आल्या. दे. भ. शिवरामपंत परांजपे व भालाकार भोपटकर यांनाही या सुमारास राजद्रोहाच्या शिक्षा झाल्या होत्या. त्याचाही परिणाम झाला.

या सर्व परिस्थितींतून मार्ग काढून लोकमान्यांचा केसरी व राजकीय चळवळ पुढें चालविण्याची जबाबदारी टिळकपक्षीयांवर होती. महाराष्ट्रांत केसरीनें जी क्रांतीची लाट उठवली त्याला मुख्यतः काकासाहेबांची लेखणीच कारणीभूत झाली. तेजस्वी लेख म्हणजे काय व प्रखर लेखणींतून उतरलेल्या लेखणीची धार किती तीक्ष्ण असते याचें प्रत्यंतर कोणास पहावयाचें असल्यास १८९६ सालीं काकासाहेब केसरींत आल्यापासून १९०८ सालीं राजद्रोहाचा दुसरा खटला होईतोंपर्यंत खाडिलकरांनीं केसरींत लिहि-

लेलें लिखाण कोणीही वाचावें. देशाच्या पारतंत्र्याची चीड लोकांमध्यें उत्पन्न करून त्यांच्या भावना उसळून सोडणेचें काम लो. टिळकांइतकेंच किंबहुना कित्येक वेळां लो. टिळकांपेक्षांही जास्त प्रखरतेनें खाडिलकरांनीं केलें आहे. खुद्द केळकरांनींच ही गोष्ट मान्य केली आहे.

श्री. काकासाहेब खाडिलकर व श्री. तात्यासाहेब केळकर या दोघांचे संबंधाबाबत खुद्द केळकर यांनीं लिहिलेल्या 'गतगोष्टी' या पुस्तकांत बराच ऊहापोह आहे. तो आपण सोडून देऊं; कारण काकासाहेब यांनीं ही अप्रिय चर्चा करण्याचें सतत टाळलें आहे. शेवटीं शेवटीं कांहीं खुलासे करण्यापलीकडे त्यांनीं उत्तर प्रत्युत्तर असें कधींच दिलें नाहीं. पण मुद्याची गोष्ट म्हणजे काकासाहेबांच्या लेखाबाबत केळकरांना जी कबुली द्यावी लागली, ती विशेष लक्षांत घेण्यासारखी आहे. 'गतगोष्टी' या पुस्तकांत त्यांनीं पुढीलप्रमाणें लिहिलें आहे—"कृष्णाजीपंत खाडिलकर यांचे कांहीं लेख टिळकांनाही मागें टाकण्याइतके तेजस्वी असत, व बाहेर लेख कोणाचा हें न कळल्यामुळें त्याबद्दल टिळकांना स्तुतीचा आहेर मिळे." काकासाहेबांची लेखणीची ही तेजस्विता लोकांनाच प्रिय होती असें नाहीं तर ती खुद्द लोकमान्यांनाही प्रिय होती. व ज्या ज्या वेळीं, केसरी कोणी लिहावा, असा प्रश्न उत्पन्न झाला त्या प्रत्येक वेळीं केसरी मुख्यतः खाडिलकरांनींच लिहावा हा आग्रह लो. टिळकांनीं कधींही सोडला नाहीं. जनतेच्या उद्धाराचें लढाऊ राजकारण काकासाहेबांसारख्यांची तरवारीसारखी प्रखर लेखणीच जिंकेल असा विश्वास ह्या धामधुमीच्या काळांतील आपल्या प्रभावी लेखनानें त्यांनीं सर्वांनाच आणून दिला होता.



## : ७ :

# संकटांशीं झुंज !



विघ्नैः पुनः पुनरपि प्रतिहन्यमानाः ।
प्रारब्धमुत्तमजनाः न परित्यजन्ति ॥

—भर्तृहरि.

सन १९०८ च्या लोकमान्यांच्या कारावासानंतर केसरीचें संपादकत्व काकासाहेबांकडे आलें व त्याच वर्षाच्या आक्टोबर महिन्यांत इंग्रजी मराठ्याचेही ते संपादक झाले. लोकमान्य नसतांना व सरकारी दडपशाही जोरावर असतांना केसरीमार्फत नित्याचें लोकजागृतीचें व देशोद्धाराचें कार्य पूर्वीइतक्याच तेजस्वी व ओजस्वी रीतीनें करण्याचें काकासाहेबांनीं सुरू ठेवलें.

लोकमान्यांना झालेल्या शिक्षेनंतर लागलीच लिहिलेल्या केसरीच्या लेखांत "या खटल्यांतील रा. टिळक यांचे वर्तनांत त्यांच्या तीस वर्षांच्या

चरित्राचें सार आलें आहे ” असें लिहिलें आहे. तसेंच या खटल्याचे कामीं लोकमान्यांनीं मनाचा समतोलपणा किंवा कर्मयोग दाखविला. राष्ट्रीय पक्षाच्या सिद्धांतावर व कर्मावर त्यांची पूर्णभक्ति असल्यामुळें, ह्या पक्षांतील लोक सोसत आलेल्या व पुढें सोसणाऱ्या हालअपेष्टांतूनच या पक्षाची कार्यसिद्धि परमेश्वर घडवून आणणार आहे असें त्यांचें मत होतें, असें प्रतिपादन करून, महाराष्ट्राच्याच नव्हे तर सर्व हिंदुस्थानच्या राष्ट्रीय पक्षाचे ते पुढारी ज्या बुद्धीच्या व मनाच्या सद्गुणावर झाले, ते सर्व गुण या खटल्यामुळें सर्वांपुढें विशेष करून आले असल्यानें त्यांच्या हद्दपारीच्या काळांत, राष्ट्रीय पक्ष या सत्कर्मापासून तिळभरही पराङ्मुख होणार नाहीं, अशी सूचक अपेक्षा त्यांनीं प्रदर्शित केली.

सुरत कॉंग्रेसच्या फाटाफुटीनंतर राष्ट्रीय पक्षाचे पुढील धोरणाचा आराखडा निश्चित होत असतांनाच लोकमान्यांच्या हद्दपारीनें, फार जबरदस्त धक्का राष्ट्रीय पक्षास बसला होता. मोर्लेमिंटो सुधारणांचें आमिष टाकून, नेमस्त पक्षावर त्याचा कितपत परिणाम होतो हें सरकार पहात होतें. नेमस्त पक्षांतही याबाबत मतभेद चालू होते. या सर्व परिस्थितीचें काळजीपूर्वक निरीक्षण करून राष्ट्रिय पक्षास केसरीमार्फत त्यावेळीं त्यांनीं उत्कृष्ट मार्गदर्शन केलें.

लोकमान्यांना न्यायमूर्ति दावर यांनीं क्रूरपणाचीं ६ वर्षें काळेपाण्याचीं शिक्षा दिली, यामुळें सर्व हिंदुस्थानांत प्रचंड खळबळ उडाली. सर्वत्र माणसें हळहळत होतीं. रात्रीं उशीरापर्यंत खटला चालवून ठोकलेली शिक्षा व त्यानंतर त्यांना अज्ञात स्थळीं नेणें यामुळें लोकमान्यांनीं लोकांच्या हृदयांत अधिक खोल असें जिव्हाळ्याचें स्थान प्राप्त करून घेतलें व त्यांनीं ज्या मातृभूमीच्या कार्यार्थ ह्या देहदंडाचा धैर्यानें अंगीकार केला तिची त्यांनीं प्रतिपादलेल्या मार्गांनीं सेवा करण्याचें व्रत अनेकांनीं घेतलें. हीच आशा लोकमान्यांना तुरुंगांत जातांना मनाला समाधान देत होती. शिक्षा

सांगण्यापूर्वी न्या. दावर यांनीं आपणास कांहीं सांगण्याचें आहे काय असा प्रश्न विचारतांच काकासाहेबांनीं केसरींत लिहिल्याप्रमाणें,

"लोकमान्यांनीं दिलेलें उत्तर दैवी स्फूर्तीचें होतें ... तें सर्व राष्ट्रीय पक्षाकरितां होतें; हिंदुस्थानचें एक राष्ट्र होऊन राष्ट्रीयत्वाच्या सौभाग्यानें हा हत देश उज्ज्वलित दिसावा, म्हणून मनापासून खटपट करणाऱ्या सर्व देशभक्तांसाठीं होतें; कोणत्याही मार्गानें वा पंथानें जाणारे असोत पण अखेर देशोन्नतीकरितां आमची तपश्चर्या खर्च होवो अशी इच्छा करणाऱ्या सर्व हिंदी लोकांकरितां ते उद्गार होते. रा. टिळक म्हणतात देशोद्धाराच्या इतिहासांत कांहीं कांहीं अशा वेळा असतात कीं, देह कष्टविल्यानें व देहाला तीव्र दुःखें सोसण्याचा प्रसंग आल्यानें त्या कष्टामुळेंच वा त्या दुःखामुळेंच देशोन्नतीचें काम अधिक जलद घडून येतें, आणि सांप्रतची वेळ अशीच एक असल्यानें मला दोषी ठरविण्याची बुद्धि परमेश्वरानें ज्यूरीला दिली."

लोकमान्यांच्या उद्गारांचें वरील रहस्य काकासाहेबांनीं केसरीच्या द्वारां अखिल जनतेस सांगितलें. पण तें सांगण्याच्या अगोदर त्यांच्या स्वतःच्या हृदयांत तें खोलपर्यंत पोंचलें होतें. काकासाहेब देशभक्त तितकेच ते लोकमान्यांचे परमभक्त होते. आपल्या गुरूंना सहा वर्षें काळेपाण्याचे भयंकर हाल सोसावे लागणार हे विचार मनांत येऊन त्यांचें भावनावश मन विव्हल झाल्यास नवल नाहीं. त्यांतही आपल्या लेखांमुळें त्यांच्यावर ही आपत्ति आली ही आंतरिक टोंच त्यांचें हृदय विद्ध करीत होती.

## शिवरामपंतांची सुटका

लोकमान्यांच्या बरोबरच शिक्षा झालेले काकासाहेबांचे परम स्नेही प्रो. शिवरामपंत परांजपे कांहीं दिवसांनंतर १९०९ च्या ऑक्टोबरमध्यें

सुटले. त्यावेळीं त्यांना फार आनंद झाला. त्यांचे स्वागतार्थ गंगाधरराव प्रभृति राष्ट्रीय पक्षाच्या मंडळीसमवेत ते मुंबईस गेले होते. अहमदाबादची गाडी मुंबईयर येतांच त्यांना उतरून घेऊन काकासाहेबांनीं त्यांना घोडागाडींत बसविलें व तेथून त्यांची मिरवणूक काढण्यांत आली. शांतारामाचे चाळींतील राष्ट्रमत कचेरींत त्यांचा सन्मान करण्यांत आला त्यावेळीं काकासाहेबांनीं भाषण केलें. पुण्यास आल्यावर त्यांचा जाहीर सन्मान किर्लोस्कर थिएटरांत करण्याचें ठरलें. पण त्यावेळचे डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेट मि. स्विफ्ट यांनीं पोलीस ॲक्टाखालीं नोटीस काढून या सन्मान-सभेस बंदी केली.

पोलीस ॲक्टाच्या बेचाळीसाव्या कलमाच्या या दुरुपयोगाविरुद्ध काका-साहेबांनीं जो टीकालेख लिहिला त्यांत दे. भ. शिवरामपंतासारख्या स्नेही देशभक्ताबद्दलचा आदर तर स्पष्ट होतोच पण त्याहीपेक्षां लोकांचें वाढतें प्रेम व श्रद्धा मिळविणारे शिवरामपंतांचे समव्यवसायी देशसेवक या नात्यानें —स्वतः काकासाहेब—यांची भूमिकाही स्पष्ट होते. या विषयावरील ता. १२ आक्टोबरमधील लेखांत काकासाहेबांनीं दे. भ. शिवरामपंतांसारख्यांच्या सन्मानाचें मूळ कोठें आहे हें बरोबर न समजल्यामुळें असले दडपशाहीचे हुकूम सोडण्यांत येतात असें प्रतिपादन करून, लोकांचीं मनें विद्वान् देशभक्ताकडे कोणत्या कारणानें आकर्षित होत असतात याचें पुढीलप्रमाणें विवरण काकासाहेबांनीं केलें आहे:—

“ अधिकाऱ्यांनीं लक्ष्मी आमच्या बाजूची आहे म्हणून दिमाख दाखवि-विण्यांत कांहीं अर्थ नाहीं. लोकांच्या मनावर एकट्या लक्ष्मीचा अम्मल केव्हांही बसत नाहीं, तर ‘लक्ष्मी’ आणि ‘ सरस्वती ’ ह्या दोघींनीं मिळून समाजाचीं मनें आकर्षण करून ठेवलेलीं असतात. संपत्ति, दर्जा, मान-मरातब इत्यादि मार्गांनीं ‘लक्ष्मी’चा अम्मल बसतो, आणि विद्वत्ताप्रचुर ग्रंथ व प्रतिभासंपन्न लेख यांच्याद्वारें सरस्वतीचा अम्मल बसत असतो. आपल्या

विद्वत्तेनें व प्रतिभेनें लोकांचीं मनें आकर्षण करून घेणारे लेखक लक्ष्मीच्या हुकुमानें निर्माण होत नसतात. सरस्वतीच्या प्रभावाचा हा टापू परमेश्वरानें राजेलोकांचे हातीं ठेवला नसून असले लेखक त्याच्याच प्रसादानें निर्माण होतात, त्याच्या कृपाछत्राखालीं वाढतात व त्याच्याच आज्ञेनें अंगीकृत कार्य शेवटास नेतात. निःशस्त्र, दुबळे, आपापसांत भांडणारे व जुटीच्या शिस्तीला पारखे झालेले असे जेव्हां प्रजाजन असतात तेव्हां त्यांच्या उद्धाराचें काम परमेश्वर प्रथमतः आपल्या प्रतिभासंपन्न अतएव लाडक्या लेखकांच्या मार्फत करीत असतो.

ज्या लेखकांच्या प्रतिभासंपन्न लेखांनीं राष्ट्रीय पक्षास एवढें महत्त्व प्राप्त झालें आहे त्या लेखकाच्या मालेंत दे. परांजपे यांनीं महत्त्वाचें स्थान आपल्या दहा वर्षांच्या लोकसेवेनें संपादलें आहे. दे. परांजपे हे मराठी भाषेंतील एक प्रकारच्या चटकदार भाषापद्धतीचे प्रवर्तक असून परमेश्वरानें त्यांच्या हवाली केलेली मराठी भाषेवरील ही एक प्रकारची सत्ता मोठ्या प्रेमानें, कळकळीनें व एकनिष्ठेनें गेलीं दहा वर्षें राष्ट्रीय पक्षाच्या चरणीं त्यांनीं वाहिली आहे. सव्वा वर्ष कारागृहवास सोसून, कारागृहांतील एकांतवासांत, तूं दिलेली सत्ता तुझ्याच कार्याकरितां मीं खर्च केली अशी वर्दी परमेश्वराच्या पायापाशीं ह्या सव्वा वर्षांचे सुटीच्या काळांत स्वतः पोंचवून दे. परांजपे परत आले असतांना त्याच्या देशसेवेबद्दल लोकांना प्रेम व आदर कां वाटूं नये?"

काकासाहेबांचे हे उद्गार उद्बोधक आहेत. देशसेवा हे परमेश्वरीकार्य आहे अशी त्यांची भावना होती. ती त्यागवृत्तीनें ईशचरणीं वाहावयाची हा त्यांचा धर्म होता.

## नाट्यलेखन

लोकजागृतीचें हें कार्य साधण्यासाठीं ज्या गोष्टी ते वर्तमानपत्रांत विस्तरशः लिहून लोकांपुढें मांडीत त्याच त्यांच्या कलामय हृदयांत नाट्य-

रूपानें उभ्या रहात असत व त्यांचें मननशील व अभ्यासू मन रंगवून सोडीत असत. दैनंदिन, राजकीय वा व्यावहारिक घटना त्यांच्या हृदय-पटावर जिवंत पात्रांचें रूप घेऊन आपल्या वागणुकीचीं रहस्यें त्यांना प्रभावी रीतीनें उकलून दाखवीत असत. यामुळें त्यांच्या वर्तमानपत्रांतील लिखाणावरही नाट्याची उठावदार छाया नेहमींच असे. वाचकांचें हृदय ते एकदम काबीज करीत यांतील मर्म या गोष्टींत आहे. तथापि प्रत्यक्ष नाटकें लिहूनही त्यांनीं या काळांत आपल्या हृदयांतील खळबळ जनतेपुढें मांडली व त्यांचीं मनें कार्योन्मुख केलीं.

काकासाहेबांसारखे प्रथितयश नाटककार आपलीं नाटकें कशीं लिहीत असत याचें औत्सुक्य वाचकांना असणें साहजिक आहे. म्हणून कांहीं गोष्टींचा साहजिक उल्लेख या प्रसंगानें करीत आहे. पहिली गोष्ट त्यांच्या साधनसामग्रीच्या साधेपणाची ! श्री. भाऊसाहेब गोखले यांचें घरीं बिऱ्हाड असतांना काकासाहेबांचे माडींत एका जाजमावर त्यांची गुंडाळलेली झोपण्याच्या गादीची वळकटी व जवळच कोपऱ्यांत असलेली एक इझिचेअर यापेक्षां खुर्ची, टेबल वगैरे कांहींहीं सामान नसे. काकासाहेब जरुरीचें एकादें पुस्तक पाहात बसलेले क्वचित् दिसले तरी विचारांत फेऱ्या मारत रहाणें हीच त्यांची दृश्य पूर्वतयारी असे. ही पूर्वतयारी झाली म्हणजे ते कांहीं वह्या व दोन शिसपेनी आणवीत व एका चाकूनें त्या दोन शिसपेनी करून गुंडाळलेल्या वळकटीजवळ बसून त्या वळकटीवर वही टेकून लिहूं लागत. शिसपेन वेळेला केलेली नसली किंवा वेळेला चाकू जवळ नसला तर ते रागावत असत, व आम्हां सर्वांची त्यावेळीं धांवपळ होत असे. कीचकवध व त्यानंतर लिहिलेलीं सर्व नाटकें लिहितांना आम्हीं पाहिलेलीं आहेत. भाऊसाहेब गोखल्यांच्या वाड्यांतून आळवण्यांच्या वाड्यांत बिऱ्हाड बदलल्यावर खुर्च्या, टेबल वगैरे सरंजाम जास्त झाला तरी काकासाहेबांच्या विचार करण्याच्या व लिहिण्याच्या पद्धतींत फारसा फरक झाला नाहीं.

त्यांच्या लिहिण्याच्या पद्धतीवरून असें दिसून येई कीं, सर्व प्रवेशासह संपूर्ण नाटक त्यांच्या मनश्चक्षूंपुढें पूर्ण तयार झालें म्हणजेच ते लिहिण्यास बसत. कांहीं नाटकाच्या सुरवातीपूर्वी विचार करण्यांत बराच वेळ गेला असें आम्हांस आठवतें. परंतु नाटक लिहिण्यास सुरवात झाल्यानंतर मध्यंतरीं विचाराकरितां त्यांना पुन्हां वेळ लागला असें कधींच घडलें नाहीं. एकदां लिहिलेला मजकूर ते साधारणतः खोडीत नसत. काकासाहेबांचा आणखी एक विशेष त्यांच्या लिहिण्यांत दिसत असे. तो म्हणजे तें नाटक प्रत्यक्ष रंगभूमीवर होत आहे अशा जाणिवेनें वाक्यरचना लिहिली जात असे. प्रयोगाकरितां फरक काकासाहेबांच्या नाटकांत केला गेलेला आमचे आठवणींत तरी नाहीं. काकासाहेबांना 'नाट्याचार्य' असें सार्थ म्हटलें जाण्याच्या अनेक कारणांपैकीं, नाटक हें दृश्यकाव्य आहे व रंगभूमीवर होणारा परिणाम हाच नाट्याचा मुख्य निकष आहे ही जाणीव त्यांचे नाटकांत विशेषत्वानें दिसते, हें कारण अत्यंत महत्त्वाचें आहे. ही पद्धतशीर लिखाई ते इतक्या सहज लीलेनें करीत कीं, नाट्यगुण त्यांच्या अंगीं परिपूर्ण भरला आहे असेंच कोणासही वाटेल. कीचकवध नाटकाचीच गोष्ट उदाहरणार्थ सांगतां येईल. या नाटकांतील पांचव्या अंकाचा पहिला प्रवेश प्रथम नव्हता. त्या प्रवेशांत कंक भट भीमास कीचकवधाची परवानगी देतो असा भाग आहे. नेपथ्याच्या सोयीसाठीं एका प्रवेशाची जरूरी आहे असें दिसून आल्यामुळें फक्त १५ मिनिटांत तो प्रवेश काकासाहेबांनीं तोंडीं सांगून लिहवून घेतला व तो इतका उत्कृष्ट वठला कीं, या नाटकांतील हा प्रवेश टाळ्या घेतल्याशिवाय रहात नसे.

१९०७ च्या मे महिन्यांतच काकासाहेबांचें 'बायकांचें बंड' हें नाटक रंगभूमीवर आलें व तेंही फार यशस्वी झालें. हीं दोन प्रमुख व हातखंडा नाटकें घेऊन कंपनी बाहेर गांवीं गेली. सर्व ठिकाणीं कीचकवधानें लोकांना वेडे करून सोडलें. भागवत आपल्या कीचकाच्या भूमिकेनें जनतेच्या प्रेमाचे व कौतुकाभिमानाचे विषय होऊन राहिले.

यानंतर १९०९ सालीं काकासाहेबांनीं महाराष्ट्र कंपनीसाठीं भाऊबंदकी हें नाटक लिहिलें. या नाटकाची प्रेरणा १९०७ च्या सुरत काँग्रेसवरून काकासाहेबांना झाली. लोकमान्यांचेवर राजद्रोहाचा खटला झाला त्यावेळीं तें नाटक लिहिलें जात होतें. पण बसविण्यास वेळ मिळाला नव्हता. पुढें लोकमान्यांच्या न्यायकोर्टातील धीरोदात्त बचावाची घटना रामशास्त्री यांच्या स्वभावपरिपोषार्थ पुढें ठेवून काकासाहेबांनीं नाटक पुरें करून तें कंपनीकडे दिलें. हें नाटक श्री. भागवतांनींच पूर्णपणें बसवून घेतलें. त्यांची नाटयदृष्टि अमोघ होती. रामशास्त्री यांचें पात्र हुबेहूब टिळकासारखें दिसावें म्हणून त्यांचेकडून फार परिश्रम घेण्यांत आले. सोलापूर मुक्कामीं काकासाहेब पहिल्या प्रयोगास उपस्थित होते. भागवतांचें राघोबादादांचें, माधवरावांचें आनंदीबाईचें, रामशास्त्र्यांचें त्रिंबकराव प्रधानांचें, कारखाननीसांचें सखारामबापूंचें, यशवंतराव टिपनीसांचें नाना फडणिसांचें, वगैरे कामें व नाटकाची एकंदर उठावणी पाहून ते स्वतःच थक्क होऊन गेले. "या नाटकाचें मर्म भागवतांना चांगलें समजलें आहे, त्यांनीं नाटकांतल्या सर्व खांचाखोचा अधिकच स्पष्ट केल्या आहेत," असे उद्गार काकासाहेबांनीं मुक्तकंठानें काढले. हें नाटक फारच लोकप्रिय होऊन उत्पन्नाचा सरासरी आंकडा रु. ६५० च्या वर जाऊ लागला.

कीचकवधानंतर लोकजागृतीच्या कामाला भाऊबंदकी नाटकानें फार जोर आणला. या दोन नाटकांच्या निर्मितीनें तरुण पिढीच्या मनाला काकासाहेबांनीं निराळेंच वळण लावलें. अर्थातच सरकारची वक्रदृष्टि 'कीचक-वध' नाटकाकडे थोडक्याच दिवसांत वळूं लागली. कीचक वधाचें पौराणिक कथानक काकासाहेबांनीं अत्यंत कौशल्यानें पारदर्शक केलें होतें. कोणाही हिंद पुत्रास या कथानकांतून कर्झनशहांचा हिंदमातेवरील जुलूम स्पष्ट दिसत असे. तथापि महाभारताच्या मूळ कथेस त्यांनीं मुळींच सोडलें नव्हतें. या नाटकावर येऊं पहाणारें सरकारी गंडांतर चुकावें म्हणून कंपनीनें

पोलीस प्रमुख व्हिन्सेंटसाहेब यांसच एका प्रसंगीं अध्यक्ष करून त्यांच्या पुढें हा खेळ करून दाखविला. त्यांना मराठी उत्तम येतच होतें. पौराणिक गोष्टींची माहिती घेत घेत त्यांनीं नाटक पाहिलें व अत्यंत खूष होऊन त्यांनीं भागवतादिकांची अपूर्व अभिनय कौशल्याबद्दल पाठ थोपटली. द्रौपदीसारख्या पतिव्रतेचें मूलत: लोकप्रिय कथानक व भागवतांचा उत्कृष्ट अभिनय यामुळेंच कीचकवधानें लोकांना येवढें मोहित केलें आहे असा सोधा अभिप्राय या साहेबांनीं सरकारकडे लिहून पाठविला.

अशा कांहीं युक्त्यांनीं या नाटकावरचें सरकारी गंडांतर जरा लांब ठेवण्यांत येत होतें तथापि पुढें जॅक्सन खुनाचा प्रसंग साधून किंकेड-साहेबांनीं लंडन टाइम्समध्यें लेख लिहून या नाटकाची फार स्तुति केली, पण ते राजद्रोही असल्याचेंही त्यांत नमूद केलें.

## नाटकावरील बंदी

नाशिक येथें जॅक्सनसाहेबांचा खून झाला व पुन्हां सरकारी वरवंट्यास सुरवात झाली. सयाजीरावमहाराजांना पुण्याच्या मुक्कामांतील कीचकवध फारच आवडलें होतें म्हणून त्यांच्या आमंत्रणावरून यावेळीं कंपनी बडोद्यास गेली होती. तेथे जाऊन एक दोन खेळ लागतात न लागतात तोंच फेब्रुवारी १९१० मध्यें सरकारी प्रेस नोट प्रसिद्ध होऊन अनेक पुस्तकांस बंदी करण्यांत आली त्यांत कीचकवधाचें नांव पहिलें होतें!

भाऊबंदकीबद्दलही असेंच वादळ उठलें. ज्ञानप्रकाशकारांनीं केलेल्या या नाटकावरील टीकेवरून कलेक्टरनें नाटकास तें सुरू असतां बंदी केली. पण प्रो. भाटे, प्रो. भानू व वासुदेवराव गुते वगैरेंच्या मध्यस्थीनें व ज्ञान-प्रकाशकारांनीं आपल्या टीकेचा अर्थ सरकारास नीट विशद करून सांगितल्यानें नाटकास पुन्हां परवानगी मिळाली.

जॅक्सन खुनाचा संबंध कोठेंना कोठें जोडण्याचा प्रयत्न सरकारचा चालू होताच. काकासाहेबांचें नांव केसरीकार या नात्यानेंही सरकारच्या

काळया यादींत होते. त्यांच्यामागें गुप्त पोलीसांचा भुंगा सुरू झाला. इतकेंच काय पण सांगलीस त्यांचे बंधु हरिपंततात्या 'गणपती मॅनेजर' होते त्यांनाही त्रास पोहोंचला. त्यांची बदली दूरचे शिरहट्टी तालुक्यांत मामलेदार म्हणून करण्यांत आली होती. तेथून त्यांना पुढें अनेक वर्षे सांगलीस बदललें नाहीं.

अशा धूसर वातावरणांतही नित्याप्रमाणें काकासाहेबांचें केसरीचें काम निधडेपणानें चालू होतें. मद्रासचे लिबरल कन्व्हेंशन, नागपूरची राष्ट्रीय सभा, मध्यंतरींचे गणेशोत्सव अशा सर्व प्रसंगीं लोकपक्षाला धडाडीचें मार्गदर्शन त्यांच्याकडून केसरीमार्फत मिळत होतें. ता. २१ डिसेंबर १९०९ चे केसरीतील 'एक वर्षांत पारडें फिरलें' या लेखांत एकंदर राजकारणाचा त्यांनीं आढावा घेतला व राष्ट्रीय पक्षाचें राजकारण कशा रीतीनें यशाला जाणार याचें सूचक भविष्य त्यांनीं पुढीलप्रमाणें केलें:—

"सारांश, १९०८ च्या डिसेंबरापासून १९०९ चा डिसेंबर संपण्यापूर्वीच मोर्ले साहेबांचे झेंड्याभोंवतीं सुरू झालेलें मवाळांचें नृत्य-गायन थांबलें. सुधारणांचें अभिनंदन करून त्याबद्दल जाहीर रीतीनें हर्ष मानण्यांत आणि राष्ट्रीय सभेंत सुलतानी चालविण्याचे कामांत अग्रगण्य व अत्यंत मानी अशा सर फेरोजशहा मेथासही मागें पाऊल घेऊन राजीनामा द्यावा लागून, त्याबद्दल आपल्या अनुयायांचा उघड वा गुप्त धिक्कार सहन करावा लागत आहे; हा राष्ट्रीय पक्षाचा विजयारंभच आहे असें सर्व समंजस व विचारी लोकांस वाटेल यांत शंका नाहीं.

एका वर्षांत मवाळ पक्षाच्या राष्ट्रीयाकडे झुकूं लागलेल्या या पारड्याची गति पुरी होण्यास आतां एकच गोष्ट व्हावयाची राहिली आहे; ती अशी कीं, मोर्ले साहेबांच्या देणग्यांचें गांठोडें आपल्या डोईवरून इकडे आणणारे ना. गोखले यांनीं तें खालीं झुगारून देऊन मोर्ले साहेबांस सीझरप्रमाणें 'तूं सुद्धां गोखले' (Thou too Brutus) म्हणावयास लावलें, आणि यंदा नाहीं तर पुढील सालीं तरी संयुक्त कॉंग्रेस भरून कलकत्याचे चार

ठराव पास झाले, किंबहुना बॅ. गांधी यांनीं कॉंग्रेसला पाठविलेल्या निरोपांत सुचविल्याप्रमाणें, हिंदुस्थानांतील कायदेशीर राजकीय चळवळ शरीरबलापेक्षां आत्मबलावर अवलंबून असलेल्या व हिंदुस्थानच्या राष्ट्रीय शीलास अनुरूप अशा अप्रत्यक्ष प्रतिकाराच्या अटळ पायावर प्रत्यक्ष व कृतींत नेऊन ठेवली, म्हणजे सुरत येथील बखेडा व मारामारी यापासूनही एक मोठेंच देशकार्य झालें असें ठरेल."

काकासाहेबांचें हें सूचक भविष्य पुढें कांहीं वर्षांनंतर कां होईना अखेर राष्ट्रीय पक्षाचा कॉंग्रेसमध्यें पुनः प्रवेश होऊन व शेवटीं महात्मा गांधींच्या तत्त्वज्ञानावर राजकीय चळवळ यशाला जाऊन खरें झालें. काकासाहेबांच्या अभ्यासू राजकारणी दृष्टीचें हें द्योतकच आहे असें कोणीही कबूल करील. राजकारणांतील काकासाहेबांची अभ्यासू दूरदृष्टि यावरून उत्तम प्रतीत होते.

**केसरी सुटला !**

या गुणावर व आपल्या तेजस्वी लेखनशैलीच्या जोरावर त्यांनीं केसरीचा लौकिक वाढविला. आपल्या बुद्धिकौशल्यानें त्यास नटविलें सजविलें, त्यांत विविध दालनें निर्माण केलीं व त्यास वृत्तपत्रजगतामध्यें अत्यंत उच्च असा दर्जा प्राप्त करून दिला. या केसरीपत्राच्या द्वारें त्यांनींच महाराष्ट्रीय जनतेचीं मनें कार्योन्मुख केलीं व लोकमान्य टिळकांचे सहकारी हें नांव यथार्थ केलें. लोकमान्य कारावासांत गेले तरी त्यानंतरच्या दीड वर्षाभराच्या काळांत केसरी व मराठा या दोनही वृत्तपत्रांचे संपादक या नात्यानें त्यांचें कार्य उत्तम रीतीनें चाललें होतें.

पण श्री. केळकरादि मंडळींचा विचार निराळा झाला. त्या वेळीं अशी एक बातमी पसरली होती कीं नेपाळ प्रकरणांमुळें खाडिलकरांच्यावर सरकारची करडी नजर आहे. यांतच नाशिक येथें जॅक्सनचा खून झाला. अशा स्थितींत केसरीचे संपादक खाडिलकर राहिले तर केसरीला धोका येण्याचा संभव

असें व्यवस्थापकांचें म्हणणें. हें म्हणणें योग्य नव्हतें, तरी पण केळकर, विध्वंस प्रभृतींनीं अशी तक्रार मंडालेस लोकमान्यांकडे केली. या वेळीं काकासाहेबांनीं आपली बाजू जी मांडली ती अलीकडे त्यांनींच प्रसिद्ध केली आहे. त्यांच्या म्हणण्याचा आशय असा कीं, 'सरकारची करडी नजर आहे हें कारण खरें मानलें तरी अशा वेळीं तुम्ही मला केसरी सोडावयास लावून उघडा करतां आहां. त्यांत ऑफिसला मोठेपणा नाहीं व मलाही संरक्षण नाहीं."

केसरीला 'केसरीपण' ज्यामुळें मिळाले व टिळकांना लोकमान्य'त्व' ज्या निर्भयवृत्तीमुळें प्राप्त झालें त्या 'त्व' लाच 'स्व'रक्षणासाठीं दूर सारण्याचा हा प्रकार होता. केसरीपत्रानें संपादक बदलण्यासारखा फरक केवळ भीतीमुळें करावा, हें केसरी या नांवाला शोभेसें नव्हतें; तथापि कोणत्याही स्थितींत आपल्यामुळें केसरीवर संकट येऊं नये अशीच काकासाहेबांची इच्छा होती, व प्रसंगानें योग्य मार्ग काढण्याची त्यांच्या मनाची तयारी होती. पण श्री. केळकरांना तितका धीर निघाला नाहीं. वर्ष संपतांच त्यांनीं आपल्या नांवानें केसरीचें डिक्लेरेशन करून टाकलें. ही गोष्ट काकासाहेब केसरीचीं प्रुफें वाचीत असतां त्यांच्या लक्षांत आली. असल्या अयोग्य कारवाईचा काकासाहेबांसारख्या मानी माणसास अत्यंत संताप यावा हें साहजिक आहे. ते हातीं असलेलीं प्रुफें फेंकून देऊन केसरी ऑफिसांतून तडक जे बाहेर पडले ते पुन्हां लोकमान्य मंडालेहून परत येईपर्यंत तिकडे गेले नाहींत. आपल्या हक्काचें स्थान सोडून देण्यांत काकासाहेबांनीं दाखविलेली उच्च त्यागवृत्ति अनन्यसाधारण असल्यामुळें ते जनतेच्या आदरास अधिकच पात्र झाले.

काकासाहेब केसरींतून बाहेर आले ही गोष्ट साधी नव्हती. त्यांच्या जीवनांतील क्रांतीचाच हा एक प्रसंग होता. काकासाहेब उत्कट भावनांचे जसे प्रतीक होते तसेच अत्यंत खोल विचार करून आपल्या जीवनाची

दिशा ठरविणारे होते. आजपर्यंतच्या त्यांच्या सार्वजनिक आयुष्याला त्यांनीं जी घडण दिली होती ती खोल विचाराच्या स्थिर पायावरचीच होती. एल्एल्. बीचा अभ्यास सोडून आपल्या वडील बंधूंच्या संमतीचीही वाट न पाहतां जेव्हां त्यांनीं लोकमान्य टिळकांच्या केसरीस मदत करण्यास सुरवात केली तेव्हांच त्यांनीं आपणास राष्ट्रसेवेस वाहून घेतलें होतें. अशा स्थितींत लोकमान्य तुरुंगांत असतां केसरीचें आसन त्यांचे पायाखालून अचानकपणें जरी काढून घेण्याची कारवाई करण्यांत आली तरी 'पुढें काय?' हा प्रश्न त्यांच्या पुढें उभा राहिला नाहीं. आपल्या शक्तीप्रमाणे 'देशसेवा हेंच ध्येय' त्यांच्या पुढें ठरलेलें होतें.

काकासाहेब केसरींतून तडक बाहेर पडले या बातमीनें सर्वांस आश्चर्य वाटलें व आतां खाडिलकर पुढें काय करणार याबद्दल सर्वत्र कुतूहल पसरलें. नित्याप्रमाणें ते कवडेशास्त्री यांचे दवाखान्यातील बैठकांत येतील कीं नाहीं अशीही शंका त्यांच्या मित्रमंडळींना आली. पण ते ठरल्याप्रमाणें अत्यंत शांत मनःस्थितींत तेथें आले व झाल्या गोष्टीबद्दल अजीबात अवाक्षरही न काढतां नित्याप्रमाणें परतही गेले. त्यांच्या दिनक्रमांत वरील घटनेमुळें कोणताही फरक पडला नाहीं.

अशा रीतीनें देशभक्तांच्या कर्तव्यपूर्तीचें व उपजीविकेचें साधनच नाहींसें करून त्यांना हतबल करावयाचें असा सिडेनहॅम साहेबांच्या नोकरशाहीचा डाव अप्रत्यक्ष साधणार कीं काय असें इतरांना वाटत होतें. भाऊबंदकी नाटकही बंद पडावें असे उद्योग सुरू झाले होते. किर्लोस्कर कंपनीच्या मागें नाशिकांत कंपनीचें नाटक चालू होण्याचेवेळीं नाटक-गृहांतच जॅक्सनचा खून झाल्यामुळें गुप्त पोलिसांची बरीच जिकीर सुरू झाली होती. वर्तमानपत्र हातीं नाहीं, तसेंच नाटक अगर नाटककंपन्या यांच्यावरही कदाचित् उपजीविकेसाठीं अवलंबून राहतां येणार नाहीं असें काकासाहेबांस वाटूं लागलें होतें. पण असें झालें तर काय याचें उत्तर

त्यांचेपुढें तयार होतें. तें उत्तर जसें धीरोदात्त होतें तसेंच निश्चयाचें होतें. या उत्तरांत त्यांची देशहितबुद्धि प्रतीत होत होती. तसाच प्रसंग आला तर देशासाठीं हरिदासाचा पेशा पत्करून गांवोगांवीं कीर्तनरूपानें आपण लोकसेवेचें कर्तव्य खात्रीनें पार पाडूं असा त्यांचा आत्मविश्वास होता. या त्यांच्या विचाराप्रमाणें ते या आपल्या भावी राष्ट्रीय व्यवसायाची तयारी पण करूं लागले. कीर्तनाचा व्यवसाय त्यांच्या वृत्तपत्रकार व नाटककार या व्यवसायाहून फारसा निराळा नव्हताच. पण असा प्रसंग आला नाहीं. नाटककार या नात्यानें त्यांनीं नवेंच संगीताचें दालन निर्माण केलें व त्यामार्फत ते लोकजागृतीचें आपलें कर्तव्य करूं शकले.

**संगीत नाटकें**

या सुमारास प्रसिद्ध नाटककार श्रीपाद कृष्ण कोल्हटकर यांचें 'प्रेमशोधन' नाटक किर्लोस्कर नाटक मंडळी बसवीत होती. काकासाहेब श्रीपाद कृष्णांचे कॉलेजमधील स्नेही. विविधज्ञानविस्ताराचे दोघेही नामवंत लेखक. काकासाहेब आपल्या कीचकवध, कांचनगडची मोहना इत्यादि नाटकांच्या यशस्वितेनें गाजलेले यामुळें 'प्रेमशोधन' नाटक बसविण्यासाठीं श्रीपाद कृष्णांच्या इच्छेनुरूप काकासाहेब किर्लोस्कर मंडळींत जाऊं लागले. या निमित्तानें त्यांचा व कंपनीचा स्नेह जमला. 'बायकांचें बंड' हें नाटक आम्हांस संगीत करून द्या अगर दुसरें नवें नाटक कंपनीसाठीं द्या अशी विनंति काकासाहेबांना त्यावेळीं त्यांनीं वरचेवर केली. 'बायकांचें बंड' नाटक महाराष्ट्र नाटक मंडळीसाठींच लिहिलें असल्यानें तें नाटक तुम्हांस देतां येणार नाहीं असें त्यांनीं सांगितलें. पण नवें एकादें नाटक देण्याचें मात्र त्यांनीं कंपनीस अभिवचन दिलें. किर्लोस्कर मंडळींतील बाल गंधर्वांच्या मृदु, गोड व गुंगविणाऱ्या गायनानें त्यांना 'संगीताकडे' खेचून नेलें.

केसरींतून मुक्त झाल्यावर किर्लोस्कर नाटकमंडळीसाठीं त्यांनीं संगीत 'मानापमान' नाटक लिहिण्यास सुरवात केली. तें पुरें झाल्यावर योग्य मुहूर्त

पाहून नाटक रंगभूमीवर आणण्याचें ठरलें. किर्लोस्कर नाटक मंडळींत सर्व गोष्टी ज्योतिष पाहून करण्याची पद्धत होती. मुंबईचे प्रसिद्ध ज्योतिषी श्री. विष्णुपंत ऊर्फ नाना गुर्जर हे त्यावेळीं कंपनींत येत असत. त्यांचा व काकासाहेबांचा मानापमान नाटकाचे संबंधांत परिचय झाला. काकासाहेबांचा ज्योतिषाकडे पूर्वीपासूनच थोडाबहुत ओढा होता. लोकमान्यांच्या राष्ट्रीय पक्षांत प्रसिद्ध महाडकर ज्योतिषी हे एक कार्यकर्ते होते. त्यांच्या साहचर्यानें कोणत्याही नव्या गोष्टीस चालना देतांना दिवस, वार, नक्षत्र याबद्दलचे विचार काकासाहेबांच्या मनांत येत असत. श्री. गुर्जर यांचा परिचय झाल्यावर घरगुती व सार्वजनिक कार्यांत ते त्यांचा सल्ला वरचेवर घेऊं लागले व उभयतांमध्यें जडलेला हा संबंध कडेपर्यंत टिकला.

१२ मार्च १९११ या दिवशीं मानापमान नाटक मुंबईच्या रिपन थिएटरांत रंगभूमीवर आलें. नानासाहेब जोगळेकर, नारायणराव राजहंस यांच्या संगीतानें व अभिनयपटुत्वानें त्याचप्रमाणें श्री. बोडस यांच्या लक्ष्मीधर या भूमिकेनें नाटक फारच रंगलें. दुसरे दिवशीं मुंबईभर याची कीर्ति होऊन पुढील दोन चार आठवडे नाटकास तिकिटें मिळण्याची पंचाईत पडूं लागली, हें नाटक किर्लोस्कर नाटक मंडळींत पहिल्या दिवशीं जसें रंगलें व गाजलें तसें आजही तें कोणाही कंपनीनें केलें तरी रंगतें, गाजतें व पैसा देतें. हें या नाटकाचें वैशिष्ट्य आहे.

हें नाटक लिहीत असतांनाच महाराष्ट्र नाटक मंडळीच्या आग्रहावरून काकासाहेबांनीं प्रेमध्वज हें नाटक लिहिलें. वस्तुतः त्यांचें मन मानापमान नाटकांत गुंतलें होतें. पण महाराष्ट्र नाटक मंडळींचें कीचकवध हें पैसा देणारें नाटक बंद झालेलें! 'भाऊबंदकी' जरी चालू होतें तरी तें कांहीं खुसपट निघून पुन्हां बंद न होईल कशावरून? म्हणून नवें नाटक मंडळीला हवेंच होतें. प्रथमतः पुण्याच्या 'स्टूडंट्स् सोशल क्लबचे' सेक्रेटरी श्री. दत्तात्रय आत्माराम फाटक यांनीं याच विषयावर लिहिलेल्या नाटकांत

प्रेमविषयक भाग काकासाहेबांनीं घालून नाटक पुरें करावयाचें असा कांहीं विचार होता. पण मग सगळें नाटक मंडळींच्या आग्रहावरून काकासाहेबांनीं तोंडी नवेंच सांगितलें व तें माधवराव व यशवंतराव टिपनीसांनीं लिहून घेतलें. सुमारें १५ दिवसांत पुण्याच्या कंपनीच्या बिऱ्हाडीं 'प्रेमध्वजाची' अशी निर्मिति झाली. पहिल्या खेळांतील भागवतांच्या बुद्धिसिंगाच्या कामानें फारच रंग आणला.

नाट्याचार्य व नटश्रेष्ठ या गुणविशेषांच्या संयोगामुळें मानापमान यशस्वी होतांक्षणींच दुसरें नाटक हवें अशी त्यांच्याकडे मागणी झाली. मानापमानानें महाराष्ट्रास बालगंधर्व, जोगळेकर व बोडस हे नट जणूं नव्यानें दिले. बालगंधर्व रसिकांच्या गळ्यांतले ताईत बनले. जोगळेकरांचें रंगभूमीवरील स्थान केवढें मोठें आहे याची प्रतीति गुणज्ञास झाली. ते रंगभूमीचें तीन चांदांचे सरदार झाले. अभिजात संगीत व मधुर चाली याच नाटकानें पुढें आणल्या. तसेंच नाटकाचें पुस्तकांत श्री. टेंबे यांचेकडून करवून घेतलेलें पदांचें स्वरलेखनही प्रथमच काकांनीं प्रसिद्ध केलें. अशा रीतीनें या नाटकाचे बाबतींत सर्वच अद्वितीय झालें; व त्यामुळें काकासाहेब 'खाडिलकर युग' प्रवर्तक ठरले.

दुसरें नाटक विद्याहरण लिहावयास घेतलें. पण या सुमारास महाराष्ट्र नाटक मंडळीचे विख्यात नट श्री. भागवत नागपुरास आत्महत्येनें वारल्याचें कळल्यानें काकासाहेबांचें मन फार विषण्ण झालें. इतकेंच काय पण किर्लोस्कर संगीत नाटक मंडळीवरही असाच निर्घृण आघात पडला. नटश्रेष्ठ नानासाहेब जोगळेकर मृत्यु पावले. नानासाहेबांच्या मनांत काकासाहेबांबद्दल अतिशय आदर होता. काकासाहेबांच्या मनांत नानासाहेबांबद्दल अतिशय आशा होत्या. नानासाहेबांच्या मृत्यूनें काकासाहेबांच्या मनच्या आशा पार भंगून गेल्या. श्री. गोविंदराव टेंबे यांना मुख्य नट म्हणून घेऊन किर्लोस्कर मंडळीनें मार्ग काढला.

## गृह व नाट्य संसार

याच सुमारास आमचें बिऱ्हाड भाऊसाहेब गोखले यांच्या वाड्यांतून मुंजाबाच्या बोळांतील आळवणी यांच्या वाड्यांत आलें. नवी जागा पूर्वीच्या जागेपेक्षां प्रशस्त होती. त्यांत रस्त्याचे बाजूला माडीवर दिवाणखान्याची जागा व मागील बाजूस दोन खोल्या व गच्ची होती. नव्या जागेंत टेबल, खुर्च्या व वेताचा एक बैठा पलंग असे. पलंगाजवळच खिडकीसमोर एक प्रशस्त ईझीचेअर ठेवलेली असे.

काकासाहेब दररोज सायंकाळीं बाहेरून घरीं परत येत तेव्हां बहुतेक चित्रशाळेचे मॅनेजर शंकरराव जोशी त्यांचेबरोबर असत. शंकरराव ईझीचेअरवर व काकासाहेब वेताच्या पलंगावर असे बराच वेळ गप्पागोष्टी बोलत बसत. तिसऱ्या मजल्यावर मी व माझे धाकटे बंधु नाना व चि. अप्पा यांची अभ्यासाची खोली होती. काकासाहेबांकडे शंकररावांप्रमाणें कांहीं वेळां देशमुख व पुढें पुढें वैद्य कवडेशास्त्री व नाटक मंडळ्यांतील चालक व नट अशी मंडळी येत असत. या मंडळींच्याकडे व प्रसिद्ध धन्वंतरी महर्षि अण्णासाहेब पटवर्धन यांच्याकडे काकासाहेब वेळोवेळीं जात असत. त्या वेळच्या राष्ट्रीय पक्षांतील मंडळींचा एक शुक्रवार क्लब असे. आळीपाळीनें प्रत्येकाकडे या क्लबाची बैठक भरे. बैठक भरली म्हणजे प्रचलित राजकारणावर चर्चा होत असे. अशी सभा ४।६ महिन्यांनीं आमच्याही घरीं भरत असे. हा क्लब आरंभीं चित्रशाळेंत भरत होता.

याच सुमारास काकासाहेबांनीं संगीताच्या अभ्यासास सुरवात केली. नाटकासाठीं रचण्याच्या पदांची पूर्व तयारी हा जसा या अभ्यासाच्या मागें त्यांचा हेतु होता तसाच हा अभ्यास जरूरतरच्या आपल्या हरिदासी पेशास उपयोगी पडेल हाही मानस होता. संगीताचार्य भास्करबुवा बखले यांच्याशीं नाटकांच्या चालींच्यासाठीं त्यांचा या वेळीं संबंध आला होता. काकासाहेबांच्या आग्रहामुळें त्यांनीं भारतगायनसमाज ही संस्था स्थापन

केली. या संस्थेच्या सल्लागारमंडळांत ते होतेच, पण या समाजाच्या पहिल्या विद्यार्थ्यांत त्यांनीं आपलें नांव दाखल केलें. त्यांची शिकण्याची वेळ सायंकाळची पांच वाजतांची होती. बरोबर पांचाच्या ठोक्यास ते हजर असत. सुमारें दोन तीन वर्षें ते समाजांत शिक्षणासाठीं जात असत. तथापि त्यांचे घरींही संगीत शिक्षण चाले. घरीं अष्टेकर बुवा शिकवण्यास येत असत.

केसरीची नोकरी सुटल्यावर संसाराचा सगळा खर्च नाटकांच्या प्रयोगाकरतां नाटकमंडळ्याकडून मिळणारा पैसा व नाटकांचीं पुस्तकें विकलीं जाऊन येणारा पैसा यावरच चालत असे. यांतही संसार कौशल्यानें सुंदर कसा करावा ही जबाबदारी संपूर्णपणें सौ. गौरकाकू यांचेवरच होती. काकासाहेब त्यांच्या हातांत महिन्यांतून एकदां पैसे देत व तेही आपल्या आवकीच्या हिशोबांत देत. पण यापेक्षां संसाराचें काकासाहेबांना कांहींच माहीत नसे. त्यांच्या स्वतःच्या कपड्यापासून मुलांच्या शिक्षणापर्यंत सर्व गोष्टी सौ. गौरकाकूंनाच पहाव्या लागत.

सौ. गौरकाकूंचा संसार फार टापटिंपीचा पण सुरेख असे. घरीं शिक्षणासाठीं पुतणे, भाचे व आणखी कोणीतरी नेहमीं असत. स्वतःचीं तीन लहान मुलेंही होतीं. शिवाय जाणारे येणारे कोणी आप्त सोयरे असतच. आमचे कोंकणचे नातेवाईक श्री. विठूकाका खाडिलकर—ज्यांनीं पुढें नाटककार ना. वि. कुळकर्णी यांचे सहकार्यानें महाराष्ट्र कुटुंब माला चालविली ते—कोंकणातून पुण्यास आल्यापासून त्यांची घरीं कायमची ये जा असे. त्यांची सौ. गौरकाकूंना फार मदत असे. या सर्वांचें त्या फार आदरानें व प्रेमानें अगत्य करीत. काकासाहेबांना लागणाऱ्या किरकोळ गोष्टींकडे सुद्धां त्यांचें अत्यंत लक्ष असे. त्यांना सर्व गोष्टी ठराविक वेळेवर लागत. सुंदर जिन्नस करणें ही काकूंची भारी हौस! रोजच्या भाकरी करतील तर त्या सुद्धां पापुद्रा आणि तळ न समजण्यासारख्या! रोज

दहापांच पानें असत. पण विजेप्रमाणें त्या स्वतः एकट्याच सर्व करीत व वाढीत. घरचा कर्ता पुरुष व मुलें यांची जोपासना करावयाची तशीच आतेष्ट व पाहुणे यांच्या सुखसोईकडे पाहावयाचें हें प्रत्येक सुगृहिणीचें कर्तव्य आहे असें त्या नेहमीं म्हणत. कितीही आर्थिक ओढाताणींत घरच्या मालकिणीनें जिन्नस आणि पैसा राखून खर्च केला पाहिजे असें त्यांचें म्हणणें असे व ते त्या प्रत्यक्ष करून दाखवीत. या त्यांच्या धोरणामुळें काकासाहेबांना त्यांचा पुढें अनेक वेळां उपयोग झाला. उत्तम व्यवस्था पण काटकसर हें गौरकाकूंच्या संसाराचें कायमचें धोरण असे. पाहुण्यांना त्या आडव्या चमच्यानें तूप वाढीत पण वेळीं घरच्या माणसांना उभा चमचा वापरण्याचा कठोरपणा त्यांना करावा लागे. पण या धोरणानें साचविलेल्या रोखीचा वा जिन्नसांचा उपयोग काकानाच झाला इतकेंच नव्हे तर आम्हां घरच्या मुलांना व तिचे भाचे रा. मोरोपंत आपटे वगैरे अनेक आप्त सुहृदांना व विद्यार्थ्यांना त्यांनीं केलेला आहे.

काकासाहेबांची मनःस्थिति या कालांत मिश्र स्वरूपाची होती. केसरींतून निघावें लागलें हें अस्वास्थ्य! पण नाट्यामार्फत लोकसेवेचें काम यशस्वी रीतीनें चालूं लागलें हें समाधान! मानापमान फार रंगलें. त्यामुळें पैसा व कीर्ति दोन्हीचा लाभ झाला. याचा आनंद, तर भागवत व नानासाहेब जोगळेकर निधन पावले हें दुःख! अशांतच जोगळेकरांच्या मृत्यूमुळें किर्लोस्कर नाटक मंडळींत मालकी हक्काचीं भांडणें सुरू झालीं. बाल गंधर्व व बोडस यांना भागीदारींत घेऊन हें भांडण कसें बसें मिटविलें व विद्याहरण लिहून पुरे केलें. या नाटकाच्या चाली कांहीं बालगंधर्व, कांहीं भास्करबुवा बखले व कांहीं टेंबे यांनीं दिल्या. कंपनींतील अनेक घडामोडीनंतर १९१३ पर्यंत न बसूं शकलेलें हें नाटक शेवटीं ता. १३ मे १९१३ रोजीं पुण्यास प्रथम रंगभूमीवर आलें. तें अत्यंत यशस्वी झालें; शुक्राचार्यांची कृष्णराव गोरे यांची भूमिका त्या नाटकांत सर्वांकडून फार वाखाणली गेली.

किर्लोस्कर मंडळीची जूट यापुढें फार दिवस टिकली नाहीं. मालकी हकाचें पुन्हां वादळ माजलें. काकासाहेबांनीं खूप प्रयत्न केले पण मुजुमदार व बालगंधर्व बोडस यांचें जमेना. अनेक वेळां चर्चा झाल्या. शेवटीं १९१३ च्या जुलै महिन्यांत बालगंधर्व, टेंबे व बोडस यांनीं आपली स्वतंत्र ' गंधर्व नाटक मंडळी ' स्थापन केली. शंकरराव मुजुमदारांनीं या नव्या कंपनीवर मानापमानाच्या हकाबद्दल कोर्टांत दावा मांडला पण काकासाहेबांनीं तडजोड़ करून त्या नाटकाची मालकी किर्लोस्कर मंडळीकडेच ठेविली पण तें नाटक करण्याचा हक त्यांनीं गंधर्व नाटक मंडळीस मिळवून दिला.

## परराष्ट्रीय राजकारण

याच वेळीं बाल्कन युद्ध सुरू झालें. चित्रमयजगतामध्यें या युद्धावरील लेखमाला काकासाहेबांनीं सुरू केली. युद्धांचे डावपेच व पुढील हालचालींची मांडणी ते अचूक रीतीनें अजमावून लोकांपुढें कौशल्यानें मांडीत असत; जणुं कांहीं युद्धाचा सेनापतीच आपल्या युद्धभूमीचा नकाशा पुढें ठेवून पुढील धोरण ठरवीत आहे असें वाचकांस वाटे. हें लेख लिहिण्याचा त्यांचा उद्देश ते असा सांगत कीं लोकांनीं स्मशान निद्रेंतून जागें व्हावें व जगांत चाललेल्या पौरुषाचा, पराक्रमाचा व युद्धाचा नीट विचार करून त्याचें शास्त्र अवगत करून घ्यावें. हें शिक्षण पुढील पिढीला या प्रसंगानें दिलेंच पाहिजे असें त्यांस वाटत होतें.

अशा रीतीनें काकासाहेब आपल्यापुढें त्यांनीं निष्ठेनें आंखून घेतलेला देशसेवेचा व लोकजागृतीचा निश्चित कार्यक्रम पार पाडीत असतां १९१४ च्या जून महिन्यांत एकाएकीं एक दिवशीं रात्रीं बारा वाजल्यानंतर लोकमान्य टिळक मंडालेहून सुटून घरीं आल्याचा निरोप आला. कांहीं धक्के फार सुखाचे असतात! अपरात्रींच्या या हांकेनें सर्वत्र आनंद गजबजला. काकासाहेब तावडतोब लोकमान्यांच्या दर्शनास गेले. आम्हां

मुलांना मुद्दाम हाका मारून उठवून त्यांनीं बरोबर नेलें. लोकमान्यांच्या दर्शनानें त्यांच्या मनोवृत्ति किती उचंबळल्या होत्या हें त्याच्या मुखावरून स्पष्ट दिसत होतें. लोकमान्यांच्या आगमनानंतर त्यांच्या सांगण्याप्रमाणें काकासाहेब पुन्हां केसरी कचेरींत जाऊं लागले. अशा रीतीनें मध्यंतरींच्या काळांत निर्माण केल्या गेलेल्या मानवी व दैवी व्यक्तिगत संकटांशीं यशस्वी झुंज देऊन ते आपल्या देशकार्यांतील नव्या झुंजीसाठीं पूर्ववत् तयार झाले.

: ८ :

# महायुद्धाच्या छायेखालीं

हा संग्रामू काय म्हणिपें । कीं स्वर्गचि येणें रूपें ।
मूर्त कां प्रतापें । उदो केला ॥ —ज्ञानेश्वर.

महायुद्धानें राजकीय वातावरण धडाडून पेटलें आहे. हाच काळ कवींना अनुकूल, वीरांना अनुकूल, राष्ट्रभाग्योदयाला अनुकूल होय. याच कालीं महाभारत समजेल.'

—काकासाहेब खाडिलकर.

लोकमान्य मंडालेहून सुटून पुण्यास आले. सर्वत्र आनंद झाला. लोकमान्य कारावासांतून बंधमुक्त झाले येवढेंच यांत नव्हतें. ते बंदींत पडल्यामुळें त्यांच्या सर्व सहकाऱ्यांचा कोंडमारा झाला होता. लोकमान्य बाहेर आल्यानें सर्वांनींच मुक्ततेचा उसासा टाकला. दाबून ठेवलेला सर्वांचाच उत्साह उसळी मारून बाहेर आला. काकासाहेब पुन्हां आपल्या आघाडीच्या कामावर रुजूं झाले. लोकमान्यांना त्यांचें वरिष्ठ संपादकीय कर्तृत्व व

त्यांची उच्च तत्त्वज्ञानी भूमिका यांबद्दल विशेष आदर होता. त्यांच्या अनुपस्थितींत जें ते टाळूं शकले नाहींत तें त्यांनीं आल्याबरोबर प्रथम दुरुस्त करून टाकले. लोकमान्यांचे शेजारीं काम करणें यांत काकासाहेबांस अनन्यसाधारण आनंद होता. तो देवभक्ताचा, गुरु-शिष्याचा किंवा माता-पुत्राचा आनंद होता. यांत मागचे व पुढचे अशी आजूबाजूला दृष्टीच जात नाहीं.

लोकमान्य पुण्यास आल्याबरोबर केसरी कचेरीवर सरकारनें पोलीसच बसविले. लोकमान्यांची शिक्षा संपली तरी सरकारच्या अंगचें विष अजून उतरलेंच नव्हतें. या नाकेबंदीनें सरकारच्या खुनशीपणाचें मात्र प्रदर्शन झालें. कारण लोकांनीं लोकमान्यांच्याबद्दल प्रेमादर व्यक्त करण्याच्या कार्या-वर याचा कांहींसुद्धां परिणाम झाला नाहीं. पुण्यांतच काय पण अखिल हिंदुस्थानांत प्रांतोप्रांतीं ठिकठिकाणीं लोकमान्यांच्या अभिनंदनाचें प्रदर्शन होतच होतें व लोक त्यांचा जयजयकार करीतच होते. यांतच गणपति-उत्सव आला. मग तर काय विचारतां ? लोकमान्यांच्या बद्दलची आपल्या मनांतील उसळतीं पूज्यबुद्धि दाखविण्यासाठीं मुद्दाम आंखलेला तो समा-रंभच असें जनतेस वाटलें. काकासाहेब, शिवरामपंत, स्वतः लोकमान्य यांचीं व्याख्यानें धूमधडाक्यानें चाललीं होतीं व ‘ टिळक महाराज की जय ’ ची आरोळी आकाशांत पोंचत होती. अर्थात् या निनादानें सरकारच्या कान-ठळ्या बसल्या असल्यास नवल नाहीं. पुण्याच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटनें पोलीस कायद्याखालीं लगेच एक जाहीरनामा काढला व टिळकांचा जयजयकार व त्यांच्या तसबिरीची मिरवणूक काढणें यांस बंदी केली.

## महायुद्धाचा प्रारंभ

काकासाहेबांनीं व गणेशोत्सवांतील इतर व्याख्यात्यांनीं या अश्लाघ्य व अप्रस्तुत कृत्याबद्दल सरकारवर कडक टोकास्त्र सोडलें व सरकारी धोरणाची चांगली हजेरी ` ली. लोकमान्यांनीं स्वतः आपल्या विलायतेंतील मित्रा-

मार्फत सेक्रेटरी ऑफ स्टेटपर्यंत तक्रार केली. कारण अशा कृत्यास कायदा अगर शिष्टाचार यांपैकीं कशाचाच आधार नव्हता. इतक्यांत ता. ४-८-१९१४ रोजीं युरोपांत लढाईचें .रणशिंग फुंकलें गेलें. ब्रिटिश सरकारवर त्याचा जोराचा परिणाम झाला. सर्व पक्षांच्या सहानुभूतीची सरकारला आवश्यकता वाटूं लागली. सरकारला आपलें धोरण बदलणें आवश्यकच झालें. त्याचा एक भाग म्हणून लवकरच लोकमान्यांच्या सदनावरील नाकेबंदी सरकारनें उठविली.

लोकपक्षाच्या राजकारणावरही या महायुद्धाचा विशेष परिणाम झाल्याखेरीज राहिला नाहीं. लोकमान्यादिकांचे प्राप्त परिस्थितींतील नव्या धोरणासंबंधीचे विचारविनिमय सुरू झाले.

टिळक पक्षियांत निरनिराळ्या मनोवृत्तीची व निरनिराळ्या मार्गांचा आग्रह धरणारी मंडळी होती. लोकमान्यांच्या कारावासाच्या काळांत टिळकपक्षीयांना जे विविध अनुभव आले होते त्यांवरून कार्यकर्ते आपल्या शक्तीविषयीं एका निश्चित धोरणावर आले होते. या काळांत प्रजापक्षानें थोड्याफार चळवळी केल्या होत्या. बंगाल्यांतील बॉंबस्फोट किंवा नाशिक येथें जॅक्सन साहेबांच्या खुनासारखे कांहीं अत्याचार कांहीं ठिकाणीं घडले होते. पण या सर्व घडामोडींचा परिणाम सरकारवर उलटच झाला आणि दडपशाहीचें पाऊल पुढेंच पडलें व राजकारणाचें पाऊल त्यामानानें मागेंच राहिलें अशी स्थिति दिसून आली.

जहाल-मवाळ यांचे मतभेद अद्याप मिटलेले नव्हते. राष्ट्रीय सभा यामुळें दुभंगलेलीच होती. अशा परिस्थितींत महायुद्धामुळें उत्पन्न झालेल्या सरकारी मऊ धोरणाचा आपल्या राजकारणाला उपयोग करून घ्यावयाचा तर आपल्या चळवळीचें धोरण बदलून तें सामोपचाराचें ठेवावें असा विचार लोकमान्य पक्षीयांत येऊं लागला व त्याचा प्रारंभ म्हणून लोकमान्यांनीं आपल्या विरुद्ध माजलेला गैरसमज दूर व्हावा

म्हणून आपलें धोरण स्पष्ट करणारा जाहीरनामा प्रसिद्ध केला व त्याचा जरूर तोच परिणाम झाला.

## गीतारहस्य

लोकमान्य कारावासांतून बाहेर पडले ते राष्ट्रोद्धाराला प्रेरणा देणारा गीतारहस्य हा महान् ग्रंथ घेऊन बाहेर आले. काकासाहेबांचा गीतेचा गाढ अभ्यास व गीतेचें तत्त्वज्ञान जीवनांत उतरविण्याची त्यांची वृत्ति लोकमान्यांच्या त्यांचेबद्दलच्या भावाची एक प्रमुख सांखळी होती. त्यांनीं आपली गीतारहस्याची हस्तलिखित प्रत काकासाहेबांस वाचावयास देऊन ती वाचून सूचना करण्यास सांगितलें. काकासाहेबांनीं ती वाचली व वाचतां वाचतां ज्या ज्या ठिकाणीं शंका उपस्थित झाल्या त्यांवर खुद्द लोकमान्यांशीं चर्चा करून त्यांचें निरसन करून घेतलें. गीतेसंबंधींचें लोकमान्यांचें विशेष अंतरंग काकासाहेबांस पहावयास मिळून गीतेच्या तत्त्वज्ञानाचें मर्म ऊर्फ गीतारहस्य त्यांचें मनामध्यें अधिकाधिक खोलपर्यंत पोंचलें. लोकमान्य व गीतारहस्य यांच्या अन्योन्य संबंधाबद्दल सूक्ष्म अभ्यासाअंतीं काकासाहेबांनीं पुढील उद्गार काढले आहेत:—

"भगवद्गीतेच्या भक्तीमुळें टिळक अखेरीस स्वतः भगवद्गीता झाल्यावर टिळकांनीं गीतारहस्य हा ग्रंथ लिहिला आहे. अर्जुनाचा पराक्रम उद्दीप्त करण्यास आणि अखेरचें यश अर्जुनाच्या पदरांत टाकण्यास जशी गीता कारणीभूत झाली, त्याप्रमाणें स्वराज्याचे आद्य प्रवर्तक टिळक स्वतः गीता होऊन स्वराज्यवाद्यांचा पराक्रम उद्दीप्त करण्यास व स्वराज्यवाद्यांच्या पदरांत अखेरीस यश टाकण्यास कारणीभूत व्हावयाचें निश्चित ठरलेलें असल्यामुळें गीतारहस्य हा ग्रंथ महाराष्ट्रापुढें व हिंदुस्थानापुढें अवतीर्ण झालेला आहे."

काकासाहेबांची गीतारहस्यासंबंधींची ही दृष्टि व निष्ठा होती. गीतारहस्य हें पुस्तक छापण्याबद्दल लोकमान्यांच्या काकासाहेबादिकांशीं बऱ्याच चर्चा

पुण्यांतील राष्ट्रीय पक्ष



खुर्चीवरः—१ श्री. शिवरामपंत परांजपे, २ श्री. तात्यासाहेब केळकर, ३ श्री. सीतारामपंत दामले, ४ लोकमान्य, ५ श्री. वासुकाका जोशी, ६ श्री. दत्तोपंत वेहेरे, ७ श्री. काकासाहेब खाडिलकर

झाल्यानंतर त्या कामास सुरवात झाली. त्या कामावर विशेष नजर ठेवण्याचें काम काकासाहेबांवरच सोंपविण्यांत आलें.

वरील उद्योग व राष्ट्रीय सभेंत पुनः प्रवेशाबद्दलच्या स्वप्रांतीय व परप्रांतीय पुढाऱ्यांशीं वाटाघाटी चालू असतांच काकासाहेबांचें नाट्यलेखनाचें कार्यही चालूं होतें. महाराष्ट्र नाटक मंडळींतील मालकांपैकीं यशवंतराव टिपनीस यांनीं फुटून निघून स्वतःची नवी नाटक कंपनी काढली. महाराष्ट्र नाटक मंडळीला नवें नाटक मिळविणें जरूर होतें. काकासाहेबांच्या पूर्वीच्या नाटकाशिवाय गडकऱ्यांचें प्रेमसंन्यास व खरेशास्त्री यांचें तारामंडळ या नाटकांचे प्रयोग ती मंडळी करीत असे. फुटून निघालेल्या मंडळींनीं काकांचें भाऊबंदकी नाटक परवानगीशिवाय बसविण्याचा प्रथम प्रयत्न केला, पण आपलीं नाटकें महाराष्ट्र मंडळीशिवाय इतर कोणत्याही मंडळींना करूं न देण्याचें काकासाहेबांचें धोरण असल्यामुळें त्यांनीं तसें यशवंतराव यांस कळविलें पण त्यांनीं अत्यंत गळ घातल्यानें नाटकाच्या स्वामित्वाची किंमत ठरवून ती रक्कम महाराष्ट्र मंडळीस प्रथम द्या व नंतर नाटक बसवा अशी अटीची परवानगी त्यांनीं टिपणीसांना दिली. महाराष्ट्र नाटक मंडळीविषयीं काकांची काय भावना होती हें या प्रसंगावरून स्पष्टच दिसणार आहे. याची जाणीव महाराष्ट्र नाटक मंडळीस पूर्ण होती.

काकासाहेबांनीं ‘ सत्त्वपरीक्षा ’ हें आपलें सुंदर नाटक लिहून झाल्यावर तें महाराष्ट्र नाटक मंडळीस दिलें. यावेळीं ती कंपनी नागपुरास खेळ करीत होती. प्रथम नाटकाचे दोन अंक त्यांच्याकडे पाठविले व नाटक पुरें लिहून झाल्यावर काकासाहेब स्वतः नागपुरास गेले. तेथें त्यांनीं स्वतःच्या देखरेखीखालीं नाटक बसवून घेतलें. नाटकाचा पहिला प्रयोग नागपूरच्या तुळशीदास नाटकगृहांत फार ठसठशीत रीतीनें झाला. हें नाटक कलापूर्ण व काकासाहेबांच्या विविध वैशिष्ट्यांनीं नटलेलें आहे हें खरेंच; पण या पुढील

नाटकांतून दिसून येणारी काकासाहेबांची तत्त्वज्ञानाची स्थिर बैठक या नाटकांत प्रथम दृष्टीस पडते ही गोष्टही लक्षांत घेण्यासारखी आहे. आपल्या हातांतील जळका भाकरीचा तुकडा भिरकावून देऊन "हें पोट फेकून दिलें. माझी आई व माझे बाबा गुलामगिरींत असेतों अन्नाचा एकही कण माझी जीभ पोटांत लोटणार नाहीं" अशी बाळ रोहिदासानें केलेली कठोर प्रतिज्ञा काकासाहेबांनीं याच नाटकांत महाराष्ट्रीय जनतेस ऐकविली आहे.

लोकमान्यांच्या गीतारहस्याचें काम चालू होतें. तसेंच वरीलप्रमाणें काकासाहेब महाराष्ट्र नाटक मंडळी व गंधर्व नाटक मंडळी यांच्यासाठीं नाटकें लिहिण्याच्या कामांतही होते. लोकमान्यांच्या अनुपस्थितींत केसरी सोडावा लागल्यानंतर व नाटकावर बंदी येईल अशी परिस्थिति दिसूं लागल्यानंतर काकासाहेब कीर्तनकार होऊं इच्छित होते. सिडनहॅमशाहींत नाटकावर सुद्धां गदा आणून देशकार्य करणाऱ्यांचा जो वृत्तिच्छेद करण्याचा नवा डाव दिसत होता, त्यांतून मार्ग काढून आपलें लोकजागृतीचें कर्तव्य कांहीं झालें तरी पार पाडलेंच पाहिजे, अशी त्यांची मनोभूमिका होती; व कीर्तनकाराचे पेशांत जनतेशीं निकटचे व जिव्हाळ्याचे संबंध उत्पन्न करून, या मार्गानेंही आपण आपलें राष्ट्रकार्य करूं; व त्या विरुद्ध सरकार कांहीं करूं शकणार नाहीं, असा त्यांचा हिशेब होता. कीर्तनकार हा वृत्तपत्रकार व नाटककार यांचेहून साधनादि भेदामुळें थोडा निराळा वाटत असला तरी साध्य व पूर्वतयारी यांच्या दृष्टीनें त्यांचेमध्यें सामान्य भूमिका अधिक आहे. एक तऱ्हेनें असेंही म्हणतां येईल कीं, वृत्तपत्रकार कीर्तनाचा पूर्वरंग करतात, तर नाटककार आख्यानरूपाचा उत्तररंग करतात! कीर्तनकारास वक्तृत्व लागतें तें काकासाहेबांजवळ परिपूर्ण होतें. त्यांना एकच अडचण भासत होती, ती म्हणजे संगीताची. या बाबतींत त्यांना आत्मविश्वास होता. आपणांस आवाजाची देणगी नाहीं याची

आणीव त्यांना होती. तथापि कीर्तनकार म्हणजे गवयी नव्हे. भक्तिभावयुक्त पद्यें त्यांस म्हणतां आलीं तरी या पेशापुरतें काम भागेल असें त्यांचें मत होतें व तितपत तयारी जरा अधिक खटाटोप पडला तरी करावयाचीच असा त्यांचा निश्चय होता. संगीत नाटकेंहि लिहिलीं जात होतीं, त्यामुळें त्यांनीं प्रारंभापासूनच संगीताच्या अभ्यासास सुरवात केली होती.

पण नाटकावर पुढें बंदी आली नाहीं व गद्य व संगीत नाटकें लोकप्रिय झाल्यामुळें कीर्तनकाराचा पेशा त्यांना पत्करावा लागला नाहीं. पण कवी, कीर्तनकार, वीर, नट व नाटककार यांचा संबंध एकजीव आहे अशीच त्यांची विचारप्रणाली होती. झगड्याकरितां पराक्रम, पराक्रमाकरितां लोक-शिक्षण व लोकशिक्षणाकरितां काव्यनाट्यादि वाङ्मयसेवा अशा वृत्तीचे काकासाहेब असल्यानें, युरोपखंडांत महायुद्ध पेटल्याबरोबर, त्यांचें लढाऊ मन, या अद्भुत संग्रामप्रसंगाकडे विशेषत्वानें आकर्षित झालें व या अपूर्व घटनेचा उपयोग लोकजागृतीकडे व्हावा व त्यावेळच्या स्मशानशांततेच्या निद्रेंतून जागे होऊन युद्धांतील पौरुषाची व पराक्रमाची स्फूर्ति जनतेला होईल असें उपयुक्त वाङ्मय तयार करावें असें त्यांच्या कविमनानें घेतलें. वासुकाका जोशी यांचे बरोबर विचारविनिमय करून "चित्रमयजगत्" या मासिकामध्यें पहिल्या महायुद्धावरची प्रसिद्ध लेखमाला काकासाहेबांनीं सुरू केली.

## महायुद्धाची लेखमाला

ता. २८ जुलै १९१४ रोजीं आपल्या युवराजाच्या खुनासंबंधानें ऑस्ट्रि-यानें सर्व्हियाशीं युद्ध पुकारलें. इंग्लंड, फ्रान्स व रशिया एकामागून एक या महायुद्धाच्या रणांगणांत उतरले. युरोपचें राजकारण नेहमींच गुंतागुंतीचें असतें. या लढाईंत तर राजकारण जास्तच गोंधळाचें झालें होतें. मुत्सद्यांचीं भाषणें व सेनानींच्या हालचाली जनतेस नेहमीं घोंटाळ्यांत घालण्यासारख्या असत. पण काकासाहेब यांनीं परदेशी राजकारणाचे धागेदोरे आपल्या

सूक्ष्म दृष्टीनें इतके स्पष्टपणें ओळखले होते कीं ते या युद्धाच्या डावपेंचाचें भविष्य अचूक सांगत असत. ऑस्ट्रियाच्या युवराजाचा खून पडतांच युरोपांत महायुद्ध पेटणार ह्याचें त्यांनीं भविष्य वर्तविलें होतें.

चित्रमयजगतांत हे लेख लिहितांना त्यांची ही सूक्ष्मदृष्टि व युद्धाचे आडाखे बांधण्याची कुशलता वाचकांना स्पष्टपणें दिसून आली. हें सर्व ते आपल्या अचाट स्मरणशक्तीच्या जोरावरच करीत असत. युद्धावरील मासिक लेख लिहितांना परदेशीय अनेक दैनिकें व मासिकें ते वाचून काढीत, पण वाचनानंतर संदर्भासाठीं त्यांचा सहसा उपयोग करीत नसत. मात्र मजकूर सांगण्यापूर्वी रणभूमीचा मोठा नकाशा टेबलावर पसरून कुशल सेनापतीप्रमाणें शक्य त्या हालचालींचा सूक्ष्मदृष्टीनें अभ्यास करीत असत. व त्या महिन्याचा लेख सांगून लिहवीत असत. त्यांच्या या विलक्षण अचाट स्मरणशक्तीची व कुशाग्रबुद्धीची वाचकवर्गावर परिणामकारक छाप पडून ती लेखमाला अत्यंत लोकप्रिय झाली.

हें महायुद्ध सतत सन १९१४ ते १८ पर्यंत चाललें होतें. यांत उभय पक्षांच्या जयापजयाच्या अनेक घटना घडल्या; नव्या शस्त्रास्त्रांचे अनेक नमुने दृष्टोत्पत्तीस आले व उभयपक्षीय सेनानींनीं आपल्या नव्या नव्या डावपेंचानें जगाला चकित करून सोडलें. तसेंच काकासाहेबांनींही आपल्या नवोनव रम्य युद्धकथा कथनानें व डावपेंचांचे आडाखे बिनतोड मांडून आपल्या सुंदर लेखांनीं वाचकांस मुग्ध केलें. आश्चर्य असें कीं ही लेखमाला सतत चार वर्षें चालू राहिली तरी त्या विषयींची वाचकांची कुतूहलपूर्ण आतुरता सतत वाढत राहिली हाच या लेखमालेचा विशेष होय.

काकांची युद्धकथा कथन करण्याची रम्य लेखनशैली, स्थळांचे अचूक नामनिर्देश, उभय सेनानींच्या मनींमानसीं उद्भवणाऱ्या कल्पना व डावपेंच, उभयपक्षी सैन्यांच्या संभाव्य हालचाली यांचे बिनचूक आडाखे यांनीं वाचकवर्ग तर मंत्रमुग्ध होऊन चित्रमयजगतची चातकाप्रमाणें मार्गप्रतीक्षा

करीत असे व काकांच्या लेखनाचें आतुरदृष्टीनें ग्रहण करीत असे. महिन्याचे लेख चित्रमयजगतमध्यें येत तर केसरीसाठीं त्यांनीं 'वार्षिक आढावे' लिहिले व केसरीच्या वाचकवर्गाला आपल्या लेखनाचा लाभ करून दिला.

ह्या महायुद्धाच्या लेखमालेच्या प्रारंभकाळींच प्रत्यक्ष महायुद्धाबद्दल लोकांनीं काय करावें व टिळकपक्षीयांनीं कोणतें धोरण स्वीकारावें याबद्दल राष्ट्रीय पक्षांत विचार चालले होते व त्यासंबंधीं लेख व व्याख्यानें दिलीं जात होतीं. त्या सालच्या शिवराज्याभिषेकोत्सवांत लोकमान्य टिळकांच्या अध्यक्षतेखालीं किर्लोस्कर नाटकगृहांत काकासाहेबांचें 'सक्तीची लष्कर-भरती' या विषयावर भाषण झालें. व्याख्यात्यांनीं त्या व्याख्यानांत ग्रीस, रोम, फ्रान्स, जर्मनी व हिंदुस्थान इत्यादि देशांतील लष्करभरतीच्या निर-निराळ्या पद्धतींचें विवेचन करून पगारी भाडोत्री सैन्य ठेविल्यापासून राजांची अनियंत्रित सत्ता कशी वाढते, भाडोत्री सैन्यांत कनिष्ठ दर्जाच्या लोकांची भरती होऊं लागून समाजाची नीति व घडी कशी बिघडते, राष्ट्रीय लष्कर उभारण्याची आवश्यकता काय, आणि जुलमी अनियंत्रित सत्ता व भाडोत्री लष्कर, राष्ट्रीय स्वातंत्र्य व राष्ट्रीय लष्कर यांची अखंड सांगड कशी असते इत्यादि मुद्यांचें मार्मिक विवेचन करून अशा प्रसंगीं राष्ट्रीय लष्कर उभारणें कसें जरूर आहे तें विशद करून सांगितलें.

अध्यक्ष या नात्यानें या व्याख्यानाचा समारोप करतांना लोकमान्यांनीं काकांनीं विशद केलेल्या मुद्यांना पाठिंबा दिला व त्याकाळच्या सरकारी लष्करभरतीच्या धोरणाविरुद्ध पुढील तक्रार केली.

"भाडोत्री सैन्याचा युद्धप्रसंगीं खरा उपयोग होत नाहीं, असा सर्वत्र अनुभव येत असून राष्ट्रीय लष्कर उभारल्यास आपल्या हातांतील अधिकार जाईल या भीतीनें नोकरशाहीनें भाडोत्री लष्कर उभारण्याचा अद्याप प्रयत्न चालू ठेविला आहे. शिपाई द्या, पैसे द्या पण लष्करांतील वरिष्ठ जागा मिळवण्याची महत्त्वाकांक्षा बाळगूं नका असें या नोकरशाहीचें म्हणणें

आहे. लष्करभरतीच्या कामीं मदत करा असें सरकार आम्हांस सांगतें. राष्ट्राला कोणत्याहि प्रकारचे हक्क देण्यास मात्र सरकार तयार नाहीं. युरोपियनाप्रमाणें हिंदी लोकांचा लष्करी दर्जा वाढवण्याची सरकारची इच्छा नाहीं. असें असतांना नोकरशाहीचा जुलूम कायम करण्यास लष्करांत तुम्ही शिरा असें आम्हीं लोकांना सांगितलें, तरी आमचें कोण ऐकणार ! स्वदेशासाठीं मी मरेन अशी भावना तरुणांत उत्पन्न होईल तर अखिल भारतांत एक कोटी सेना तयार होईल."

## राष्ट्रीय सभेंत प्रवेश

अशीं प्रसंगोपात्त व्याख्यानें होत. या प्रसंगीं सरकारला लोकांनीं कशी मदत करावी याबद्दल सरकारी नोकरवर्गाशींही खाजगी वाटाघाटी व बोलणीं होत. युद्धकाळाचा जास्तींत जास्त लाभ करून घेण्याला राष्ट्रीय सभेंतील दोन्ही प्रमुख पक्षांचा समेट झाला पाहिजे हा विचार लोकमान्यांच्या मनांत प्रामुख्यानें होता व याविषयीं अन्यप्रांतीय पुढाऱ्यांशीं सारखा पत्रव्यवहार चालू होता. समेटाच्या अटी कोणत्या असाव्या या बाबतींत झालेल्या पंचायती मधूनच लोकमान्यांचा व भारतसेवक ना. गोखले यांचा वाद झाला. या नवीन वादानें जुन्या वादाची खपली निघाली पण ना. गोखल्यांच्या मृत्यूनें हा वाद विराम पावला. दुफळी मिटवण्याचा वाद थांबला, परंतु या कामांत झालेला बखेडा लक्षांत घेऊन संयुक्तराष्ट्रीय सभा होईतोंपर्यंत आपल्या पक्षानें स्वतंत्रपणें कार्यारंभ करावा असें लोकमान्यांनीं ठरवलें. या बाबतींत पुण्यास झालेल्या परिषदेंत बॅ. बॅप्टिस्टा यांनीं सुचविल्याप्रमाणें एक वेगळा संघ स्थापून होमरूलची मागणी करावी असेंही ठरलें. १९१५ मध्यें सुप्रसिद्ध बेझंटबाई यांनीं आपल्या 'न्यू इंडिया' पत्रांत स्वराज्यसंघाची कल्पना मांडली होती. टिळकांनीं आपल्या केसरींतून बाईच्या या नूतन संघाला पाठिंबा दिला. तरी पण असे नवीन संघ स्थापण्यापेक्षां राष्ट्रीय सभेंत सर्वपक्षीयांची एकी साधावी व

स्वराज्याची एकमुखी मागणी मागावी याबद्दलच लोकमान्यांचा विशेष कटाक्ष होता व तसें ते आग्रहानें प्रतिपादीत.

१९१५ मध्यें राष्ट्रीय सभेचें अधिवेशन मुंबईस भरलें. त्यांत राष्ट्रीय सभेनें आपलें ‘ सुरतेचें क्रीड ’ दुरुस्त केलें. या क्रीडवर सही करून राष्ट्रीय सभेंत प्रवेश मिळवावा किंवा नाहीं असाही वाद टिळकपक्षीयांत चालला होता. एक पक्षांस क्रीडवर सही करणें अपमानास्पद वाटत होतें. उलट-पक्षीं लोकमान्यांचें मत “ तुटेपर्यंत ताणूं नये, सन्माननीय अटीवर समेट करावा, ” असें होतें. या वादाचा निकाल बेळगांवच्या परिषदेंत करण्याचा निश्चय लोकमान्यांनीं केला. अध्यक्षस्थान दे. भ. खापर्डे यांना देण्याचें ठरविलें व त्यांना निमंत्रण देण्यासाठीं उमरावतीस काकांना समक्ष पाठ-विलें. दादासाहेबांना अध्यक्षस्थान देण्याच्या हेतूंत आपल्या सर्व अनुयायांनीं एकत्र जमावें व पुढील धोरणाची रूपरेषा ठरवावी अशी लोकमान्यांची मनीषा होती. त्याप्रमाणें बेळगांवला लोकमान्यपक्षीयांचा अपूर्व मेळावा जमला.

प्रत्यक्ष अधिवेशनास प्रारंभ होण्यापूर्वी या मुख्य ठरावावर खाजगी चर्चा कँपाकँपांत चालू होत्या. लोकमान्यांच्या नजीकच्या सहकाऱ्यांपैकीं बरीच मंडळी काँग्रेसमध्यें जाऊंच नये, अशा मताची होती. मवाळ पक्षानें तयार केलेलें क्रीड त्यांना अमान्य होतें. लोकमान्य टिळकांनीं सर्व बाजूंनीं विचार करूनच राष्ट्रीय सभेंत शिरण्याचें निश्चित ठरविलें होतें. खाजगी चर्चा अगदीं निकरावर आली होती. पण इतक्या महत्त्वाच्या प्रश्नावर पक्षामध्यें मतभेदाची धूळ उठून लोकमान्यांना विरोध करण्याची पाळी येण्यानें राष्ट्रकार्यहानि होईल असें काकासाहेबांचें प्रामाणिक मत असल्यानें व लोकमान्यांच्या निर्णायक बुद्धीवर त्यांचा अत्यंत गाढ विश्वास असल्यानें त्यांनीं लोकमान्यविरोधकांना स्पष्टपणें विरोधून लोकमान्यांच्या मताचा पाठपुरावा केला व वादाची धूळ शमली. समेटाचा ठराव खुद्द टिळकांनीं मांडला.

अनेक भिन्नमतवाल्यांनींहि पाठिंबा दिल्यावर सर्व मतांनीं ठराव पास झाला. व राष्ट्रीय संस्थेंत शिरावयाचें असें ठरलें. थोड्याच दिवसांनीं लखनौस राष्ट्रीय सभेचें अधिवेशन झालें. त्या अधिवेशनास लोकमान्य व त्यांचे अनुयायी शेंकडोंनीं एका स्पेशल 'होमरूल' ट्रेननें गेलें. २९।१२।१९१६ या दिवशीं राष्ट्रीय सभेंत बेळगांवच्या होमरूल मागणीच्या ठरावाला अनुमति मिळाली. लोकमान्यांची समेटाची इच्छा पूर्ण झाली व तो ठराव एकमतानें पास झाला. होमरूलची एकमुखी मागणी झाली.

## प्रपंचांतील सुखदुःखें

यापूर्वी थोडे दिवस काकासाहेबांवर मातुःश्रीच्या मृत्यूनें दुःखाचा प्रसंग आला. आईचा मृत्यु त्यांच्या वयोमानानें अकालीं नव्हता, पण ती आणखी कांहीं दिवस जगावयास पाहिजे होती. आईनें काकांच्या जन्मापासून अनेक अडचणींतून मार्ग काढून कौशल्यानें संसाराची घडी ठाकठीक बसवली होती. उभयतां मुलगे—हरिपंततात्या व काका-या सुपुत्रांच्या कर्तृत्वानें तो संसार सुस्थितीला आलेला होता. हा काळ स्वास्थ्यानें आपल्या नातवंडांचें कौतुक करीत राहण्याचा व सुख अनुभवण्याचा होता. या वेळीं काकांची आर्थिक परिस्थिति काळजी करण्यासारखी नव्हती. आळवण्यांच्या वाड्यांतील वाढत्या संसाराची मांडणी सौ. गौरकाकूसारख्या सुगृहिणीनें अत्यंत ठाकठिकीची व सुखमय केली होती. अशा सुखी संसारांत आईचें मन रमलें होतें. आपल्या दोघां मुलांनीं आपापल्या अंगीकृत व्यवसायांत कर्तृत्व दाखविलें, यामुळें आई पूर्ण समाधानाच्या मनःस्थितींत राहत असे. तिचें आजारीपण फारच थोड्या दिवसांचें झालें. यामुळें मृत्युसमयीं तात्यांना जवळ राहतां आलें नाहीं. तात्या त्यावेळीं सांगली संस्थानपैकीं कर्नाटकांतील शिरहट्टीसारख्या रेल्वेपासून दूर असलेल्या गांवीं मामलेदार होते. ते नंतर आले. आई जुन्या वळणाची व धार्मिक प्रवृत्तीची होती. तथापि यांतही तिचें वैशिष्ट्य असे. तिचा दानधर्म नेहमीं चालू असे.

चातुर्मासांत नेम म्हणून ती गीतेचीं पुस्तकें लहानशा चंदनी पेटींत घालून योग्य ब्राह्मणास दान देत असे. या दानपद्धतींत तिच्या मनःप्रवृत्तीच्या सर्वच छटा चांगल्या रीतीनें दिसून येतात. ती अत्यंत शांत तितकीच करारी स्वभावाची होती. तिचा शांतपणा तात्यांनीं उचलला तर करारीपणा काकासाहेबांनीं घेतला.

आईच्या मृत्यूपूर्वीच चि. अप्पा व चि. विनायक या दोन पुत्रांच्या मुंजी करण्याचा काकासाहेबांचा मनोदय होता. पण योगायोग तसा नव्हता. पुढें कांहीं दिवसांनीं तात्या पुण्यास आल्यानंतर त्यांच्या विचारें मुंजीचा बेत कायम करण्यांत आला. पुण्यास संसार सुरू झाल्यानंतर घरांतील हा पहिलाच मोठा मंगल समारंभ होता. तसेंच अनेक आपत्तींशीं झुंज झाल्यानंतरचे काकासाहेबांचे व सौ. गौरकाकूंचें हेच अत्यंत स्वास्थ्याचें व सुस्थितीचें दिवस होते. समारंभ फार थाटानें साजरा करण्यांत आला. तो पाहण्यास आई नव्हती हें न्यून सर्वांस पदोपदीं भासत होतें. सर्व आप्त इष्ट गांवोगांवहून आले होते. स्वतः लोकमान्य टिळक व राष्ट्रीय पक्षांतील सर्व मंडळी समारंभास उपस्थित होती. नाट्यव्यवसायांत जोडलेल्या सर्व मंडळींनीं समारंभांत उत्साहानें भाग घेतला होता. काकासाहेब या सर्व समारंभाचे सहाय्यभूत असले तरी प्रत्यक्ष समारंभांत भाग घेणें हें त्यांना तितकेसें आवडत नसे. बऱ्याच गोष्टी परस्पर व्हाव्यात अशी त्यांची वृत्ति असे. तात्यांची कार्यांत उपस्थिति असल्यामुळें सर्वांच्या सर्व मनासारखें झालें. सौ. गौरकाकूंनीं मुलांच्या हातांत सोन्याचीं कडींही घातलीं व काकासाहेब मुंजीच्या देवकार्यांत जरीचा पीतांबरही नेसले! मुंजीच्या दिवशीं रात्रीं मंडपामध्यें गायनवादनाचा कलापूर्ण जलसा झाला. श्री. टेंबे यांचें पेटीवादन व गायनाचार्य भास्करबुवा बखले, नटवर्य बालगंधर्व व मास्तर कृष्णराव यांचें मधुर गायन असा अपूर्व योग त्या दिवशीं घडून सर्वांना उत्कृष्ट संगीताची मनमुराद मेजवानी मिळाली.

गृहप्रपंचांतील हा मंगल समारंभ संपल्यानंतर पुढें लखनौची राष्ट्रीय सभा झाली व तेथें होमरूलचा ठराव एकमतानें पास झाला. तत्संबंधीं लोकजागृति करण्यासाठीं लोकमान्यांनीं देशभर, विशेषतः अखिल महाराष्ट्रांत दौरे काढण्याचें निश्चित केलें व लखनौहून परत येत असतांच वाटेंत वऱ्हाड नागपूरकडील भागांत दौरा काढला. होमरूलचा प्रचार करण्यास त्यांनीं तेथूनच सुरवात केली. पुण्यास आल्यावर त्यांनीं स्वराज्यसंघाचा पुढील कार्यक्रम ठरविला.

## स्वयंवर

या सुमारास गंधर्व नाटक मंडळीसाठीं काकांनीं 'स्वयंवर' नाटक लिहिलें होतें. त्याची तालीम कंपनींत चालली होती. याचा पहिला प्रयोग गंधर्व नाटक मंडळीनें १०।१२।१६ रोजीं मुंबईस एलफिन्स्टन थिएटरमध्यें संपूर्ण वैभवांत केला. स्वयंवर नाटकाचें वैशिष्ट्य त्याच्या इतर परिणाम-कारक नाट्यगुणापेक्षांहि रुक्मिणीची वैशिष्ट्यपूर्ण भूमिका यांत आहे. यामुळें या नाटकांस अत्यंत लोकप्रियता प्राप्त झाली. या लोकप्रियतेचें श्रेय रुक्मिणीची भूमिका अत्यंत तन्मयतेनें करणारे सुप्रसिद्ध नटवर्य बालगंधर्व यांचेकडेहि आहे. गंधर्व नाटक मंडळीला या नाटकानें वैभवसंपन्न केलें. व लौकिकाच्या शिखरावर अधिष्ठित केलें. इतर नाटकांपेक्षां या नाटकानें काकांना जास्त आर्थिक लाभ करून दिला. इतकेंच नव्हे तर संगीत नाटककार अशी त्यांची लोकप्रियता वाढली. खुद्द काकासाहेब आपल्या नाटकाच्या लोकप्रियतेपेक्षां किंवा नाट्यतंत्रापेक्षां नाटकांत अनुस्यूत अस-लेल्या जीवनाच्या तत्त्वज्ञानावर आपलें लक्ष केंद्रीत करीत. ही त्यांची नाट्य-लेखनाची मनोभूमिका या नाटकानंतर ६ महिन्यांतच पुण्यास भारतनाट्य-समाजातर्फे भरलेल्या तेराव्या नाट्य संमेलनाच्या अध्यक्षीय भाषणांत त्यांनीं विशद केली आहे. काकासाहेबांच्या नाट्यजीवनाचें वास्तव प्रतिबिंब या भाषणांत दिसून येत आहे. आपल्या नाट्यलेखनाची जगूं काय कैफियत त्या भाषणांत त्यांनीं दिलेली आहे.

काकासाहेबांनीं केलेल्या सुंदर भाषणांत हेच विचार पुढीलप्रमाणें मार्मिक रीतीनें मांडले आहेतः—

" रणांगणापासून जसा वीर वृत्तीचा उगम तशीच पुरुषार्थापासून, वीर वृत्तीपासून, राजवैभवापासून, रसाची–काव्याचीहि–उत्पत्ति आहे. आम्हां कवींच्या मागोमाग वीर पुरुष किंवा वीरवृत्तीच्या मागोमाग आम्ही असा हा वीर्य व रस यांमधील अन्योन्य संबंध आहे. ' माझा हिंदुस्थान ' माझा महाराष्ट्र, वीर पुरुषांनीं केव्हां गजबजून जाईल, यश उज्ज्वल स्वरूपानें केव्हां वावरूं लागेल, अशी तळमळ कवींना लागून राहिलेली असते.

हरिकीर्तनसंस्थेपासूनच नाट्यकलेचा महाराष्ट्रांत उदय झाला. पूर्वी जे पंडित, शास्त्री, कथेकरी होते तेच स्वराज्यकाळीं राजकारणांत पडले. रामशास्त्री इतके निःस्पृह व विरक्त कीं घरामध्यें फक्त एका दिवसाची सामुग्री ठेवावयाची, पण तेच राजकारण करीत होते. त्यांचा निःस्पृहपणा एवढा कीं त्यांनीं स्वतःच्या संसारावर पाणी सोडलें. पण राघोबाला देहान्त शिक्षा फर्माविली. त्यावेळीं लोकांना शास्त्री लोक महाभारताचें शिक्षण देत. पुढें स्वराज्य गेलें. पूर्वीचीच संस्था, तेच शास्त्री, पुन्हां इंग्रजींत निराळ्या रूपानें पुढें आले. कृष्णशास्त्री, विष्णुशास्त्री, यांनींच आपल्यापुढें बी. ए. एम्. ए. पदव्या लावून लोकशिक्षणाचें काम अंगावर घेतलें. विष्णुशास्त्र्यांनीं न्यू स्कूल काढलें तेव्हां हेच हरदास पुराणिक तेथें गोळा झाले. त्याच प्रभावळींत रा. देवल प्रगट झाले. या रामशास्त्र्यांच्याच स्वार्थत्यागानें व निःस्पृहपणानें ' केसरी ' काढला व चालविला. त्यांनीं सरकारवर स्पष्ट व निर्भीड टीका करून आपला निःस्पृहपणा सिद्ध केला. तेच हे शास्त्री टिळकांच्याच जवळ राहिलेलें आश्रित पुराणिक पुढें नाटककार बनले. या टिळकांच्या पूर्वीच्या आश्रित पुराणिकांनीं ' केसरी 'सोडल्यावर जायचें कुठें ? परिस्थितीप्रमाणें नाटककार व्हावें लागले. हें सारें पूर्वसंस्थेला धरूनच आहे. हे शास्त्री जसे पुढें नाटककार बनले तसे हरिदास नट बनले.

सध्याचे गंधर्व कंपनींतील हीरो हरिदासच होते. हे असेंच आहे. लोकांमध्यें मिसळून जागृति करावयाची ही महाराष्ट्राची पुरातन पद्धतीच आहे.”

‘दुनियेचें कल्याण मी करीन’ अशी वीरवृत्ति ज्यांच्यांत आहे त्यांची कीर्ति कवींनीं गायची नाहीं, तर काय डुकरांनी गायची? संसारी जनास कर्मयोगाला प्रवृत्त करणें हें वीरांचें काम, हें कवींचें काम! राष्ट्राला सुखी करीन हा पीळ वीरांना पडेल तेव्हां कवींच्या अंतःकरणांत कालवाकालव होईल, तो काव्य बोलेल, तो रस ओतील, तो नाटक गाईल. तपःसामर्थ्य वाढवा, पुरुषार्थाकडे दृष्टि लावा, म्हणजे काव्यरस सहज प्रकट होईल.”

काकासाहेबांचें काव्यपूर्ण ‘स्वयंवर’ नाटक रंगभूमिवर आले त्या सुमारास घरीं त्यांची दुसरी मुलगी शांताबाई हिच्या लग्नाच्या वाटाघाटी चालू होत्या. शांता फार गोड स्वभावाची व हुशार मुलगी होती. लहानपणापासूनच तिला वाचनाचा व कविता करण्याचा नाद होता. तीनही मुलींमध्यें काकासाहेबांची ती विशेष आवडती होती. तिच्या वर संशोधनाला त्यांना फार वेळ घालवावा लागला नाहीं. जावळखोऱ्यांतील मेढ्याचे जमीनदार श्री. गोपाळराव करंदीकर यांच्याशीं तिचा विवाह ठरविणेंत आला, व काकासाहेबांच्या त्या वेळच्या सुखासमाधानीं परिस्थितीचा द्योतक असा लग्नसमारंभाचा सोहळा अवश्य त्या थाटमाटानें करण्यांत आला.

## अथणी परिषद्

यानंतर थोड्याच दिवसांत लोकमान्यांनीं कर्नाटकचा दौरा घेण्याचें ठरविलें. कर्नाटकचे पुढारी गंगाधरराव देशपांडे यांनीं बेळगांव जिल्हा परिषद् यावेळीं अथणी येथें भरवावी असें निश्चित केलें. लोकमान्यांच्या स्वराज्यसंग्राचा संदेश जनतेस उत्तम रीतीनें पटवून देईल असा प्रभावी अध्यक्ष पाहिजे म्हणून सर्वांच्या विचारें काकासाहेबांची अध्यक्षपदीं योजना

अथणी परिषद्



मध्यभागीं अध्यक्षस्थानीं परिषदेचे अध्यक्ष दे. भ. काकासाहेब खाडिलकर असून त्यांचे उजवीकडे दे. भ. गंगाधरराव देशपांडे आहेत व डावे बाजूस लोकमान्य टिळक भाषण करीत आहेत.

करण्यांत आली. अनेक महत्त्वाचे प्रश्न परिषदेपुढें होते. कर्नाटकचे शेंकडों प्रतिनिधी अथणीस जमले होते. जनसमुदाय अफाट होता. काकासाहेबांचे त्यावेळचे अध्यक्ष या नात्याचें भाषण, त्यांच्या परिणामकारक वक्तृत्वाचा उत्तम आदर्श म्हणून समजलें गेलें. त्यावेळीं ' लाऊड स्पीकर्स ' नव्हते. तरीही त्या अफाट जनसम्मर्दापुढें त्यांनीं आपल्या भरदार आवाजांत असें सुंदर भाषण केलें कीं, लोक तें ऐकत असतां मंत्रमुग्ध नागाप्रमाणें डुलत होते. होमरूलसारखा विषय, अथणीस जमलेला दे. भ. गंगाधरराव यांच्या तालमींत तयार झालेला अफाट श्रोतृसमाज, मग काकांच्या खणखणीत वाणीला अधिकच तेज चढलें यांत नवल काय!

### अध्यक्षीय भाषण

आपल्या अध्यक्षीय भाषणांत काकासाहेब खाडिलकर यांनीं महायुद्धामुळें मिळालेल्या संधीचें पुढीलप्रमाणें मार्मिक विवेचन केलें आहे:—

"बेळगांव हा पुढें गेलेला व जोरकस जिल्हा आहे. पुणें, मुंबई वगैरे ठिकाणीं राजकारणासंबंधानें विचार होतो. पण त्याची अंमलबजावणी बेळगांव जिल्ह्यांत नेटानें केली जाते. असा आजपर्यंतचा अनुभव आहे. रणांगणावर हिंदुस्थानचें रक्षण करण्याचे कामीं पांच शतकापूर्वी कर्नाटकांतील निश्चयी व चिकाटीच्या शूर लढवय्यांनीं पुढाकार घेतला होता. कर्नाटकांतील लोकांच्या अंगचा हा गुण अद्याप नष्ट झालेला नसून सांप्रतच्या चळवळीच्या काळांत बेळगांव जिल्ह्यांतील लोकांनीं धमकीनें पुढें येऊन या चळवळीस जोराचा पाठिंबा दिला आहे. बेळगांव जिल्हा जसा जोरकस आहे तसाच भांडखोरपणाचा दुर्गुणही त्यांचें अंगीं वसलेला दिसून येतो. पण देशहिताला विघातक होईल इतका या दुर्गुणाचा फैलाव होईल असें मला वाटत नाहीं. सध्यांचा स्वराज्याचा काल आहे. हिंदुस्थानच्या स्वराज्याच्या योजनेसंबंधानें विचार करण्याकरितां मि. मॉंटेग्यूसाहेब हिंदुस्थानांत दाखल झाले आहेत. येता आठवडा, पंधरवडा, महिना हिंदुस्थानच्या

इतिहासांत चिरस्मरणीय होईल यांत शंका नाहीं. हिंदुस्थानच्या उद्धाराचें जें कार्य मि. मॉंटेग्यू यांनीं हातीं घेतलें आहे त्यांत त्यांना यश मिळून हिंदुस्थानच्या भावी इतिहासांत त्यांचें आगमन सोनेरी अक्षरांनीं लिहून ठेवण्याइतके शुभप्रद होवो अशी माझी परमेश्वराजवळ प्रार्थना आहे. मि. मॉंटेग्यू हे कट्टे उदारमतवादी आहेत. वहिवाटलेला रस्ता उगाच कां बदलावा, अशा मताचे ते नसून माझे पाय जेथें पडतील तेथें नवीन रस्ता निघेल; अशा हिमतीचें व तडफेचे ते आहेत. हिंदुस्थानची राज्यपद्धति मृतवत् झाली आहे असें पार्लमेंटमध्यें त्यांनीं स्पष्टपणें सांगितलें व हिंदी राजकारणांत नवजीवनाचा संचार करून हिंदुस्थानास ऊर्जित दशेला आणण्याच्या उद्देशानें हिंदुस्थानांत येण्याचा त्यांनीं निश्चय केला. मेसापोटेमिया प्रकरणासंबंधानें त्यांनीं पार्लमेंटमध्यें भाषण केल्यावर त्यांना हिंदुस्थानचे स्टेटसेक्रेटरी नेमण्यांत येऊन त्यांना हिंदुस्थानांत पाठविलें आहे. त्यांच्या सभोंवतीं अधिकारी वर्गाचें कुंपण घालण्यांत आलें आहे आणि हिंदुस्थानांत असेतोंपर्यंत जाहीर रीतीनें भाषण करून आपले विचार प्रकट करण्याची त्यांना मनाई करण्यांत आली आहे हें खरें! तरीपण शक्ति कोंडली गेल्यामुळें मॉंटेग्यू साहेबांच्या इच्छेला इंजिनाचें सामर्थ्य प्राप्त होऊन स्वराज्याच्या चळवळीला ते जोराची गति देतील अशी माझी खात्री आहे.

महायुद्ध सुरू झाल्यापासून इंग्लंडला द्रव्यबलाची व मनुष्यबलाची अधिकाधिक गरज भासूं लागली. हिंदुस्थानांत युद्धकर्ज म्हणून कांहीं कोटी रुपये वसूल करण्यांत आले व आजपर्यंत ७।८ लाख सैन्यही हिंदुस्थानांत उभारण्यांत आले. पण हिंदुस्थानच्या लोकसंख्येच्या मानानें ७।८ लाख सैन्य म्हणजे कांहींच नव्हे असें ब्रिटिश मुत्सद्यांना वाटूं लागून महायुद्धाच्या कामीं हिंदुस्थानकडून व्हावी तशी मदत न होण्याचीं कारणें शोधून काढण्याची त्यांना बुद्धि झाली; व हिंदुस्थानांतील राजकीय चळवळ शांत करून युद्धाच्या कामीं हिंदुस्थानांतून शक्य ती मदत मिळविण्याकरितां

भावी हिंदी राज्यकारभारासंबंधानें धोरण जाहीर करावें असा इकडील अधिकाऱ्यांचाही ब्रिटिश मुत्सद्यांच्या मागें लकडा लागला. साम्राज्यासंबंधानें हिंदी लोकांना आधिक आपलेपणा वाटण्यास हिंदुस्थानास स्वराज्याचे हक्क देण्यांत आले पाहिजेत असें आमच्या पुढाऱ्यांनींही वारंवार बोलून दाखविलें. तेव्हां ह्या सर्व गोष्टींचा इष्ट तो परिणाम होऊन हिंदुस्थानास कांहीं तरी स्वराज्याचे हक्क देण्याचें ब्रिटिश मुत्सद्यांनीं निश्चित केलें आहे. हिंदी लोकांच्या—आमच्या स्वराज्य चालविण्याच्या-पात्रतेचें अवडंबर करून स्वराज्य मिळाल्यास हिंदुस्थानांत व्यापार, उद्योग वगैरे धंद्यांत घातलेलें भांडवल बुडेल अशा प्रकारचीं पोंचट कारणें पुढें मांडून कांहीं अँग्लो-इंडियन लोक उदार मतवादी ब्रिटिश मुत्सद्यांच्या या धोरणास अडथळा आणूं पहात आहेत. पण हे निव्वळ थोतांड असल्यामुळें हिंदुस्थानचें कांहीं नुकसान होईल अशी भीति बाळगण्याचें कारण नाहीं. हिंदुस्थानचें एक राष्ट्र बनावें, साम्राज्यांतील इतर घटकावयवाप्रमाणें हिंदुस्थानचें सामर्थ्य वाढावें, हिंदुस्थानचें वैभव वाढून हिंदुस्थानकडून साम्राज्याला द्रव्याची मदत व्हावी व येथें लाखों सैन्य उभारतां यावें, हिंदुस्थानांत सक्तीचें शिक्षण सुरू व्हावें, शास्त्रीय संशोधन संस्था स्थापन व्हाव्या, प्रचंड कारखाने निघावे, हिंदी लोकांना तोफा ओततां याव्या, विमानें तयार करतां यावीं, जहाजें बांधतां यावीं अशा रीतीनें सर्व बाजूंनीं हिंदुस्थानचें सामर्थ्य वृद्धिंगत होण्यास हिंदुस्थानचा कारभार हिंदी लोकांनींच पाहिला पाहिजे ही गोष्ट आतां सर्वमान्य झाली आहे. लॉर्ड कर्झन साहेबांनींही ह्या गोष्टीला आतां आपली संमति दिली आहे. साम्राज्यांतील एक घटकावयव ह्या दृष्टीनें हिंदुस्थानचें सामर्थ्य व वैभव वाढण्यास हिंदुस्थानास स्वराज्याचे हक्क देणें अपरिहार्य आहे असें ब्रिटिश मुत्सद्यांना वाटूं लागलें आहे. ही अनुकूल परिस्थिति लक्षांत घेऊन हिंदी लोकांनीं एकमतानें स्वराज्याची मागणी करणें जरूर आहे. राष्ट्रीय सभा व मुस्लीम लीग

ह्यांनीं करार केलेल्या स्वराज्याच्या योजनेंत देखील सर्व जातींच्या व सर्व धर्मांच्या लोकांनीं एकदिलानें आपली अनुमति 'दिली पाहिजे. जातिमत्सराला राजकारणांत बिलकुल वाव मिळतां उपयोगी नाहीं. जातवार प्रतिनिधी मागण्याची ही चळवळ आत्मघातकीपणाची आहे. जातिमत्सरामुळें आपल्या देशाचें आतांपर्यंत अत्यंत नुकसान झालें आहे. पार्शी, मुसलमान, लिंगायत, जैन ह्या जातिविशिष्ट भावनांचा लोप होऊन राजकारणांत 'राष्ट्रदेवो भव' ह्या एकाच भावनेचा प्रसार झाला पाहिजे."

या परिषदेनंतर दौऱ्यावरील मंडळी निपाणीस गेली. तेथील जनतेनें लोकमान्यांना गांवातर्फे मानपत्र अर्पण करण्याचा समारंभ केला. काकांचें 'स्वराज्यांची मागणी' या विषयावर उद्बोधक भाषण झालें. लोकमान्यच अध्यक्षस्थानीं होते. कर्नाटकच्या या यशस्वी दौऱ्यानंतर लोकमान्य टिळकांनीं वऱ्हाड नागपूरकडे पुन्हां दौरा काढिला. त्यांत काकासाहेब त्यांचे बरोबर होते. हा दौऱ्याचा कार्यक्रम अत्यंत गर्दीचा व धूमधडाक्याचा झाला. मोटारीचा सारखा प्रवास व सारखीं व्याख्यानें. श्री. दादासाहेब खापर्डे, वीर वामनराव जोशी वगैरे मंडळींनीं दौऱ्याचा कार्यक्रम काळजीपूर्वक आंखला होता. ठिकठिकाणीं सभा, परिषदा, मानपत्रसमारंभ व थैली अर्पण अशा कार्यक्रमांची गर्दी झाली. दौऱ्यांत काकासाहेब, गंगाधरराव देशपांडे, वीर वामनराव, बापूजी अणे वगैरे मंडळी लोकमान्यांच्या प्रकृतीच्या दृष्टीनें त्यांना कमींत कमी श्रम पडावे म्हणून काळजी घेत असत. या दौऱ्यांत स्वराज्याच्या मागणीबरोबर लष्करभरतीच्या प्रश्नावर व्याख्यानें होत. हा विषय काकासाहेब फार परिणामकारक पद्धतीनें मांडीत. या दौऱ्यांतील लोकमान्यांच्या या विषयावरील भाषणांचा मुद्दाम गैरसमज करून, सरकारी अधिकाऱ्यांनीं टिळकांना दिल्लीला जाण्याची बंदी केली होती. याच वेळीं सेक्रेटरी ऑफ स्टेट मॉंटेग्यू साहेब दिल्लीस अनेक शिष्टमंडळांच्या मुलाखती

नागपूर-वऱ्हाडचा होमरूल दौरा



खुर्चीवर—१ डॉ. मुंजे, ३ लोकमान्य, ४ काकासाहेब.

बेत होते. टिळकांच्या स्वराज्यसंघानेंही मँटेग्यू साहेबाकडे होमरूलचा अर्ज दाखल केला होता व या मागणीच्या मागें लोकमताचा केवढा पाठिंबा आहे हेंच या दौऱ्यांनीं राज्यकर्त्यांस दाखवावयाचें होतें. त्या दृष्टीनें हे स्वराज्यसंघाचे होमरूल दौरे अत्यंत यशस्वी झाले. या दौऱ्यांत काकासाहेबांची लोकमान्यांचा उजवा हात समजून विश्वास टाकण्याइतकी कर्तव्य-तत्परता व एकनिष्ठा दिसून आली. पण हे दौरे चालू असतांनाच या पुढील चळवळ हिंदुस्थानापेक्षां विलायतेंत करणें जरूर आहे हें स्पष्ट झालें होतें. विलायतेस पुढें गेलेल्या बॅ. बॅप्टिस्टा यांचाही आग्रह तसाच होता. चिरोलच्या खटल्याच्या दृष्टीनेंही लोकमान्यांना विलायतेस जाणें जरूर होतें; त्यामुळें कोंकण, वऱ्हाड, नागपूर, कर्नाटक वगैरे अनेक भागांतील दौरे आटोपल्यावर लोकमान्यांनीं विलायतेस जाण्याचें निश्चित केलें.

## केसरीचे पुनः जाहीर संपादक

लोकमान्य विलायतेस जाण्याचें ठरल्याबरोबर, त्यांच्याबरोबर कोणी जावयाचे व केसरी–मराठ्याची व्यवस्था कशी करावयाची याची बरीच वाटाघाट झाली. ज्या कामाकरितां विलायतची सफर ठरली होती त्या कामाच्या दृष्टीनें उत्कृष्ट सल्लागार, अभिजात 'परराष्ट्रमंत्री' आणि एकनिष्ठ मदतगार अशा दृष्टीनें काकासाहेबांना बरोबर नेण्याचा लोकमान्यांचा बेत होता. पण इतर अनेक कारणांसाठीं शेवटीं श्री. नरसोपंत केळकरच त्यांच्या बरोबर गेले, व केसरीचे संपादक म्हणून काकासाहेबांच्या नांवाचें डिक्लेरेशन होऊन लोकमान्यांच्या अनुपस्थितींत देशाच्या राजकारणाचें सुकाणूं त्यांच्या हातीं देण्यांत आलें.

लोकमान्य विलायतेंत गेल्यानंतरच्या काळांत हिंदुस्थानांत विविध महत्त्वाच्या घडामोडी होत होत्या. महात्मा गांधींचें राजकीय क्षेत्रांतील पदार्पण अभिनव प्रकारचें होतें. लॉर्ड विलिंग्डन यांच्या मुंबई स्मारकाबाबत चळवळ चालू होती. यांतच देशांत चालू असलेल्या

किरकोळ दंग्यांचें निमित्त करून व बोल्शेविझमच्या संकटाचा बागुलबुवा दाखवून रौलेट ॲक्ट पास करून घेण्याचें अत्यंत निंद्य व दुराग्रही वर्तन सरकारनें केलें. या उद्वेगांतून महात्माजीसारख्या सत्त्वशील पुढाऱ्यांकडून सत्याग्रहाची चळवळ सुरू झाली व यांतूनच हिंदी जनतेच्या हृदयास घरें पाडणारें 'जालियनवाला बागेचें' हत्याकांड निर्माण झालें. यावेळीं महात्माजींची सत्याग्रहाची नवी धडक काकासाहेबांनीं जोरानें उचलून धरली. ८ एप्रिल १९१९ च्या केसरींत त्यांनीं पुढीलप्रमाणें लोकांना उपदेश केला आहे.

"महात्मा गांधी हेही केवळ कायदे मोडण्यानें निंदेला किंवा तिरस्काराला पात्र होऊं शकत नाहींत. कायदा पाळणें ही बाबही कांहीं प्रसंगीं निंदास्पद ठरली जाईल; आणि कायदा मोडणें ही गोष्टही प्रसंगीं वीरांना, महात्म्यांना व तपस्व्यांना भूषणदायक होईल ...... कोणते कायदे कोणी व कसे मोडावयाचे यासंबंधानें शंकाकुशंका काढीत बसण्यापेक्षां आणि वृथा वादांत काळ घालविण्यापेक्षां निरनिराळ्या कमिट्यांशीं असला वादविवाद करून, निरनिराळीं मतें घेऊन महात्मा गांधी स्वतः जे कायदे मोडतील ते सर्व कायदे आपआपल्या शक्तीप्रमाणें व बलाप्रमाणें सांप्रतच्या प्रसंगीं कोणाही देशभक्तानें मोडल्यास त्याला पाप लागण्याची बिलकुल भीति नाहीं; यांत बिलकुल दोष नाहीं; प्रत्यवाय नाहीं; पूर्वीच्या कामाचा नाश नाहीं. शक्तिनुसार थोडेंसें झालें तरी तें कल्याणप्रदच होऊन निदान रौलेट कायद्याचें संकट टळेल. यशापयश सर्वांच्या एकजुटीवर व मदतीवर अवलंबून आहे."

हिंदुस्थानांत अशा घडामोडी चालू असतां लोकमान्य विलायतेंत ज्या ज्या तऱ्हेची चळवळ करीत होते त्याचा त्याचा केसरींतून परामर्ष घेतला जात होता. चिरोल खटला टिळकांच्या विरुद्ध गेला म्हणून त्यांच्याविषयींची लोकांची आदरबुद्धि उलट वाढली. या निमित्तानें त्यांची सत्याची बाजू

व तिच्यामागील त्यांचा खंबीरपणा जगाच्या निदर्शनास आल्यानें सर्वत्र त्यांचा लौकिक पसरला. हा खटला संपण्याच्या सुमारास महायुद्धही संपलें. मॉंटेग्यू-चेम्स्फर्ड सुधारणा सरकारनें नुकत्याच जाहीर केल्या होत्या. अशा स्थितींत १९१९ च्या नोव्हेंबर महिन्यांत लोकमान्य विलायतेहून हिंदुस्थानास परत आले.



: १ :

# नाट्याचार्यांचा जयजयकार



"राष्ट्राला सुखी करीन हा पीळ वीरांना पडेल तेव्हां कवीच्या अन्तःकरणांत कालवाकालव होईल, तो काव्य बोलेल, तो रस ओतील, तो नाटक गाईल."

"ज्यांचें राष्ट्रांच्या वीरवृत्तीशीं, परमपुरुषार्थाशीं तादात्म्य झालें तोच उत्तम नाटककार व जो स्वतःच्या भूमिकेशीं तादात्म्य पावला तोच उत्तम नट."

—काकासाहेब खाडिलकर,

अध्यक्ष नाट्यसंमेलन १९१७.

काकासाहेबांच्या चरित्राच्या ज्या कालखंडापर्यंत आपण आलों, तो कालखंड काकासाहेबांच्या नाट्यलेखनाच्या उत्कर्षाचा मुख्य काल होय. त्यांनीं नाट्य लेखनास प्रारंभ केव्हां केला व वेळोवेळीं लिहिलेलीं नाटकें कोणत्या परिस्थितींत व कोणत्या मनोवृत्तींत लिहिलीं गेलीं व यशस्वी झालीं

याबद्दल त्या प्रत्येक नाटकाचे लेखनकाल प्रसंगीं–या पूर्वीच्या प्रकरणांत– उल्लेख व थोडीबहुत चर्चा केली असली तरी व पुढेंही प्रसंगानें करणेंची असली तरी आतां ज्या कालखंडाच्या अखेरीस त्यांचें चरित्र आलें आहे त्या कालांत काकासाहेबांचें 'नाट्याचार्य' हें स्थान निश्चित झालें होतें म्हणून त्यांच्या ह्यापूर्वीच्या व ह्यानंतरच्या सर्वच नाट्यलेखनाचा संकलित ऊहापोह करणें उचित होईल.

काकासाहेबांच्या नाट्यलेखनाचे ऐतिहासिक दृष्ट्या तीन भाग पडतील. इ. स. १८९३ ते १९१०, इ. स. १९१० ते १९२० व इ. स. १९२० ते १९४३ असे सालवारीनें हे विभाग कल्पितां येतील. हा काल चार तपांपेक्षां जास्त आहे आणि तो भरतखंडाच्या राजकीय इतिहासाच्या पार्श्वभूमीनें पाहतां तीन वैशिष्ट्यपूर्ण पण एकमेकांशीं भिन्न अशा निरनिराळ्या अवस्थांतून गेलेला आहे असें दिसून येईल. ( १ ) लोकमान्यांच्या असंतोषाच्या क्रांतिवृत्तीचा काळ, ( २ ) स्वराज्याच्या सनदशीर चळवळीचा काळ, ( ३ ) महात्माजींच्या असहकार व सत्याग्रहाचा काळ असे हे तीन कालखंड आहेत. नाट्यवाङ्मयाच्या दृष्टीनेंही ह्या कालाचीं वैशिष्ट्यें अशींच भिन्न आहेत व ह्या सगळ्यांचा परिणाम काकासाहेबांच्या नाट्यकृतीवर झालेला आहे.

काकासाहेबांनीं विद्यार्थिदशेंत एक नाटक लिहिलें असलें तरी तें नाटक कोणतें लिहिलें हें जगापुढें नसल्यानें त्यांचें प्रसिद्ध झालेलें पहिलें नाटक 'सवाई माधवराव यांचा मृत्यु' हेंच होय. ज्या कालांत हें लिहिलें गेलें त्या कालापासूनच ह्या ऐतिहासिक निरीक्षणाला प्रारंभ होणें साहाजिक आहे. हा काल जुन्या पद्धतीचीं नटीसूत्रधारांचीं पौराणिक नाटकें मागें पडून पाश्चात्य नाटककारांच्या भाषांतरित नाटकांची पकड सुशिक्षित जनमनावर बसूं लागली होती असा होता. श्री. गोविंदराव देवल व श्री. शंकरराव पाटणकर हे काम करीत असलेले 'झुंजारराव' नाटक, प्रो. वासुदेवराव

केळकर यांनीं लिहिलेलें व शाहूनगरवासी नाटक कंपनी करीत असलेलें शेक्सपीयरचें भाषांतरित 'त्राटिका' नाटक, व श्री. आगरकरांनीं भाषांतर केलेलें 'हॅम्लेट' नाटक, अशा नाटकांनीं सर्वत्र खळबळ उडवून दिली होती. 'तरुणी शिक्षण नाटिकें' सारखीं सामाजिक प्रश्नावर लिहिलेलीं नाटकेंहि —त्यांतील विवाद्य विषयामुळें—लोकप्रिय झालेलीं होतीं व श्री. अण्णासाहेब किर्लोस्कर यांचीं सौभद्रादि नाटकें संगीतामुळें रसिकांचें आकर्षण करीत होतीं.

अशा या कालांत काकासाहेब कॉलेजचे विद्यार्थी म्हणून पुण्यांत वावरत असल्यानें तत्कालीन परिस्थितीचा परिणाम त्यांचेवर होत होता. काकासाहेबांचें स्वयंभू नाटकी मन हें सर्व संस्कार घेत असतांनाच शेक्सपीयरच्या नाट्यवाङ्मयाचें अध्ययन चालू असल्यानें त्यांच्या पहिल्या नाटकांवर——म्हणजे 'सवाई माधवरावाचा मृत्यु' या नाटकावर—या सर्व परिस्थितीचा परिणाम दिसून येतो. विद्यार्थिदशेपासून कालिदास, भवभूति वगैरे संस्कृत नाटककार व शेक्स्पीयर, टेनिसनसारखे पाश्चात्य कवि यांच्या वाङ्मयानें त्यांच्या उपजत नाट्यकलेवर संस्कार झाले होते व याचा परिणाम त्यांच्या नाट्यरचनेंत दिसूं लागला व त्यांच्या या अभिनव कौशल्यानें ते बुद्धिप्रधान प्रेक्षकांचें समाधान करूं शकले. त्यांची उपजत नाट्यबुद्धीच अशी विशाल होती कीं, शेक्स्पीयर, भवभूति सारख्यांनीं लिहिलेल्या नाटकासारखीं नाटकें आपण लिहूंच असा आत्मविश्वास त्यांना वाटत असला पाहिजे. व यामुळेंच काकासाहेबांनीं लिहिलेल्या पहिल्या नाटकांतच शेक्स्पीयरच्या दोन नाटकांतील हॅम्लेट व अयागो या दोन उत्कृष्ट भूमिकांना एकत्रित रंगविण्याचा साहसी व यशस्वी विक्रम त्यांनीं केला. त्यामुळें नाट्यसृष्टींतील पहिल्या पदार्पणानेंच काकासाहेबांनीं नाट्यसृष्टि अर्धी जिंकली.

नाटक हें दृश्यकाव्य असल्यानें 'कांचनगडची मोहना' व 'कीचकवध' ह्या दोन नाटकांच्या प्रत्यक्ष प्रयोगानेंच त्यांचे श्रेष्ठ नाटककार म्हणून पद

तेरावें नाट्यसंमेलन



गंधर्व नाटक मंडळीतर्फे किर्लोस्कर नाटकगृहांत ता. ४।५।१९१७ रोजीं रा. खाडिलकर यांच्या अध्यक्षतेखालीं

सिद्ध केलें; व एका नव्या युगाचे ते प्रवर्तक ठरले. या त्यांच्या नव्या नाट्ययुगांत 'बायकांचें बंड', 'भाऊबंदकी', 'प्रेमध्वज', 'मानापमान', 'सत्त्वपरीक्षा', 'विद्याहरण', 'स्वयंवर' व 'द्रौपदी' हीं नाटकें लिहिलीं गेलीं. या नाट्यवाङ्मयामुळें त्यांचा सतत जयजयकारच झाला. तें यश त्यांच्या यानंतर लिहिलेल्या 'मेनका', 'सवतीमत्सर', 'सावित्री', 'त्रिदंडी संन्यास' ह्या तत्त्वप्रधान नाटकांतही भरून राहिलें. ह्या सर्व नाट्यवाङ्मयाचा त्या त्या कालच्या रंगभूमीवर व समाजावर जो परिणाम झाला तो त्यावेळच्या इतर नाटककारावरही झालेला दिसून आला; व ह्या दृष्टीनें एकप्रकारें काकासाहेब हे इतर नाटककारांना मार्गदर्शक ठरले.

## नाट्याचा पाया राष्ट्रोद्धार

काकासाहेबांच्या ह्या अलौकिक यशाचें मूळ कशांत आहे याचा विचार करतांना ज्या देशाच्या विशिष्ट परिस्थितींत तीं नाटकें लिहिलीं त्याचा त्यांच्या लेखनावर जो परिणाम झाला त्याचा विचार करणें उद्बोधक होईल. वाङ्मयीन मूल्यें ठरवितांना राजकीय परिस्थितीशीं त्यांचा असलेला संबंध विचारांत घेणें भागच आहे. ह्याबाबत काकासाहेबांनींच १९१७ सालच्या नाट्यसंमेलनांतील अध्यक्षीय भाषणांत उद्बोधक चर्चा केली आहे. तिचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. काकासाहेबांनीं नाटक लिहिण्यास प्रारंभ केला तो लोकमान्य टिळकांचा 'राजकीय असंतुष्टता' निर्माण करण्याचा काल होता. स्वातंत्र्यप्राप्तीचे प्रयत्न होण्यास पारतंत्र्याची चीड निर्माण झाली पाहिजे अशी काकासाहेबांसारख्या वाङ्मयनिर्मात्यांची त्यावेळची दृष्टि होती. राजकीय अडचणीच्या परिस्थितींत नाट्यवाङ्मया-सारख्या जनमनरंजक पण अप्रत्यक्ष मार्गानें राष्ट्रीय वृत्ति निर्माण करण्याचा त्यांचा प्रयत्न होता. व ह्या परिस्थितीच्या छटा त्या कालांतील त्यांच्या प्रत्येक नाटकांत दाखवितां येतील. विशिष्ट दृष्टीनें ग्रंथवाचन आणि देश-परिस्थिति निरीक्षण करून लोकांचीं अंतःकरणें हलवितील अशा प्रभावी

भूमिका निर्माण करण्याचें असाधारण कौशल्य हाच काकासाहेबांच्या नाटकांचा अभिजातपणा आहे.

ते ज्या राजकीय चळवळींत मोठया उमेदीनें पडले होते त्यांत भेटणाऱ्या अनेक लहानथोर पुरुषांचे स्वभाव हाही त्यांच्या निरीक्षणाचा विषय होता. शेक्स्पीयर, भवभूतीसारख्या नाटककारांच्या कृतींनीं त्यांच्या मनाची पकड घेतली असली तरी काकासाहेबांच्या नाट्यकृति विशिष्ट तऱ्हेच्या होण्यास त्या कालांतील परिस्थितीचें सूक्ष्म निरीक्षण हेंही एक महत्त्वाचें कारण आहे. नाटककार हा आपल्या मनांत वावरणारीं कल्पनाचित्रें, परंपरा व परिस्थिति यांच्या मिश्रणानें बनवीत असतो. हीं चित्रें ध्येयप्रवण वृत्तीनें वठविणारे काकासाहेबांसारखे एकादेच ! त्यांनीं आपली नाट्यसृष्टि त्या त्या कालाला प्रभावी वाटतील अशी कल्पून कर्तृत्ववान् आणि महत्त्वाकांक्षी भूमिका निर्माण केल्या. अशा भूमिका लोकांच्यापुढें मांडतांना त्यांच्याबद्दल लोकांना आपलेपणा वाटून त्यांच्या मनांतील ध्येयवृत्ति जागृत व्हावी याकरितांच त्यांनीं पौराणिक व ऐतिहासिक कथानकांची निवड हेतुपुरस्सर केली. अशा पौराणिक व ऐतिहासिक भूमिकाबद्दल लोकांना जो स्वाभाविक जिव्हाळा वाटतो त्यामुळें त्या नाट्यकृतीची परिणामकारकता सुलभतेनें होते. जुन्या ऐतिहासिक व पौराणिक व्यक्तींना त्यांनीं आपल्या कल्पकतेनें नवा तजेला देऊन प्रभावशाली लेखणीनें त्या भूमिकेंत जोरकस जीव घातला.

'सवाई माधवराव यांचा मृत्यु' या नाटकाच्या द्वारें मराठी नाट्याच्या प्रदेशांत पदार्पण केल्यावर त्याच्या जहाल स्वभाववृत्तीला नाट्यदेवतेचें जें दर्शन झालें त्याचा परिणाम म्हणजे त्याचें 'कांचनगडची मोहना' हें नाटक होय. काकासाहेबांच्या आयुष्यक्रमाचा व त्यांच्या वीरवृत्तीचा व करारी बाण्याचा विचार केल्यास त्यांच्या तरुणपणच्या ताज्या रक्तानें उसळणाऱ्या लेखणीनें 'कांचनगडच्या मोहनेंत' स्वराज्याकरितां तळमळीचे प्रयत्न करून आत्मत्याग करणारी 'प्रतापरावाची' भूमिका निर्माण केली.

कांचनगडच्या मोहनेंतील पांचव्या अंकांतील दुसऱ्या प्रवेशांत शत्रूनें घेरलेल्या स्थितींत प्रतापरावांचें तोंडीं काकासाहेबांनीं घातलेलें पुढील भाषण त्या कालांतील परिस्थितीचेंच द्योतक असल्यानें त्या परिस्थितींत सांपडलेल्या जनतेच्या हृदयांत खोल घर केल्याशिवाय कसें राहिलें असेल?

"प्रतापराव:—संताजीराव, आमच्या चौपट पांचपट शत्रूचें सैन्य आहे. चारपांच हजार काटक अरब, रोहिले आहेत. किती तरी तोफा आहेत. ही भिकार टेकडी आमचें किती वेळ संरक्षण करणार? संताजीराव, आज मरण हें सर्वांच्या कपाळीं लिहिलेंच आहे. पण शत्रूचा पक्का सूड उगविण्याचा सर्वांनीं पक्का निश्चय केला पाहिजे. संताजीराव, आमची मान तुटेल, आमचीं हाडें चिंबून चिंबून जाऊन त्यांचा चुराडा होईल; पण संकटांना केसभरहि हार जाणार नाहीं, हें शत्रूला आज पक्कें समजूं द्या. म्हणजे आम्ही जिवंत राहून जें कार्य आमचे हातून पार पडणें अशक्य आहे तें कार्य आमचे मरणानें आपोआप होईल. आमचा काटकपणा, आमचें शौर्य, शरीरांत धुगधुगी असेतों आमची लढण्याची हौस ही विजापूरच्या बादशहाला कळूं द्या. लाखों फौजेनें विजापुरास गराडा दिला असतां पादशहास जी भीति वाटेल, त्याहून अधिक भीतीनें आमचें नांव निघण्याबरोबर पादशहा कांपूं लागेल. विजयानगराकरितां आम्ही किती हाल सोसले, धर्मासाठीं आम्हीं आपले प्राण कसे खर्ची घातले, ह्याची हकीकत तुमच्या देशांत चोहोंकडे पसरूं द्या. तुमच्या प्रत्येक खेड्यांत दवलतरावासारखे—संताजीरावासारखे—सेनानायक जन्मास येतील; आणि प्रत्येक झोपडींत ह्या माझ्या सेनेसारखे प्राणास प्राण देणारे शूरवीर निपजतील. तुमच्या देशभक्तीचें, तुमच्या धर्मनिष्ठेचें, शत्रूविषयींच्या अस्सल सूडांचें बीज तुम्ही आज ह्या भूमींत आपल्या मरणानें पेरीत आहांत. वीरहो, तुम्ही आज मरायला जात नाहीं तर एकाचे हजार, लाख होऊन तुमच्या शत्रूचा बी-मोड करण्याकरितां जात आहांत.'

प्रतापरावाच्या तोंडीं काकासाहेबांनीं हें भाषण १८९८ सालीं म्हणजे पन्नास वर्षांपूर्वी घातलें आहे हें लक्षांत घेणें जरूर आहे. आज स्वतंत्र झालेल्या भारताच्या वातावरणांतही वरील भाषणाची तेजस्विता सहज पटते आहे. मग पारतंत्र्यांतून मार्ग दिसत नव्हता अशा धुक्याच्या वेळीं—पन्नास वर्षांपूर्वी—स्वातंत्र्योत्सुक जनतेला ह्या भाषणानें प्रभावी मार्गदर्शन केलें असल्यास नवल कोणतें ?

त्यांचें कीचकवध नाटक या दृष्टीनें विशेष लक्षांत घेण्यासारखें आहे. ह्या नाट्यकृतिद्वारा काकासाहेबांनीं तत्कालीन परिस्थितीचें अप्रत्यक्षपणें नाट्यचित्र रेखाटून समाजाच्या आशाआकांक्षांना उत्तेजित केलें आहे. तो काल दास्यांत खितपतलेल्या भारतीय जनतेस अत्यंत तापदायक असा होता. कर्झनसारखे गोरे राजप्रतिनिधि उन्मत्तपणानें जनतेचा अपमान करीत होते. देशसेवेकरितां तळमळणाऱ्या देशसेवकांत दुफळी माजविण्यांत येत होती. लो. टिळकांसारख्या लोकोत्तर लोकनेत्यावर कारावासाची शिक्षा भोगण्याचें प्रसंग येत होते. या सर्व घटनांचा परिणाम काकासाहेबांच्यासारख्या कवि-मनावर होऊन त्याचा नाट्यात्मक आविष्कार त्यावेळीं त्यांनीं लिहिलेल्या निरनिराळ्या नाटकांत झाला व कीचकवध, भाऊबंदकी आणि सत्त्वपरीक्षा यासारखीं जनतेवर प्रभावी परिणाम करणारीं कलापूर्ण नाटकें लिहिलीं गेलीं.

कीचकवध नाटकांत तर कर्झनशहाच्या घमेंडखोर भाषणांचा व दडपशाहीचा बेमालूम प्रतिध्वनि कीचकाच्या भाषणांतून काकासाहेबांनीं उमटविला आहे. मुसलमान व मवाळांना गोंजारून घेऊन मागसलेल्यांचे कैवारी आहों असा बहाणा करून त्यांना जबाबदारीची जाणीव देण्याची कर्झनशहांची ऐट पुढील कीचकाच्या भाषणांत दिसून येत आहे.

“ **कीचकः**——सैरंध्री,...माझ्या नाटकशाळेंत राहूं देण्याचा मी तुला मान देत आहे—...माझ्या नाटकशाळेचा नियम असा आहे कीं, नाटक-

शाळेंत शिरण्यापूर्वी कोणाचा कसा दर्जा होता, उच्च कोण, नीच कोण, याची बिलकूल चौकशी करावयाची नसून नाटकशाळेंत शिरल्यावर सर्व नायका एकाच दर्जाच्या होतात."

कर्झनशहाच्या असल्या दमदाटीला, समानतेच्या पुराणाला व घातकी सहानुभूतीला हिंदमातेनें कसें खडखडीत उत्तर द्यावें हेंच काकासाहेबांनीं सैरंध्रीनें कीचकाला दिलेल्या पुढील उत्तरानें दिलें आहे.

**सैरंध्री** :—पाप्या! अनुकीचकांची तुला पूर्ण मदत असल्यामुळें विराट महाराजांना जरी तूं कस्पटाप्रमाणें लेखीत असलास, आणि मत्स्यदेशांत आपणाहून दुसरा कोणी श्रेष्ठ नाहीं अशी जरी घमेंड तुला वाटत असली, तरी सर्वांचा न्याय करण्यास परमेश्वर बसला आहे, हें ध्यानांत ठेव. साध्वीचा छळ करण्याच्या तुझ्या या पापामुळें तुझ्या शक्तीला कीड लागून अमर्याद वाटणारी तुझी सत्ता हां हां म्हणतां ढांसळून पडेल. चांडाळा, सदाचारी लोकांचा नाहक छळ करण्याच्या तुझ्या पापा-मुळें क्रुद्ध झालेल्या परमेश्वरी शक्तीचे दूत, तुझ्या पापाचा घडा केव्हां भरेल म्हणून, तुझ्या भोंवतीं घिरट्या घालीत असून तुझा बळी घेण्यास टपलेले आहेत.'

राजकीय पारतंत्र्याविरुद्ध चाललेल्या देशाच्या झगड्यांत जनतेचें धैर्य कायम ठेवावयाचें, आपसांतील दुहीचे दुष्परिणाम जनतेच्या मनावर बिंबवावयाचे व उच्च ध्येयासाठीं व लोककार्यासाठीं प्रयत्न करीत असतां पडतील ते क्लेश भोगायचे अशी तत्त्वनिष्ठ कलाकृति अशा नाटकांच्या द्वारें काकासाहेबांनीं लोकांपुढें ठेवली.

मानवी जीवनांत जीविताच्या मूल्याचें महत्त्व कळल्याशिवाय आत्मो-द्धाराचे प्रयत्न होऊं शकत नाहींत व त्याचे परिणाम टिकाऊ होत नाहींत असें काकासाहेबांचें तत्त्वज्ञान असल्यानें त्यांनीं राष्ट्रोद्धारवृत्तीची ही जाणीव निर्माण करण्याकरितां नाटकें लिहिलीं; म्हणून अज्ञातवासांतील पांडव,

सत्यप्रतिज्ञेकरितां राज्य सोडणारा त्यागी हरिश्चंद्र, देवशत्रु राक्षस यांच्या गुरूकडून-मोहाला बळी न पडतां-कर्तव्यतत्परतेनें विद्याहरण करणारा कच, व वचनपूर्तीसाठीं वनवास सोसणारे प्रभु रामचंद्र अशीं आदर्श स्वभावचित्रें त्यांनीं जनतेपुढें मांडलींत. काकासाहेबांच्या पहिल्या नाटकां-प्रमाणेंच नंतर लिहिलेल्या नाटकांतही त्यांच्या नाट्यतंत्राचे सर्व गुण प्रतीत होतात. त्यांच्या 'सवतमित्सर' नाटकांतील पुढील संवाद नवीन पद्धतीनें लिहिलेल्या शाश्वत तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें, रसोत्कर्ष, संघर्ष, रंगभूमी-वरील परिणामकारकता व प्रभावी भाषा ह्या दृष्टीनें मनन करण्याजोगा आहे.

(कौसल्येच्या मंदिरांत रामाच्या प्रतिज्ञेची हकीकत लक्ष्मण सांगतो तितक्यांत राम प्रवेश करतो.)

**राम**—रामाच्या प्रतिज्ञेचा भंग करण्याचें सामर्थ्य त्रिलोकांत कोणाच्याही अंगीं नाहीं.—आई, तुझा हा आवडता मुलगा पित्याचें वचन खरें करण्याकरितां वनवासाला जावयाला निघाला आहे.—मी माझ्या तोंडून हा वृत्तांत मातुश्रींना निवेदन करण्यापूर्वी मातुश्रीच्या कानावर पडून माझ्या हृदयावरचा भार जसा हलका झाला आहे, तसाच माझ्या वनवासाचा मार्ग आशीर्वाद देऊन सुखद करण्यास मातुश्रीचें पवित्र अंतःकरण समर्थ आहे. (पाया पडतो.)

**कौसल्या**—ऊठ रामा, ऊठ. रामा तुझें हृदय फुलाहून नाजूक व वज्राहून कठीण आहे, हें मला माहीत आहे. पण तितकी योग्यता माझी नाहीं.—वासराची ताटातूट झाली असतांना गाईची जी अवस्था होते ती अवस्था दुर्दैवानें माझी केली आहे.—रामा, तुला सोडून कोणाकडे पाहून मी दिवस कंठूं रे? सवतीनें झिडकारलें, तिकडून अपमान करण्यांत आला. देव नवसाला पावला नाहीं. कांहीं झालें तरी तुला पाहिलें म्हणजे माझें सर्व दुःख नाहींसें होतें.—सवतीनें मला पावलोपावलीं छळावें. अशा नरकांत मला

लोटून देऊन रामा, वनवासांत कोणतें तूं पुण्य संपादन करणार? जिवंतपणाच्या नरकयातनांतून आईला ज्या पुत्रानें सोडविलेलें नाहीं, त्या पुत्राला सद्गति मिळते का रे रामा?

**राम**—आई, तुझे हाल हा राम कसे करील? तुझ्या मनाला यातना होणार, पण दुर्दैवापुढें हात टेकणें मला भाग आहे.—सत्याची कांस धरणाऱ्यांना असल्या दुर्दैवाच्या टेंचा लागावयाच्याच—शांत चित्तानें सगळें दुःख सोसल्याशिवाय दुसरा मार्ग कोणता आहे?

**लक्ष्मण**—दुसरा मार्ग युद्धाचा आहे.—दुर्दैव—दुर्दैव—पराक्रमी पुरुषांनीं जर दैवावर हवाला दिला तर पराक्रम कशाला? दैव सर्व कांहीं करीतच आहे!—दादा, अश्वविद्या शिकलास कशाला? तुमच्या बाहूंत अजिंक्य शक्ति कशाला सांठवून ठेवली आहे? आपण खुशाल दैवाकडे बोट दाखवा, मी धनुष्याकडे बोट दाखविणार.—दैव दाखवील त्या मार्गानें जाण्याची जरूरी पराक्रमी पुरुषांना नसते—धनुष्य—बाण दाखवील तो मार्ग धनुर्धरांचा असतो.

**राम**—लक्ष्मणा, माझ्या बाहूंतील शक्ति म्हणजे सत्याची शोभा होय, मनुष्य मेल्यावर त्याच्या शरीरावरचे वस्त्रालंकार जसे टाकाऊ ठरतात त्याप्रमाणेंच सत्य सोडल्यावर शक्ति टाकाऊ ठरते.—सत्य सोडून शक्तीचा नाद धरणें म्हणजे प्रेतावरील कपड्याकरतां टपून बसणें होय.—प्रसंग आला तर अलंकार काढून ठेवावेत पण प्राण देऊन आत्महत्या करूं नये.—आज मी धनुष्यबाणांना विसावा देत आहे सत्याची हत्या मला करवत नाहीं.—लक्ष्मणा, पराक्रमाकरतांच तुझ्याप्रमाणें मी अस्त्रविद्या शिकलों, पराक्रमाकरतांच ह्या बाहूंत मी प्रचंड शक्ति सांठविली, आणि पराक्रमाकरतांच धनुर्धरांचा अग्रणी झालों; पण सत्यपालनाला उचलून धरण्याकरतां पराक्रम आहे. लक्ष्मणा, सत्याची गळेचेपी करण्याकरितां नाहीं—

लक्ष्मण—दादा, हे बाहू—हे हात—बायकांप्रमाणें सौंदर्याचे पल्लव म्हणून शरीरावर वाहूं काय! दुःखाच्या डागण्या आईच्या हृदयावर दिल्या जात असतांना, चित्रविचित्र रंगाच्या माळेप्रमाणें हें धनुष्य गळ्यांत बाळगून बायकाप्रमाणें मी मिरवूं काय? विद्युलतेप्रमाणें चमकणारें खड्ग हिर्‍यामोत्यांचा दागिना म्हणून कमरेला लटकावूं काय? पराक्रमी पुरुषांना शोभेचें खेळणें बनविणारा तुमचा उपदेश, दादा, मला पटत नाहीं.

राम—मी दुर्दैव—दुर्दैव म्हणून म्हणतों तें हेंच, माझें सत्यपालन, लक्ष्मणा, तुला मूर्खपणाचें वाटतें.—ह्या दुर्दैवावर चौदा वर्षांच्या प्रत्यक्ष वनवासाशिवाय दुसरा इलाज नाहीं.—माझें सत्य तुला पटत नाहीं. चौदा वर्षांनंतर पटेल—चौदा वर्षांत सत्याच्या सेवेकरितां मी माझ्या शस्त्रास्त्रांचा कसा उपयोग करतों ह्याचा अनुभव घेतल्यावर लक्ष्मणा, तुझा दादा मूर्ख नाहीं हें आपोआप तुझ्या ध्यानीं येईल.—आई, वनवासास जावयाला निघालेल्या तुझ्या या आवडत्या लेकराला आतां आशीर्वाद दे—(पाया पडूं लागतो.)

लक्ष्मणः—आई, आशीर्वाद देऊं नकोस—लक्ष्मणाचे बाण दादांना वनवासाला जाऊं देणार नाहींत—दादा, तुमच्या बाहूंतल्या पराक्रमापुढें ह्या लक्ष्मणाची शक्ति कांहीं नाहीं हें मला माहीत आहे; पण तुम्हांला अड-थळा करतांना तुमच्याशीं लढणाऱ्या लक्ष्मणाचें शिर एकबाणी रामानें धडापासून वेगळें करून, आपल्या ह्या सौमित्राचें मस्तक पायाखालीं ठेंचाळून, दंडकारण्याचा मार्ग आपणाला आक्रमावा लागेल—

रामः—तसें नाहीं व्हावयाचें—युद्ध करूनच मला अडथळा करावयाचा असेल—तुझ्या हट्टाला मी कोण आळा घालणार—सौमित्रा, तुझ्या बाणांनीं विव्हल झालेला राम वनाकडे तोंड करून जमिनीवर मरून पडलेला दृष्टीस पडेल—रामाचा बाण, लक्ष्मणा, तुझ्याशीं लढण्याकरितां भात्यांतून बाहेर पडणार नाहीं; पण वनाकडे वळलेलें रामाचें पाऊल एक रेसभरही मागें येणार नाहीं.

सीताः—ह्या असल्याच दृढ निश्चयावरून सर्व प्राण ओवाळून टाकावे असें वाटतें.

लक्ष्मणः—( रामाचे पाय धरून ) दादा, असें कसें हो माझ्याशीं कठोरपणानें वागूं शकतां—

रामः—( लक्ष्मणाला उठवून ) लक्ष्मणा, मी तुझ्याशीं कठोर कसा होईन ?—सौमित्रा, मी कठोर नाहीं—संसाराच्या रोजच्या रसांत गुरफटले-ल्यांना सत्य कठोर दिसतें."

त्यांच्या विद्याहरणांतील कच हा तर त्या कालांतील परदेशांत जाणाऱ्या भारतीय तरुणांना आदर्श म्हणूनच त्यांनीं रंगविला आहे. परदेशांत मोहाला बळी न पडतां स्वजनांच्या हिताची विद्याच फक्त मिळवावी हें कचाच्या पुढील भाषणानें त्यांनीं स्पष्ट केलें आहे.

कचः—'संजीवनी विद्येशिवाय मला देवयानीचें पाणिग्रहण करतां येत नाहीं—संजीवनी विद्येच्या लोभानें मी देवयानीवर प्रेम केलें नाहीं व करीत नाहीं; परमेश्वरसाक्ष देवयानीवर माझें प्रेम निर्लोभी आहे. पण आचार्य, पितरांचें ऋण व देवांचें ऋण फेडल्याशिवाय प्रेमस्वरूपाच्याही लोभाचा स्वीकार मी करणार नाहीं, अशी प्रतिज्ञा देवेंद्राचे समक्ष मीं केली आहे !—संजीवनी विद्या मला माझ्या सुखासाठीं नको आहे, वाडवडिलांचें व सांप्रदायाचें देणें देण्यासाठीं पाहिजे आहे. गुरुमहाराज, प्रेमाच्या सुखाचा अनुभव घेतांना देवेंद्राच्या सभेंतील वियोगदुःखाच्या यातना सोसणाऱ्या प्रेमी जीवांची आठवण मला होते. माझें एकट्याचेंच सुख किंवा माझें एकट्याचेंच दुःख, एवढाच जर हा प्रश्न असता, तर देवयानीकरितां पाहिजे तें दुःख सोसण्यास मी तयार झालों असतों. पण एका प्रेमी जोड-प्यांचें सुखाकरितां सदाचारी व प्रेमी असंख्य जीवांच्या दुःखाकडे मी कशी डोळेझांक करूं ? देवेंद्राच्या सभेंतलि दुःखीकष्टी व म्लानवदन झालेल्या स्वकीयांच्या दुःखाचें निवारण करण्याकारितां, माझ्या जिवाच्या अमृत-

चल्लीशीं, या असल्या दिव्य तेजाशीं–मूर्तिमंत प्रेमाच्या पुतळीशीं संलग्न होणाऱ्या सुखाचा त्याग करणें, हेंच बृहस्पतीचे मुलाला यावेळीं उचित होय!'

उज्ज्वल ध्येयवादित्व हा त्यांच्या नाट्यवाङ्मयाचा आत्मा होय. ह्या उज्ज्वल ध्येयवादित्वामुळेंच त्यांचें लिखाण अत्यंत तेजस्वी, भव्य व उदात्त असें झालें. या दृष्टीनें त्या त्या काळाचें त्यांच्या नाट्यकृतींत ध्येयरूपानें प्रतिबिंब पडलें आहे व अशा रीतीनें हें नाट्यवाङ्मय तत्कालीन परिस्थितीचें प्रातिनिधिक वाङ्मय झालें आहे.

नाट्य लेखनाचा उपयोग लोकोद्धारासाठींच झाला पाहिजे असें काकासाहेबांचे कटाक्षपूर्वक मत असल्यानें त्यांनीं आपली कला जनतेसाठींच राबविली. कीचकवध व भाऊबंदकी हीं नाटकें त्या कालांतील राजकीय घडामोडींचें दर्शन देतात तसेंच प्रेमध्वजासारख्या नाटकांतही हिंदु मुसलमान अशा अन्तःकलहाचे परिणाम देशोद्धार कार्याला घातक ठरतात असें दाखविलें आहे. कोणच्याही चळवळीचीं राष्ट्रांत जीं आंदोलनें होतात त्यामागें मानवी स्वभावाचें कांहीं शाश्वत तत्त्व असतें तें शाश्वत तत्त्व ओळखून त्याची नाट्यपूर्ण व परिणामकारक चिकित्सा काकासाहेब कोशल्यानें करतात. दारिद्य आणि श्रीमंती–पूर्वजांच्या ऐश्वर्यावर ऐदीपणानें सुख भोगणारे सरदार व स्वतःच्या पराक्रमानें आपला उत्कर्ष करून घेणारे वीर पुरुष–यांचा झगडा–मानापमानांत–शाश्वत तत्त्व–म्हणून त्यांनीं रंगविला आहे. तसेंच त्या वेळच्या राजकीय परिस्थितीवर व मोठयांच्या वागणुकीच्या जनमनावर झालेल्या परिणामावर–नाट्यरूपानें–प्रकाश पडल्यामुळें तें तत्त्वज्ञान जास्त उद्बोधक झालें आहे.

## शाश्वत तत्त्वाचा आविष्कार

काकासाहेबांच्या नाट्यकृतीच्या चिरपरिणामित्वाचें मुख्य कारण, त्यांच्या नाटकांतील शाश्वत तत्त्वाचा आविष्कार हें होय. त्यांच्या नाट्यलेख-

नाचा हा स्थायीभाव आहे. मानवी जीवनांतील विविध भावना व त्यांतून निष्पन्न होणारे प्रसंग, यामागील त्रिकालाबाधित तत्त्वांची कौशल्यपूर्ण मांडणी, त्यांच्या सर्व नाटकांत कमीजास्त प्रमाणांत असल्यानें, तीं नाटकें विशिष्ट कालापुरतींच परिणामकारी अशीं न राहतां, कोणत्याही काळीं व कोणत्याही स्थळीं, जनमनाची कायमची पकड घेणारीं तीं झालीं आहेत.

'शाश्वत तत्त्वज्ञान' काव्यपूर्ण पद्धतीनें मांडण्यांत काकासाहेबांचा हातखंडा होता. 'सत्त्वपरीक्षा' हें नाटक या गुणांचे आदर्श म्हणून दाखवितां येईल. 'हरिश्चंद्र हा राजा होता व राजा हाच जनतेचा पुढारी असें 'राजा' या कल्पनेचें शाश्वत तत्त्वज्ञान आहे. तो नीतितत्त्वें उत्कृष्ट आचरील तरच प्रजेचा नीतीचा व्यवहार चालेल हें रहस्य हरिश्चंद्र तारामतीच्या पुढील सत्त्वधीर संभाषणानें प्रेक्षकांना पटतें.

**तारामतीः**—महाराज, आपण माझी अशी परीक्षा कां पहातां ? मला देहान्त शिक्षा झाली म्हणून मृत्यूला भिऊन प्राण रक्षणाकरितां स्वतःच्या प्रतिज्ञेविरुद्ध वागण्यास मी पतीला सांगीन, असें आपणास वाटतें तरी कसें ?......अयोध्येच्या सिंहासनावरून जे खालीं उतरलों ते प्रतिज्ञा सत्य करण्याकरितां; काशीस लाकडें फोडलीं तीं प्रतिज्ञा पाळण्याकरितां; मी गुलाम झालें तीं प्रतिज्ञा पाळण्याकरितां; रोहिदास मेला, प्रतिज्ञा पाळण्याकरितां !...महाराज, प्रतिज्ञा पाळण्याकरितां माझा शिरच्छेद आपण केला पाहिजे."

डोंबाघरीं खडतर तपश्चर्या करणाऱ्या सत्यप्रतिज्ञ हरिश्चंद्राचे पुढील भाषणांत काकासाहेबांनीं थोर चरितांचें केवढें उज्ज्वल ध्येयवादित्व दर्शविलें आहे !

**हरिश्चंद्रः**—... माझ्या या गुरूची आज्ञा आहे, माझी प्रतिज्ञा पाळण्याकरितां मी माझ्या आवडत्या बायकोचा शिरच्छेद केला पाहिजे.

काशीस नवीन सिंहासन स्थापण्याचा मोह मला कसा पडेल? आजच्या माझ्या ह्या कृत्यानें सर्व विश्वांतील सत्यप्रिय राजांचीं सिंहासनें स्थिर व्हावयाचीं आहेत. माझ्या खड्गानें तोडलेल्या तारामतीच्या शिरावर सत्यमय पृथ्वीची स्थापना होणार आहे. पापाचरणामुळें स्वस्थानापासून भ्रष्ट होऊन पृथ्वीवर कोसळूं पहाणारें तारामंडळ माझ्या प्रतिज्ञापालनानें आज जागच्या जागीं घट्ट बसून पुन्हां देदीप्यमान होणार आहे.......सत्याचें साम्राज्य तिन्ही लोकांत स्थापणारांचा नेता होण्याची वेळ आली असतांना चोरांचा नायक कोण होणार?

राजा हरिश्चंद्राप्रमाणेंच लोकनेता गणलेल्या लोकमान्य टिळकांनीं त्या-वेळीं आपला सहा वर्षांचा खडतर कारावास धैर्यानें व तत्त्वनिष्ठेनें भोगला होता त्यामुळें 'सत्त्वपरीक्षा' पहात असतांना टिळक-चरित्रच लोकांच्या नजरेसमोर चटकन उभें राहिलें. तसेंच 'भाऊबंदकींतील' रामशास्त्री बोलत असतांनाही पापी अधिकाऱ्यांना न भितां त्यांच्या अपराधाचें प्रायश्चित्त लोकमान्य टिळकच सांगत आहेत कीं काय असा भास होत असे.

लोकमान्यांचें सुरत कॉंग्रेसप्रसंगीं दिसून आलेलें अलोट धैर्य व निःस्पृह बाणा तसेंच नोकरशाहीचें पाप निर्भीडपणें त्याच्या पदरांत केसरीद्वारें टाकल्यामुळें झालेल्या राजद्रोहाचे वेळीं खटल्याचें त्यांनीं दिलेलें धीरोदात्त उत्तर भाऊबंदकींतील रामशास्त्र्यांनीं राघोबाला देहान्त प्रायश्चित्त सांगतांना केलेल्या भाषणरूपानें—काकासाहेबांनीं मार्मिकपणें प्रगट केलें आहे असें सहज दिसून येईल.

**रामशास्त्रीः**—नाहीं, बाईसाहेब, नाहीं. दुसरें प्रायश्चित्त नाहीं—आपणासारख्या महापातकी खुन्यांची सोय लावण्याकरितां ऋषींनीं शास्त्रें लिहिलेलीं नाहींत.

**आनंदीबाईः**—कोणापुढें, कोठें व काय बोलतां आहां ह्याची शुद्ध असावीवा, तुम्हांला नसावीसें दिसतें. श्रीमंतांना देहान्त प्रायश्चित्त

सांगणाराची जीभ येथल्या येथें कापली जाईल, हें ध्यानांत ठेवून नीट शुद्धीवर येऊन बोला. तुम्ही आमचे नोकर आहां हें विसरलांत वाटतें !'

**रामशास्त्रीः**—'बाईसाहेब, आतां वाड्यांत येण्यापूर्वी मी श्रीमंतांचा नोकर होतों; पण वाड्यांत आलों आहे तो नोकरी सोडून दिली हें कळविण्याकरितांच आलों आहें. बाईसाहेब, ह्या जिभेनें यावेळीं सत्य भाषण केलें आहे. पुढें कदाचित् खोटें बोलण्याचा मोह तिला उत्पन्न होईल; तेव्हां याच वेळीं तिला कापून टाकून सत्य बोलत असतांनाच ह्या जिभेची समाप्ति आपण केली तर त्यांत मला समाधान आहे. राघोबा, पेशव्यांच्या गादीचा नोकर नसलेला हा रामशास्त्री तुला देहान्त प्रायश्चित्त सांगत आहे. राजसत्तेनें तुझें डोकें उडविलें जाण्याचा जर संभव नसेल तर देहाला झिजवून झिजवून अखेरीस देहाच्या पतनानें पापक्षालन कसें करावें ह्या तपश्चर्येचा धडा शिकण्याचे उद्योगाला त्वां लागावें हें बरें.'

स्वयंवरांतील कृष्ण, "राजा हा पराक्रमानें निर्माण होतो" असें शाश्वत तत्त्व सांगत असतां भारतांतील पराक्रमहीन संस्थानिकांची मालिका आपोआपच प्रेक्षकांच्या डोळ्यांपुढें येते व हें तत्त्वज्ञान ठसठशीतपणें पटतें. मेनका व सावित्री ह्या नाटकांतील तत्त्वज्ञानाचाही अशा रीतीनें विचार केल्यास या शाश्वत तत्त्वज्ञानाचा आविष्कार करतांना लोकांच्या उन्नतीला पोषक असेच विचार व कार्य–कलेची हानि न होऊं देतां–काकासाहेबांनीं केलेलें आहे.

ह्या बाबतींत काकासाहेबांचीं कांहीं निश्चित मतें होतीं. मानवी जीवनाला सदैव उपकारक ठरणारीं तत्त्वें, नव्या नव्या सौंदर्यानें लोकांना आकर्षक व अनुकरणीय व्हावीं असें कलेचें कार्य मानलें पाहिजे. समाजांतील त्या त्या कालांतलीं उद्धारविषयक आंदोलनें बाह्यतः निराळीं दिसलीं तरी परीक्षा केल्यास तीं जुन्या तत्त्वांचाच नवा आविष्कार असल्याचें ध्यानांत आल्याखेरीज राहात नाहीं. त्या परिस्थितीचें व तत्त्वाचें प्रदर्शन साहि-

त्याच्या द्वारें कला करायला लागली तर ज्या कालांतलें प्रदर्शन त्या कालांतल्या आंदोलनाचे सूर त्या प्रदर्शनांत सूक्ष्म व अप्रत्यक्ष रीतीनें घुसल्याखेरीज राहात नाहींत. सुरतेमुळें जो बखेडा माजला व त्यामुळें देशाचेंच नुकसान कसें आहे हे विचार भाऊबंदकींतील रामशास्त्री यांच्या पुढील भाषणानें सहज उमटणारे आहेत.

रामशास्त्री—...'बारभाईची खेती फळास येत नाहीं अशी एक जुनी म्हण आहे. ती म्हण बारभाईच्या कारभाराच्या या यशानें आज खोटी ठरली आहे. आमच्यांतील आपआपसांतील तंटे—मग ते व्यक्तिविषयक असोत, जातिविषयक असोत किंवा धर्मविषयक असोत—विकोपास जाऊन जर आमच्या धर्माचें व देशाचें नुकसान होऊं नये अशी इच्छा असेल तर खेड्यांतील खेतीपासून तों साम्राज्याच्या सत्तेपर्यंत सर्व लहानथोर प्रसंगीं —पंचांनी बारभाईनीं मिळून कामें करण्याचें वळण स्वतःला व इतरांना लावण्याचा हट्ट धरावा. व्यक्ति तितक्या प्रकृति असावयाच्याच; चार भांडीं एके ठिकाणीं आली म्हणजे एकमेकांवर आदळावयाचीं‌च, पण असे भेद ओळखतांना व एकमेकांवर हापटतांना दुसऱ्याचा चक्काचूर करण्याच्या दुष्ट बुद्धीचा जर विटाळ होऊं दिला नाहीं, तर बारभाईची खेती एका व्यक्तीच्या खेतीहून बारापट अधिक उत्पन्न देणारी होते, हें तुमच्या निदर्शनास तेव्हांच येईल. प्रत्येक गोष्टीप्रमाणें भांडणालाही मर्यादा असली पाहिजे. ज्या भांडणामुळें भांडण भांडणाऱ्या दोनही पक्षांचा नाश होणार अशीं चिन्हें दिसूं लागतांच 'तें भांडण एकदम थांबवलें पाहिजे. आपल्या अभ्युदयाकरितां भांडण भांडावयाचें असतें; अभ्युदयाचे ऐवजीं जर उलट नाशच होऊं लागला तर भांडण तरी कशासाठीं भांडावयाचें ? स्वतःचा नाश झालेला पत्करला पण दुसऱ्याचा नाश होवो, अशा दुष्ट बुद्धीनें भांडण भांडणें म्हणजे प्रत्यक्ष परमेश्वराशींच तंटा करणें होय.'

समाजांतील भाऊबंदकीप्रमाणेंच देशहिताच्या आड येणाऱ्या दारूच्या व्यसनामुळें जनतेचें कसें नुकसान आहे तें खुद्द शुक्राचार्यासारखा उग्र

पश्चर्येचा ज्ञानी पुरुषही दारूपायीं कसा मातीमोल होतो तें विद्याहर-
ांतील शुक्राचार्यांच्या तोंडच्या पुढील पश्चात्तापदग्ध भाषणानें काकासाहे-
ांनीं उत्कृष्ट रीतीनें पटवून दिलें आहे.

शुक्राचार्यः—'शुक्रा, दारूच्या दुष्ट व्यसनानें काय तुझी दीन स्थिति
ली ही? हंसा, सर्व विद्यांनो, या मद्यपी शुक्राला हंसा! थुंका; सर्व
पस्व्यांनो, या मद्यपी शुक्राचे तोंडावर थुंका! धिक्कारा; ब्रह्मयज्ञ करणाऱ्या
र्व विद्यार्थ्यांनो, या मद्यपी शुक्राला धिक्कारा! आणि अखिल दुनियेंत
ाही फिरवा कीं दारूमुळें बुद्धिनाश होतो, दारूमुळें शत्रूला पोटांत
ारायला मिळतें, दारूमुळें शत्रूला हृदयांत दबा धरून बसावयाला
ळतें आणि दारूमुळें सर्व विद्या शत्रूच्या ताब्यांत जाऊन शत्रूच्या
ोंजळीनें पाणी पिण्याची पाळी येते! कार्यकर्ते तपस्वी हो, या शुक्राच्या
धःपाताचें उदाहरण नेहमीं डोळ्यांपुढें ठेवून, कोणत्याही मोठ्या
ार्याचा नेतेपणा किंवा कारभार व्यसनी पुरुषाकडे ठेवूं नका....जो कोणी
ेद्याव्यासंगी—मग तो तुझा गुरु हा प्रत्यक्ष शुक्र असो—जो कोणी
ेद्याव्यासंगी—दारू पितांना सांपडेल, त्याच्या घशांत तापलेल्या शिशाचा
स ओतण्यास चुकूं नकोस!'

विद्याहरणांत दारूच्या व्यसनाचा दोष जसा जनतेच्या निदर्शनास
ाणला आहे तसा मेनकेंत सत्तेचा हव्यास सुटलेल्या कौन्सिल-प्रवेशवाल्यांची
टाळणी केली आहे. कीचकवधांत सौदामिनीच्या रूपानें नौकरीवाले व
वाळांची जी वृत्ति दाखविली आहे तीच वृत्ति मेनकेंतील बटूंच्या रूपानें
ौन्सिलवाल्या लाळघोट्यांची दाखविली आहे. सौदामिनीची भूमिका
ाकांना आवडली पण बटूंची चेष्टा लोकांना मानवली नाहीं हा
ालमहिमा आहे. खाडिलकरांचे नाट्यतंत्रांत कसलीच उणीव नाहीं.

सौंदर्यापेक्षां सेवेनेंच प्रेमाचें आकर्षण हितपरिणामीं ठरतें हें सेवेचें
हत्त्व 'मेनका' नाटकांत काकासाहेबांनीं उठावदारपणें दाखविलें आहे.

खरें प्रेम व खरें शील कसें असावें, हें मेनका व सावित्री नाटकरूपानें काकासाहेबांनीं दिग्दर्शित केलें आहे.

सावित्री नाटक लिहितांना काकासाहेबांच्या मनांत काय उद्देश होता तें त्यांनीं सावित्री नाटकाच्या अखेरीस भरतवाक्याचे प्रसंगीं पुढील-प्रमाणें सांगितलें आहे.

‘ लोकसंग्रह–धर्मकर्मा । प्रगटवो बहु साधु–महिमा ॥
आसुरी मति फिरवावया । साधु वसवो शीलधामा ।।

ह्या साधुसंतांच्या व थोर व्यक्तींच्या शीलाच्या आचरणानें व संवर्ध-नानेंच खरें लोककल्याण होत असतें. संकटसमयी या शीलाचीं परीक्षा होत असते. सत्यवानाला मनानें एकदां पति म्हणून वरल्यानंतर त्याचा मृत्यु जवळ आहे हें कळलें तरी तो आपला निश्चय कायम ठेवण्यांत सावित्रीनें केवढें तेजस्वी शील प्रगट केलें आहे.

**सावित्रीः**–‘ बाबा, मृत्यूवर इलाज पाहिजे कशाला ? मृत्यूला न भिणें हाच मृत्यु तरून जाण्याचा उपाय आहे.–मृत्यु नाहीं कोणाला ? आम्हां सर्वांना मरण आहे; आमचा मरणाचा दिवस समजला नाहीं, तिकडचा समजला, एवढाच फरक ना ? ह्या एवढ्या फरकासाठीं मी मृत्यूपुढें हार कां खाऊं ? बाबा, ज्याला तूं पसंत करशील त्याला तुला मी देईन असें आपण मला वचन दिलें; आपल्या आज्ञेप्रमाणें त्यांना मीं पसंत केलें व मनानें वरिलें; मृत्यूचा बागुलबोवा दाखवून माझें मन मी मागें कसें परतवूं ? वरवर बाह्य उपाधीमुळें प्रीतीचा भास झाला असता तर गोष्ट निराळी होती; पवित्र अन्तःकरणाचें खरें खरें प्रेम, त्यांच्या-वर माझें बसलें आहे; त्या प्रेमाला, बाबा, मृत्यूची प्रतिष्ठा नाहीं, हें प्रेम, आई, मृत्यूमुळें असें असें बिलकूल वळायचें नाहीं. माझें प्रेम, मुनीवर, मृत्युसकट तिकडच्या चरणाचा स्वीकार करीत आहे; त्यांना सोडून



१९२७ साली कॅलिफोर्नियांत अमेरिकन व हिंदी स्त्री-पुरुषांनीं इंग्रजी भाषेंत केलेल्या मानापमानांतील प्रसंग

इतरांचे गळ्यांत माळ घातल्यानें मी आपल्या व माझ्या शीलाला व्यभिचाराचा कलंक लावल्यासारखें नाहीं का होणार ! '

## मराठीचे केसरी

देशाच्या बाह्य परिस्थितीचे काकासाहेबांच्या नाट्यकृतींवर जसे परिणाम झाले आहेत तसेच त्यांच्या स्वतःच्या जीवनांतील घटनांचे व स्वभावाचे परिणाम कांहीं नाट्यप्रसंगांत उमटलेले आहेत. त्यांच्या जीवनांतील कित्येक प्रसंगाकडे नजर दिल्यास त्यांचा नाट्यकृतीवर कसा परिणाम झाला आहे तें सहज दिसून येईल. त्यांचीं प्रारंभींचीं कांहीं वर्षें सांगलींतील दरबारी वातावरणांत गेलीं होतीं. त्या दरबारी वातावरणांतील वावरणारीं व्यक्तिचित्रें कीचकवध व भाऊबंदकींतील दरबारी प्रसंग रंगवितांना उपयोगीं पडलीं आहेत. नेपाळांतील मुक्कामांत त्यांना मिळालेला अनुभव बायकांच्या बंडांत उपयोगीं पडला आहे. बायकांचे बंडांतील जंगल्या नेपाळांतील त्यांच्या स्वयंपाक्यावरून सुचला असें त्यांनींच लिहून ठेवलें आहे. बायकांच्या बंडाची पार्श्वभूमीहि नेपाळच्या आसपासची आहे. नेपाळांत असतांनाच तुळसीरामायण गाइलें जात असतां त्यांतील रावण-मंदोदरी संवादानें त्यांचें मन वेधून घेतलें. ' सीतेच्या रूपाकरितां मीं तिला पळवून आणली नसून ती आपल्या पराक्रमाची निशाणी आहे ' अशा आशयाचें उत्तर रावण मंदोदरीला देतो. रावणमंदोदरीचा हा संवाद कीचक-वध नाटकांत कीचक व रत्नप्रभा यांच्या भाषणांत आलेला आहे. रावणाच्या भूमिकेंतील हें वैशिष्ट्य त्यांनीं प्रथम कीचकाच्या स्वभावरेखनांत उत्कटपणानें रंगविलें. पुढें द्रौपदी नाटकांतही दुर्योधनाचा स्वभाव त्यांनीं असाच मानी आणि महत्त्वाकांक्षी रेखाटला आहे. पुण्यांतील त्यांचे वास्तव्यांत झालेल्या राजकीय उलाढालींची छाप भाऊबंदकी व विद्याहरण वगैरे नाटकांत जागजागीं दिसून येते. तसाच महात्मा गांधींच्या राजकारणाच्या–

त्यांच्या मनावर झालेल्या–परिणामांचे पडसाद त्यानंतर लिहिलेल्या मेनका, सवतीमत्सर वगैरे नाटकांत उमटलेले दिसतात.

काकासाहेब हे स्वभावतः तत्त्वनिष्ठ, करारी, त्यागी व भावनाप्रधान असे गृहस्थ होते. त्यांनीं नाट्यसृष्टींत निर्माण केलेल्या भूमिका जेव्हां आपण पहातों तेव्हां तीं काकासाहेबांच्या स्वभावाचीं निरनिराळीं रूपें दाखवितात असा प्रत्यय येतो. त्यांच्या व्यक्तित्वाचीं प्रतिबिंबें विशेषतः 'प्रतापराव', 'रामशास्त्री', 'हरिश्चंद्र' व 'विश्वामित्र' यांच्या भूमिकेंत जास्त स्पष्टतेनें दिसून येतात. कांचनगडच्या मोहनेंतील प्रतापरावाचें शेवटचें भाषण हें काकासाहेबांच्या मनांतील पारतंत्र्याच्या चिडीचें व स्वातंत्र्यप्राप्तीकरितां आत्मदान करण्याच्या प्रवृत्तीचें द्योतक आहे. काका· साहेब हे त्यावेळीं बंडखोर व क्रांतिकारी वृत्तीचे होते व असा मनुष्य देशाकरितां कोणता त्याग करूं शकेल हें प्रतापरावाच्या रूपानें त्यांनीं जनतेला दाखवून दिलें. सत्यप्रतिज्ञ हरिश्चंद्र आपल्या प्रतिज्ञापालनाकरितां ज्या निश्चयानें व कठोरपणानें वागतो ती निश्चयी त्यागी वृत्ति काकासाहेबांच्या स्वभावाचीच निदर्शक आहे. ज्या निर्भयतेनें राघोबाला रामशास्त्र्यांनीं देहान्त प्रायश्चित्त सांगितलें त्या निर्भयतेवरच काकासाहेबांनीं आपलें सार्वजनिक व खासगी आयुष्य अधिष्ठित केलें.

त्यांनीं मेनका नाटकांत निर्माण केलेली 'विश्वामित्र' ही भूमिका तर त्यांच्या स्वतःच्या तापट आणि क्रोधी स्वभावाचें प्रत्यक्ष दर्शनच वाटेल. विश्वामित्रानें जशी प्रतिसृष्टि निर्माण करण्याचें सामर्थ्य तपश्चर्येनें आपल्या अंगीं बाणलें, तसल्याच तपश्चर्येनें काकासाहेबांनीं आपली स्वतंत्र नाट्यसृष्टि निर्माण केली.

विश्वामित्राप्रमाणेंच गायत्रीमंत्राच्या मार्फत स्वतःचा उद्धार करून घेण्याचा विश्वास त्यांनीं धरला होता. 'ॐकाराची उपासना' ह्या प्रवचनांत त्यांनीं आपल्या ह्या दोषाचा उल्लेख व त्यावरील उपासनेच्या

उपायांचेंही दिग्दर्शन केलें आहे. गीतारहस्यांत सांगितलेल्या थोर विचारांचे ते उपासक असल्यामुळें केसरीलेखद्वारें व नाट्यकृतीद्वारें त्यांनीं जी महाराष्ट्र-भाषेची सेवा केली त्यामुळेंच ते मराठीचे केसरी ठरले.

## वाङ्मयीन नवरसपान

शाश्वत तत्त्वाचा आविष्कार, भोंवतालची देशाची परिस्थिति व त्यांच्या वैयक्तिक स्वभावाची प्रभावी ठेवण येवढ्या वैशिष्ट्यामुळें त्यांचीं नाटकें यशस्वी झालीं असेच केवळ नसून नाटकांतील घडण, भूमिकांचा स्वभाव परिपोष, नाट्यगुणांच्या आविष्काराला त्यांच्या भूमिकांना मिळणारा अव-सर, कौशल्यपूर्ण स्वभावपरिपोष, भाषेची तेजस्विता व ओजस्विता वगैरे गुणांच्या प्रकर्षामुळेंच काकासाहेबांचें श्रेष्ठत्व सिद्ध झालें आहे. शृंगारादि रसांचें प्रदर्शन विशेषतः वीर व करुण रसांचें प्रकर्ष दिग्दर्शन, रागलोभादि विकारांचें परिणामकारक प्रगटीकरण, मनुष्य-स्वभावाच्या मूलभूत गुण-दोषाचें-स्थायीभावाचें-कलापूर्ण आविष्करण, वगैरे नाट्यगुणांचा आदर्श त्यांच्या नाट्यकृतींत दिसून येतो म्हणूनच तीं प्रभावी ठरलीं आहेत.

भारतीय संस्कृतींतील आदर्श पुरुष व आदर्श महिला त्यांनीं आपल्या नाट्यसृष्टींत निर्माण केल्या आहेत. द्रौपदी, रुक्मिणी, सावित्री यांच्या जीवनांतले करुण प्रसंग प्रामुख्यानें मांडून त्या त्या संकटांत त्या कशा वागल्या हें हृदयंगम पद्धतीनें रंगविलें आहे. पित्याला कैदेंतून सोडवितांना स्वयंवरांतील रुक्मिणीनें केलेल्या करुणरसप्रधान भाषणांत स्वजनऋण फेडण्याचें तत्त्वज्ञान किती बहारदाररीतीनें रंगविलें आहेः—

**रुक्मिणीः**—स्वजनांचें देणें मीं दिलें; पितृऋण मीं फेडलें, माझ्या या शरीराचें देणें तेवढें बाकी आहे. शरीरा, श्रीकृष्णाचे सहवासांत व सेवेंत तुला सुखी करण्याचें देणें मीं द्यावयाचें असेल तर त्यांच्यावरील माझें निस्सीम प्रेम थोड्या अवधींत त्यांना येथें आणल्यावांचून राहाणार नाहीं.

पण रुक्मिणी, तुझ्या शरीराचे देणेंच बाकी निघत नसेल तर—तर—ते येणार नाहींत; हो येणार नाहींत, दैवच नसेल तर येणार नाहींत; आणि मग—शरीराचें जर देणें नसेल—तर माझा व शरीराचा संबंधच संपला ! हो, असेंच, असेंच, संबंधच संपला. दादांचें व बाबांचें देणें पुरतें देण्याकरितां ह्या हातांनीं त्या वैऱ्याच्या गळ्यांत माळ टाकली—लगेच शरीराचा संबंध संपला—श्रीकृष्णावरील माझें प्रेम शरीराची व माझी तत्क्षणीं ताटातूट करील.'

स्त्रीपुरुष एकमेकांना पूरक आहेत. हा नाट्यविषय 'बायकांचें बंड.' व 'मेनका' ह्या दोन नाटकांत प्रभावीपणें काकासाहेबांनीं रंगविला आहे. 'राज्यतृष्णा व त्याचे दुष्परिणाम' हा नाट्यविषय 'भाऊबंदकी' व 'सवतीमत्सर' या नाटकात सर्व बाजूंनीं दिग्दर्शित केला आहे. मानवी जीवनांतील वेंचक समरप्रसंग निवडून त्यांचें कलात्मक दिग्दर्शन व पद्धतिशीर मांडणी झाल्यामुळें उत्कृष्ट नाट्यवाङ्मय निर्माण झालें आहे.

नाटक हें दृश्य काव्य असल्यामुळें काकासाहेब या दृष्टीनें नाट्यतंत्र नमुनेदार तऱ्हेनें हाताळतात. कीचकवधांतील ओवाळणीचा प्रसंग, भाऊबंदकींतील नारायणरावांच्या खुनाचा प्रसंग, मद्यप्राशनाबरोबर कचाच्या अस्थींची रक्षा पोटांत गेल्यामुळें देवयानीच्या अपत्यप्रेमामुळें त्याला जिवंत करतांनाच तो 'विद्याहरण' करणार ह्या जाणिवेमुळें शुक्राचार्यांचा झालेला भावनोद्रेकाचा नाट्यप्रसंग, स्वयंवराच्या मंडपांत स्वजनांचा रक्तपात होऊं नये म्हणून स्वयंवराचा हक्क सोडण्याचें रुक्मिणीचें धीरोदात्त वर्तन, रोहिदासानें भुकेनें व्याकुळ झाला असतांही प्रतिज्ञापालनासाठीं 'हें पोट फेंकून दिलें' असे उद्गार काढण्याच्या वेळचा वीर व करुणरसात्मक प्रसंग असे काकासाहेबांच्या नाटकानाटकांतून कितीतरी दृश्यकाव्याचे प्रसंग दाखवितां येतील. त्यांच्या सर्वच नाटकांचे नुसते आरंभ पाहिले तरी नाट्यप्रसंग निवडण्याच्या, त्यांची डौलदार सांखळी गुंफून शेवटीं कलात्मक परिणाम

साधण्याच्या–त्यांच्या सामर्थ्याची खात्री पटल्यावांचून राहात नाहीं. मर्यादित पात्रें, पद्धतशीर कथाविकास, उत्कृष्ट संवाद, योग्य रसपरिपोष, इत्यादि नाट्यतंत्रावर त्यांचें असामान्य प्रभुत्व असल्यामुळें त्यांच्या नाटकांत रसोत्कर्षाला बहर येतो.

त्यांचीं उपकथानकें कृत्रिम नसून स्वाभाविक व मुख्य कथानकाला पूरक व नाट्यविषयाला उठाव देणारीं आहेत. त्यांनीं घातलेला विनोद हाही कथानकाला पोषक व जरूर तितकाच उपयोजला आहे. प्रतिपाद्य विषयांच्या गांभीर्याचा ताण प्रेक्षकावर कमी व्हावा म्हणून विनोद व उपकथानकें यांची योजना केली आहे. कांचनगडच्या मोहनेंतील दादासाहेब, भाऊबंदकींतील नमकशास्त्री, चमकशास्त्री व त्यांच्या देशस्थ कोंकणस्थ बायकांच्या भांडणाचा विनोद, कीचकवधांतील सिद्धपाक विद्याधर यांचा विनोद, विद्याहरणांतील फुकट्या दारुड्याचा विनोद असा नाट्यविषयाला उठाव देण्याकरितां विनोदी उपकथानकाचा योग्य उपयोग करून घेतला आहे. लक्ष्मीधरासारखीं विनोदी पात्रेंही त्यांनीं सरसपणानें रंगविलीं आहेत.

काकासाहेबांच्या भाषेचें वैशिष्ट्य सांगण्याचें झाल्यास त्यांच्या भाषेंतील ओजोगुणाकडेच प्रामुख्यानें अंगुलीदर्शन करावें लागेल. बुद्धिसामर्थ्यानें अथांग भरलेली त्यांची वागगंगा ओघवती आहे तशीच गंभीरही आहे. त्यांच्या नाटकांतील तत्त्वज्ञानात्मक भाषणेंहि अशीं ओघवान व प्रसंगाला अनुरूप असल्यानें त्यांचा राम किंवा हरिश्चंद्र, त्यांची रुक्मिणी किंवा मेनका आपल्या भाषणानें श्रोत्यांची चित्तवृत्ति तल्लीन करून टाकतात. शृंगार व वीररसपरिपोषक शब्दांचा उपयोग ते उत्तम प्रकारचा करतात. स्वयंवरांतील 'खडा मारायचा झाला तर'– हें भाषण अल्लड शृंगाराचें एक गद्यमय काव्यपूर्ण उदाहरण म्हणून दाखवितां येईल. श्रीकृष्णालाच प्रेमसर्वस्व वाहिलेली व स्वतःच कृष्णमय झालेली रुक्मिणी गौळीवाड्यांत येऊन कल्पनेच्या भरारींत स्वगत भाषण करते असा जो प्रसंग स्वयंवरांत

रंगविला आहे तो गद्य भावगीताचाच एक उत्कृष्ट नमुना म्हणावा लागेल.' रुक्मिणीचें हें भाषण गद्यकाव्याचा नमुना ठरणारें झालें आहे.·

**रुक्मिणी :**—'माझ्या महालासभोंवारच्या बगीच्यांतून मी एकटी बाहेर पडलें–मनाला कसें मोकळें वाटलें! बांधून ठेवल्यासारखें इतक्या दिवस वाटत होतें. तो माझा सुंदर महाल कुंडिनपूरच्या नव्हे तर सर्व विदर्भ देशाच्या शोभेची सीमा समजला जातो, मानवी कौशल्याची पराकाष्ठा समजला जातो; पण तेथें माझा कोंडमारा होत होता! येथें कसें मोकळें वाटतें, माझी मी स्वतंत्र आहेसें वाटतें! आणि गाई चरायची नदीकांठची ही जागा काय कमी सुंदर आहे? सायंकाळच्या कोंवळ्या आरक्त सूर्यकिरणांनीं नटलेले हे तरुवर—कोणत्या नागरिक मनुष्याला असली शोभा पाहावयास मिळेल? तांबूस सूर्यकरांनीं आच्छादिलेला हा नदीचा प्रवाह—उगीच नाहीं त्यांना यमुनातीर इतकें आवडतें तें! आणि गाईचीं हीं खिल्लारें!–मदिरेप्रमाणें धनही मादक आहे म्हणून म्हणतात; असें म्हणणारांनीं ह्या गोधनाकडे पहावें. ह्यांचें दर्शन उन्मादाला शमवितें, ह्यांचा सहवास भांडणतंटे मिटवितो, ह्यांच्या सेवेला अमृतप्राशनाचें बक्षीस मिळून खरेंच गोकुळ दुसरें वैकुंठ समजलें पाहिजे! ते द्वारकेस राहावयास गेले, गोकुळांत राहून गौळिणीप्रमाणें त्यांची सेवा करायची माझी हौस आतां कशी भागणार? देवा, आपले व माझें लग्न झाल्यावर पुन्हां गोकुळांत कांहीं काल राहावयाचें गडे! मी किनई, डोक्यावर घागर घेऊन यमुनेचें पाणी भरून आणीन; घागर मला जड वाटायची नाहीं; आपल्या पदचिन्हांनीं पुनीत झालेल्या यमुनेच्या नाजुक वाळूवर घटकान् घटका चालतांना श्रम कोणाला होणार? पण—पण—मी साफ सांगतें हं, खडा मारायचा झाला तर माझ्या हातावर नाहींतर घागरीवर मारायचा—तसेंही नको—खड्यानें घागर फुटून मी ओलीचिंब झालेलें मला नाहीं आवडायचें—निदान मी रागावलें म्हणजे हंसत मजकडे नाहीं पहावयाचें—

हें काय हो, डोक्यावरची घागर फोडून—मला ओलीचिंब करून—असें काय म्हणून हंसत पहावयाचें? मला आपल्याकडे पहातच उभी रहावेसें वाटतें! किती वेळ मी अशी ओलेत्यानें उभी राहूं? इतर गौळी—गवळणी येथें जमल्या म्हणजे कसें? ही रुक्मिणी गवळण झाली असली तरी राजकन्या आहे. मला नाहीं गडे इतके निर्लज्ज होतां येत."

कांचनगडच्या मोहनेंतील प्रतापरावाचे शेवटच्या प्रवेशांतील भाषण हें वीररसाचें अनेक उदाहरणांपैकीं एक उदाहरण म्हणून दाखविता येईल.

काव्यांत ध्वनि हा अलंकार श्रेष्ठ मानला आहे. एकादेंच ध्वन्यर्थदर्शक वाक्य योग्य ठिकाणीं टाकून रसपरिपोष करण्याचें अजब हस्तलाघव मराठी नाटककारांत काकासाहेबांइतकें कोणांतही आढळून येत नाहीं. स्वयंवरांतील 'दादा ते आले ना' किंवा द्रौपदी नाटकांतील द्रौपदीचें 'मी दासी नाहीं, मी स्वतंत्र आहें' हें वाक्य किती परिणामकारक होतें हें सर्वश्रुतच आहे. काकासाहेबांनीं आपल्या भाषेची मांडणी अशी केलेली असते कीं वाक्य उच्चारल्याबरोबर भावना जागृत होतात. दृश्य व श्राव्य या काव्याच्या दोन प्रमुख अंगांचा प्रकर्ष निर्दिष्ट केलेल्या लेखनवैशिष्ट्यामुळें उत्तम प्रकारचा होतो. यामुळें कीचकवध, द्रौपदी अगर सत्त्वपरीक्षा वाचीत असतांना वाचक पात्राशीं इतका तल्लीन होऊन जातो कीं कीचक भीम, अगर विश्वामित्र समजून तो स्वतः न कळत त्या त्या पात्राचीं भाषणें साभिनय उच्चारूं लागतो.

## नाटक मंडळ्या व नटश्रेष्ठ

नाटकाच्या यशाला व लौकिकाला नाटकाच्या चांगुलपणाइतकेंच नाटककंपन्यांचें चांगुलपण हेंही एक प्रमुख कारण असतें. नाट्य हें दृश्य काव्य आहे व त्यांचें यश नाटक कंपन्यांची व्यवस्था व नटांचें अभिनयकौशल्य यांचेवरच प्रामुख्यानें अवलंबून आहे. यामुळें या विषयाचा तपाशिलानें

विचार करण्यापूर्वी ज्या कंपन्यांनीं काकासाहेबांचीं नाटकें केलीं त्या कंपन्यांच्या व नटांच्या परिस्थितीचा थोडा इतिहास—अभिनय गुणाची चिकित्सा करण्यापूर्वी—पार्श्वभूमीप्रमाणें नमूद करणें जरूर आहे.

काकासाहेबांचें एक नाटक शाहूनगरवासी नाटक मंडळींनीं बसविलें असलें तरी त्या कंपनीचा पुढें काकासाहेबांशीं फारसा संबंध आला नाहीं; पण १९०४ च्या सुमारास श्री. कारखाननीस, टिपनीस बंधू, दत्तोपंत देशपांडे वगैरे महाडच्या सुशिक्षित तरुणांनीं काकासाहेबांच्या 'कांचनगडची मोहना' ह्या नाटकाचा खेळ क्लबचा म्हणून केला व या खेळाच्या यशानें त्या मंडळींच्या मनावर एवढा परिणाम झाला.कीं त्यांनीं पुढें पुण्याच्या प्रो. टिपनीस, प्रो. भानू वगैरेंच्या विचारें पुण्यास महाराष्ट्र नाटक कंपनीची स्थापना केली व त्याचा पहिला खेळ काकासाहेब नेपाळांत असतांच पुण्यास करण्यांत आला.

गद्य नाटकापेक्षां संगीत नाटकाची छाप त्यावेळीं जनमनावर बरीच असे. तथापि या मंडळींच्या अभिनयकौशल्यानें व मोहना नाटकाच्या तेजस्वी व काव्यपूर्ण रचनेनें लोकांचीं मनें या गद्य नाट्यकृतीकडे प्रकर्षानें ओढून घेतलीं. काकासाहेब नेपाळांतून परत आल्यावर त्यांना नाटकाचा प्रयोग पाहून महाराष्ट्र मंडळीच्या वर्धिष्णु अभिनय गुणाची प्रचीति आली; व आपली नाट्यकृति रंगभूमीवर उठावदार रीतीनें आलेली पाहून ते खूष झाले. त्यानंतर काकासाहेब व महाराष्ट्र नाटक मंडळी यांचे संबंध वाढत गेले व काकासाहेबांनीं आपल्या सर्व गद्य नाट्यकृति महाराष्ट्र नाटक मंडळीकरितांच लिहिल्या; व कंपनींतील भागवत, टिपनीस, प्रधान वगैरे प्रारंभींच्या नटांना कीचकवध, भाऊबंदकी वगैरे उत्कट नाट्यप्रसंग असलेल्या नाटकांत काम करण्यास संधि देऊन व शिक्षण देऊन त्या त्या नटास लौकिकास चढविलें. भागवत हे अत्यंत अभ्यासू आणि प्रभावी नट होते. ते दिग्दर्शनही चांगलें करीत. पुढें याच कंपनींत पोतनीस. दाते वगैरे

नटश्रेष्ठ सामील होऊन त्यांनीं महाराष्ट्र नाटक मंडळीचा लौकिक, काकासाहेबांच्या प्रेमध्वज, सत्त्वपरीक्षा वगैरे नाटकांतील कामांनींही कायम राखला.

काकासाहेबांनीं आपलीं गद्य नाटकें महाराष्ट्र नाटक मंडळीशिवाय दुसऱ्या कोणास दिलीं नाहींत. पैशाची जिगजीग कधीं केली नाहीं. कंपनी यशस्वी होण्यास जें जें सहाय्य लागेल तें तें देत गेले व अशा रीतीनें गद्य नाटकाचें श्रेष्ठत्व, महाराष्ट्र नाटक मंडळी मार्फत काकासाहेबांच्या परिश्रमानें प्रस्थापित झालें.

महाराष्ट्र मंडळीच्या गुणी नटास व श्री. कारखाननीस, देशपांडे वगैरे मालकास काकासाहेबांची प्रेमोपकाराची पूर्ण जाणीव होती. उच्च ध्येयानें नाट्यसेवेकरतांच ही मंडळी स्थापन झाली होती. व हें आपलें वैशिष्ट्य अत्यंत परिश्रमानें व आस्थापूर्वक त्यांनीं कायम राखलें. कीचकवध व भाऊबंदकी हीं नाटकें ज्या विशिष्ट परिस्थितींत यशस्वी झालीं त्या यशास नाटकांच्या उत्कृष्टपणाइतकेंच कंपनीनें केलेल्या पूर्वतयारीस व भागवतादि श्रेष्ठ नटांच्या उच्च अभिनयकौशल्यासही आहे.

महाराष्ट्र नाटक मंडळी इतकाच काकासाहेबांचा घनिष्ठ संबंध गंधर्व नाटक मंडळीशीं आला. गंधर्व मंडळी ही, किर्लोस्कर नाटक मंडळीनें काकासाहेबांचें मानापमान नाटक बसवून तें यशस्वी झाल्यानंतर व प्रख्यात नट श्री. जोगळेकर यांच्या मृत्यूनंतर त्या नाटक मंडळींत झालेल्या मालक मुजुमदार व इतर मंडळी यांच्यांतील मतभेदामुळें स्थापन झाली. किर्लोस्कर मंडळींत प्रख्यात गायक म्हणून प्रसिद्ध असलेले नारायणराव राजहंस ऊर्फ बालगंधर्व हे ह्या नव्या कंपनीच्या मालकापैकीं मुख्य मालक होते. या कंपनीच्या स्थापनेपासूनही काकासाहेब व गंधर्व मंडळी यांचे संबंध असेच चांगले राहिले.

संगीताच्या निमित्तानें व नाटकांतील पदास अभिनव चाली मिळविण्याच्या निमित्तानें मूळच्या किर्लोस्कर कंपनींतील जोगळेकर, बालगंधर्व

वगैरे गायक नटाप्रमाणेंच काकासाहेबांचा प्रथम गायनाचार्य भास्करबुवा बखले, वादनपटु गोविंदराव टेंबे व पुढें संगीतकलानिधि मास्तर कृष्णराव वगैरे अनेक संगीततज्ज्ञांचा काकासाहेबांशीं संबंध आला व त्यांच्या सर्वांच्या सहकार्याचें फल मानापमान, विद्याहरण, स्वयंवर वगैरे नाटकांतील यशस्वी संगीतानें जनतेच्या पदरांत पडलें. खानदानी चालीबरहुकूम पद्यरचना करतांना काकासाहेबांना तांत्रिक अडचणी येत असत तरीही काकासाहेब स्वयंभू कवि असल्यानें वरील संगीततज्ज्ञांच्या मदतीनें त्या तांत्रिक अडचणी दूर होऊन बहुतेक पदें काव्यपूर्ण व लोकप्रिय झालीं आहेत. संगीत नाटकालाही अभिनयकौशल्याची तितकीच जरूर असते व नाटकाचें खरें यश त्यांतच आहे, ही गोष्ट काकासाहेबांचा संगीत नाटक मंडळ्यांशीं जो संबंध आला त्या प्रसंगानें काकासाहेबांनीं ती संगीत कंपन्यांतील नटांचे मनावर बिंबवली. गंधर्व नाटक मंडळीप्रमाणेंच काकासाहेबांचा पुढें नटवर्य चिंतामणराव कोल्हटकर, मास्तर दीनानाथ व कोल्हापुरे यांनीं काढलेल्या बलवंत नाटक मंडळीशींही संबंध आला. कोल्हटकर हे संगीत कंपनींत नट होते तरी मुख्यतः संगीतापेक्षां अभिनय गुणावरच लौकिकास चढले. ते मूळ किर्लोस्कर कंपनींत आल्यापासून पुढें बलवंत कंपनीचे मालक झाले तरी काकासाहेबांचा व त्यांचा आपलेपणाचा संबंध होता. व काकासाहेबांची शिकवणूक व सल्ला त्या नटांच्या व नाटक कंपनीच्या उत्कर्षास बराच कारणीभूत झाला असें त्या कंपनीच्या इतिहासावरून दिसून येईल. काकासाहेबांचा पुढें सुलोचना संगीत मंडळीशींही नाटककार या नात्यानें संबंध आला पण तो अल्प असल्यामुळें त्यांचेकरितां—'बायकांचें बंड' संगीत केलें व 'त्रिदंडी संन्यास' हें नवें शेवटचें नाटक त्या मंडळीनें बसविलें ह्यापेक्षां नमूद करण्यासारखा इतिहास त्या कंपनीचा नाहीं.

त्या वेळीं चालू असलेल्या नाटक कंपन्या व काकासाहेब यांच्या एकमेकांशीं असलेल्या संबंधास, काकासाहेब म्हणजे महाराष्ट्र नाट्यकुटुंबांतील

एक कर्ते पुरुष असें नामाभिधान दिल्यास तें सर्वस्वीं अनुरूप होईल. नाटक कंपन्या व नाट्यसंस्था यांचेवर काकासाहेबांचें आत्मीयतेचें प्रेम होतें. मराठी रंगभूमीचे ते स्वतःच फार ऋणाईत समजत व तें ऋण फेडण्याची व रंगभूमीचा लौकिक वाढविण्याची संधि जेव्हां जेव्हां त्यांना प्राप्त झाली त्या त्या वेळीं श्रेष्ठ व त्यागी मनोवृत्तीनें त्यांनीं ती साधली. त्यांचा नाट्यसृष्टींतील अनेक नाटक मंडळ्या, नट व नाटककार यांच्याशीं संबंध आला. त्याबद्दल वर नमूद केलेला इतिहास व काकासाहेबांच्या प्रत्येक नाटकाच्या पहिल्या प्रयोगाची हकीकत लिहितांना, प्रत्येक प्रसंगीं दिलेली माहिती ही सर्व पाहातां काकासाहेबांनीं या सर्वांच्या उत्कर्षास किती सहाय्य केलें आहे तें दिसून येईल.

या सहाय्यांतच काकासाहेबांचें नाट्याचार्य हें पद सिद्ध झालें आहे. हें आचार्यपद ज्या नटांच्या अभिनय गुणामुळें प्राप्त झालें त्या नटांतील नाट्यगुण प्रभावीपणें रंगभूमीवर प्रतीत व्हावेत याकरितां काकासाहेब किती मेहनत घेत असत याचा विचार केल्यास काकासाहेबांचें यश कशांत होतें तें स्पष्ट होईल. नटसम्राट बालगंधर्वांच्या गोड गळयामुळें त्यांच्या अभिनयकौशल्याच्या दुधांत साखर पडली.

### अभिनय शिक्षण

काकासाहेबांच्या यशाचें एक महत्त्वाचें कारण नाटक लिहितांना कल्पिलेली भूमिका नटाकडून जशीच्या तशी वठवून घेण्यांत ते जी दक्षता घेत तें होय. आम्हीं पूर्वीं सांगितलेंच आहे कीं नाटक लिहूं लागण्यापूर्वीं पूर्ण विचारानें अन्तश्चक्षूंपुढें नाटकाचें संपूर्ण चित्र दृग्गोचर झाल्याशिवाय काकासाहेब नाट्यलेखनास सुरवात करीत नसत. अशा रीतीनें अभ्यासानें व मननानें तयार झालेलें चित्र त्यांच्या अन्तःपटलावर स्थिर झालें असल्यानें नटाकडून तें चित्र वठविण्याकरितां काय केलें पाहिजे हें ते बरोबर जाणीत व नटाला समजावून देऊं शकत. या सव्यसाचित्वामुळें त्यांचीं नाटकें

रंगभूमीवर गाजलीं आहेत. काकासाहेब नाटकें बसविण्याचे बाबतींत किती मेहनत व काळजी घेत याबद्दल त्यांच्याशीं संबध आलेल्या श्री. बालगंधर्व, नटवर्य दाते, श्री. पटवर्धन, श्री. कारखाननीस वगैरे अनेक नटांनीं सादर साक्ष दिली आहे. नाटकाच्या तालमी ते स्वतः घेत. तालमी घेणें म्हणजे नाटक समजावून सांगणें हा त्यांनीं पाडलेला नवा संप्रदाय होता. तालमींत व तालमीनंतर भूमिकेचीं बाह्यांगें व अन्तरंगें ह्यांचें खूप विवेचन ते करीत. तालमी घेतांना ते अगदीं रंगत. अशा भावनोत्कट शिक्षकाच्या हाताखालीं शिक्षण घेतल्यावर कोणता अभिजात नट आपली भूमिका तन्मयतेनें करणार नाहीं ? नाटयशिक्षणांत शब्द, स्वर, श्वसन, अर्थ, आविर्भाव व सर्वांत महत्त्वाचें मनन यावर त्यांचा फार भर असे. प्रत्येक गोष्ट उत्तम झाली पाहिजे या सात्त्विक आग्रहामुळें त्यांच्या तापटपणाबद्दल नटांना त्रास झाला तरी कधीं राग आला नाहीं. उलट आदरानें ते त्यांचा उपदेश मानीत असत.

नाटकाच्या तालमीनंतर त्या नाटकाचे कपडे, सीनसिनरी या बाबतींत ते जातीनें लक्ष घालीत असत. सुमुहूर्त पाहून नाटकाचा प्रयोग लावणें, दर नाटकास अखेरपर्यंत प्रेक्षकांत बसून नाटक पाहाणें, नटाच्या अभिनयावर लक्ष ठेवणें व चुकलेल्या नटास दुसरे दिवशीं कमीजास्त कडक शब्दांत समज देणें अशी या काटेकोर गुरूची सक्त देखरेख असल्यानें अगदीं मुख्य नायकनायिकेचें काम करणाऱ्या नटापासून सामान्य कामें करणाऱ्या नटापर्यंत प्रत्येकास काकासाहेबांचा वचक वाटत असे. याचा परिणाम म्हणजे जो तो आपापलीं कामें लक्षपूर्वक करी व त्यामुळें नाटक यशस्वी व्हावयाचें हें ठरलेलेंच असे. नाटकाच्या तालमीच्या वेळची शिस्त व वक्तशीरपणा याबद्दल काकासाहेब फारच कटाक्षानें वागत.

अशा रीतीनें नाटक रंगभूमीवर येण्याचे अगोदर त्याची मेहनत घेण्याची पद्धत असे. आपण ज्या विचारानें भूमिका लिहिल्या त्याच नमुन्याचें त्याचें प्रगटीकरण झालें पाहिजे असा त्यांचा आग्रह व कटाक्ष असे.



नाट्याचार्य व नटसम्राट

नाटक बसवण्यापूर्वी नटांची निवड करण्यांतही ते फार काळजी घेत असत व अशा निवडलेल्या नटांनीच तीं तीं कामें केलीं पाहिजेत असा त्यांचा आग्रह असे. नाटकप्रयोगाच्या यशस्वितेचीं जीं अनेक कारणें आहेत त्यांतील नटांची निवड हेंही एक महत्त्वाचें कारण आहे. चित्राहरण नाटकानें श्री. गोविंदराव टेंबे यांना नट या नात्यानें जसें पुढें आणलें त्याप्रमाणेंच स्वयंवर नाटकानें पंढरपूरकरबुवा आणि पेटकर यांना पुढें आणलें. त्यांतील भीष्मकाचें व रुक्मीचें काम काकासाहेबांनीं इतकें सुंदर बसवून घेतलें होतें कीं, भीष्मकाच्या अटकेच्या तिसऱ्या अंकांतील प्रसंगीं प्रेक्षक भावनावश होऊन अश्रू ढाळीत 'ईश घेई अवताराला' हें भीष्मकाचें पदही पंढरपूरकरबोवा अत्यंत रंगून म्हणत. मेनका नाटकांत विश्वामित्राचें काम जोरदार आहे आणि तशाच तडफेचीं पदें त्याला आहेत. तें काम काकासाहेबांनीं श्री. विनायकराव पटवर्धनांचेकडून चांगलें बसवून घेतलें होतें व ते चांगलें करीतही. खुद्द बालगंधर्व हें काकासाहेबांच्या तालमी मिळण्यापूर्वी फक्त गायक म्हणून लोकप्रिय होते, पण काकासाहेबांच्या नाट्यशिक्षणानें ते अभिनयपटु नट म्हणून अग्रेसर झाले. भागवत, जोगळेकर, श्री. दाते, चिंतामणराव कोल्हटकर वगैरे प्रसिद्ध नट त्यांच्याच, भूमिकेशीं समरस होऊन काम करण्याच्या, शिक्षणामुळें नटश्रेष्ठ पदवीला चढले. व त्यामुळें अशा उत्कृष्ट नटाकडून काकासाहेबांच्या नाटकाच्या यशस्वितेंत भर पडली.

## 'खाडिलकर युग'

काकासाहेबांच्या नाट्यव्यवसायांतील 'आचार्य' पदाचा फायदा नाट्यव्यवसायी मंडळींना फार झाला. काकासाहेबांनीं आपल्या आत्मनिवेदनपर उल्लेखांत त्यांनीं असें लिहून ठेवलें आहे कीं, 'पुढें नाटकी मंडळींचा सहवास घडल्यामुळें तेथील ठळक ठळक दोष मला लागावयास पाहिजे होते. पण लो. टिळकांच्या दराऱ्यामुळें आणि त्यांनीं मला 'केसरीकार' या

नात्यानें त्यांच्या बरोबरीच्या उन्नतीच्या मार्गाला लावल्यामुळें नाटकी मंडळींच्या अंगच्या ठळक ठळक दोषापासून माझा बचाव झाला हे लोकमान्य टिळकांचे माझ्यावर उपकार झाले आहेत.' काकासाहेबांच्या वरील उद्गारांत नमूद केलेला परिणाम त्यांच्यावर तर झालाच पण त्यांच्या उच्च चारित्र्यामार्फत त्यांच्या सहवासांत आलेल्या नाटक मंडळ्यावर झाला. काकासाहेबांनीं नाट्यव्यवसायाला एक तऱ्हेनें उच्च दर्जा आणून दिला. इतर धंदेवाईकाप्रमाणें नटवर्ग हाही सन्मान्य नागरिक असतो असा गौरव नटवर्गाला त्यांनीं मिळवून दिला. महाराष्ट्र नाटक मंडळीसारख्या सुशिक्षित मंडळींनीं नाट्यव्यवसायाला उपजीविकेचें सन्माननीय साधन बनविण्याचा जो उपक्रम सुरू केला तो काकासाहेबांच्या सहवासामुळें व सहाय्यामुळें यशस्वी झाला.

नाट्यव्यवसाय हें सन्मान्य साधन राहिलें पाहिजे ह्या त्यांनीं निश्चित केलेल्या तत्त्वामुळें ते नाटक कंपनीशीं अत्यंत उदारपणानें वागत. नाट्यलेखनाच्या पुरस्काराच्या पैशाबद्दल ते नाटक कंपनीला कधींही अडवीत नसत. कराराची भाषा झाली असली तरी आपल्या पैशाचा विचार करण्यापूर्वी नाटक मंडळींच्या योगक्षेमाचा विचार ते प्रथम करीत असत. या त्यागी वृत्तीमुळें त्यांचेबद्दल नाटक मंडळ्यांतील आदर वृद्धिंगत होत गेला. महाराष्ट्र व किर्लोस्कर कंपन्यांकडे नाटकाची मोनापोलीच्या रकमेची मागणी त्यांनीं आपण होऊन कधीं केली नाहीं. उलट ठरलेल्या रकमेपेक्षां कमी रकमाही काकासाहेबांनीं घेतल्या आहेत. 'नवाकाळ' हें स्वतःचें वृत्तपत्र काढल्यावर नाटक मंडळींच्या जाहिरातीच्या बाक्या राहिल्या तरी त्याचा तगादा कधीं केला नाहीं किंवा त्यांच्या जाहिरातीही कधीं बंद केल्या नाहींत.

या कालांतील बहुतेक सर्व कंपन्या व बहुतेक सर्व नाटककार यांना त्यांच्या कलाकृतींत काकासाहेबांची थोडीबहुत तरी मदत झालेली आहे.

शिवरामपंत परांजपे यांचें पांचवा पांडव नाटक, कोल्हटकरांचें प्रेमशोधन, गडकऱ्यांचें प्रेमसंन्यास, केळकरांचें कृष्णार्जुनयुद्ध, वासुदेवशास्त्री खरे यांचें तारामंडळ इत्यादि नाटकें रंगभूमीवर यशस्वी होण्यास काकासाहेबांचें मार्मिक दिग्दर्शन कारणीभूत झालेलें आहे. प्रथितयश नाटककार मामासाहेब वरेरकर यांचें संन्याशाचा संसार, केळकरांचें तोतयाचें बंड, वीरवामन-रावांची रणदुंदुभी, बॅ. सावरकरांचें संन्यस्त खड्ग, कमतनूरकरांचें श्री व बामणगांवकरांचें आत्मतेज या नाटकांच्या बाबतींत काकासाहेबांच्या स्नेहपूर्ण प्रोत्साहनाची त्या त्या नाटककारांना अगर नाटक मंडळींना मदत झालेली आहे. ह्या सर्व थोर नाटककारांशीं काकासाहेबांचे संबंध आदराचे व प्रेमाचे होते. तसेंच गुर्जरांचें नंदकुमार व वसंतराव देसाई यांचें अमृतसिद्धि व श्री. ना. वि. कुलकर्णी यांचें कान्होपात्रा हीं नाटकें मराठी रंगभूमीवर सत्वर आलीं तीं काकासाहेबांच्या विशाल हृदयामुळेंच आलीं. टिपनीस, औंधकर, बोडस वगैरे नाटककार तर काकासाहेबांच्या नाटक कंपन्यांतून नट म्हणून काम करीत असतांनाच उदयाला आले.

मराठी नाट्यसृष्टींतील इतर कांहीं नाटककार यांच्याही डोळ्यांपुढें काकासाहेबांचा आदर्श सदोदित होता. या चाळीस वर्षांच्या दीर्घ कालांत होतकरू नाटककारांच्या नाट्यकृति वाचून त्यांना काकासाहेबांनीं निर्व्याजपणें मार्गदर्शन केलें आहे. काकासाहेबांकडून मिळालेल्या ह्या सहाय्याचा त्या त्या नाटककारांनींही प्रसंगाप्रसंगानें कृतज्ञतापूर्वक उल्लेख केला आहे. श्री. नारायणराव बामणगांवकर यांनीं आपलें एक नाटक खाडिलकरांना अर्पण केलें असून अर्पण-पत्रिकेंत 'महाराष्ट्राचे शेक्सपियर' असा काकासाहेबांचा उल्लेख केला आहे. आपलें नाटक काकासाहेबांनीं येऊन थोडा वेळ पाहिलें तरी आपल्या श्रमाचें चीज झालें असें प्रथितयश नाटककारांना तसेंच नटश्रेष्ठांनाही वाटत असे इतकें त्यांच्या नाट्यसेवेच्या तपश्चर्येमुळें निर्माण झालेल्या आशीर्वादाला सर्वांकडून महत्त्व मिळत असे. नाटककार व नट

या दोघांचीही मान्यता काकासाहेबांनीं आपल्या कर्तृत्वानें वाढविली होती.

अशा रीतीनें महाराष्ट्रांतील नाटक कंपन्या, त्यांचीं नाटकें, त्या नाटकांचे नाटककार आणि मराठी नाट्यावर लुब्ध असणारी जनता या सर्वांचें हृदय आपल्या तेजस्वी व कलापूर्ण कर्तृत्वानें काकासाहेबांनीं एकसमयावच्छेदें-करून काबीज करून त्यांच्याकडून प्रेमाची ‘ नाट्याचार्य ’ ही पदवी जशी मिळविली, तसेंच महाराष्ट्राच्या नाट्यसृष्टींत स्वतंत्र ‘ खाडिलकर युगाचे ’ प्रणेते म्हणूनही आपलें नांव त्यांनीं कायम केलें व म्हणूनच महाराष्ट्र शाहीरांनीं काकासाहेबांचे पोवाडे गाईले आहेत.

जनहृदयांची ओळख ज्याला।वश केलें त्या ललित कलेला।
कृष्णकवी हा म्हणुनी झाला। नाट्यदेविचा प्यार!॥



: १० :

# अस्तोदय



दीपे दीप लाविला । तैसा परिष्वंग तो जाला
द्वैत न मोडितां केला । आपण पें पार्थ ॥

--ज्ञानेश्वर

अस्तोदय ही नियति कुठली, स्वयंभु तेजाला ॥

—अनामिका

लोकमान्य विलायतेमधून आले ते विविध तऱ्हेचीं यशें घेऊन आले. ते विलायतेंत गेले होते त्यांत त्यांचे उद्देश दोन होते. एक उद्देश चिरोल-विरुद्ध खटला लढणें हा होता. दुसरा उद्देश हिंदुस्थानच्या स्वराज्य-प्राप्तीच्या कार्यांत प्रत्यक्ष इंग्लंडमधील अधिकारी पक्षांत खटपट करण्याचा होता. चिरोल खटल्याचे बाबतींत न्यायालयाच्या निरुंद चौकटींत जरी त्यांचें यश अग्निसमर्पण झालें व त्यावर प्रतिपक्षाचा खर्च द्यावा लागून सुमारें तीन लाखांची घृतधारा ओतावी लागली तरी त्यांतच ते यश दिव्यत्वाला पावून त्यानें आपल्या सोज्ज्वल तेजानें हिंदभूमीच

काय पण सर्व जग उजळून टाकलें. त्यांची कीर्ति जगभर पसरली. हिंदुस्थानच्या लोकांनीं टिळक पर्सफंडाच्या रूपानें त्यांचेवरील प्रेमपूर्वक निष्ठा व्यक्त केली. टिळक पर्सफंडाची कल्पना काढून ती यशस्वी करण्यांत काकासाहेब प्रमुख होते.

स्वराज्याच्या खटपटींतील यशही कांहीं कमी नव्हतें. ते परत हिंदुस्थानांत आले त्यावेळीं मॉंटेग्यु चेम्सफर्ड सुधारणांचें बिल पार्लमेंटापुढें होतें व सिडन हॅम कंपूनें तें लांबविण्याचा कितीही प्रयत्न केला तरी पार्लमेंटचे प्रमुख बोनर लॉ यांनीं ते हिंदी कॉंग्रेस भरण्याच्या आंत पास झालेंच पाहिजे असा आग्रह बोलून दाखविला होता. हिंदी जनता आतां जागी झाली आहे व तिचे पुढारी या जनताजागृतीच्या जोरावर इंग्लंडास, आजपर्यंतच्याप्रमाणें हिंदुस्थानावर अनिरुद्ध सत्ता चालवून देणार नाहींत याची प्रभावी जाणीव लोकमान्यांनीं इंग्लंडांत करून दिली होती.

### अमृतसर कॉंग्रेस

इकडे महात्मा गांधींनीं आपल्या सत्याग्रहानें यावेळीं हिंदी राजकारणास नवा जोर आणला होता व त्यास केसरीद्वारा काकासाहेबांनीं पूर्ण उचलून धरलें होतें. नव्या सुधारणांमुळें लोकमान्यांना विविध कारणांसाठीं समाधान झालें होतें व तो आनंद काकासाहेबांनीं केसरीद्वारा घोषित केला होता. त्यांच्या आनंदाचें कारण, सरकार विरुद्धच्या लढाईत, या सुधारणांमुळें, लढाईची रेषा निश्चितपणें शत्रु पक्षाच्या हद्दींत गेली, हें होतें. अमृतसरची कॉंग्रेस भरली त्याचे थोडेच अगोदर सुधारणांचें बिल पास होऊन त्यास बादशहांची मंजुरी मिळाली व राजकैदी सोडण्याच्या हुकुमासह ही मंजुरी बादशहांनीं जाहीर केली. राजकीय कैदी सोडावेत ही राष्ट्रीय सभेची मागणीही सुधारणा देतांना जाहीर करण्यांत सरकारनें हिंदी राष्ट्रीय सभेच्या चळवळीचें दडपण आतां आम्हांस फार जाणवूं लागलें आहे याची स्पष्ट कबुलीच दिली असल्यामुळें हिंदी पुढाऱ्यांस आपल्या कामगिरीबद्दल

कृतार्थता वाटली व आनंद वाटला. अमृतसरच्या काँग्रेसमध्यें जो बादशहाच्या आभाराचा ठराव पास झाला, त्याचा खरा रोख बादशहांकडे नसून हिंदी जनतेनें लढ्यांत मिळविलेल्या वरील महत्वाच्या यशाबद्दल तिला झालेल्या आनंदाकडे आहे, हें इंगित कांहीं मंडळींना कळलें नाहीं; म्हणून अमृतसर काँग्रेसमध्यें ठरावाच्या वेळीं वाद झाले.

नवीन सुधारणा आल्या याचा अर्थ लढाईचा नवा पवित्रा पडला इतकेंच. याची तयारी लोकमान्यांनीं आपल्या सहकारी पुढाऱ्यासह ताबडतोब सुरू केली. निवडणुकी लढविणें व इतर प्रचार फार मोठा करणें जरूर होतें. म्हणून त्यांनीं केसरी पत्रास नवें स्थायी स्वरूप देण्याचें ठरविलें. केसरीचा ट्रस्ट करून त्यांत काकासाहेबांना ट्रस्टी करण्याचें व केसरी द्विसाप्ताहिक करून त्याचें संपादकत्वही काकासाहेबांकडे सोंपविण्याचें लोकमान्यांनीं ठरविलें व या संबंधांतील जुना इतिहास ध्यानीं ठेवून ही योजना त्यांनीं त्यांच्यापुढें मांडली. याबाबतची माहिती काकासाहेबांनीं आपल्या आत्मनिवेदनपर आठवणींत पुढीलप्रमाणें दिली आहे.

" १९२० सालीं लोकमान्य टिळकांनीं केसरी द्विसाप्ताहिक करण्याचें ठरविलें आणि ट्रस्टची योजना मुक्रर केली. त्यावेळीं त्यांनीं मला विचारलें, मी केसरीचा ट्रस्ट करण्याचें ठरविलें आहे व तुम्हांला एक ट्रस्टी करणार आहे. याबद्दल मी प्रथम तुम्हांला विचारीत आहे. तुम्ही हॉटी-रागीट आहां हें मला माहीत आहे म्हणून तुम्हांला प्रथम विचारीत आहे. त्यावर मी सांगितलें कीं, 'तुम्हांला पाहिजे त्या पत्राची, केसरीची किंवा मराठ्याची जबाबदारी माझ्यावर सोंपवा. त्या पत्राचें धोरण वगैरेची सर्व मुखत्यारी माझी राहील. माझी त्याला मान्यता आहे.' त्यानंतर द्विसाप्ताहिक केसरी माझ्याकडे रहावा असें ठरलें आणि श्री. केळकरांनी त्याला मान्यता दिली."

याचे जोडीस लोकमान्यांनीं नवीन राजवट कायम करण्यासाठीं काँग्रे

डेमोक्रॅटिक पार्टीची संघटना करून तिचें धोरण विशद करण्यासाठीं एक जाहीरनामा काढला व या पक्षातर्फे सर्व हिंदुस्थानभर निरनिराळ्या प्रांतांत कौन्सिलांच्या सभासदत्वासाठीं कोणी कोणी उभें रहावें हेंही विचारविनिमय करून ठरवून टाकलें. त्यांत मुंबई कौन्सिलसाठीं काकासाहेबांनीं उभें रहावें अशी योजना लोकमान्यांनीं आखली.

द्विसाप्ताहिक केसरी व कौन्सिलचें कामही त्यांच्यावर नवी जबाबदारी येणार होती व त्यांत त्यांना चांगलेंच लक्ष घालावें लागणार होतें. त्यांच्या मनांत त्यावेळीं द्रौपदी नाटकाची कल्पना घोळत होती व तें नाटक गंधर्व नाटक मंडळीसाठीं लिहिण्यासही त्यांनीं सुरुवात केली होती नवी राजकीय जबाबदारी अंगावर घेण्याच्या अगोदर हें हातीं असलेलें काम संपवून टाकावें असें ठरवून,—द्रौपदी नाटक पुरें करण्यासाठीं चार महिन्यांची रजा त्यांनीं लोकमान्यांच्या जवळ मागितली. या रजेच्या मुदतींत श्री. न. चिं. केळकर यांचें नांव केसरीचे संपादक म्हणून घातलें गेलें. १९०९।१० सालीं केसरीवरील संपादक म्हणून असलेलें त्यांचें नांव त्यांचे संमतीशिवाय—इतकेंच नव्हे-त्यांना न कळवितां—काढलें गेलें होतें व त्याबद्दल काकासाहेबांची तक्रार होती. म्हणून यावेळीं लो. टिळकांनीं काकासाहेबांना विचारलें कीं, 'तुमचें नांव तुम्हांला न कळत निघत नाहीं ना? संमति नसेल तर मला आत्तांच सांगा!' त्यावेळीं काकासाहेबांनीं त्यास आपली संमति असल्याचें सांगितलें. याप्रमाणें केसरींतील काम कांहीं दिवस दुसऱ्यावर सोंपवून काकासाहेब आपलें द्रौपदी नाटक बसविण्यासाठीं मुंबईस गंधर्व नाटक मंडळींत येऊन राहिले.

## वडील बंधूंचें निधन

याप्रमाणें एका बाजूनें काकासाहेबांच्यापुढें नवीं कामें व नवीं ध्येयें उभीं होत असतां दुसरीकडून परिस्थितीचें वारें त्यांना निराळ्या बाजूस रेटीत होतें. त्यांचे वडील बंधु हरिपंततात्या आजारी होते. त्यांची

शिरहट्टीच्या मामलेदारीवरून बदली होऊन ते आतां स्पेशल ड्यूटी ऑफिसर म्हणून सांगलीस आले होते. त्यांचे ज्येष्ठ चिरंजीव-म्हणजे प्रस्तुत लेखक-नुकतेच वकिलीची परीक्षा पास होऊन तेथें वकिली करीत होते. त्यांचे इतर मुलगे शिकत होते. हरिपंततात्यांचा आजार बरेच दिवस चालू होता. सांगलीचे चांगले डॉक्टर व वैद्य यांची मदत असूनही रोग वाढत जाऊन शेवटीं तो हृदयाच्या विकारावर गेला. काकासाहेबांना हें कळल्यावर ते आपले मित्र डॉ. बाबासाहेब परांजपे व वैद्यपंचानन कवडेशास्त्री यांना घेऊन मुद्दाम सांगलीस आले व या उभयतांच्या विचारें तात्यांच्या रोगावर नवीन औषधयोजना करण्यांत आली. हें करून काकासाहेब परत पुण्यास गेले खरे. पण याही औषधाचा कांहीं उपयोग झाला नाहीं. ता. २० जुलै १९२० रोजीं सकाळीं बोलतां बोलतां हरिपंततात्यांचें प्राणोत्क्रमण झालें.

या बातमीनें काकासाहेबांस फारच वाईट वाटलें. पितृसुख पाहण्याचें त्यांच्या नशिबीं नव्हतें. पण तात्यांच्या जिव्हाळयानें काकासाहेबांस याबद्दल कधीं आठवण झाली नाहीं. गृहसंसाराचा भार वाहण्यासाठीं प्राथमिक शाळेंतील शिक्षकाची छोटी नोकरी पत्करली व संधी येईल तेथें कर्तृत्व दाखवून ते सांगलीच्या राजेसाहेबांच्या खास विश्वासांतील स्पेशल ड्यूटी ऑफिसर झाले. आपल्या बंधूंना राष्ट्रकार्य करण्यास उत्तेजन देत असतां त्यांनीं स्वतः सांगलीचे ॲडमिनिस्ट्रेटर बर्कसाहेब यांचे मदतीनें जनसेवेचें काम चालू ठेवलें होतें. सांगली संस्थानांत प्राथमिक शिक्षण सक्तीचें व मोफत करण्याची योजना त्यांनींच आखून दिली.

कॅ. बर्क यांसच तात्यांच्याबद्दल विशेष आदर होता असें नव्हे तर पुढें गादीवर आलेले सांगलीचे राजे यांचाही तात्यांच्या सौजन्ययुक्त व सेवा-वृत्तीच्या कर्तृत्वावर फार विश्वास होता. परस्पर सहकारी पेढ्यांचें खातें, ग्रामोद्धाराचें खातें वगैरे खास जनहिताचीं खातीं स्पेशल ड्यूटी ऑफिसर म्हणून श्रीमंतांनीं तात्यांच्याकडेच सोंपविलीं होतीं. त्यांच्या परोपकारी

वृत्तीमुळें त्यांनीं आपल्या शिरहट्टीच्या मामलेदार या नात्याच्या कारकीर्दींत शक्यतों प्रत्येक खेड्यास शाळा, विहीर व धर्मशाळा देऊन तेथील जनतेची सेवा केली. या ऋजु सेवाभावामुळें ते 'देव मामलेदार' या नांवानें त्या तालुक्यांत प्रिय झाले.

काकासाहेबांना तात्यांचा कोण आधार! लहानपणीं कृष्णाकांठावर हूडपणा करण्यांत त्यांचा जो बेगुमानपणा होता तोच आपल्या जीवनाची नाव वकिलीच्या सुंदर सरोवरांत टाकण्यासाठीं मुंबईस आणली असता ती तात्यांना न कळवितांच खवळलेल्या देशसेवेच्या समुद्रांत त्यांनीं पुण्यास फेकून दिली. या त्यांच्या कृत्यांतही दिसून येतो. आपण कशीही उडी घ्यावी, आपणास प्रसंगीं झेलणारे, कौतुक करणारे, सावरणारें कोणी आहे याची हृदयस्थ जाणीवच जगांतील सर्व मोठ्या साहसाच्या मुळाशीं असते. तात्यांनीं काकासाहेबांचे एल्एल्. बी. पावेतोंच शिक्षण केलें. इतकेंच नव्हे पण नेपाळची धाडसी कामगिरी करून पुण्यांस परत येईपर्यंत त्यांच्या सर्व संसाराची जबाबदारीच तात्यांनीं संभाळली होती. तात्यांच्या जिवावर आपण देशसेवा करूं शकलों असें त्यांना नेहमीं वाटे. काकासाहेबांनीं देशसेवा केली त्यांत तात्यांचें सेवानुकूल हृदय आनंदित झालें. काकासाहेबांनीं देशासाठीं त्याग केला त्यांत तात्यांचें त्यागी मन रमलें. काकासाहेबांवर त्यांच्या राजकीय चळवळीमुळें सरकारचा रोष होता व त्यामुळें तात्यांनाही थोडाबहुत त्रास सहन करावा लागला. पण त्याचें त्यांना कांहीं वाटलें नाहीं.

काकांनीं केसरींत एखादा उत्तम लेख लिहिला म्हणजे तो वाचतांना तात्यांचा चेहरा नेहमीं उमलून जाई आणि तात्यांचा टांगा येतांना वरून पाहिला म्हणजे ते टांग्यांतून उतरतात न उतरतात तोंच भक्तियुक्त अंतःकरणानें त्यांना अभिवादन करण्याची काकासाहेबांना घाई होत असे. तात्यांच्या प्रेमळ शांत स्वभावाची छाया काकासाहेबांच्या उसळत्या हृदयाला

नेहमींच सोज्ज्वळ आल्हाद देत असे. ‘ शांत हरि हास्य धरि, सौख्य झालें जनीं ’ या ‘ स्वयंवर ’ नाटकांतील आरंभींच्या ईशस्तवनात्मक पद्यानें काकासाहेबांनीं जणुं तात्यांचेंच स्तवन केलें आहे.

तात्यांच्या मृत्यूनें काकासाहेबांचें भावनात्मक मन विव्हल झालें असल्यास नवल नाहीं. स्वकर्तव्याची उच्च शिकवण देणारे ते काकासाहेबांचे गुरु होते. तात्यांच्या कुटुंबाचा भार आतां त्यांच्यावरच पडला. तात्यांच्या निधनाची वार्ता जेव्हां काकासाहेबांकडे गेली तेव्हां सांगलीस लिहिलेल्या पत्रांत त्यांनीं आपल्यावरचें छत्र नाहींसें झाल्याचें लिहिलें असून ‘ माझ्या कर्तव्याच्या दृष्टीनें तात्या मला जिवंतच आहेत, हें आधार देणारें वाक्य लिहिलेलें आहे, काकासाहेबांचा हा आधार आम्हांस त्यांच्या हयातीपर्यंत परिपूर्ण होता.

## लोकमान्यांचें देहावसान !

काकासाहेब तात्यांच्या दहाव्या दिवसासाठीं सांगलीस आले व कृष्णे-वरील विष्णूच्या घाटावर तिलोदकाचा विधि झाला. मंडळी परत घरीं येतात तों धोंडोपंत विद्वांसांची काकासाहेबांना तार आलेली ! “ लोकमान्य अत्यवस्थ आहेत, सत्वर निघून या. ” काकासाहेब तावडतोब मुंबईस गेले व दोघांची भेट झाली, पण लवकरच लोकामान्य सर्व हिंदुस्थानाला अंधः-कारांत टाकून परलोकीं निघून गेले ! काकासाहेबांनीं आपल्या आत्मनिवे-दनांत हा प्रसंग नमूद केला आहे.

“ द्रौपदी नाटक लिहिण्यांत मी गुंतलों असतांना जुलै महिन्यांत माझे थोरले बंधु हरिपंत तात्या वारले. डोक्यावरचें छत्र गेलें म्हणून विव्हल अंतःकरणानें बंधूंच्या उत्तरक्रियेच्या वेळीं मी सांगलीस गेलों. तेथें असतांनाच लोकमान्य टिळक अत्यवस्थ असल्याची श्री. विद्वांस यांची तार आली आणि मी तसाच मुंबईस गेलों. सरदारगृहांत गेल्यावर लोक-मान्यांचें दर्शन झालें. गांठ पडली. त्यांची भेट झाल्यावर जेवण उरका

असें सांगितलें. लोकमान्य टिळक शुद्धीवर असतांनाची हीच माझी व त्यांची भेट. त्यानंतर लोकमान्य जे बेशुद्ध झाले ते पुन्हां पूर्णपणें शुद्धीवर आलेच नाहींत. पुण्यास मी परत आलों तों बंधु आणि गुरु यांना गमावून आलों. लोकमान्य टिळकांच्या पश्चात् ता. १० च्या केसरींत लोकमान्यांचें पुण्यस्मरण करणारा अग्रलेख मीं लिहिला. केसरींतील तोच माझा शेवटचा लेख होय.''

पितृतुल्य वडील बंधूंच्या निधनाबरोबरच परमपूज्य गुरुही दिवंगत व्हावेत ही किती दुःखाची गोष्ट! बंधुनिधनाचे अश्रु पुसण्याच्या आंतच लोकमान्य देहातीत होऊन काकासाहेबांना दुसरा आघात झाला. लोकमान्य त्यांच्या आयुष्याचे दैवत होते. लोकमान्य त्यांच्या कर्तृत्वाची स्फूर्ति होते. त्यागाच्या चुन्यांत बांधलेल्या केसरीच्या बिनीच्या मोर्चावर उभे राहून शत्रुपक्षावर मुलुखमैदान तोफेचा अचूक मारा करण्यास लोकमान्यांनीं त्यांना शिकवलें. आपल्या हृदयांतील देशप्रेमाचे तेजानें महाराष्ट्र सरस्वतीच्या महालाला देदीप्यमान मुलामा देण्याच्या कार्यास लोकमान्यांनीं त्यांना उद्युक्त केलें आणि मराठी नाट्यदेवीच्या मंदिरांत कलाप्रचुर कर्तव्यकर्मप्रेरक नवें दालन निर्माण केल्याबद्दल लोकमान्यांनीं त्यांची प्रशंसा केली.

लोकमान्यांनीं जन्मभर स्वतःच्या आचरणानें जी शिकवण लोकांना दिली ती शिकवण श्रद्धायुक्त मनानें काकासाहेब गिरवीत असत. लोकमान्यांच्या पार्थिव देहाचें विसर्जन केल्यावर जड अंतःकरणानें गतकालाकडे दृष्टि वळविली असतां काकासाहेबांना लोकमान्य आपल्या शिकवणुकीच्या रूपानें जिवंतच असल्याचें दिसत होतें. ता. १०-७-२० च्या केसरीच्या अंकांत ती शिकवण काकासाहेबांनीं लोकमान्यांच्या पुण्यस्मरणार्थ पुढील प्रमाणें दिला आहे.—

"...आपले पूर्वज मोठे होते आणि चिमुकलें अर्भकही त्याच मोठे-

पणास चढणार आहे अशी दृढनिष्ठा जशी वीरमातेच्या अंगां असते, तशीच दृढनिष्ठा लोकमान्यांचे अंगीं होती. आयुष्यभर त्यांनीं जें पाळलें ते या सतीचें व्रत पाळलें ! आपल्यांतला पुढारी सतीचें व्रत रक्तांत भिनलेल्या वीरमातेसारखा असावा लागतो. लोकमान्य टिळक तसेच होते. नव्या नव्या जोमाचा हिंदुस्थान त्यांनीं जन्मास घातला आणि तो तारुण्याच्या कल्याणप्रद अवस्थेच्या जवळ आणून पोंचविला. मातेचा स्वार्थत्याग त्यांच्या अंगीं पूर्णपणें भिनलेला होता. आपलें शरीर जितकें देशकार्यार्थ झिजवितां येईल तितकें झिजविलें पाहिजे आणि लहान थोर खाजगी किंवा सार्वजनिक, हरएकप्रसंगीं तीव्र वृत्ति कायम ठेवली पाहिजे, एरव्हीं स्वार्थत्यागाचें वळण सर्व देशांकडून गिरविलें जाणार नाहीं, असें त्यांचें ठाम मत होतें व त्याप्रमाणें ते वागतही होते. निरंतर एकसारख्या वाहणाऱ्या स्वार्थत्यागाच्या प्रवाहांत वीर वृत्तीची योग्य प्रसंगीं जोड देण्यास लोकमान्य कधींही चुकले नाहींत.

सरकारी नोकरी करून फावल्या वेळांत देशकार्य करण्याची रूढि हिंदुस्थानच्या मनांतून खाडकन् उतरून टाकण्याकरितां अत्यंत साधेपणानें व मूठभर वस्तूवर उपजीविका करण्याचें तापसाचें व्रत त्यांनीं ऐन तरुणपणीं वीर वृत्तीनें स्वीकारलें. सरकारशीं झगडा करीत असतां अंगांत संचारल्यासारखे ते उसळत असत. यांतलें इंगित तरी त्यांच्या हृदयांत भिनलेली वीरवृत्तीच होय ! स्वतःच्या लोकांकडे बघण्याची त्यांची दृष्टि आईची होती. आणि राज्यकर्त्यांकडे पाहण्याची त्यांची नजर वीराची होती. ( आक्षित ) लेख दुसऱ्याचे असतांही परमेश्वरी कार्य तडीस नेण्यास ही चांगली संधि आपणांस मिळाली आहे असें समजून लोकमान्यांनीं जाणून बुजून तुरुंगाचा रस्ता ( तीनदां ) पत्करला. स्वदेशावर प्रेम आणि निरंतरच्या स्वार्थत्यागाच्या प्रेरणेनें अडथळ्याशीं झगडणारी वीरवृत्ति हे दोन गुण सर्व देशास खडबडून जागें करण्यास आणि बहुतेकांचीं अंतःकरणें

देशकार्याकडे वेधून घेण्यास पुरेसे झाले. त्यांचें खासगी वर्तन पराकाष्ठेच्या निर्मलतेचें होतें.

हिंदुस्थानच्या अभ्युदयाकरितां गेल्या चाळीस वर्षांत सूर्यासारखी त्यांनीं मेहनत केली आहे, एवढेंच नव्हे तर "या निशा सर्व भूतानां तस्यां जागर्ति संयमी" या न्यायानें निरनिराळ्या लढायांमधला विसाव्याचा काळही त्यांनीं देशकार्याकडेच खर्च केला. चाळीस वर्षांत वीस वर्षे लौकिक सूर्य निजतो; तो निजण्याची वेळही लोकमान्यांनीं जागून काढली. रण-भूमीवरून जबरदस्तीनें सरकारनें त्यांना नेऊन मंडालेस सहा वर्षें कोंडून ठेवलें. तेथेंही त्यांच्या अंतःकरणानें वा बुद्धीनें विसांवा घेतला नाहीं. गीतारहस्यासारखा अलौकिक ग्रंथ असल्या रात्रींच्या समयीं रात्रीचा दिवस करून त्यांनीं लिहून काढला. झगडण्याच्या उद्योगाला विसांवा म्हणजे तत्त्वज्ञानाचें मनन होय. गीतारहस्य हें पुस्तक त्यांच्या (परमेश्वरी) भक्तीचें फळ होय! पिढ्यान् पिढ्यांना वळण देणाऱ्या लढायांत लोकमान्यांच्या राजकीय झगड्यांची गणना होईल. पण चारचारशें पांचपांचशें वर्षें ज्या तत्त्वज्ञानाची शिदोरी सर्व राष्ट्राला पुरते, तसलें कर्मयोगाचें तत्त्वज्ञान लोक-मान्यांनीं गीतारहस्यांत लोकांच्यापुढें मांडलें आहे. राष्ट्रीय जीवनाला, राष्ट्रीय सद्भावाला, राष्ट्रीय स्वार्थत्यागाला, आणि राष्ट्रीय वीरवृत्तीला सर्वकाळीं व सर्वस्थळीं पाठिराखें होणारें तत्त्वज्ञान नव्या हिंदुस्थानास पाहिजे होतें. तसा अनुभव घेऊन आपल्या चारित्राची शिकवणूक लोकमान्यांनीं गीतारहस्यांत लिहून ठेवली आहे. आधीं केलें व मग सांगितलें असा त्या दोहोंचा परस्पर निकट संबंध असल्यानें त्यांचें चरित्र व शिकवणूक यांत बिलकुल अंतर नाहीं."

प्रियजनाच्या निधनानंतर दुःखावेगांत मनाला जे कढ येतात त्याचे-बरोबर त्या गतव्यक्तीबद्दलच्या पूर्व स्मृति सारख्या उसळून येत असतात. लोकमान्यांच्या बद्दलच्या चरित्राच्या स्मृतींचें कांहींसें दिव्य सार वरीलप्रमाणें

काकासाहेबांनीं त्यांच्या दहाव्या दिवशींच्या तिलांजलिनिमित्त लोकगंगेच्या कांठाशीं वाहिलें आहे.

तात्या व लोकमान्य हे दोघेही कालपुरुषानें बोलावून घेतल्याप्रमाणें एकाच वेळीं कालवश व्हावे या दुःखी घटनेचा परिणाम काकासाहेब तत्वज्ञानी वृत्तीचे होते, म्हणूनच सोसूं शकले व या गोंधळलेल्या मनःस्थितींतही प्राप्त कर्तव्याची जागृति त्यांना राहूं शकली. अशा मनःस्थितींतच काकासाहेबांना लोकमान्यांचे व आपले केसरीविषयक मनीं बाळगलेले बेत— केसरी द्विसाप्ताहिक करण्याचे व ट्रस्ट करण्याचे बेत—उधळले गेल्याचें समजून आलें. लोकमान्यांचे ट्रस्टबद्दलचे विचार सर्वांना ज्ञात होते. तरी काकासाहेबांच्या विरुद्ध असलेल्या कांहीं मंडळींनीं जोर केला. टिळक पुत्रांच्या हरकतीचें निमित्त करून त्यांना ट्रस्टीमधून वगळण्यांत आलें. यासंबंधांत काकासाहेबांनीं पुढील आत्मनिवेदन केलें आहे.

" टिळकपुत्रांनीं केसरीचा नवा ट्रस्ट केला. त्यावेळीं मला ट्रस्टी होण्याबद्दल विचारण्यांत आलें. केसरी किंवा मराठा यांपैकीं कोणत्याही एका पत्राची पूर्ण अखत्यारी आपणांकडे यावी असें मी लोकमान्य टिळकांच्या ज्या जावयाबरोबर माझेकडे निरोप आला होता, त्याचेपाशीं सांगितलें, पण ते त्यांना (करणें) झालें नाहीं. टिळकपुत्रांच्या सहीनें जो ट्रस्ट जाहीर झाला त्यांत अर्थातच माझें नांव नव्हतें. केसरीचा व माझा संबंध अशा रीतीनें लोकमान्य टिळकांच्या पश्चात् कायमचा सुटला." लोकमान्यांच्या निधनानें काकासाहेबांच्या विषयीं योजलेले त्यांचे विचार तसेच राहिले. केसरीचा ट्रस्ट झाला. त्यांत काकासाहेबांचें नांव घातलें गेलें नाहीं. ही घटना मृत्युपत्रांत व्यक्त झालेल्या लोकमान्याच्या इच्छेविरुद्ध झाली. लोकमान्यांनीं एकंदर तीन वेळां मृत्युपत्र लिहिलें. प्रथम मंडालेस व पुढें दोन वेळां विलायतयात्रेच्या वेळीं. मंडालेचें मृत्युपत्र कोणाशीं चर्चा न करतां स्वतःच्या मनानें लिहिलें. दुसरें मृत्युपत्र लिहितांना काकासाहेबांशीं चर्चा

करून लिहिलें. या दोन्ही मृत्युपत्रांत काकांचें नांव ट्रस्टीमध्यें नमूद केलें होतें. तिसरें मृत्युपत्र कोलंबोला झालेलें. त्यांत ट्रस्टींचीं नांवेंच नव्हतीं. या परिस्थितींत टिळकपुत्रांच्या सहीचा जो ट्रस्ट जाहीर झाला त्यांत काकासाहेबांचें नांव वगळलें गेलें तें लोकमान्यांच्या मनीषेच्या विरुद्ध झालें हें उघड आहे.

तथापि जें होतें तें बऱ्याकरतांच होतें असें म्हणावें लागतें. परमेश्वर जें करतो तें कांहीं हेतुपूर्वक करीत असावा! लोकमान्य स्वतः गेले तरी आपलेंच कार्य पुढें चालविणाऱ्या गांधीजींच्याकडे आशापूर्ण अंगुलिनिर्देश करून ते गेले.

## तेजाचा नवोदय

सूर्याचा अस्त झाला असें आपण म्हणतों त्याच वेळीं तो दुसरे बाजूस उदित होत असतो. लोकमान्य आणि महात्मा गांधी यांच्या राजकारणांतील अस्तोदयाचा असाच अर्थ आहे. सूर्य एकच व त्याचाच अस्तोदय होत असतो. तसेंच हिंदुस्थानच्या राजकीय क्षितिजावर झालें. काकासाहेबांच्या जीवनांतही असाच फरक झाला. लोकमान्यांच्या केसरीच्या जीवनांतून त्यांचा एकाएकीं अस्त झाला तरी काकासाहेबांच्या जीवनांत लोकमान्यामुळें निर्माण झालेलें चैतन्य अमर होतें, त्यामुळें तें पुण्याच्या केसरींतून मुक्त झाले ते मुंबईच्या क्षितिजावर "लोकमान्य" पत्र रूपानें उदय पावले व त्यांचें तेज नव्या रूपानें चोहींकडे पसरलें. ज्योतीस ज्योत लागल्यावर पहिली ज्योत विझली तरी दुसरी ज्याप्रमाणें वाढत्या तेजानें तेवतच राहते, किंवा बीज विलीन झालें तरी त्यांतूनच वृक्षपल्लवी वर येते, तसेंच काकासाहेबांच्या जीवनांत परिवर्तन झालें. काकासाहेबांच्या मनाची उज्ज्वलदीप्ति लोकमान्यांच्या निधनानें लोप न पावतां, भारतीय राजकारणांत गांधीजींच्या नव्या तेजोगोलांत एकरूप झाली. "जैसें जीर्ण वस्त्र सांडिजे। मग भूत न वेढिजे। तैसें देहांतरातें स्वीकारिजे। चैतन्यनाथें॥ तसेंच

हें झालें. हा नवा तेजोगोल लोकमान्यांनाही दिसला होता. महायुद्धाच्या संकटकाळीं सरकारला सहाय्य करूं इच्छिणारें महात्माजी चंपारण्याच्या स्वानुभवानें असहकाराच्या जालिम उपायापर्यंत आले होते व जालियनवाला बागेच्या हत्याकांडानें त्यांच्या मनानें असहकाराचें शेवटचें टोंक गांठलें होतें. लोकमान्यांनीं हें पाहिलें. ते स्वभावतःच असहकारी होते. विलायतें-तून परत आल्यावर मुंबईंत शांतारामाच्या चाळींतील प्रचंड स्वागतसभेंत ते म्हणाले, "इकडील हकीगती मला सर्व कळल्या—रौलेट बिलाविरुद्ध गांधींनीं सत्याग्रह सुरू केला तेव्हां त्यांत भाग घेण्याला मी हजर नव्हतों, एवढेंच मला वाईट वाटतें." काकासाहेबांनीं आपल्या आत्मनिवेदनांत यासंबंधांत अधिक स्पष्टता केली आहे. ते म्हणतातः—

"लोकमान्य टिळक यांच्या निधनापूर्वी कलकत्त्याचे राष्ट्रीय सभेचें जादा अधिवेशन मुक्रर झालें होतें. आणि त्या अधिवेशनासाठीं लोक-मान्यांचें नांव पुढें आलें होतें. पण लोकमान्य टिळक अध्यक्षपद स्वीकार-ण्यास तयार नव्हते. तुमचें नांव सुचविण्यांत येत आहे. तुम्ही अध्यक्षपद कां स्वीकारीत नाहीं असें मी त्यांना विचारलें होतें. त्यावेळीं त्यांनीं असें उत्तर दिलें कीं, 'महात्मा गांधींच्या रूपानें एक प्रचंड शक्ति राजकीय क्षेत्रांत प्रवेश करीत असून कलकत्त्याचा असहकाराचा ठराव अत्यंत महत्त्वाचा आहे. अशा वेळीं अध्यक्षांच्या खुर्चीवर राहून अधि-वेशन चालविण्याच्या कामांत जखडून जाण्यापेक्षां चर्चेंत भाग घेण्या-साठीं मी मोकळा असणें जरूर आहे.' महात्मा गांधींच्या नव्या आयुधानें त्यांचें लक्ष पूर्णपणें वेधून घेतल्याचें त्या संभाषणांत मला आढळून आलें."

राजकारणांतील ही गांधीरूपांतील नवी शक्ति लोकमान्यांच्या तेजस्वी कार्याचेंच नवें स्वरूप आहे हें काकासाहेबांना स्पष्ट दिसलें, व लोक-मान्यांच्या देशकाजांत एकरूप झालेले काकासाहेब महात्मा गांधींच्या नव्या-

राजकारणात मिसळून नव्या तेजानें झळकले. लोकमान्यांच्या मृत्युपूर्वीच मुंबईस राष्ट्रीय पक्षाचे दैनिक काढण्याचे विचार चालूच होते. काकासाहेबांनीं सर्व परिस्थितीचा विचार करून कर्तव्यबुद्धीनें आपल्या पुढील जीवनक्रमाचा निर्णय घेतला व "लोकमान्य" दैनिकाचें संपादकत्व स्वीकारण्यास त्यांनीं सम्मति दिली. " द्रौपदी नाटकाच्या पूर्ततेसाठीं रजा घेऊन तात्पुरते पुण्याहून मुंबईस आलेले काकासाहेब कायमचे मुंबईस राहिले. अशा रीतीनें अघटित विधिघटनांच्या संयोगानें केसरीपत्र व पुणें शहर यांचा काकासाहेबांच्या जीवनांतून एकपरीनें अकल्पित अस्त होऊन लोकमान्य दैनिक व मुंबई शहर या नव्या स्वरूपाचा त्यांच्या जीवनांत उदय झाला !



: ११ :

## ॥ मामनुस्मर युध्य च ॥

ज्ञात्वा धर्ममधर्मं च लाभं चोद्यममाश्रिताः ।
युध्यस्व मनहंकारा यतो धर्मस्ततो जयः ॥

—महाभारत.

काकासाहेब लोकमान्यांच्या मृत्यूनंतर मुंबईस आले ते वास्तविक ‘ द्रौपदी ’ नाटक गंधर्व कंपनीकडून बसवून घेण्याकरितां. मानापमान व विद्याहरणाच्या यशस्वितेनंतर नवें नाटक ‘ द्रौपदी ’ लिहून देण्याबद्दल गंधर्व कंपनीचा लकडा लागलेलाच होता. तशांत जेव्हां लोकमान्य विलायतेहून परत आल्यावर केसरी द्विसाप्ताहिक करून काकासाहेबांना कायमचे संपादक करावयाचें ठरलें त्या वेळीं ‘ द्रौपदी ’ नाटक लिहून मोकळे व्हावें म्हणून त्यांनीं तात्पुरती चार महिन्यांची रजा घेतली व त्या मुदतींत श्री. केळकरांचें नांव संपादक म्हणून घातलें गेलें. पण योगायोग असा होता कीं काकासाहेबांचें नांव केसरीचे संपादक म्हणून पुन्हां येऊं नये. लोक-

मान्यांच्या मृत्यूनंतरच्या घडामोडीमुळें काकासाहेबांना केसरीच सोडावा लागला असें नसून पुणेंसुद्धां सोडावें लागलें. 'द्रौपदी' नाटक बसविण्याचें काम चालू झालेलें होतें व लोकमान्यांच्या मृत्यूनंतर त्याच कामासाठीं काकासाहेब मुंबईस आलेले होते.

द्रौपदी नाटकाचा पहिला प्रयोग मुंबईस १९२० च्या डिसेंबरांत झाला. हें नाटक यशस्वी करण्याकरितां बालगंधर्वांनीं अतोनात पैसा खर्च केला. गंधर्व कंपनी जशी बादशाही थाटांत होती तशाच बादशाही थाटांत द्रौपदी नाटकाच्या रंगभूमीची सजावट करण्यांत आली. तो भरजरी सोनेरी थाट पाहून प्रेक्षकांचे डोळे दिपून जात असत.

द्रौपदी नाटकाचें कथानकही जनमनाची—विशेषतः स्त्रियांच्या अन्तःकरणाची—पकड घेणारे होते. स्त्रिया पुरुषांइतक्याच तेजस्वी असतात, हें आदर्शचित्र काकासाहेबांना जनतेपुढें मांडायचें होतें. आपल्या पतीलाही त्यांचें कर्तव्य काय आहे तें खडखडीतपणें बजावणारी ती तडफदार स्त्री होती. श्रीकृष्णाची ती अभिमानी होती. व श्रीकृष्णाचें श्रेष्ठत्व सिद्ध करण्याकरितां काय वाटेल तें करावें लागलें तरी तें थोडेंच असें मानणारी ती मानी स्त्री होती.

## तेजस्वी द्रौपदी

'श्रीकृष्णाच्या सेवेसाठीं युद्धाचा प्रसंग मला अभिमानाचा, हौसेचा आणि आनंदाचा वाटल्यावांचून राहाणार नाहीं.' असे उद्गार धर्मराजालाही द्रौपदीचें स्वाभिमानी वर्तन पाहून काढावे लागले. अपमान सहन करण्यापेक्षां धर्मयुद्धाला तयार रहावें असें स्पष्टपणें सांगणारी द्रौपदी काकासाहेबांनीं रंगविली आहे. पण युद्धाऐवजीं द्यूताचा कुटिल डाव टाकण्यांत आला व त्यांत पांडव दास झाले. व त्यांनीं जेव्हां द्रौपदीलाही पणाला लावली तेव्हां ती मानी स्त्री केवढें तेजस्वी स्वरूप धारण करतें तें काकासाहेबांनीं फार बहारदारपणें रंगविलें आहे.

आणि तशांतही द्रौपदीच्या तोंडीं काकासाहेबांनीं घातलेलें भाषण केवढें महान् तत्त्वज्ञान सांगणारें आहे !

द्रौपदी:—'मी दासी नाहीं. स्वतंत्र आहें. मी जर दास्य कबूल केलें तर माझी पुण्याई, हंबरडा फोडून आईला बोलावल्याप्रमाणें विश्वांतल्या पुण्याईला माझ्या मदतीला कशी आणील? सर्व अणूरेणूंत भरलेल्या विश्वाच्या स्वतंत्र पुण्याईला दासांकडे पाहून पान्हा फुटत नाहीं; स्वतःचें तान्हुलें हें नव्हें; असें त्या विराटस्वरूपी स्वतंत्र शक्तीला वाटतें ! त्या स्वतंत्र विराटशक्तीचें तान्हुलें झालें तरी स्वतंत्रच असावें लागतें !–मातेला पान्हा न फुटेल असलें तान्हुलें ह्या नव्या कृष्णजन्माचे वेळीं ह्या सभेच्या दृष्टीला कसें पडेल? मी दासी नाहीं; स्वतंत्र आहें.'

## 'लोकमान्य' दैनिक

त्याचवेळीं मुंबईच्या दैनिकाबद्दल वाटाघाटी चालत असत. त्या वेळीं मॅाटेग्यु चेम्सफर्ड सुधारणामुळें राजकारणाला नवें वळण लागलें होतें. सुधारणा राबवण्याचे विचार पक्षोपक्षांत जोरानें चालले होते. राष्ट्रीय पक्षासारख्या महत्त्वाच्या पक्षाला पुढील राजकारणांत वाढत्या जोमानें पडणें अवश्य असल्यानें त्या दृष्टीनें राष्ट्रीय पक्षामध्यें चर्चा होऊन थोडी पूर्व तयारीहि झाली होती. केसरी द्विसाताहिक काढणें हें लोकमान्यांनीं पूर्वीच ठरवलें होतें. पूर्वी एकदां मुंबईस राष्ट्रीय पक्षाचें एक दैनिक असावें म्हणून 'राष्ट्रमत' काढण्यांत आलें होतें. तसेंच या कालांतही मुंबईस आपल्या पक्षाचें दैनिक सुरू करावें अशी चर्चा लोकमान्यांच्या हयातींतच चालू होती. पण लोकमान्यांच्या आकस्मिक मृत्यूमुळें व त्यांनीं केलेल्या केसरीच्या नव्या व्यवस्थेमुळें मुंबईस काढावयाच्या दैनिकाचा प्रश्न राष्ट्रीय पक्षांतील इतर प्रमुख मंडळींना सोडवावा लागला. मुंबईचे सुप्रसिद्ध डॉ. देशमुख व डॉ. भडकमकर यांनीं लोकमान्यांच्या हयातींत झालेल्या चर्चेत महत्त्वाचा भाग घेतला होताच. लोकमान्यांच्या मृत्यूमुळें त्यांचें

योग्य वृत्तपत्रीय स्मारक करण्याचा विचारहि राष्ट्रीय पक्षप्रमुखापुढें होता. या दोन्ही कल्पना एकरूप होऊन मुंबईस लेकामान्यांचें स्मारक म्हणून 'लोकमान्य' दैनिक सुरू करण्याचें निश्चित झालें व त्यासाठीं 'लोकमान्य पब्लिशिंग कंपनी लि.' स्थापण्यांत आली.

या नव्या दैनिकाचें संपादकत्व .कोणास द्यावयाचें याचा निर्णय घेण्यास फारसा विचार करावा लागला नाहीं. केसरीच्या ट्रस्टच्या नव्या व्यवस्थेमुळें काकासाहेबांच्या कुशल संपादकाला केसरी मुकला होता. त्यांच्यासारख्या प्रभावी संपादकाच्या जोरकस लेखणीचा उपयोग आपल्या पक्षाच्या राजकारणाला करून घेतलाच पाहिजे असा विचार राष्ट्रीय पक्षांतील प्रमुख मंडळींत होता. यामुळें दे. भ. गंगाधरराव देशपांडे व. श्री. वासुकाका जोशी यांनीं काकासाहेबांचें नांव सुचवतांच सर्वांचें साहजिक एकमतच झालें. काकासाहेब यावेळीं आपलें 'द्रौपदी' नाटक बसवण्यासाठीं मुंबईस आलेले होते. मुंबईस काढावयाच्या दैनिकाच्या वाटाघाटींतही ते होतेच. त्याना या बाबतींत विचारण्यांत आलें. लोकमान्यांचें स्मारक म्हणून निघणाऱ्या 'लोकमान्य' दैनिकाचें संपादकत्व नाकारणें शक्य नव्हतें. पत्राचें संपादकीय धोरण सर्वस्वीं त्यांच्या अखत्यारींत रहावें असें ठरलें व काकासाहेबांनीं कर्तव्यबुद्धीनें ही जबाबदारी पत्करण्याचें कबूल केलें.

दैनिक वर्तमानपत्र काकासाहेब प्रथमच काढणार असल्यानें वर्तमानपत्राचा आकार, त्याची मांडणी, त्याचे शिरोलेख वगैरे अनेक गोष्टींच्या योजना त्यांना आंखावयाच्या होत्या. ह्यासंबंधीं सर्व तऱ्हेनें विचार करून त्यांनीं आपल्या नव्या वर्तमानपत्रास अत्यंत आकर्षक अशी घडण घालून दिली. लोकामान्याचा पहिला अंक काढतांना त्यांत येणाऱ्या अग्रलेखापासूनच्या इतर सर्व मजकुरानें जसे त्यांना बरेच श्रम दिले त्याचप्रमाणें तो अंक छापणाऱ्या मशिनरीनें पण दिले. पहिला अंक




गुरुशिष्य

निघाला त्या रात्रीं मशीन बंद पडलें व त्यामुळें तें पुन्हां चालू होई-तोंपर्यंत व अंक निघेतोंपर्यंत काकासाहेब रात्रभर मशीनपाशीं उभे होते. अशा प्रकारें शके १८४३ चैत्र शु. प्रतिपदेस ( ९ मार्च १९२१ ) रोजीं गुढी पाडव्याच्या मुहूर्तावर ' लोकमान्य दैनिका'चा पहिला अंक प्रसिद्ध झाला. पत्रावर शिरोभागीं लोकमान्य स्तुतिपर खालीलप्रमाणें श्लोक स्वतः काकासाहेबांनीं रचून घातला:

देशोद्धारे प्रवीणं टिळकसुचरितं ध्यायते तद्वरेण्यम् ।
उद्दीप्तं राष्ट्रभक्त्या जनपदहृदयं यस्य कारानिवासैः ॥
बद्धाकांक्षः स्वराज्ये परिणतवचसा भारतो यस्य जातः ।
दृश्यो गीतारहस्ये विमलयतु गुरुः नो धियो लोकमान्यः ॥

अग्रलेखावरील ब्रीद वाक्य ' मामनुस्मर युध्य च ' हें त्यांनींच स्वतः निश्चित केलें होतें.

लोकमान्य चारित्राचें अत्यंत सुंदर रीतीनें सार देऊन त्यांच्याबद्दलची अनन्यभक्ति दर्शविणाऱ्या या श्लोकानें व ' मामनुस्मर युध्य च ' या अग्रलेखावरील सूत्रवाक्यानें काकासाहेबांनीं आपल्या हृदयींच्या अनेक भावना उत्कृष्ट रीतीनें दर्शविल्या आहेत. पुण्याहून युद्धभूमि जरी मुंबईस आली तरी लोकमान्यांनीं आपल्या हयातींत सुरू केलेला झगडा अजून संपलेला नाहीं आणि स्वराज्याचा हा लढा झगडत असतां सदोदित लोकमान्यांची प्रेरक मूर्ति आपल्या डोळ्यांपुढें ठेवूनच आपणांस काम करावयाचें आहे ही जाणीव त्यांनीं वरील अवतरणांतून व्यक्त केली आहे.

पहिल्या दिवशींचा अग्रलेख देखील त्यांनीं याच दृष्टीनें लिहिलेला आहे. लोकमान्य दैनिकाच्या या पहिल्या अग्रलेखांत हिंदुस्थान कोणत्या राजकीय परिस्थितींत आहे याचें चित्र काकासाहेबांनीं विशद रीतीनें जनतेपुढें मांडलें आहे. अपुऱ्या स्वराज्यदानानें अयशस्वी ठरलेली लॉर्ड

चेम्सफर्डची कारकीर्द संपल्याचा उल्लेख करून अग्रलेखांत नव्या व्हॉइस-रायाचे नेमणुकीबाबतचे विचार प्रदर्शित केले आहेत. नवा व्हॉइसराय शोधतांना सैतानी कारकीर्दीचा पाठपुरावा करणारा सवाई चेम्सफर्ड चालणार नाहीं. मागील कारकीर्दीतील कडुपणा विसरावयास लावणारा, हिंदी आकांक्षांकडे सहानुभूतीनें पाहणारा व्हॉइसरॉय शोधणें अत्यंत अवश्य आहे, असें असंदिग्धपणें सुचाविलें आहे. इंग्लंडच्या मंत्रिमंडळांतहि असेच विचार चालले होते व शेवटीं मंत्रिमंडळानें न्यायाधिशाचे हुद्यावर असलेले लॉर्ड रीडिंग यांना हें पद देणेंचे कसें ठरवलें हेंहि त्याच लेखांत दिग्दर्शित केलें आहे.

नवे व्हॉइसराय आले तरी हिंदुस्थानांतील नोकरशाही जुनीच होती. तिची दडपशाही अद्याप संपली नव्हती. प्रांतोप्रांतीं दडपशाहीचा धिंगाणा चालूच होता. म. गांधी आपल्या असहकाराच्या चळवळीसाठीं द्रव्यबळ, मनुष्यबळ व बुद्धिबळ मिळवण्याच्या कार्यांत गुंतले होते. बिझवाडा येथें भरलेल्या ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीनें टिळक-स्वराज्यफंडास एक कोट रुपये जमविण्याचा, राष्ट्रीय सभेच्या सभासदांची संख्या एक कोटी करण्याचा व स्वदेशी व्रताची अखंड जागृति राहण्यासाठीं वीस लाख चरखे अविरत चालवण्याचा असे महत्वाचे ठराव संमत केले होते. या सर्व गोष्टींचा आढावा आपल्या पहिल्या अग्रलेखांत काकासाहेबांनीं घेतला आहे. अशा प्रकारें सत्याग्रह-सप्ताहाच्या प्रारंभीं पाडव्याच्या सुमुहूर्तावर गुरु लोकमान्यांचा स्वराज्यमंत्र सांगण्यासाठीं 'लोकमान्य' दैनिक काकांनीं जनतेला सादर केलें.

या सुमारास याच कारणासाठीं पुण्यास दे. भ. शिवरामपंत परांजपे यांनीं 'स्वराज्य' व श्री. सीतारामपंत दामले यांनीं 'राजकारण' अशीं साप्ताहिकें चालू केलीं. हीं सर्व पत्रें महात्मा गांधींच्या असहकारतत्त्वाचा पुरस्कार करणारीं होतीं. असहकार चळवळींत बऱ्याच विद्यार्थ्यांनीं शाळा-

कॉलेजें सोडलीं व नव्या विचाराच्या शिक्षणाकरितां पुण्यास 'टिळक महाविद्यालय,' अहमदाबादेस 'गुजरात विद्यापीठ' व धारवाडास 'कर्नाटक महाविद्यालय' अशा राष्ट्रीय शिक्षण देणाऱ्या संस्था निघाल्या. टिळक-महाविद्यालयांत भारताचार्य चिंतामणराव वैद्य यासारखे नाणावलेले विद्वान् प्रमुख म्हणून काम करूं लागले व प्राध्यापकांत व दे. भ. शिवरामपंत परांजपे, केळकर, करंदीकर, प्रो. दत्तोपंत घारपुरे वगैरे पुढारी व महात्माजींच्या नव्या चळवळींतील कार्यकर्ते काम करूं लागले. त्यामुळें या नव्या मंडळींचा काकांशीं विशेष संबंध आला. चिंतामणराव वैद्य व दत्तोपंत घारपुरे हे पुढील सर्व चळवळींत काकासाहेबांचे सहकारी म्हणून काम करूं लागल्यानें त्यांच्या पूर्वापार स्नेहाची वाढच झाली.

### मुंबईस बिऱ्हाड

लोकमान्य वर्तमानपत्राचें काम सुरळीत चालू झाल्यानंतर पुण्याहून आपलें बिऱ्हाड हलवून तें आतां कायमचें मुंबईस आणण्याच्या विचारास काकासाहेबांनीं सुरवात केली. त्याप्रमाणें जागा बघण्याचें काम सुरू झालें. तथापि चांगली जागा मिळेतोंपर्यंत सर्व बिऱ्हाड आपल्या कंपनीच्या विस्तृत जागेंतच ठेवावें अशी इच्छा बालगंधर्वांनीं प्रदर्शित केल्यामुळें पुण्याहून बिऱ्हाड जें हललें तें मुंबईस प्रथम गंधर्व कंपनींत आलें. पुढें ते भटवाडींत राहूं लागले. याच भटवाडीच्या जागेंत श्रीमती सौ. अवंतिका-बाई गोखले यांचा खाडिलकर मंडळींशीं निकट संबंध आला व तो पुढें फार वृद्धिंगत झाला.

असहकारितेच्या चळवळीचा खाडिलकर कुटुंबांतील शिक्षण घेणाऱ्या मंडळीवर साहजिकच परिणाम झाला. मुंबईस पुण्याप्रमाणें राष्ट्रीय शिक्षण-संस्था निघाली नसल्यानें काकांचे थोरले चिरंजीव अप्पा यांना अहमदाबादेस गुजरात विद्यापीठांत पाठवण्यांत आलें व पुतण्यांपैकीं केशवराव टिळक महाविद्यालयांत दाखल झाले. दुसरे पुतणे प्रभाकर हरि ऊर्फ नाना

नागपूरचे शेतकी कॉलेज चळवळींत सोडून परत आले. त्यांना 'लोक-मान्यां'च्या संपादकमंडळांत घेण्यांत आलें. काकासाहेबांचें बिऱ्हाड चिखलवाडींतून भटवाडींत व शेवटीं केनेडी ब्रिजाजवळील एका चाळींत सारखें बदलत गेलें. पुण्यास असतांना स्वतंत्र व प्रशस्त वाड्यांत संसार मांडलेला असे. मुंबईच्या जागा तेथील मानानें मोठ्या असल्या तरी पुण्याच्या जागेशीं तुलना करितां लहानच होत्या. त्यामुळें संसाराची व्यवस्थित मांडणी करणें सौ. काकूंना फारच अडचणीचें गेलें. तरीहि त्यांनीं कुशलतेनें पुण्याची संसारी शिस्त मुंबईसही बरोबर राखली.

मुंबईस बिऱ्हाड केल्यानंतर कांहीं दिवसांनीं एकुलती एक मुलगी सौ. शांता सासरहून आजारी पडून आली. तिची व्यवस्था करतांना मुंबईच्या नव्या जीवनाचा सौ. काकूंना फार त्रास झाला. अखेरीस त्या आजारांत सौ. शांताबाई वारली. त्यामुळें सौ. काकूंचें मन अतिशय उद्विग्न झालें. अशा उद्विग्न मनस्थितींत संसाराचा ताण वाढता होता. बाहेरच्या चळवळीस नवी दिशा लागलेली, नव्या चळवळीमुळें पक्षांत मतभेद माजलेले, मुलांच्या शिक्षणाची नवीच कहा सुरू झालेली, घरांत नातेवाईक, नवपरिचित यांची कामानिमित्त ये जा वाढलेली, अशा व्यग्रतेंत मुलीच्या मृत्यूच्या दुःखाची भर पडली.

सौ. गौरकाकूंना यामुळें झालेलें दुःख वर्णन करणे कठीण आहे. त्यांची पहिली मुलगी सौ. गंगू ही दुखण्यांत बरेच हाल होऊन गेलेली होती. त्यानंतर सौ. गौरकाकूंच्यावर हा दुसरा आघात होता. सौ. शांताताई ही आपल्या नांवाप्रमाणेंच अतिशय शांत तशीच अतिशय हुशार होती. ती आपल्या घरीं कर्तृत्वाला पोंचेल अशी फार आशा धरली होती. सौ. काकूंनीं आपल्या आजारी स्थितींतही ती तेथेंच माडीवर असलेल्या हिंद महिला-समाजांत जाऊन काम करी व प्रसंगीं व्याख्यानेंहि देई. अशा स्थितींत सर्व आशांचा भंग करून सौ. शांता जेव्हां स्वर्गवासी झाली तेव्हां

सौ. गौरकाकूंना फार दुःख झाले. त्यांचें सांत्वन करणें मोठें कठीण काम होतें. तथापि सौ. अवंतिकाबाई गोखले यांनीं आपल्या प्रेमळपणानें त्यांचें सांत्वन करून त्यांच्या मनाला देशसेवेच्या विधायक कार्यांत गुंतवून दुःखाला थोडा-फार विसर पाडला.

म. गांधींच्या नव्या चळवळीपासून घरच्या सर्वच मंडळींनीं विशेषतः काका व सौ. काकू यांनीं खादीपरिधान व्रत अंगीकारलें. या व्रताबरोबरच चरखाहि घरांत सुरू झाला. काकासाहेबांनीं या काळांत आपली पगडी बाजूस ठेवून खादीटोपीचा स्वीकार केला होता. १९२१ च्या ऑगस्ट पहिल्या तारखेस लोकमान्यांच्या पहिल्या पुण्यतिथीस काँग्रेसचा 'असह-कार' पुकार झाला. तेव्हां काकांनीं आपली पगडी जी एकदां उतरून खादीटोपी घातली ती कायमचीच घातली. काकांची सहज प्रवृत्ति अशी कीं विचारपूर्वक अंगीकारलेल्या गोष्टीची पुनःपुन्हां चिकित्सा करीत बसावयाचें नाहीं किंवा त्यांतून पळवाट, पर्याय शोधित रहावयाचें नाहीं. त्यामुळें पगडीचा विचार त्यांनीं पुन्हां कधींच केला नाहीं. ती पगडी लोकमान्य दैनिकाच्या संपादकीय कचेरींत जी काढून ठेविली ती तें पत्र सोडल्यावर घरीं आणली गेली. काकांनीं ती पुढें कधींच डोक्यावर चढ-वली नाहीं.

### दैनिकाची व्यवस्था

दैनिकाच्या या नव्या व्यवसायांत काकासाहेबांशिवाय बहुतेक मंडळी अगदींच नवखी होती, त्यामुळें 'लोकमान्य' पत्राच्या शाखोपशाखांच्या दैनंदिन व्यवस्थेकडे काकांना जातीनें लक्ष द्यावें लागे. कित्येक वेळीं रात्रीं बारापर्यंत ते स्वतः हजर रहात व तारेच्या बातम्यांची निवड व मांडणी कशी करावी हें रात्रपाळीच्या उपसंपादकास स्वतः शिकवीत. छापखान्याची जागा मध्यंतरीं दोन वेळां बदलली. या नव्या जागेची दुरुस्ती व रंगरंगोटी चालू असली तरी अशा त्रासांत अग्रलेख व स्फुटें असा पांचसहा कॉलम

मजकूर काका स्वतः लिहीत. संपादकीय कार्य करीत असतांना मशीन, कंपोजिंग व मॅनेजिंग खातीं या सर्वांवर ते स्वतः जातीनें देखरेख करीत. उत्कृष्ट नांव, नांवाजलेला कुशल प्रभावी संपादक, चळवळीच्या धामधुमीचा अनुकूल काळ यामुळें लोकमान्य पत्राचा खप पहिल्या सहा महिन्यांतच १०।१२ हजार झाला व तो वर्ष अखेरीस १८।२० हजारापर्यंत वाढत गेला. अशा अपूर्व यशामुळें महाराष्ट्र जनतेला हा कौतुकाचा व अभिमानाचा विषय झाला. काकासाहेबांच्या कुशलसंपादनामुळें पहिल्याच वर्षी शेअरवर डिव्हिडंड वाटण्याइतकी सुस्थिति लोकमान्य पब्लिशिंग कंपनीला लाभली.

काकासाहेबांना लोकमान्य पत्राच्या व्यवस्थेंत व राजकीय चळवळींत जास्त लक्ष घालावें लागे. त्याचप्रमाणें मुंबईस अनेक स्थानिक संस्थांच्या कार्यांत भाग घ्यावा लागे. काकांचा मुंबईशीं यापूर्वी थोडा संबंध असला तरी मुंबई ही अपली कर्मभूमि करून नवा व्यवसाय करण्याचा हा पहिलाच प्रसंग असल्यानें मुंबईतील अनेक नव्या संस्था, अनेक व्यवसायीयांचा काकांना वाढता संबंध ठेवावा लागला. मुंबईस कायमचें वास्तव्य झाल्यानें ते मुंबईच्या ग्रंथसंग्रहालय संस्थेचे तहहयात सभासद झाले. आर्यन एक्सेलशिअर लीग, ब्राह्मणसभा वगैरेसारख्या सांस्कृतिक कार्य करणाऱ्या भिन्नमतीयांच्या संस्थांशीं त्यांचे वाढते संबंध राहिले. मुंबई कॉंग्रेसकमेटीचे ते प्रमुख कार्यकर्ते होते. हा सर्व व्याप काकासाहेब लोकमान्य पत्राच्या व्यवस्थेच्या कामावर लक्ष केंद्रित असतांनाहि संभाळीत असत.

मुंबईच्या सार्वजनिक कार्यांत काकाप्रमाणेंच सौ. गौरकाकूहि भाग घेऊं लागल्या होत्या. पुण्यांत घरसंसाराखेरीज इतर कोणत्याहि कार्यांत त्या भाग कधींच घेत नसत पण मुंबईस असे प्रसंग आले. सौ. गौरकाकू हिंद महिला समाजाच्या सभासद झाल्या होत्या. व त्या अनुषंगानें समाजाच्या चळवळींत त्या जातीनें भागहि घेऊं लागल्या होत्या. म. गांधींच्या तत्व-

प्रणालींतील खादीनिष्ठेविषयीं सो. गोरकाकू व सौ. अवंतिकाबाई गोखले यांचें प्रथमपासूनच एकमत झालें. दोघींनींहि सूतकताईचें कार्य निष्ठापूर्वक आमरण आचरून गांधी भक्तीचा धडा इतर भागिनींना या दोघींनीं स्वतःच्या कृतीनें घालून दिला; इतकेंच नव्हे तर आपल्या खादीच्या विधायक कार्यामुळें पुढें या दोघींनीं महात्माजींचेंहि लक्ष आपल्याकडे वेधवून घेतलें.

## राजकारणांतील मतभेद

महात्माजींच्या अनत्याचारी असहकार तत्त्वावर महाराष्ट्रांत यावेळीं पुष्कळच मतभेद वाढला होता. लोकमान्यांचें राजकारण व गांधींचें राजकारण यांत मूलतः फरक आहे असें म्हणणारा एक वर्ग त्या वेळच्या चळवळींतील मंडळींत होता. तसा फरक नाहीं असें म्हणणारा दुसरा एक वर्ग होता. काकासाहेब, शिवरामपंत परांजपे, गंगाधरराव देशपांडे, वीर वामनराव जोशी, कुलगुरु चिंतामणराव वैद्य इत्यादि मंडळी या दुसऱ्या वर्गांत प्रामुख्यानें होती. महाराष्ट्रांत यावेळीं गांधींच्या अनत्याचारी असहकार तत्त्वाचा पुरस्कार करणारी व तद्विरोधी अशा दोन मतप्रणाली स्पष्टपणें दिसत होत्या. विरोधकांचा गांधींचें राजकारण लोकमान्यांच्या राजकारणाहून भिन्न आहे या मुद्यावर विशेष जोर असे. काकासाहेब वगैरे मंडळींना गांधींच्या या नव्या चळवळींत लोकमान्यांच्या वेळच्या चतुःसूत्री चळवळीचें स्वरूप दिसत होतें. त्यांच्या मताप्रमाणें पूर्वींचा स्वदेशी बहिष्कार आतां नव्या शब्दांत व रूपांत सांगितला जात होता. खादी तर स्वदेशीचीच पुढची पायरी होती. बहिष्कार तर नुसत्या मालावर न राहतां सरकार यंत्रांतील शाळा, कोर्टकचेऱ्या यावरही पडत होता. राष्ट्रीय शिक्षणाविषयीं तर मतभेदच नव्हता ' स्वराज्य हा माझा जन्मसिद्ध हक्क आहे व तो मी मिळवीनच ' ही लोकमान्यांची ध्येयघोषणा, ' साधनानां अनेकता ' हें त्यांचें धोरण याशीं म. गांधींची स्वराज्यप्राप्तीसाठीं अनत्याचारी असह-

कारिता सुसंगतच होती हें या पक्षाचें मत होतें. काकासाहेब व शिवरामपंत यासारख्या मूलतः क्रांतिप्रवृत्तीच्या टिळकपक्षीयांना अनत्याचारी असहकारितेंत क्रांतिबीजें जास्त दिसत होतीं. या नवीन कार्यक्रमानें सरकारविरुद्ध लढाई खात्रीपूर्वक जिंकूं असा भरंवसा यांना वाटे. या नव्या चळवळींत जुलमी परकी राजसत्तेचें यंत्र बंद पाडण्याची शक्ति होती. या नव्या मार्गाचा 'स्वार्थत्याग' हा मूळाधार होता. लोकमान्यांचें राजकारणाचें सूत्र धरूनच म. गांधी आपली नवी चळवळ पुढें चालवीत आहेत असें या मंडळींचें प्रतिपादन असे. तुल्यबल सशस्त्र क्रांतीनें जें कार्य होईल असें त्यांना आजवर वाटत होतें तेंच कार्य निःशस्त्र क्रांतीनेंहि होईल असा त्यांना विश्वास होता.

मतभेदांचे प्रवाह असे चालू असतां महाराष्ट्राच्या राजकारणांत मुळशी सत्याग्रहाचा प्रसंग उद्भवला. या सत्याग्रहांत सर्वच पक्षीयांनीं आपापल्या परीनें भाग घेतला. या चळवळींत शिवरामपंत परांजपे, ज.स. करंदीकर, सीतारामपंत दामले, हरीभाऊ फाटक वगैरेंना शिक्षा भोगावी लागली. पण एवढ्यानें पक्षांतील मतभेद फारसे कमी झाले नाहींत. या मतभेदाचें स्वरूप कौन्सिलबहिष्कार बाबतींत अधिक स्पष्ट दिसलें. महाराष्ट्रांत गाजलेला फेरनाफेर वाद याच कारणानें सुरू झाला. असहकारितेच्या कार्यक्रमांतून कौन्सिल बहिष्कार वगळावा. कारण तो इष्ट असें प्रतिपादन करणारा एक पक्ष व असहकारितेच्या कार्यक्रमांत यत्किंचितहि फरक करूं नये असें दुसऱ्या पक्षाचें म्हणणें, यांनाच फेरनाफेरवादी असें नांव पडलें. या वादांतील मतभेद कौन्सिल प्रवेशापुरतें स्पष्टपणें दिसत असलें तरी इतके वरवरचे नव्हते. राजकारणाकडे पाहण्याच्या भिन्न दृष्टिकोनांतून ते उत्पन्न झाले होते.

### पेण परिषद्

१९२१ च्या अखेरीस वसई येथें भरलेल्या परिषदेंत नाफेर पक्षाचा जोर दिसून आला. त्यामुळें लागलींच त्याच सालच्या आक्टोबरांत फेर-

वाद्यांनीं अकोल्यास परिषद भरवली. पण त्यांतही कौन्सिल प्रवेशाचा ठराव थोड्याच मताच्या फरकानें पास होऊं शकला. नंतर पेण येथें १६ व १७ एप्रिल १९२२ ला महाराष्ट्र प्रांतिक परिषद भरली. त्यावेळीं अध्यक्ष काकासाहेब खाडिलकर यांनीं आपल्या भाषणांत टिळकानुयांचें प्राप्त कर्तव्य काय व लोकमान्यांचेंच कार्य महात्मा गांधीं पुढें चालवीत असल्यानें खऱ्या अनुयायांनीं नेत्याचा पाठपुरावा कसा केला पाहिजे तें पुढीलप्रमाणें उद्बोधक रीतीनें सांगितलें:—

'आजच्या प्रांतिक परिषदेचा प्रसंग इतर वेळच्या परिषदेपेक्षां फार वेगळा आहे, कारण यंदाच्या परिषदेंत पुढील कार्यक्रम आखावयाचा आहे. प्रांतिक परिषदेपुढें काय विषय यावयाचे ते विषय-नियामक मंडळींत आगाऊच ठरून गेले आहेत; हें माझ्या भाषणाला फार उपयोगी पडेल. व त्याचेंच निदर्शन मी करणार आहे. मी केवळ धोपटमार्गानें जाणारा—इतरांनीं तयार केलेल्या मार्गानें जाणारा—मनुष्य आहे हें आपण लक्षांत ठेवावें. धोपटमार्गानें जाणाऱ्या मनुष्याची जी विचारसरणी असते त्या वृत्तीचा मी आहें. मी महात्मा गांधींच्या अनत्याचारी असहकारी तत्त्वाचा अनुयायी आहे. लोकमान्य टिळकांची सेवा करीत असतां, मला जी शिकवण मिळाली ती मी आजतागायत रेंसभर विसरलों नाहीं; व त्यांच्या तत्त्वांशीं यत्किंचितही मी कृतघ्न झालों नाहीं. लोकमान्यांची देवता विठोबाच्या मूर्तीइतकी महाराष्ट्राला प्रिय आहे व मलाही ती माझ्या माऊली इतकीच प्रिय आहे.

कलकत्त्याच्या कॉंग्रेसमध्यें इतर प्रांतांतील प्रतिनिधीप्रमाणें महाराष्ट्रांतील पुढाऱ्यांचा असहकारितेच्या तत्वाला विरोध असतांहि, बहुमताने वागण्याचें त्यांनीं ठरविलें. नागपूर व अहमदाबाद कॉंग्रेसमध्येंहि सर्वांनीं संमति दिली. पुढें खादीचा प्रसार, टिळक फंड या गोष्टीहि कॉंग्रेसनें केल्या. मध्येंच अलीबंधू यांस अटक झाली; इतक्यांत युवराज आले, त्यांच्या आगमनावर

बहिष्कार घालण्याचा ठराव पास झाला. तो हाणून पाडण्यासाठीं नोकर-शाहीनें दडपशाहीचीं निरनिराळीं अस्त्रें बाहेर काढलीं. जनतेनेंहि कायदे-भंग करण्याचें ठरवून कलकत्त्यांत मोठमोठया स्त्री-पुरुषांनीं हें कार्य हातीं घेतलें; व त्यांनीं कायदेभंग केला. राष्ट्रीय चळवळीस असें निराळें वळण येऊं लागलें.

कलकत्त्यास युवराजांचें स्वागत करण्यासाठीं मोठमोठे युरोपियन व्यापारी व नोकरशाही जमली असतां कलकत्त्याच्या हरताळानें त्यांनीं मोठी बिकट परिस्थिति उत्पन्न केली. त्यांनीं दडपशाहीचीं शस्त्रें उभारलीं, परंतु बंगाली लोकांनीं मोठया धैर्यानें तुरुंग कःपदार्थ मानून, केवळ लहानशा खादीच्या फडक्याच्या जोरावर सरकारचीं दडपशाहीचीं अस्त्रें लुळीं पाडलीं. यासाठीं हजारों लोक तुरुंगांत गेले. या अनत्याचारी चळवळीस पूर्ण पाठिंबा मिळावा म्हणून अहमदाबादचा ठराव करण्यांत आला. आपलें भाषण-स्वातंत्र्य, सभा-स्वातंत्र्य, संघ-स्वातंत्र्य सरकारनें दडपशाहीनें हिरावून घेतलें, म्हणून शिस्त राखण्यासाठीं स्वयंसेवकांची संघटना निर्माण करण्याचा ठराव झाला. पण चौरीचुऱ्याच्या दंग्यानें कायदेभंग करण्याला लोक अद्यापि तयार झाले नाहींत असें पाहून, महात्माजींनीं बारडोलीचा कार्यक्रम मागें घेतला व त्यांत दिल्लीच्या सभेनंतर जरासे फेरफार केले. पुढें लागलीच महात्मा गांधी यांस पकडण्यांत आलें.

महात्मा गांधी विद्युत्पाताप्रमाणें आज येथें—उद्यां तेथें—अशी दर पंधरा दिवसांनीं सारखी चाल बदलीत होते. सरकारचीहि झाली तरी अशीच स्थिति आहे. गेल्या सहा महिन्यांत अशी स्थिति उभयपक्षी झालेली आहे. कांहीं वकिलांनीं वकिली न सोडली किंवा मुलांनीं शाळा न सोडली तरी आज जी नव जागृति उत्पन्न झाली तिनें हजारों रुपये दरमहा मिळवणारे श्री. दास, बादशाही थाटानें राहणारे पंडित मोतिलाल नेहरू

यांनीं फकिरी पत्करली. तेव्हां ही चळवळ अपयशी झाली असें कसें म्हणावें ?

मृतप्राय झालेले तुर्की तट्टू पुन्हां उठेल असें कोणासहि वाटलें नव्हतें; पण महात्माजीस मात्र तसें वाटलें नाहीं. परमेश्वराच्या कृपेनें केमलपाशा विजयी झाले, व आज ग्रीस त्याजपाशीं भीक मागत आहे. या गोष्टीचें श्रेय येथील खिलापतीच्या व असहकाराच्या चळवळीला आहे हें सरकारासहि कबूल करावें लागेल. येथील चळवळीकडे लक्ष देऊन पॅरिसमध्यें तडजोडीचा प्रश्न निघाला. आमचें शस्त्र काय तर एक खादीचें फडकें व असहकारितेची चळवळ. हिंदुस्थानच लोक जिवंत आहेत इतकी कबुली तरी परदेशांनीं दिली आहे. हिंदुमुसलमानांच्या एकीच्या जोरावर आम्हीं परदेशीय राष्ट्रांचें लक्ष आपणाकडे वेधून घेतलें आहे. या एकीच्या जोरावरच राष्ट्रांतील अंतःस्थ प्रश्न सुटतील. ब्राह्मण–ब्राह्मणेतरांचे प्रश्न सहज सुटावे म्हणून म. गांधींनीं अस्पृश्यता निवारणाची चळवळ सुरू केली. शेतकरी व जमीनदार यांचे प्रश्न सुलभ रीतीनें सुटण्यास ब्राह्मण–ब्राह्मणेतर यांत सलोखा घडवून आणण्यासाठीं व परदेशी कापडावर बहिष्कार घालण्यास केवळ एक खादी हाच उपाय आहे.

यामुळेंच रौलेट ॲक्टसारखे कायदे गाडले गेले. हीच चळवळ जोरानें सुरू ठेवल्यास स्वराज्य आपणास सहज मिळेल. सुतानें स्वर्ग कसा मिळेल असें म्हणून आज कित्येक लोक हसतात; पण पार्लमेंटमध्यें प्राइम मिनिस्टर या संघटित बहिष्कारामुळें रडत आहे, असें खादीचें महत्त्व आहे. तीबद्दल साशंक वृत्ति ठेवूं नका. कार्यक्रमांत फेरफार करणें, कौन्सिलांत जाणें व खादीची चळवळ यासंबंधीं प्रश्न सभेपुढें येतील त्यावेळीं हें खादीचें महत्त्व लक्षांत ठेवा.

आपलें लक्ष खालील मुद्यांकडे विशेषतः जाणें इष्ट आहे. पुढील

कॉंग्रेसनें काय फेरफार करावे याबद्दल आपण आतांपासून चळवळ करणें इष्ट आहे काय? वीस हजार लोक आज तुरुंगांत खितपत पडले आहेत; ते लवकरच बाहेर येतील. पुढील कॉंग्रेसमध्यें असे तुरुंगांतून आलेले लोकच दृष्टीस पडतील. ते लोक या विषयाचा विचार करीत असतां आजच महाराष्ट्रानें त्यांच्या मार्गांत बंधनें कां घालावीं? महात्माजी तुरुंगांत जाऊन आज महिनाहि झाला नाहीं, अशा प्रसंगीं आपण असे ठराव आणणें इष्ट आहे काय? याचा विचार झाला पाहिजे. त्यांच्या भावनांचाही विचार लक्षांत घेतला पाहिजे. ती भावना लक्षांत ठेवली पाहिजे. माझ्या पाठीमागून येणारे अनुयायीहि माझ्याच भावनेचे आहेत अशी पुढाऱ्यास जाणीव असावी लागते.

भावी राष्ट्रीय सभा कशी होणार आहे, तेथें कोणते लोक येणार आहेत ही गोष्ट लक्षांत ठेवा. राष्ट्रीय जिवंतपणाला मतभेद अवश्य आहेत परंतु त्या देशभक्ताचा तेजोभंग होणार नाहीं असें वर्तन महाराष्ट्राचें असणें अवश्य आहे. ही जबाबदारी महाराष्ट्राच्या शिरावर आहे या सर्व प्रश्नांचा आपण विचार करून आपण आपला कार्यक्रम आंखावा अशी माझी विनंती आहे."

त्यावेळीं महात्माजी नुकतेच तुरुंगांत गेले होते. तेव्हां काकासाहेबांनीं आपल्या अध्यक्षीय भाषणांत वरीलप्रमाणें महात्माजी कारावासांत असतां, त्यांनीं आंखलेल्या कार्यक्रमांत कांहींहि बदल करूं नये असें जें प्रतिपादिलें तें योग्यच होते. त्याच धोरणाचा पुरस्कार करणारा मुख्य ठराव स्वागताध्यक्ष श्री. चिंतामणराव वैद्य यांनीं परिषदेपुढें मांडला. या ठरावास त्रिविध बहिष्काराच्या निषेधपर उपसूचना श्री. भोपटकर व जोशी यांनीं सुचविल्या. श्री. दा. वि. गोखले यांनीं कॉंग्रेसनेंच कार्यक्रमाचा फेरविचार करावा अशी उपसूचना केली. त्या सर्व सूचना उपसूचना यांचेवरून या

मतभेदाचें वारें कसें वाहत होतें हें दिसून येईल. शेवटीं गोखले यांच्या उपसूचनेसह मूळ ठराव पास झाला.

या दोन सालांतील मतभेदाच्या घडामोडींत काकासाहेब प्रारंभीं मत-भेद वाढूं नयेत या वृत्तींत होते. म. गांधींच्या चढावू धोरणाचा पाठ-पुरावा करतांना लोकमान्यांच्या अनुयायांमध्यें फाटाफूट झाली असें दृश्य जनतेला दिसणें इष्ट नव्हे असें त्यांना मनापासून वाटत होतें. पुण्याच्या पक्षीयाशीं मिळतें दाखविण्याचा त्यांचा आग्रह असे. पण वसईपासून पेणपर्यंत झालेल्या या दोन वर्षांतील घडामोडीनें त्यांची ही भूमिका पालटली. १९२२ च्या जानेवारीमध्यें म. गांधींनीं बारडोलीचा सत्याग्रह मागें घेतला. त्यावर सर्वत्र जी कडक टीका झाली त्यांत केसरीनें प्रमुखपणें भाग घेतला होता. अखिल हिंदुस्थानच्या राजकारणांत पक्षोपपक्ष निर्माण होत आहेत असें दृश्य त्यावेळीं दिसूं लागलें होते. महाराष्ट्र जनतेनें निश्चित विचार करून आपलें धोरण ठरविलें पाहिजे अशी परिस्थिति उत्पन्न झाली होती.

पेणच्या परिषदेमध्यें जरी केसरी पक्षाचा ठराव मंजूर झाला होता तरी सर्वसाधारण जनतेचा कल कोणीकडे आहे हें काकांना कळून आलें होतें. जनतेची ही लढाऊ वीरवृत्ति लोकमान्यांच्या तत्वाच्या नांवा-खालीं दडपून टाकिली जाणें म्हणजे लोकमान्यांवर अन्याय करणें आहे त्यांच्या तत्त्वज्ञानाचा विपर्यास करणें आहे असें त्यांचें मत होतें. या-संबंधांत निश्चित विचार त्यांनीं पुढील १-२ महिन्यांत केला. त्यानंतर १९२२ जुलैमध्यें लोकमान्य पुण्यतिथीच्या निमित्तानें त्यांनीं सबंध एक आठवडा रोज अग्रलेख लिहून, महात्माजींच्या तत्त्वाचा पुरस्कार करणें म्हणजेच लोकमान्यांचें पुण्यस्मरण, असें मत विस्तरशः प्रतिपादिलें. या लेखमालेंत विरुद्ध पक्षांकडून प्रतिपादिलेल्या तत्वांचा कडक शब्दांत निषेध केला असून महाराष्ट्र जनतेस योग्य मार्गदर्शन प्रभावीपणें काकांनीं केलें.

महात्मा गांधी विचार करतां करतां डायरेक्टर ॲक्शनच्या मार्गावर पोंचलेले आहेत. टिळकजन्मापासून उपजतच डायरेक्ट ॲक्शनचे कैवारी आहेत असे लोकमान्य व गांधी यांच्या मार्गांचें एकत्व स्पष्टपणें मांडलें.

## विरारचा विजय

यावेळीं कॉंग्रेसच्या नव्या घटनानुसार प्रांतिक कमेट्या, जिल्हा कमेट्या तालुका कमिटया व शहर कमिटया इत्यादि कमिटया निवडणुकीनें होऊं लागल्या होत्या. या कमेट्यांत फेरनाफेर पक्षाचे बलाबल अस्थिर होते. पण परिषदेनंतर नाफेर पक्ष बहुमत मिळविण्याच्या प्रयत्नास लागला व १९२२ च्या आक्टोबरमध्यें विरारच्या निवडणुकीच्या सभेंत नाफेर पक्षानें बहुमतानें निवडणुकी जिंकल्या. विरारची ही सभा या मतभेदाच्या दंगलीमुळें फार गाजली. पुण्याहून शिवरामपंत, वासुकाका फाटक इत्यादि नाफेरवादी मंडळी या सभेस आली होती. सीतारामपंत, दामले, चिंतामणराव वैद्य, देव, दास्ताने वगैरे मुंबई, खानदेशकडील मंडळीही उपस्थित होती. तडजोडीचे प्रयत्न झाले तथापि भांडणें विकोपाला गेलीं. पोलिसांना बोलावण्यापर्यंत प्रसंग आला. वल्लभभाई पटेलांनीं मध्यस्ति केली. ही सर्व दंगल चालू असतां सभा अत्यंत कौशल्यानें पार पाडण्यांत आली व त्यांत नाफेरपक्ष विजयी ठरला. या सभेची संपूर्ण हकीकत जशीच्या तशी दुसरे दिवशींच्या लोकमान्यांत ताबडतोब देण्यांत आली.

विरारला झालेला हा प्रचंड जय महाराष्ट्रांतील कॉंग्रेस कार्यकर्त्यांच्या दृष्टीनें अत्यंत निर्णायक व म्हणून फार महत्त्वाचा होता. महाराष्ट्रांतील फेरनाफेर पक्षांतील द्वंद्वयुद्धांत या निकालानें म. गांधीजींच्या एकनिष्ठ अनुयायांचे गळ्यांत विजयश्रीनें माळ घालून विरुद्ध पक्षास एक तऱ्हेनें पराजित केलें होतें, ह्या सभेची हकीकत सबंध महाराष्ट्राचे दृष्टीनें अत्यंत स्फूर्तिदायी असल्याकारणानें ती जनतेच्या कानीं शक्य तितक्या विस्तारानें

व शक्य तितक्या लवकर घालावी अशी विरारच्या सभेंत ज्या वीरवृत्ति पुढाऱ्यांनीं विजय मिळविला होता त्यांची फार इच्छा होती. त्यामुळें सभा संपल्याबरोबर पहिल्या गाडीनें शिवरामपंत परांजपे, सीतारामपंत दामले, डॉ. भडकमकर, चिंतामणराव वैद्य, प्रो. दत्तोपंत धारपुरे वगैरे मंडळी विरारहून मुंबईस लोकमान्य ऑफिसांत आली.

पत्रछपाई सुरू करण्यास फारच थोडा अवधि होता. अशा स्थितींत सभेहून परत आलेल्या मंडळींपैकीं, सीतारामपंत दामले यांनीं विरारच्या सभेची अत्यंत उत्साहवर्धक व प्रक्षोभक हकीकत अत्यंत द्रुतगतीनें सांगितली व जसजशी लिहिली गेली तसतशी ती लगेच जलदीनें कंपोज केली गेली. अशा रीतीनें सुमारें दहा कॉलम मजकुराची मधलीं पानें विरारच्या हकीकतीनेंच नटून "लोकमान्य" पत्र दुसरे दिवशीं सकाळींच लोकांच्या हातांत पडलें. पहिला अंक छापून झाल्याबरोबर तो घेऊनच ही सर्व स्नेही मंडळी काकासाहेबांचे घरीं भल्या पहांटे आली. काकासाहेब उठावयाचे होते. शिवरामपंतांनीं पुढें होऊन त्यांना उठविलें व 'लोकमान्यां'चा अंक त्यांनीं त्यांच्यापुढें ठेविला.

अशा रीतीनें हमरीतुमरीच्या विरार सभेंत महात्माजींच्या अनुयायांनीं निवडणूक जिंकली खरी. पण त्याबद्दल पुढें वाद उपस्थित होऊन तो गया कॉंग्रेसमध्यें नेण्यांत आला. तेथेंही फेरवाद्यांचा पराभव झाला व ऑल इंडिया कॉंग्रेस कमिटीच्या बैठकींत विरारला झालेल्या निवडणुकीच मान्य केल्या गेल्या.

काकासाहेबांच्या कर्तबगार संपादकत्वाखालीं चाललेल्या 'लोकमान्य' पत्रांत नाफेरपक्षाची बाजू अशा प्रकारें अत्यंत परिणामकारक रीतीनें चढाईनें मांडली जाऊं लागली. या पत्राच्या कचेरीच्या अनुषंगानें आपल्या पक्षाचें एक केंद्रच मुंबईस चालू करावें अशी काकांची कल्पना होती. कंपनीच्या व्यवस्थेंत मुंबईस असें केंद्र बनविण्याच्या दृष्टीनें त्यांनीं एकदां सूचनाहि

केली व याच दृष्टीनें संपादक मंडळीसाठीं क्लबाची एक स्वतंत्र जागा करून त्यांनीं या कल्पनेस प्रारंभहि केला होता. काकांची ही योजना वर्तमानपत्र व पक्ष या दोन्हीहि दृष्टीनीं फारच उपयुक्त होती. अशा केंद्रामुळें परप्रांतीय पक्षीय पुढाऱ्यांच्या गांठीभेटी व सल्लामसलतीचा लाभ मिळून चळवळीला एकसूत्रीपणा व बळकटी आणण्यास फारच मदत झाली असती व वृत्तपत्राच्या संपादकवर्गालाहि आपला दृष्टिकोन विस्तृत करण्यास सहाय्य झालें असतें.

## तेजोभंग

पण लोकमान्य पब्लिशिंग कंपनी केवळ नाफेर पक्षाच्याच लोकांची नव्हती. लोकमान्य पत्राचें धोरण कंपनीच्या स्थापनेपासूनच सर्वस्वीं काकासाहेबांच्या मताप्रमाणें ठरविण्याचें ठरलें होतें. अशा स्थितींत महाराष्ट्रांत फेर नाफेर असे पक्ष पडले. लोकमान्य पब्लिशिंग कंपनीच्या व्यवस्थापकमंडळांत फेरवादी पक्षाचे लोक असल्यामुळें गांधीवादी विचारसरणीची लोकमान्यांतील चढाई त्यांना असह्य होऊं लागली. आपल्या अधिकाराचा उपयोग करून लोकमान्यांतच कांहीं मजकूर संपादकीय धोरणाशीं विसंगत असा आणण्यांत येऊं लागला. अशा स्थितींत काकासाहेबांच्या क्लबाच्या वगैरे योजनांना मूर्तस्वरूप देण्यास मतभेद असणाऱ्या मंडळींनीं संधीच दिली नाहीं.

मतभेद दिवसेंदिवस वाढत होते. असे चालू असतां काकासाहेबांच्या विरुद्ध असलेल्या मंडळींनीं डायरेक्टरांच्या एका सभेंत कांहीं तरी निमित्त काढून तक्रारी मांडल्या. वस्तुतः काकांच्या लेखणीच्या प्रभावामुळेंच लोकमान्य दैनिक नांवारूपास आलें होतें. परंतु पेण व विरार येथें झालेल्या आपल्या पक्षाच्या पराभवामुळें चिडलेल्या विरुद्ध पक्षाच्या मंडळींनीं एका क्षुल्लक प्रश्नावर वाद माजविला व ' लोकमान्य पत्र हें केवळ लोकमान्यांच्या नांवामुळेंच भरभराटीस आलें आहे, ' असें काकासाहेबांच्या मनाला लाग-

णारें विधान केलें. लटपटी खटपटी करून आपल्या बाजूस मताधिक्य करून घेणें व सभा जिंकणें अशी काकासाहेबांची कधींच प्रवृत्ति नव्हती. इतकेंच नव्हे तर अशा मार्गाचें अवलंबन करणें त्यांच्या मानी मनाला कधींच मानवणारें नव्हतें. यामुळें विरुद्ध पक्षाची कारवाई पाहतांच व वरील लागट विधान ऐकतांच काकासाहेब ताडकन उठले. लोकमान्य पब्लिशिंग कंपनींतील विरुद्ध पक्षाशीं आपलें यापुढें जमणें शक्य नाहीं, हें त्यांना स्पष्ट दिसत होतें. व वृत्तपत्राचे धोरणाबाबत इतराकडून करारभंगही होत होता. अशा स्थितींत वरील लागट शब्द ऐकल्याबरोबर ते जे उठले ते लोकमान्य कचेरींतून रात्रीं १२ चे सुमारास तडक बाहेर पडले.

काकांनीं लोकमान्य पत्र या विलक्षण परिस्थितींत एकाएकीं सोडलें हा त्यांच्या जीवनांत अत्यंत महत्त्वाचा व दूरगामी परिणाम करणारा प्रसंग होता. काकासाहेबांच्या अंगचे सर्व गुण या प्रसंगीं प्रकर्षानें दिसून आले. ही घटना इतकी अनपेक्षित व जलद घडली कीं प्रत्यक्ष कुटुंबांतील जवळच्या मंडळींना सुद्धां त्याची कल्पनाही नव्हती. काकासाहेब त्या रात्रीं घरीं आले तो प्रसंग घरांतील सर्व मंडळींच्या पूर्ण लक्षांत राहिला आहे. सभेंतून काका मध्यरात्रीच्या सुमारास घरीं आले व तडक आपल्या निजण्याच्या खोलींत गेले. चेहरा अस्वस्थ दिसत होता. काय झालें हें विचारण्याची अर्थात् कोणाचीहि हिम्मत नव्हती. खोलींत येरझारा घालीत असतां पाण्याचा पेला त्यांच्यापुढें करण्यांत आला. नित्याप्रमाणें त्यांनीं पाणी प्राशन केलें, दिवा मालवला व चकारशब्दहि न काढतां ते अंथरुणावर आडवे झाले.

दुसऱ्या दिवशीं उजाडतांच ठरल्याप्रमाणें ते बाहेर पडले. लोकमान्य कचेरीस ते गेले असाच सर्वांचा समज! पण थोड्या वेळांतच ते लोकमान्य कचेरींत गेले नाहींत असें आढळून आलें. त्यामुळें घरची मंडळी बुचकळ्यांत पडली. काकासाहेब ११ चे सुमारास घरीं परत आले तेव्हां त्यांना लोकमान्य कचेरींतून, ते कचेरींत कां आले नाहींत याची चौकशी

करण्यास श्री. पागे येऊन गेल्याचें कळविलें. तें ऐकून किंचित् थांबून काका म्हणाले, " हं, मी आजपासून लोकमान्य सोडला आहे. " ऐकणारे सर्व क्षणभर स्तिमितच झाले. सौ. काकूंनीं ' पुढें काय ? ' असा प्रश्न केला. काकासाहेबांचें या प्रश्नाला मन तयारच होतें, त्यांनीं एकदम उत्तर दिलें, " दुसरें पत्र काढावयाचें–'नवाकाळ' या नांवाचें !" घडलेला प्रकार व त्यावरील निर्णय हा असा एकाच वाक्यांत काकासाहेबांनीं सांगून टाकला !



# : १२ :

## ॥ न मे भक्तः प्रणश्यति ॥



प्रियप्राया वृत्तिर्विनयमधुरो वाचि नियमः ।
प्रकृत्या कल्याणी मतिरनवगीतः परिचयः ॥
पुरो वा पश्चाद्वा तदिदमविपर्यासितरसम् ।
रहस्यं साधूनामनुपादि विशुद्धं विजयते ॥

—भवभूति

जगाच्या संसारांत आपत्तींना फार महत्त्वाचें स्थान आहे. परमेश्वरानें निर्माण केलेल्या अनेक सत्प्रवृत्तींच्या ओघांनीं जीवनाची बाग सर्वत्र नटते फुलते असें जरी असलें तरी त्यांना कड्याकपाऱ्यावरून झेप घ्यावयास लावण्यांत त्यांच्या सत्कार्याचा वेग वाढविणें व त्या शक्तीच्या जोरावर दूरवरच्या प्रदेशापर्यंत त्यांच्यामधील पोषक द्रव्यांचा पुरवठा करणें हाच ईश्वराचा हेतु असतो. हिऱ्यावर प्रखर शस्त्राघात होतात त्यामुळेंच त्याला पैलू पडून त्याच्या तेजानें जग अधिक रमणीय होतें. वनस्पति अगर इतर

धातु रासायनिक भट्टीमध्यें भयंकर स्वरूपाची आंच सहन करून आपणास जाळून घेतात त्याचवेळीं त्यांच्या भस्मामध्यें दुसऱ्यांना नवजीवन देण्याचें सामर्थ्य येतें.

मानवी जीवनांतही आपत्तींचें हेंच स्थान आहे असेंच समजलें पाहिजे. त्या एकावर एक अशा झेप घेत घेत आल्या म्हणजे त्यांचें रुद्र स्वरूप पाहून मन भयग्रस्त झाल्याशिवाय रहात नाहीं. अशा वेळीं भक्कम पायावर जें आधारलेलें नाहीं तें सर्व उध्वस्त झालें अगर बेचिराख झालें तरी जें दृढमूलाचें आहे, ज्यांत अंतस्थ विशेष सत्त्व आहे तें सर्व या अग्निदिव्यानंतर अधिकच कल्याणप्रद होतें. देव भक्तांवर अनेक आपत्ति आणतो. पण त्यांत त्याचा उद्देश त्याच्या अल्प धारिष्टाची चांचणी घेत घेत त्याच्या अंतरंगांतील सुप्त शक्तींना जागें करून जगापुढें आणण्याचा असतो. अर्थात् अशा आपत्तींत बुडून गेलेल्या माणसांना त्या स्थितींतही आपलें कर्तृत्व पार पाडीत नेटानें जागा धरून राहण्याचें धैर्य त्यांच्या अंतरींच्या ईश्वराबद्दलच्या अत्यंत दृढ श्रद्धेनेंच येतें. ' न मे भक्तः प्रणश्यति ' हें भगवद्वचन त्यांची समरांगणांतील ढाल होते. तिच्या आसऱ्याखालीं नव्या नव्या कौशल्यानें लढण्याचें काम ते चालू ठेवतात व अखेर यशस्वी होतात.

काकासाहेबांच्यावर 'लोकमान्य' सोडावयास लावून नवी आपत्ति आणण्यांत असाच कांहीं ईश्वरी संकेत दिसतो. ज्या भावनोद्रेकाच्या आवेशांत त्यांनीं आपल्या जीवनांतून लोकमान्य वृत्तपत्रास दूर केलें त्याच भावनेच्या ऊर्मीसरशीं त्यांच्या मनापुढें नवाकाळाची कल्पना उभी केली. ज्या वाणीनें त्यांनीं आपण ' लोकमान्य ' सोडला असें जाहीर केलें त्याच वाणींतून त्याच वेळीं ' नवाकाळ ' हीं अक्षरेंही उच्चारलीं.

' मी माझें स्वतंत्र ' नवाकाळ ' नामक दैनिक काढीन ' असें सांगून काकासाहेब लोकमान्य कचेरींतून बाहेर आल्यावर काकासाहेबांना साहजिकच बरेच प्रश्न सोडविण्याचे होते.

एक तर काल बदलला होता. काकांचा हा निर्णय अवघड परिस्थितींत घेतला गेला होता. स्वपक्षीयांत मतभेद तीव्र झाले होते. लोकमान्यांचे बरोबर काम करतांना कोणत्याही कार्यास पक्षाचें बल संपूर्णतेनें मिळे, तशी स्थिति आतां उरली नव्हती. या कालांत कार्यापेक्षां मतभेदाच्या वाग्युद्धांत बरीच शक्ति खर्ची पडत होती. स्वपक्षांतील मतभेदामुळें उत्पन्न झालेल्या अडचणी लक्षांत घेऊन लेखन करावें लागत असे.

दुसरें, काकांनीं आपल्या त्यागी वृत्तीमुळें संपत्तिसंग्रह कधींच केलेला नव्हता. लोकमान्यांत त्यांना आरंभापासून दरमहा पांचशें रुपये पगार ठरला होता तरी ते त्या पत्राच्या प्राथमिक अवस्थेकडे पाहून फक्त तिनशें घेत असत. दैनिक पत्राच्या नित्याच्या दंगलींत द्रौपदीनंतर दुसरें नाटक लिहावयास त्यांना स्वस्थता मिळाली नव्हती. थोरल्या बंधूंच्या मृत्यूनंतर सर्वच कुटुंबाच्या योगक्षेमाचा बोजाहि त्यांचेच शिरावर होता. अशा अडचणीच्या आर्थिक कोंडींत स्वतःच्या जबाबदारीवर नव्या दैनिकाची उभारणी ते आपल्या आत्मविश्वास, कार्यनिष्ठा, उद्योगप्रियता व चिकाटी या गुणांच्या बळावर करणार होते.

**‘ नवाकाळची स्थापना ’**

अडचणी कितीही मोठया असल्या तरी त्यांचे ध्येय त्याहून मोठें होतें. स्वदेशाच्या स्वातंत्र्यप्राप्तीच्या लढ्यांतील आघाडीची कामगिरी लोकमान्यांनीं त्यांना सांगितली होती. महात्मा गांधींना लोकमान्यांचें नवें स्वरूप काकासाहेब मानीत होते. लोकमान्यांनीं स्वतः काकासाहेबांच्या जवळ ‘ राजकारणांत म. गांधी ही नवी शक्ति प्रविष्ट होत आहे, तिचें स्वागत आपण केलें पाहिजे ’ असे उद्गार काढले होते. लोकमान्य जसे मुत्सद्दी होते तसेच प्रसंगीं रणांगणावर वीरवृत्तीनें लढणारे व मृत्यूशीं टक्कर देणारे वीर होते. महात्माजींच्या नव्या राजकीय तंत्रांत याच गुणाचें अधिष्ठान होतें. सत्याग्रह व असहकार या नव्या तंत्रांत शौर्य व मुत्सद्दीपणा

होता. राष्ट्राला महात्माजींचें हें नवें राजकारण अत्यंत हितकारी आहे असा काकासाहेबांच्या मनाचा दृढ विश्वास होता. म्हणून ते तावडतोब नव्या उद्योगास लागले. १९१० सालीं अकस्मात् ध्यानीं मनीं नसतां केसरींतून बाहेर पडण्याचा त्यांना प्रसंग आला, त्यावेळीं लोकांमध्यें वीरवृत्ति जागृत करण्यासाठीं परिणामकारक नाटकांची निर्मिति करण्याचें कार्य त्यांनीं अंगीकारलें होतें. या प्रसंगीं कालगतीनुसार त्याच ध्येयासाठीं स्वतःचें नवें दैनिक काढण्याचें त्यांनीं निश्चित केलें व लोकमान्य सोडल्यानंतर एक महिन्याचे आंत त्यांनीं आपल्या ' नवाकाळ ' पत्रास सुरुवात केली.

या पत्राच्या नांवाबद्दल ते नांव सहज स्फूर्तीनें त्यांनीं उच्चारले असें एके प्रसंगीं त्यांनीं स्वतःच म्हटलें असलें तरी त्यांचे परममित्र शिवरामपंत परांजपे यांच्या सुप्रसिद्ध ' काळा ' ची स्मृति त्यांच्या मनांत नसेलच असें म्हणवत नाहीं. त्याबरोबर १९०६–७ चा स्वदेशी बहिष्कार चळवळीचा काळ आणि आतां नवें दैनिक प्रारंभ करितांना दिसणारा असहकारितेचा काळ यांतील मूलभूत फरकही त्यांना व्यक्त करावयाचा होता. आपल्या मताप्रमाणें राष्ट्रीय सभेचें धोरण लोकांत प्रसृत करण्यासाठीं हें आपण नवें दैनिक स्वतःच्या मालकीचें काढलें अशा आशयाचें आपल्या पत्राचें धोरण नव्या पत्राच्या संपादकीय लेखांत काकासाहेबांनीं सांगितलें आहे.

देशांतील बहुसंख्य लोकांची जी राष्ट्रीय सभा तिच्या मतांचा पूर्णतया पाठपुरावा करावयाचा हें लोकमान्य टिळकांच्या वेळेपासूनचें धोरण गांधी युगांतील राष्ट्रीय सभेच्या मताचा प्रचार व दणदणीत पुरस्कार करण्याचे धोरणाशीं अगदीं तंतोतंत जुळणारेंच होतें. लोकमान्य पत्राच्या अग्रलेखावर त्यांनीं 'मामनुस्मर युध्य च' असें गीतेंतील वचन लोकमान्यांना उद्देशूनच घातलें होतें. लोकमान्यांवरील आत्यंतिक निष्ठेमुळें त्यांच्या स्मरणार्थ काढलेल्या दैनिकाला ' लोकमान्य ' हें नांव दिलें होतें. आतां स्वतःच्या मालकीचें स्वतंत्र दैनिक काढलें तरी त्यांच्या अंतःकरणांतील लोकमान्यांवरील

व्यक्ति तितकीच जागृत होती. म्हणून त्यांनीं आत्मविश्वासानें ' नवा काळ ' हें नवें नांव देऊन काढलेल्या नव्या दैनिकाच्या अग्रलेखावर ' न मे भक्तः प्रणश्यति ' असें गीतावचन उद्‌धृत केलें. ' लोकमान्यांचा खरा भक्त आहे तो कधींच नाश पावत नाहीं, ' असेंच त्यांना आपल्या विरोधकांना सांगावयाचें होतें. राजा कालस्य कारणम् हा नवाकाळच्या मथळ्याखालील श्लोक निवडण्यांतहि त्यांनीं स्वतःची निष्ठा व कालाचें औचित्य दाखविलें आहे.

स्वतःचें असें नवें दैनिक नव्या नांवानें काढलें तरी लोकमान्यांच्या स्मृत्यर्थ काढलेल्या ' लोकमान्य ' दैनिकाबद्दल काकासाहेबांच्या मानसीं कोणते आत्मीयतेचे विचार वरचेवर येत असत ह्याबद्दल स्वतः त्यांनींच सांगितलेल्या एका आठवणींत नमूद केलेलें आहे. दे. भ. शिवरामपंत परांजपे यांचेबद्दल सांगितलेल्या एका आठवणींत काकासाहेबांनीं ह्या संदर्भात पुढीलप्रमाणें लिहिलें आहे.

' नवा काळ ' हें दैनिक मी सुरू केल्यावर ' लोकमान्य ' पत्राची स्थिति फार डबघाईस आली. चालकाकडून तें पत्र बंद करण्यांत येईल असा अंदाज होता. तें पत्र आपणांस चालवण्यास मिळेल काय, आणि तो प्रसंग आल्यास 'नवा काळ' हीं अक्षरें मोठीं छापून त्यांत 'लोकमान्य' पत्र सामील केलें आहे असें लिहावयाचें कीं, नांवांत उलटापालट करावयाची अशा विचारांत मी होतों.

त्या वेळीं दे. भ. शिवरामपंत परांजपे मला मुंबईस भेटावयास आले होते. सहज बोलतांना लोकमान्य पत्राविषयीं बोलणें निघालें. मी माझ्या मनांतील विचार त्यांच्यापुढें मांडलें आणि काय करावें ? असा प्रश्न त्यांना केला. मी ' नवा काळ ' हा शब्द रागारागानें बोलत असतांना सहज स्फूर्तीनें कसा उच्चारला याचें वर्णन केलें, व लोकमान्य पत्राविषयीं माझा जिव्हाळा कसा हेंही त्यांना ठाऊक होतें. दे. भ. परांजपे यांनीं ' नवा

काळ ' हे शब्द मी सहज स्फूर्तीनें उच्चारलें या माझ्या विधानावर जोर दिला व नंतर ते म्हणाले कीं, कधीं काळीं 'लोकमान्य'पत्र तुमच्या हवालीं करण्यांत येईल ही तुमची आशा व्यर्थ आहे. तुम्हांला लोकमान्यांतून निघून यावें लागलें हें ध्यानांत ठेवा; आणि माझें स्मरण ' काळा ' चा ' नवा काळ ' होऊन लोकांपुढें ठेवीत आहां हें विसरूं नका. ही भविष्यवाणी दे. भ. परांजपे यांनीं मला ऐकविली आणि भलतेसलते विचार मनांत येऊं देऊं नका असें बजावलें. नंतर मी माझ्या या विचारांना दूर केलें."

नवें दैनिक मुंबईसारख्या शहरीं चालू करितांना प्रतिकूल परिस्थितीची जाणीव काकासाहेबांना पूर्ण होती. पण या परिस्थितीशीं आपण यशस्वी झगडा देऊं असा आत्मविश्वासही परिपूर्ण होता. ही जाणीव व हा आत्मविश्वास त्यांनीं आपल्या नव्या दैनिकाच्या ध्येयवाक्यांत ' न मे भक्तः प्रणश्यति ' हे शब्द निश्चयानें निवडण्यांतही स्पष्टपणें दिसून येतें. काकासाहेबांचें सर्वच आयुष्य देशसेवेस अर्पिलेलें होतें. वृत्तपत्र त्यांनीं फक्त धंदा म्हणून पत्करिलें नव्हतें तर देशसेवा व लोकजागृतीचें प्रभावी साधन या बुद्धीनें स्वीकारलें होतें, आणि हें कर्तव्य उत्कृष्ट रीतीनें होण्यास माणसाच्या अंगीं जी निस्सीम स्वार्थनिरपेक्षता, त्याग व निश्चयीपणा इ० गुण अवश्यक लागतात ते गुण काकासाहेबांच्या अंगीं परिपूर्ण होते. याबाबत त्यांना आत्मविश्वास असल्यामुळें प्रतिकूल परिस्थितीची जाणीव असूनही त्यांनीं नव्या दैनिकाचें नवें साहस अंगीकारलें.

' नवा काळ ' दैनिक काकासाहेबांनीं कां काढलें यासंबंधींची माहिती आतांपर्यंत थोडक्यांत दिलेलीच आहे. तथापि नवा काळच्या पहिल्या अंकांतील पहिला अग्रलेखच मुळीं त्यांनीं ' स्वतःसंबंधीं ' या शीर्षकानें लिहिला असून महाराष्ट्रीय जनतेपुढें आपलें हृदय खुलें केलें आहे. त्यांत सर्व गोष्टी संगतवार खुलाशानें सांगितल्या असल्यामुळें तो सर्व लेखच येथें देणें अधिक उपयुक्त दिसतें.

## नवाकाळचा पहिला अग्रलेख

" संतांचीं उच्छिष्टें बोलतां उत्तरें । काय म्यां पामरें जाणावें हें ॥

--तुकाराम

वाचकांचा व रा. खाडिलकर यांच्या लेखांचा आज नव्या स्वरूपांत पुनः परिचय होत आहे. हा परिचय जरी नवा असला तरी १८९६ सालापासून रा. खाडिलकर यांच्या लेखांच्या धोरणासंबंधानें नवी ओळख करून देण्याची जरूरी नाहीं. लो. बाळ गंगाधर टिळक यांचें शिष्यत्व स्वेच्छेनें व आनंदानें स्वीकारून ज्या मतांचा अंगीकार श्री. खाडिलकर यांनीं केला तीं मतें आज जशींच्या तशीं कायम आहेत. लो. टिळक यांनीं आपल्या विचारसरणीला जें वळण लावलें तें वळण म्हणजे सद्गुरूचा मोठा प्रसाद होय, असा रा. खाडिलकर यांचा दृढ विश्वास असून गेलीं दोन वर्षें लोकमान्य पत्राचे संपादक या नात्यानें सांप्रतच्या नव्या काळांत त्यांनीं जें धोरण स्वीकारलें होतें, तेंच धोरण नव्या पत्राच्या रूपानें आजपासून वाचकांपुढें मांडण्यांत येत आहे.

म. गांधी यांनीं सुरू केलेली असहकारितेची चळवळ म्हणजे लो. टिळक यांच्या धोरणाचें परिपक्व फल होय. याविषयीं सर्व विचारी लोकांची एकवाक्यता झालेली आहे. ज्या वृक्षांचें बीजारोपण लो. टिळक यांनीं केलें, जो वृक्ष लो. टिळकांच्या हयातींतच वाढीस लागून फलोन्मुख झाला, व ज्या वृक्षाचें पूर्ण स्वरूप म. गांधी यांच्या चळवळीमुळें जनतेच्या दृष्टीस पडलें, त्या वृक्षाच्या सावलीखालीं बसून 'नवाकाळ' पत्र आपलें रोजचें काम करणार आहे. नवाकाळ पत्राच्या धोरणाबद्दल इतकें सांगितल्या नंतर लोकमान्य पत्राशीं आपला असलेला संबंध रा. खाडिलकर यांना कां सोडावा लागला, याविषयीं थोडासा खुलासा करणें जरूर आहे.

दोन वर्षांपूर्वीं डॉ. भडकमकर यांनीं लोकमान्य पत्र काढण्यासंबंधीं पुढारीपणा स्वतःकडे घेऊन जेव्हां जुळवाजुळव केली, त्या वेळीं लोक-

ान्य पत्राचे मॅनेजिंग एजंट रा. खाडिलकर व डायरेक्टर मंडळींतील मुख चालक यांची एकजूट होती. कॉंग्रेसपक्ष व कौन्सिलपक्ष असे मत-द होऊं लागल्यानंतर मूळची जूट कायम राहिली नाहीं. मॅनेजिंग :जंटमधील डॉ. भडकमकर यांचा पुढारीपणा नाहींसा होऊन कौन्सिल-ाल्या पक्षाचे रा. मंडलीक मॅनेजिंग एजंटसूच्यातर्फे एक्स ऑफिशिओ ायरेक्टर झाले, आणि खुद्द डायरेक्टरांचे बोर्डांत आपल्या बाजूनें मता-ैक्य नाहीं असा अनुभव रा. खाडिलकर यांना आला. मॅनेजिंग एजंट हणजे रोजचें कामकाज पाहणारे मालकच होत. मालक भिन्न मताचा व ोकर असलेला संपादक भिन्न मताचा, ही स्थिति रोजच्या कामकाजांत मडचणीची होते, इतकेंच नव्हे, तर उभयतांसही अत्यंत त्रास व मानासिक ्लेश देणारी झाल्यावांचून राहत नाहीं. मॅनेजिंग एजंटच्या तर्फेचा कारभार ॉ. भडकमकरांचे हातून निघून गेल्यामुळें डळमळीत झालेले रा. खाडिल-र यांचें आसन, डायरेक्टरच्या बोर्डांतही आपल्या बाजूनें नेहमींच मता-ैक्य होईल, असा रा. खाडिलकर यांना विश्वास न आल्यामुळें नेहमीं डळमळीत राहणार असें रा. खाडिलकर यांना वाटलें व त्यांनीं लगेच ोकमान्य पत्राशीं आपला असलेला संबंध सोडून दिला.

अशाच प्रकारच्या परिस्थितीमुळें संपादक नात्याच्या कार्यांत पुण्यास ा. खाडिलकर यांना पूर्वी दोन वेळां खो मिळाला होता, तोच खो ुण्याहून मुंबईस आल्यावरही तिसऱ्यांदा आपल्या सभोंवतीं घिरट्या ालीत आहे, असें पाहून अशा खोच्या डावांतील मानसिक क्लेश टाळण्या-करितां स्वतःचें स्वतंत्र आसन नवाकाळ पत्राच्या रूपानें चालण्याचा निश्चय रा. खाडिलकर यांनीं केला, आणि इष्ट मित्रांच्या मदतीमुळें नवाकाळ पत्राचे द्वारें आपले विचार वाचकांपुढें मांडण्याची संधि रा. खाडिलकर यांना मिळाली. संपादक व लेखक या नात्यानें आपल्या आयुष्यांतील शेवटच्या पायरीवर उभे राहून आजपासून

आम्ही लो. टिळक व म. गांधी यांचे विचार आपल्या वेड्यावाकड्या पद्धतीनें बोलून दाखविणार आहोंत. ते बोल म्हणजे सद्‌गुरूचीं व संतांचीं उच्छिष्टें होत. हे आमच्या वाचकांस माहीत असल्यामुळें पूर्वीच्या स्वरूपांतील आमचे लेख ज्याप्रमाणें महाराष्ट्रांतील वाचकांनीं गोड करून घेतलें, तसेंच नवाकाळांतील लेख वाचक गोड करून घेतील, असा नवाकाळ पत्रास भरंवसा वाटत आहे.''

वरील अग्रलेखांत त्यावेळची राजकीय परीस्थिति व लोकमान्यांच्या लढाऊ राजकारणावरील काकासाहेबांची श्रद्धा यांचें यथार्थ चित्रच डोळयांपुढें उभें राहातें.

**मदतीचा आधार**

मुंबईसारख्या ठिकाणीं हातीं साधनसामुग्री कांहींच नसतां दैनिक वर्तमानपत्र चालू करणें ही गोष्ट सोपी नव्हती. यासाठीं सर्व साधनांची जुळवाजुळव करण्यास त्यांनीं तावडतोब सुरवात केली व अत्यंत परिश्रम घेतले. तथापि त्यांचे शब्द खालीं पडूं नयेत म्हणून ‘ आपणास आम्ही सर्व तऱ्हेची मदत करूं ’ अशीं आश्वासनें त्यांच्याकडे सर्व बाजूंनीं येत होतीं. डॉ. नानासाहेब देशमुख व श्री. वासुकाका जोशी यांचा काकासाहेबांना सर्वतोपरि आधार होता. कांहीं धनिक गृहस्थ काकासाहेबांच्यासाठीं स्वतंत्र नवें दैनिक काढून देण्यासही तयार होते. पण काकासाहेबांना आतां स्वतःचेंच वृत्तपत्र काढावयाचें होतें. म्हणून त्यांनीं आपल्या हितचिंतकांकडून इतक्यापुरती अवश्य ती मदत घ्यावयाचे ठरविलें.

यंदे शेखदार यांचा ‘इंदुप्रकाश’ छापखाना गिरगांव रोडवर होता व त्यांत इंदुप्रकाश दैनिकही छापलें जात असे. शेटजींनीं नवाकाळ आपल्या छापखान्यांत छापून देण्याचें कबूल केलें इतकेंच नव्हे तर ‘ इंदुप्रकाश ’ दैनिकासाठीं काम करणारी बहुतेक सर्व मंडळी थोड्या थोड्या प्रमाणांत नवाकाळ वर्तमानपत्रासाठींही काम करूं लागली. किती तरी माणसांनीं

मदत करावी तेव्हां एक कार्य होतें. अशी बरीच तयार मंडळी काकासाहे-बांना ' इंदुप्रकाश 'मध्यें मिळाली. वर्तमानपत्राचे विक्रेते श्री. बागवे हे मुंबईच्या विक्रीची उत्कृष्ट व्यवस्था करण्यास उभे होतेच.

संपादकमंडळींत पहिल्याप्रथम अधिक मंडळी नव्हती. स्वतः काका-साहेब, लोकमान्यांतून त्यांचे बरोबरच नोकरी सोडून आलेले त्यांचे पुतणे श्री. नाना खाडिलकर या दोघांवरच मुख्यतः सर्व लेखनाचा भार होता. आप्पाराव कुलकर्णी हे मुंबई शहराचे बातमीदार म्हणून काम करीत.

वरील जुळणी होण्यास फार वेळ लागला नाहीं. तथापि शक्य तितक्या लौक ' नवाकाळ ' सुरू झालाच पाहिजे असा काकासाहेबांचा कटाक्ष होता त्यामुळें वरील तऱ्हेची वर्तमानपत्राची जुळणी चालविली असतांच त्यांनी श्री. गुर्जर ज्योतिषी यांस ते सुरू करण्यास उत्तम दिवस कोणता याची विचारणा केली. त्यांनीं पंचांग पाहून सुमारें ३।४ महिन्यांनीं उत्तम मुहूर्त असल्याचें सांगितलें. त्यावर ' मला या आठ दिवसांत माझें वर्तमानपत्र सुरू करावयाचें आहे. या आठ दिवसांत कोणता चांगला दिवस आहे तें सांगा, असें काकासाहेबांनीं सांगितल्यावर शके १८४४ फाल्गुन वद्य ' बुधवार ता. ७–३–१९२३ हा सुमुहूर्त श्री. गुर्जर यांनीं काढून दिला.

' नवाकाळ ' आकर्षक व्हावा यासाठीं काकासाहेबांनीं आपल्या सह-काऱ्यांच्या मदतीनें खूप श्रम घेतले व शेवटीं ता. ६–३–२३ रोजीं रात्रीं योग्य वेळीं सर्व मजकूर तयार झाला.पण छापणारें मशीन काम बरोबर देईना त्यासाठीं काकासाहेब बराच वेळपर्यंत मशीनसमोर दुरुस्तीच्या सूचना करीत उभे होते. शेवटीं मशीन दुरुस्त होऊन नवाकाळचा पहिला अंक वेळेवर छापला जाऊन त्यासाठीं आतुरतेनें वाट पहात असणाऱ्या जनतेच्या हातांत तो पडला.

नवाकाळ असा सुरू झाला व त्याची चिमुकली कचेरी ' इंदुप्रकाश

कचेरींतच एका कोपऱ्यांत सजविली गेली हें खरें ! पण ' नवाकाळ—' सारखें काकासाहेबांचें दैनिक म्हणजे लहानमहान गोष्ट थोडीच होती? वर्तमानपत्र सर्व तऱ्हेनें उत्तम हवें व त्याचा खप सर्वांत अधिक व्हावा असें असलें तर त्यासाठीं इतर सर्व साधनेंही अधिक कार्यक्षम व मोठया प्रमाणावर हवींत. नवाकाळ सुरू झाल्याबरोबर अशा तऱ्हेच्या अडचणी एक एक अधिकाधिक स्पष्ट होऊं लागल्या. ' इंदुप्रकाश 'चीं यंत्रें जुनीं होतीं. त्यांत ' इंदुप्रकाश ' वर्तमानपत्र रोज छापलें जातच होतें. त्यांत आतां दुसरें हें नवाकाळ दैनिक निघालें. जुनें यंत्र अधिक काम देईना. म्हणून चित्रशाळेंतून एक छपाईचें यंत्र आणवून तेंही बसविलें. पण यामुळेंही फारशी सुधारणा होत आहे असें दिसेना.इकडे आपल्या उपसंपादकांना सूचना देणें वगैरें कामें काकासाहेबांना करावीं लागत तशींच नवाकाळच्या व्यवस्था खात्यावरही त्यांना नजर ठेवावी लागे. ते दिवसभर या कामावर असतां आणखी मशीन पुढेंही त्यांना वरचेवर उभे राहून छपाई वेळेवर होते का नाहीं हेंही पहावें लागे. अंक वेळेवर न निघाला तर लगेच विक्रीवर परिणाम होई. या सर्वांतून. बाहेर निघण्यास एकच मार्ग होता आणि तो म्हणजे आपला स्वतःचा छापखाना काढणें हा होय.

स्वतःचा छापखाना काढावयाचा म्हणजे पुन्हां एक मोठा आर्थिक बोजा उचलावयाचा असा त्याचा अर्थ होता. काकासाहेब कोणतीही गोष्ट करीत ती त्यासंबंधाचा साधकबाधक सर्व विचार करून करीत. एकदां असें पाऊल टाकलें म्हणजे ते कधींही मागें घेत नसत. यासाठीं जरूर त्या देहकष्टाची, धाडसी त्यागाची अगर इतर अडचणी सोसण्याची त्यांची केव्हांही तयारी असे. या कामासाठीं आतां अधिक कर्ज काढावें लागणार होतें. पण त्याला त्यांची तयारी होती. त्यांनीं आपल्या मित्रमंडळींशीं यासंबंधांत विचारविनिमय करून इंदुप्रकाशच्या जागेंतच स्वतःचा 'दत्तात्रेय छापखाना' काढण्याचें ठरविलें. छपाईचीं यंत्रें व थोडी इतर सामुग्री अगो-

दर चित्रशाळेंतून आणलेलीं होतींच. त्यांत जरूर ती आणखी भर घालून 'इंदुप्रकाश'च्या जागेंतच एका बाजूस ही सर्व मांडण्यांत आली; व 'दत्तात्रय छापखाना' सुरू झाला. ता. २३–१–१९२४ रोजीं या छापखान्यांत कामास सुरवात होऊन गुरुवार ता. २४–१–१९२४ चा नवा काळचा अंक स्वतःच्या छापखान्यांतून बाहेर पडला. १९२५ च्या नोव्हेंबरच्या दोन तारखेस 'दत्तात्रय छापखाना' व 'नवा काळ' यांना खटाव-मकनजी वाडींत प्रशस्त व सोइस्कर जागा मिळाली व त्याच वाडींत काकासाहेबांना राहण्यासही चांगली जागा मिळाल्यामुळें आपल्या वृत्त-पत्राच्या कामावर देखरेख करणें त्यांना सोईचें झालें.

काकासाहेबांना त्यांच्या या नव्या धाडसांत परमेश्वरी मदत जशी अनेक मित्रमंडळीमार्फत होत होती, तशीच त्यांच्या अत्यंत कर्तृत्ववान् पत्नी-कडूनही झाली. संपादकीय कामांत व बाहेरचा इतर मोठा व्याप उभारण्यांत ते व्यग्र असतां, नित्य संसाराकडे किंवा कुटुंबियाच्या व्यवस्थेकडे त्यांना मुळींच पाहावें लागत नसे. आतां तर नव्या दैनिकाच्या व मालकीचा छापखाना चालविण्याच्या आधिक जबाबदाऱ्या त्यांच्यावर पडलेल्या! या परिस्थितीची पूर्ण जाणीव ती. सौ. गोरकाकूंस होती. यापूर्वी त्यांनीं संसाराचे उन्हाळे पावसाळे मोठ्या कौशल्यानें पार पाडलें होतें व काका-साहेबांना त्यांची जिकीर मुळींच पडूं दिली नव्हती. आतां तर त्यांनीं नवें साहस आरंभलेलें; अशा वेळीं त्यांना निर्वेधपणें आपल्या जबाबदाऱ्या पार पाडण्याइतकें स्वास्थ्य मिळावें म्हणून सौ. काकूंचे काळजीपूर्वक प्रयत्न असत.

काकासाहेबांच्या या मालकीच्या नव्या व्यवसायामुळें घरांतील आतेष्ट पाहुण्यांची वर्दळ जास्त वाढली होती. काकासाहेबांच्या प्रवृत्तीप्रमाणें छाप-खान्याच्या व्यवस्थेंत जीं माणसें घेतलीं त्यांत कांहीं नातेवाईक व पूर्व ऋणानुबंधी होती. श्री. बाबासाहेब जोग, श्री. शिवरामकाका खाडिलकर

त्यांचे चिरंजीव विष्णुपंत व काकासाहेबांचे भाचे श्री. गोपाळराव रानडे वगैरे मंडळी व्यवस्थाखात्यांत नव्यानें घेतली जात होती. संपादकमंडळांत माझे बंधु नाना लोकमान्यांतून आलेल्या मंडळींत होतेच. त्याशिवाय लेखक म्हणून, सध्यां शहापूर–बेळगांव येथें वकिली करीत असलेले त्यांचे चुलत घराण्यांतील नातू श्री. विनायक दत्तात्रय ऊर्फ आबासाहेब खाडिलकर व कोंकणच्या घराण्यांपैकीं श्री. रघुनाथराव खाडिलकर, (सध्यांचे पुण्याचे सोशालिस्ट पुढारी) वगैरे नात्यांतील मंडळी काकासाहेबांनीं कामाला लाविली होती. साहाजिकच यांपैकीं बऱ्याच मंडळींची घरीं ये-जा, राहणें व वर्दळ असावयाचीच. असल्या सर्व वर्दळीच्या जबाबदारीचा भार सौ. काकूंवर पडत असे. सार्वजनिक कामाच्या दृष्टीनें, पुढारी पाहुणेही घरींच यावयाचे.

सौ. काकूंसारखी अगत्याची व कष्टाळू गृहिणी ही सर्व व्यवस्था करण्यास होती म्हणूनच हें सर्व जमे. सौ. काकूंना त्या वेळीं घरचे मदतीसही कोणी नव्हते. त्यामुळें त्यांना दगदग फार पडे. थोरले चिरंजीव अप्पा अहमदाबादेस उच्च शिक्षणाकरितां गेलेले. दुसरे चिरंजीव विनायकराव त्या वेळीं वयानें लहान व विद्यार्थी त्यांची गृहव्यवस्थेंत काय मदत होणार? नोकरचाकराकडून मदतही बेताचीच व्हावयाची. पण सौ. काकूंच्या मनावर एका विचाराचा पगडा फार जोराचा होता. काकासाहेबांच्या स्वतःच्या मालकीनें सुरू केलेल्या व्यवसायाची जबाबदारी उत्तम रीतीनें पार पाडण्याइतकें स्वास्थ्य त्यांना मिळेल, असा संसार चालविणें आपलें विशेष कर्तव्य आहे असेंच त्यांना वाटत होतें. त्यामुळें दिले जातील तितक्या पैशांतच संसार ठाकाठिकीनें व लौकिकास साजेल अशा पद्धतीनें चालवून काकासाहेबांची तब्बेत उत्तम संभाळीत असत. येवढी दगदग व ओढ मागें असतांही त्यांची वात्सल्याची भावना व विद्यादानाबद्दलची आस्था फार मोठी होती. त्यांच्या परिसरांत कोणी आला व त्यांस कांहीं कमी असलें कीं त्यांचें मन

कळवळे. अशांना त्या आपल्या घरच्याप्रमाणें मानीत व शिक्षणासाठीं मुक्त-हस्तानें आर्थिक मदतही करीत. सौ. काकूंचें दातृत्व आपलेपणाचें व अत्यंत सढळ असे.

काकासाहेबांना आनंददायक अशी आणखी एक बाब घरांत सुरू झाली होती, ती म्हणजे सौ.काकूंची चरक्यावरील सूतकताई.या सूतकताईच्या कामीं त्यांनीं जणूं कांहीं या कालांत व्रतच घेतलें होतें. पुढें सूत काढण्याचे कामीं त्यांचा उद्योग व कौशल्य इतकें वाढलें कीं, कांतलेल्या सुताचीं खादीचीं वस्त्रें, काकासाहेबांना, स्वतःला, मुलांना व पुढें सुना आल्यानंतर त्यांनाही त्या पुरवूं लागल्या. अशा रीतीनें चालविलेल्या, त्यांच्या थोर तत्त्वप्रणालीस अनुरूप संसारामुळें, काकासाहेबांना स्वीकृत कार्यांत या सहकार्यानें जास्त उत्साह वाटला असल्यास नवल नाहीं. या उत्साहामुळें, काकासाहेबांना "नवा काळ" दैनिकाच्या प्रारंभी पडलेल्या त्रासाचा परिणाम फारसा झाला नाहीं. शिवाय काकासाहेबांनीं कोणतेंही काम अंगार घेतल्यावर त्यांत ते इतके निमग्न होत कीं बाह्य उपाधीचा त्यांचेवर परिणाम होत नसे. मुंबईसारख्या हवेमध्यें प्रारंभीं ते दररोज १०।१५ तास काम करीत असतांनाही हवेची बाधा त्यांना सहसा झाली नाहीं. त्यांच्या स्वास्थ्यास त्याची विशिष्ट मनोरचना जशी कारण झाली तशीच सौ. काकूंची संसार-कुशलताही कारण झाली. घरच्या संसाराची ही जबाबदारी वैशिष्ट्यानें त्यांनीं सांभाळल्यामुळें, काकासाहेब "नवा काळ"चा संसार सुकरतेनें, पण नमुनेदार रीतीनें चालवूं शकले.

### नवाकाळचा संसार

नवाकाळचा हा संसार आदर्श करावयाचा असा काकांच्या मनाचा आग्रह असल्यानें त्याकरितां जरूर तें मनुष्यबळ व साधनसामुग्री त्यांनीं अत्यंत तत्परतेनें व प्रयत्नानें मिळविली. नवाकाळ सुरू करण्याचा निश्चय केल्याबरोबरच त्यांनीं आपले पुतणे नाना यांना लोकमान्यांतून या नव्या

पत्राच्या व्यवस्थेंत घेतलेंच होतें. इंदुप्रकाशचे पूर्वीचे बातमीदार श्री. अप्पाराव कुळकर्णी यांनाही त्यानीं प्रारंभींच आपणाकडे घेतलें. नवाकाळचे पहिले कांहीं दिवस काकासाहेब संपादक, नाना मुख्य उपसंपादक, व अप्पाराव कुळकर्णी संपादकीय मदतनीस एवढाच संच होता.

थोड्या दिवसांतच लोकमान्यांतील काकांचे जुने स्नेही श्री. गणपतराव पागे व संपादक वर्गापैकीं श्री. राऊत, व श्री. ताम्हणकर, नवाकाळ कचेरींत दाखल झाले. काकासाहेबांनीं श्री. पुरोहित व श्री. महाशब्दे या नव्या होतकरू तरुणांना आपल्याकडे नेमून घेतले. श्री. धुरंधर हे एल्एल् बी. तरुण गांधी–तत्त्वज्ञानानें आकर्षित झालेले व घरीं सुस्थिति असल्यानें हौसेनें लेखनव्यवसायांत पडूं इच्छिणारे होते. काकासाहेबांनीं त्यांचे गुण लक्षांत येतांच त्यांना नवाकाळांत वाव देण्याचें ठरवलें व त्यांच्या वैशिष्ट्य पूर्ण लेखनामुळें ते संपादकवर्गांत लवकरच पुढें आले. 'फरिस्ता' सदर त्यांच्या रोचक भाषेमुळें लोकप्रिय झालें.

विविध विषयाच्या अभ्यासांत तरबेज व हौशी तरुण जोडण्यांत काकांचें कौशल्य श्री. नरहरपंत फाटक यासारख्या भिन्नपक्षांतील विद्वान् तरुणास जवळ केलें यांत दिसून येतें. श्री. फाटक इंदुप्रकाशच्या संपादकीय कामावर होते. त्यावेळीं प्रारंभीं नवाकाळांतही ग्रंथपरीक्षण वगैरे त्यांच्या विद्वत्तेला साजेशीं सदरें लिहिण्याचें काम त्यांना देण्यांत आलें. नंतर इंदुप्रकाश बंद पडला त्यावेळीं त्यांनीं कैं. गो. कृ. गोखले यांचें चरित्र लिहिण्यास घेतलें होतें. तें पुरें झाल्यानंतर काकासाहेबांनीं त्यांस आपल्याकडे बोलावून घेतले काकासाहेबांचे व त्यांचें राजकीय मतांत कितपत जमेल अशी बलवान् शंका इतरांना वाटत असे. पण काकांचें उदार धोरण व फाटकांची अनुरूपवृत्ति यामुळें त्या उभयतांचें सहकार्य उत्तमच जमलें व एकमेकांचीं मने समजल्यामुळें पुढें प्रेमादर वाढून श्री. फाटक काकासाहेबांचे खास सल्लागार झाले. ते नवाकाळमध्यें कायमचे आले व काकाचे वृत्तपत्रव्यवसायांत प्रमुख सहकारी झाले.

चांगला छापखाना व चांगली संपादकीय मंडळी जुळवितां जुळवितां 'नवाकाळ' अधीकाधिक आकर्षक करण्याचे काकासाहेबांचे प्रयत्न चालू होते. नवाकाळ लोकांना आवडावा व त्याचा प्रसार अधिकाधिक व्हावा ही त्यांची इच्छा होती. यासाठीं विविध लोकांच्या आवडीचीं विविध सदरें त्यांनीं सुरू केलीं. विविध शिरोलेख, विविध चित्रें, विविध बातम्या त्यांच्या पत्रांत येऊं लागल्या. या सर्वांसाठीं त्यांनीं सढळ हातानें खर्च करून जरूर ती सर्व साधनसामुग्री आणविली. आठवड्यांतून कांहीं वेळां गोष्टी घालणें व क्रिकेटच्या सामन्यासारख्या लोकरंजक घटनांची लालित्यपूर्ण रीतीनें विस्तृत माहिती पुरविणें इत्यादि अद्यावत् साधनांच्या द्वाराही ते जनतेचीं मनें काबीज करीत होते. ज्ञानाचा प्रसार व्हावा, लोकजागृति व्हावी व त्यायोगें जनता स्वराज्य संपादनास योग्य व्हावी असा त्यांचा सततचा प्रयत्न होता.

आपली संपादक मंडळी वृत्तपत्राच्या कामांत तयार करतांना काकासाहेबांची ही विशिष्ट दृष्टि होती.

संपादकांनीं लेखनाकरितां कोणते विषय व ते कसे निवडावे, त्याचा अभ्यास कसा करावा व ते कसे मांडावे याबद्दल मार्मिक सूचना ते देत व नव्या होतकरू लेखकांस तर प्रसंगानें शिक्षणच देत असत. वृत्तपत्राचा हा सर्व प्रपंच ही एक देशसेवा आहे, विशेषतः परदास्यांतून मुक्त होऊं पाहणाऱ्या देशांत लोकजागृतीसाठी केलेली ही खडतर तपस्या आहे अशी त्यांची आग्रहाची शिकवणूक असे त्यामुळे या व्यवसायांत पडलेल्या सर्वच सहकाऱ्यांना लोकोपयोगी सार्वजनिक कार्यांत व राजकीय आंदोलनांत त्यांनीं भाग अवश्य घेतला पाहिजे असे त्यांचें मत असे व त्याकरितां जरूर ती सवड व शक्य ती आर्थिक मदत ते करीत असत. लोकमान्य टिळकांनीं ज्या धोरणानें आपल्या जवळची मंडळी देशसेवेवर लावली त्याच धोरणानें नवाकाळमध्यें ही तीच लोकमान्यांची प्रथा चालू ठेविली.

नवाकाळमधील मंडळी मुंबईच्या अनेक सर्व तऱ्हेच्या सार्वजनिक कार्यांत दिसत तसेंच देशात उठलेल्या राजकीय चावटळींतही दिसत. गणेशोत्सवासाठीं व्याख्यानें देण्याबद्दल काकासाहेबांना कोणी आमंत्रण देण्यास आल्यास ते आपल्या संपादकमंडळींना त्यासाठीं पाठवीत. स्वतः काकाही मुंबईस निरनिराळ्या सार्वजनिक संस्थेच्या कामांत लक्ष घालीत असत. मुंबई प्रांतिक काँग्रेस कमेटीचे ते बरींच वर्षे उपाध्यक्ष होते. म. गांधींनीं चालू केलेल्या चळवळीच्या मुंबईस होणाऱ्या प्रत्येक कार्यक्रमांत कधीं अध्यक्ष, कधीं व्याख्याते यानात्यानें ते प्रत्यक्ष भाग घेत असत. गणपती उत्सवासारख्या वार्षिक उत्सवप्रसंगीं ते राजकारणावर व इतर विषयावर विद्वत्ताप्रचुर भाषणें करीत. त्या सुमारास गांधर्व महाविद्यालयातर्फे झालेल्या संगीत परिषदेचे ते अध्यक्ष होते. जळगांव येथें खादीप्रदर्शन त्यांच्या अध्यक्षतेखालीं भरलें होतें.

संपादकखात्याकडे काकासाहेबांचें जसें लक्ष होतें तसेंच त्यांनीं व्यवस्थापक खात्याकडेही बारीकपणानें लक्ष असे. साधारणतः असें दिसतें कीं, आपल्याशीं व धंद्याशीं आपलुकीच्या निष्ठेनें राहतील अशीं साधीं माणसें हाताशीं घेऊन व त्यांना अनुभवाच्या चरकांत घालून त्यांना तयार करावयाचें असें काकासाहेबांचें धोरण होतें. ऋणानुबंधी व इतरही लोकांना उद्योग देतां येईल तितका ते देत. महत्त्वाच्या कामासाठीं माणसाची निवड करतांना ते वेळ घेत. पण एकदां माणसाची निवड केल्यावर त्याच्या कार्यक्षेत्रांत ते सहसा ढवळाढवळ करीत नसत. हाताखालच्या माणसाच्या संसाराची, त्याच्या आजारीपणाची आणि त्याच्या भवितव्याचीही ते आपलेपणानें काळजी घेत. नोकरवर्गानें आपलें कर्तव्य चोख बजावलें म्हणजे बाकी कांहीं त्यांना नको असे. नोकरावर कर्तव्यच्युतीसाठी रागावलें तर ' चालता हो ' असें एकदम म्हणतील, पण नोकरीवरून सहसा कोणास काढणार नाहींत. त्यांचेकडील नोकरी म्हणजे शाश्वतीच वाटे.

नवा काळच्या आर्थिक परिस्थितीच्या हिशोबांत आपल्या नोकरांना द्रव्य प्राप्ति व्हावी अशी त्यांची इच्छा असे. त्यामुळें पगार वाढविण्याबद्दल लायक नोकरांना काकासाहेबांच्याकडे विनंति करावी लागत नसे. सात तारखेस पगार द्यावयाचाच हें 'नवा काळ' कचेरीचें वैशिष्टय असे. या बाबतींत काकासाहेब फारच कटाक्षानें वागत. आपल्या नोकरांबद्दलच्या अशा आत्मीयतेमुळें या मंडळींत काकासाहेबांनीं एक तऱ्हेची आपल्या-बद्दल निष्ठा उत्पन्न केली व हीं सर्व माणसें त्यांना कायमचीं जोडलीं गेलीं.

नवा काळ पत्राची बाजारांत दुसऱ्या एका तऱ्हेनें पत फार मोठी असे. नवाकाळाच्यासाठीं विविध जातीचा माल बाजारांतून विकत आणावा लागे व तो नित्य हजारों रुपयांनीं असे. या व अशा सर्व नवाकाळच्या व्यवहारांत नवाकाळ अत्यंत चोख व सरळ असे. यामुळें कागदवाले, टाइपवाले व इतर व्यापारी नवाकाळला फार मानीत. आदरानें पूरित अशी ही मंडळी म्हणजे नवा काळच्या चालत्या बोलत्या जाहिरातीच झाल्यामुळें नवाकाळचा खप वाढण्यास व नवाकाळला मोठमोठया कंप-न्यांच्या जाहिराती मिळण्यास त्याचा प्रत्यक्ष उपयोग होत असे.

'नवाकाळ' वर्तमानपत्र अधिकाधिक फायदेशीर कसें होईल याकडे काकासाहेब सूक्ष्मपणें पहात व यासाठीं ते साधतील त्या योजना अमलांत आणण्यास चुकत नसत. नवाकाळ चालू असतांच त्याच्यासाठीं झालेल्या दैनिक कामाचा फायदा घेऊन त्यांनीं आठवड्याच्या नवाकाळाची योजना सुमारें वर्षाभरांतच म्हणजे ता. २८-९-२५ पासून दसऱ्याच्या मुहूर्तावर अमलांत आणली. यामुळें खेडोपाड्यांतील लोकांची नवाकाळाला सेवा करतां आली हा मोठा फायदा झाला.

नवा काळ फायदेशीर होऊन त्यापासून शक्यतों जास्त पैसा मिळावा इकडे काकासाहेबांचें लक्ष असलें तरी केवळ पैशासाठीं ते आपले कारभारां-तील अगर जीवनांतील उच्च तत्त्व कधींही सोडण्यास तयार नसत. एकदां

एक संपूर्ण पानाच्या जाहिरातीचा करार करण्यासंबंधींचें काम त्यांच्या समोर ठेवलें. अमुक दिवशीं अमुक पानावर ही जाहिरात आलीच पाहिजे अशी करारांत अट होती. काकासाहेबांनीं ती मोठी जाहिरात नाकारली, "माझें वर्तमानपत्र जाहिरात छापण्यासाठीं नाहीं. महत्त्वाचा मजकूर छापल्यानंतर जागा असेल तर जाहिरात छापूं. आमच्या प्रमुख कामांत जाहिरातवाल्याचें बंधन आम्हांस मान्य करतां येत नाहीं." असें उत्तर त्या वेळीं त्या जाहिरातदारास त्यांच्याकडून मिळालें. जाहिरातींतील मजकूर अयोग्य दिसला तर ते रागावत असत व अशा जाहिराती न घेण्याबद्दल व्यवस्थापकांस बजावीत असत.

नवाकाळ दैनिक चालवावयाचें म्हणजे त्यासाठीं पैसा फारच मोठया प्रमाणावर नेहमीं लागे व यासाठीं त्यांना वेळोवेळीं कर्जही काढावें लागे. प्रसंग पडेल त्यावेळीं जरूर तितकें कर्ज काढावयाचें व ठरल्याप्रमाणें तें परत फेडावयाचें असें त्यांचे कटाक्षानें धोरण असे. ह्या बाबतींत चालढकल होऊं नये याबद्दल ते फार दक्ष असत. या कालांत अशाच एका प्रसंगीं सौ. काकूंचे दागिने विकूनही ठरल्यावेळीं त्यांनीं कर्जफेड केली. सौ. काकूंच्या दागिन्याचा उपयोग करण्याचा हा दुसरा प्रसंग. अशा रीतीनें अतिशय शिस्तीनें व पत राखून आर्थिक व्यवस्था ते करीत असतांनाही कोणीकडून तरी पैसा कसातरी मिळवावा असें धोरण त्यांनीं ठेवलें नाहीं. एका निवडणुकीचे वेळीं प्रतिपक्षाचा उमेदवार नवाकाळकडे जास्त पैसे देऊन जाहिरात देण्यास आला. काकासाहेबांनीं त्यास स्पष्ट नकार दिला. यापेक्षांही कांहीं वेळां अनाहूत रीतीनें स्वपक्षीयाकडूनही आर्थिक मदतीबद्दल काकासाहेबांना विचारण्यांत येई. एकदां तर स्वतः पंडित मोतीलाल नेहरूंनीं आपल्या पक्षाचे प्रमुख मराठी दैनिक म्हणून दहा हजार रुपयांचा चेकही काकासाहेबांच्यासाठीं काढला होता. तथापि त्यांनीं आपल्यावरील धोरणाप्रमाणें तो आभारपूर्वक नाकारला.

'नवाकाळ' वृत्तपत्र काकासाहेबांनीं देशसेवेसाठीं काढलें. कॉंग्रेसचें

राजकारण सर्वतोपरी उचलून धरून तें यशस्वी करणें हें त्यांचें ध्येय निश्चित होतें. नवाकाळची संपादकीय जबाबदारी पार पाडतांना ते या विषयाकडेच सर्व लक्ष पुरवीत. या काळांत काँग्रेसमध्यें फेर-नाफेर, कौन्सिल-प्रवेश, कौन्सिल बहिष्कार, स्वराज्यपक्ष, काँग्रेसपक्ष असे अनेक पक्षोपपक्ष माजले असल्यामुळें काकासाहेबांना जनतेला मार्ग दाखविण्याचे बाबतींत फार दक्ष रहावें लागे.

राजकारणांत नव्या नव्या घडामोडी सारख्या सुरू होत्या. दासबाबूंचा कौन्सिलप्रवेशाचा ठराव गया काँग्रेसनें संमत न केल्यामुळें त्यांनीं काँग्रेसच्या अध्यक्षत्वाचाच राजीनामा दिला. आणि मग इतर अनेकांचे राजीनामेही आले. यासाठीं मुंबईला ऑल इंडिया काँग्रेस कमिटीची बैठक झाली. काकासाहेब सभेस हजर होते. येथें गयेच्या काँग्रेसविरुद्ध ठराव पास झाला. त्यामुळें दिल्लीस मौ. आझाद यांचे अध्यक्षतेखालीं काँग्रेसचें खास अधिवेशन भरलें. त्यासही श्री. गंगाधरराव देशपांडे यांच्यासह काकासाहेब हजर होते. धार्मिकतेची अगर सदसद्विवेकबुद्धीची अडचण न वाटेल त्यांनीं निवडणुकी लढविण्यास हरकत नाहीं असें तेथें ठरलें व मोती-लालजींच्या स्वराज्यपक्षानें निवडणुकी जिंकून सरकारशीं जोरदार लढत दिली. तितक्यांत महात्माजी अॅपेंडिसायटिसच्या ऑपरेशनमुळें तुरुंगांतून सुटले व त्यांनीं नाफेर पक्षास खादी व राष्ट्रीय शिक्षणाचा विधायक कार्य-क्रम सांगून कौन्सिल पक्षास आपलें राजकारण स्वेच्छेनें खेळण्यास वाव करून दिला. पण मंत्रिपदें स्वीकारण्यासंबंधांत या पक्षांतील लोकांत मत-भेद झाले. या सर्व घडामोडींत काकासाहेब महात्माजींच्या विचाराशीं सहमत असल्यानें काँग्रेसच्या राजकारणाला उठाव देतांना त्यांनीं नवाकाळ-मधून महात्माजींचें तत्त्वज्ञान जोरदारपणें लोकांपुढें मांडलें.

### मेनका नाटक

अशा रीतीनें "नवाकाळ" विशिष्ट आर्थिक परिस्थितींत कौशल्यानें

चालविला जात आल्यानें लोकप्रिय होत होता व आपलें कार्य नेटानें चालवीत होता. नवाकाळचें नवें आसन आतां बरेंच स्थिर झालें असल्यानें काकासाहेबांनीं पूर्व नियोजित मेनका नाटक लिहून ते रंगभूमीवर आणलें. द्रौपदीनंतर आतां सहा वर्षांनीं हें नाटक रंगभूमीवर आलें. तप आणि सेवा या दोन तत्त्वांच्या उच्च आधारावर हें नाटक अधिष्ठित झालेलें आहे. मेनकेनें सेवाधर्मानें विश्वामित्राच्या क्रोधबुद्धींत फरक पाडला व अशा रीतीनें शुद्ध झालेल्या तपस्व्याच्या बुद्धीला गायत्री मंत्राचा साक्षात्कार झाला असें काकासाहेबांनीं दाखविलें आहे. उपकथानकांत व विनोदांत इतर कांहीं नाटकांप्रमाणें फेर-नाफेर वादाच्या छटा उमटल्या आहेत. कौन्सिलप्रवेशाच्या इष्टानिष्टतेचें जनमत चष्मे ज्याप्रमाणें असतील त्याप्रमाणें त्यांना या नाटकांतील विनोद सह्य असह्य वाटला. या नाटकांतील काका-साहेबांचा तत्त्वज्ञानाकडील कल व त्यांतील विनोद या दोन गोष्टींमुळें महाराष्ट्रांत या नाटकाची बरीच चर्चा झाली यांत शंका नाहीं. स्त्रिया पुरुषांचें मन केवळ रूपानेंच आकर्षित करूं शकतात असें नसून गुणानें व सेवेनें तीच गोष्ट त्या घडवूं शकतात असें मेनकेंत काकासाहेबांनीं दाखविलें आहे.

या नाटकानंतर लवकरच काकासाहेबांनीं उत्कृष्ट नाट्यकौशल्य व तत्वज्ञानाची तीव्रता व ओजस्वी भाषा इत्यादि गुणांनीं परिपूर्ण असें श्रीरामचंद्रावरील ‘सवतीमत्सर’ हें नाटक लिहिलें. नाटक मंडळींतील अंतस्थ फाटाफुटीमुळें हें नाटक जरी रंगभूमीवर विशेष गाजलें नाहीं तरी काकासाहेबांच्या मनाचें उच्च आध्यात्मिक स्वरूप या नाटकामुळें जनतेच्या मनावर अधिक ठसलें यांत शंका नाहीं. राजकीय वा व्यावहारिक जीवनास काकासाहेब याप्रमाणें तत्त्वज्ञानाची यशस्वी रीतीनें सांगड घालून देत होते. एका हातांत नवाकाळ व एका हातांत नाट्यकला अशा नित्याच्या दुहेरी मार्गांनीं काकासाहेब लोककल्याणाचें कार्य उच्च पद्धतीनें चालवीत होते.

यांत पूर्ण यश येण्यास त्याचा व्याप महाराष्ट्रापुरतांच न राहतां आपले विचार सर्व देशभर वाचले जावे इतकेंच काय पण परदेशांतही त्याचा प्रचार व्हावा व याकरितां इंग्रजी मासिकही काढावें अशी योजना श्री. फाटक, प्रो. घारपुरे वगैरे मंडळींबरोबर चर्चिली जात होती, पण अशा विचारांना मूर्त स्वरूप येण्यापूर्वींच वर्तमानपत्रावरील आपत्तींचीं विघ्नें उत्पन्न झालीं व त्यामुळें यशाची फलप्राप्ति लांबणीवर पडली.



## : १३ :

# तपश्चर्येची सांगता



तपसा प्राप्यते स्वर्गं तपसा प्राप्यते यशः ।
आयुः प्रकर्षो भोगाश्च लभ्यन्ते तपसा विभो ॥

—महाभारत.

आपला 'नवाकाळ' एक तऱ्हेनें नमुनेदार व उपयुक्त करण्याचा धडाडीचा प्रयत्न काकासाहेब करीत होतेच. व आपल्या पक्षाचा प्रसार परप्रांतींही व्हावा म्हणून एक इंग्रजी मासिक काढण्याची कल्पना त्यांच्या मनांत होती व ते तसें बोलूनही दाखवीत असत. ही सर्व हकीकत यापूर्वी आलीच आहे. या वृत्तपत्रांचे बाबतींत खर्चाकडे बिलकुल पहावयाचें नाहीं; प्रसंगीं कर्ज काढून देखील आपलें पत्र आकर्षक, नमुनेदार व लोकप्रिय करावयाचेंच या काकासाहेबांच्या वृत्तीचें एक उदाहरण या सुमारास घडलें. 'नवाकाळ' च्या पहिल्या वर्षाच्या शेवटीं शेवटीं त्यांत ब्लॉक्स देण्याची व्यवस्था झाली होती पण ती जास्त चांगली झाली पाहिजे असें त्यांना

सतत वाटत होतें. तशी उत्तम व्यवस्था करावयाची झाल्यास स्वतः फोटोग्राफी व ब्लॉक मेकिंगची साधनें असणें अत्यंत अवश्य होतें. पण त्याकरितां लागणारी रक्कम सहा हजार रुपये खर्च करणें जरूरीचें होतें. एकाच खात्यावर एवढी मोठी रक्कम खर्च करण्याची ऐपत नवाकाळला नव्हती. तरी पण आपलें दैनिक शक्य तितकें आकर्षक करावें व इतर उत्तम दैनिकाच्या निदान जोडीचें तरी व्हावें असा काकांचा आग्रह असल्यानें स्वभावसिद्ध धडाडीनें पण कर्ज करून हा व्याप त्यांनीं वाढविला.

इतकेंच नव्हे तर ही आपली लोकसेवेची परंपरा स्थिर पायावर व्हावी म्हणून ते आपल्या नवाकाळसाठीं स्वतःची एक इमारत विकत घेण्याच्या विचारांत होते. त्याची चौकशीहि चालली होती. ज्या कारणासाठीं त्यांनीं स्वतःचा छापखाना काढिला, ज्या ध्येयाकरितां स्वतःची अद्यावत् यंत्रसामुग्री जुळविली, त्या ध्येयसिद्धीसाठीं नवाकाळ स्वतःच्या इमारतींत गेला पाहिजे असें त्यांच्या मनानें ठरविलें होतें. आतां नवाकाळ उपयुक्त झाला होता. आठवड्याच्या नवाकाळानें अपेक्षित लोकप्रियता मिळविली होती. काकांचे वडील चिरंजीव अप्पासाहेब, गुजराथ विद्यापीठाची पदवी संपादन करून नवाकाळ दैनिकाच्या संपादकवर्गांत सामील होऊन कामही करूं लागले होते. नवाकाळ व 'आठवड्याचा नवाकाळ' अत्यंत व्यवस्थित पद्धतीनें चालले होते. या पुढील सुधारणांचे विचार काकांच्या मनांत उद्भवत होते तोंच नवाकाळ दैनिकावर फौजदारी फिर्यादीचें गंडांतर आलें.

### पहिला खटला

नवाकाळवर फिर्याद होण्याचा पहिला प्रसंग सोलापूरच्या दंग्याच्या बातमी-मुळें आला. सोलापूरच्या बातमीदारानें त्यावेळचे सोलापूरचे डी. एस्. पी. डंकन मॅग्डोनाल्ड यांचेविरुद्ध कांहीं आक्षेपार्ह तार पाठविली. रात्रपाळीच्या संपादकानें ती खळबळ उडवणारी बातमी जशीच्या तशी छापण्यास दिली

व ती दुसरे दिवशींच्या अंकांत भडकपणानें प्रसिद्ध झाली. हा मजकूर नजरेस येतांच काकांना या बातमीचा परिणाम चटकन लक्षांत आला. कल्पनेप्रमाणें खटलाही झाला. सदर साहेबांनीं अब्रूनुकसानीची फिर्याद गुदरली. तेव्हां कांहींनीं दिलगिरी प्रदर्शित करून मोकळे होण्याचा सल्ला काकासाहेबांना दिला पण त्यांच्या मनोवृत्तीला हा सल्ला मुळींच पटणें शक्य नव्हतें. ही बातमी ज्या संपादकानें छापण्यास दिली त्यालाही पण त्यांनीं दोष दिला नाहीं. लोकमान्यांच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें सार्वजनिक हितास अनुसरून त्यांनीं खटला शेवटपर्यंत लढवला, खर्च केला व जबर दंडही सोसला. वृत्तपत्रव्यवसायाचा अंगीकार केलेल्या मनुष्यावर असले प्रसंग येणारच त्याबद्दल त्यांचें मन तयारच होतें. सोलापूरचे तेव्हांचे नगराध्यक्ष डॉ. मुळे वगैरे मंडळींनीं काकासाहेबांस यावेळीं फार मदत केली.

या खटल्याचें काम चालू असतांना हिंदुस्थानच्या राज्यव्यवस्थेबद्दल विचार करण्यासाठीं ब्रिटिश सरकारनें कुप्रसिद्ध सायमन कमिशनची नेमणूक केली. सायमन कमिशनच्या निर्मितीचीं कारणें व पद्धति राजकारणांतील कोणत्याही पक्षाला संमत नव्हती. कॉंग्रेसला तर हें कमिशन पूर्णपणें अमान्य होतें. व त्यामुळें १९२७ मध्यें मद्रासच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांत सायमन कमिशनवर बहिष्कार व स्वातंत्र्याचें ध्येय ठरविणें याबद्दलचे महत्त्वाचे ठराव समंत झाले. काकासाहेबांनीं या बहिष्काराच्या चळवळींत मुंबईच्या प्रांतिक कॉंग्रेस कमेटीतर्फें प्रामुख्यानें भाग घेतला. नवाकाळनें तर पद्धतशीरपणें बहिष्काराच्या चळवळीची झोड उठवून दिली.

महाराष्ट्रापुरतें याविषयीं असें सांगतां येईल कीं, बहिष्काराचे निमित्तानें प्रतिसहकारपक्ष व असहयोगीपक्ष या दोन्ही पक्षांची एकी झाली, व पुण्यास महाराष्ट्र प्रांतिक परिषद सुभाषबाबूंचे अध्यक्षतेखालीं भरली. त्यांत सायमन कमिशन बहिष्कार, करबंदी, व संपूर्ण स्वातंत्र्याचें ध्येय वगैरे अत्यंत महत्त्वाचे ठराव पास झाले. गुजराथेंत बार्डोलीचा लढा चालूच होता. देशांतील राजकारण खळबळीचें होतें. एकीकडे कौन्सिल-

प्रवेश निष्फळ ठरला होता. सायमन कमिशन नेमून सरकारनें लोकमत प्रक्षुब्ध केलें होतें; व सुभाष, जवाहिर यांच्यासारख्या 'स्वातंत्र्य संपादन' हेंच ध्येय म्हणणाऱ्या तरुणांची काँग्रेसमध्यें संघटना होत होती. काकासाहेबांना हें वीरवृत्तीचें वातावरण आपल्या संपादकीय कामगिरीला फार उत्तेजक वाटत होतें. त्यामुळें त्यांनीं या राजकारणांत धडाडीनें भाग घेतला.

अशा रीतीनें राजकारणाला नवा रंग चढत होता. चि. अप्पासाहेब संपादक मंडळांत संपादकीय धडे घेत होते. त्यांचें नवाकाळच्या व्यवस्थेकडेहि लक्ष असे. नवाकाळ आपली सरकारी धोरणावर हल्ला चढवण्याची कामगिरी निर्भयपणें चालवीत होता. अशा सुमारास गृहजीवनांतील एक महत्त्वाचा प्रसंग चि. अप्पासाहेबांचें लग्न करण्याचें ठरलें, हा होय. पालघरचे प्रसिद्ध दांडेकर घराण्यांतील श्री. अण्णासाहेब दांडेकर यांची कन्या सौ. कमलाबाई वधू निश्चित केली. कोणत्याही घरांत वडील मुलाचें लग्न आनंददायक असेलच पण सौ. काकूंच्या दृष्टीनें हें लग्न जास्त आनंददायक होतें. १९२० सालीं आमच्या वडिलांच्या–हरिपंततात्यांच्या–मृत्यूनंतर माझे बंधु नाना व केशवराव यांचीं लग्नें सांगलीस झालीं होतीं, तरी बऱ्याच वर्षांत कार्यानिमित्त सर्व कुटुंबीय मंडळी एकत्र जमली नव्हती. सर्व बाजूंनीं विचार करून हें लग्न पुण्यासारख्या शहरीं करण्याचे ठरवलें. कुटुंबांतील बरीच मंडळी, स्नेही, ऋणानुबंधी, सौ. काकूंच्या मनाच्या हौसेप्रमाणें एकूण एक जमली होती. लग्नसमारंभ अत्यंत व्यवस्थित व थाटांत झाला. पुण्यांत लग्न झाल्यानें या समारंभास काकासाहेबांची राष्ट्रीय पक्षांतील जुनी स्नेही मंडळीही उपस्थित होती. नव्याजुन्याचे हें एकत्रित संमेलनंच जमलें होतें.

## नेहरू समिति

याच सुमारास पं. मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं एक 'सर्वपक्षीय पुढाऱ्यांची समिति' नेमली गेली. हिंदुस्थानची राजकीय घटना आमची

आम्ही ठरविणार असा ह्या पुढाऱ्यांचा निश्चय होता. सायमन कमिशनला हें हिंदी राष्ट्राचें उत्तर होतें. एकत्र बैठका व विचारविनिमय खूप झाला. पण सर्व पक्षांचें एकमत होईना. समितीच्या मसुद्यांत स्वतंत्र मतदार-संघाला मान्यता नसल्यानें मुस्लिम लीग नाखूष होती. प्रागतिकांना तो मसुदा क्रांतिकारक वाटला तर सुभाषचंद्र बोस व जवाहरलाल नेहरू यांच्यासारख्या स्वातंत्र्यवादी तरुणांना तो अगदींच अपुरा वाटला. तथापि कलकत्त्याच्या राष्ट्रीय सभेच्या अधिवेशनांत पं. मोतीलाल नेहरू यांच्या अध्यक्षतेखालीं व महात्माजींच्या मध्यस्थीनें 'नेहरू रिपोर्ट' तात्पुरता संमत झाला.

पण याचा काय उपयोग होता? सर्व पक्षांचीं मनें प्रक्षुब्धच होतीं. सर्वांची आपणांस जें जें हवें तें मिळालेंच पाहिजे म्हणून जोरदार चळवळ चालू होती. हिंदु-मुसलमानांमध्यें तेढ वाढीस लागलेली होती व जातीय दंगलीचें वातावरण सारखें दाट होत राहिलें होतें. कामगारमंडळींच्या चळवळी वाढत्या प्रमाणांत होत्या. संप व दंगे जागजागीं उसळून येत होते. वास्तविक सायमन कमिशन नेमून सरकारनें हिंदुस्थानचा अपमान केला होता. पण त्या कमिशनवर साधारणतः एकजात सर्वांकडून बहिष्कार पडल्यामुळें सरकारला आपली बेअब्रू झाली असें वाटत असल्यानें सरकारच्या अंगचा तिळपापड झाला होता.

लोकांमध्यें उत्पन्न झालेल्या या जागृतीचें योग्य संवर्धन करणें काकासाहेब आपलें कर्तव्यच मानीत होते. नवाकाळमध्यें या काळांतील चाललेल्या सर्व चळवळींना योग्य मार्गदर्शन मिळत होतें व त्यांचा पाठपुरावा होत होता. मजूर कामगारांची चळवळ सरकारच्या असमर्थनीय धोरणाचें फळ आहे असें त्यांचें मत होतें. यामुळें इतर विषयांच्या अनुषंगानें 'नवाकाळ'च्या करवीं सरकारच्या पाठीवर काकासाहेबांचे प्रखर प्रहार पडत तसेच ते मजूर चळवळीचे संबंधांतही पडत असत.

' 'नवाकाळ' वर्तमानपत्र छापण्यासाठीं काकासाहेबांनीं आपला स्वतःचा ोठा छापखाना 'दत्तात्रय प्रिंटिंग प्रेस' काढला होता. काकासाहेबांचें ोवन स्वजनहितार्थ वाहिलेलें असे. 'नवाकाळ' व 'दत्तात्रय छापखाना' । दोन ठिकाणीं कोणाही स्वकीयानें यावें व स्वशक्त्यनुसार दहा रुपयां- ासून पांचशें रुपयांपर्यंत द्रव्यार्जन करावें अशी मीं सोय केली आहे' सें काकासाहेब म्हणत. 'नवाकाळ' सुरू झाल्यावर सर्व नाटक कंपन्यांना आपलें स्वतःचेंच वृत्तपत्र आहे असें वाटे. त्यांच्याकडील जाहिरातीबद्दल ाकासाहेबांचें धोरण अत्यंत आपलेपणाचें असे. हीच त्यांची वृत्ति तर वर्तमानपत्रवाल्यांबद्दलही होती. वृत्तपत्रव्यवसायांत किती अडचणी ासतात याची त्यांस जाणीव होती. यामुळें आपल्या दत्तात्रय छापखान्यांत ानेक लहान मोठीं वृत्तपत्रें ते सोईनें छापून देत असत. त्यांचेकडून ्पाईचीं बिलें संपूर्ण कधीं मिळालीं असें झालें नाहीं. पण काकासाहेब जें ातीं येईल त्याच्या पलीकडे कधींही जात नसत.

## ावाकाळवरील खटला

१९२७-२८ सालीं हिंदुस्थानांत ज्यावेळीं विविध चळवळींचा डोंब ाठला होता त्यावेळीं काकासाहेबांच्या दत्तात्रय छापखान्यांत स्वतःच्या नवाकाळ' शिवाय दोन इंग्रजी व ५।७ मराठी छोटीं मोठीं वृत्तपत्रें ापलीं जात होतीं. या वृत्तपत्रांत मजूर पुढाऱ्यांचीं वृत्तपत्रेंही कांहीं ासल्यानें कॉम्रेड स्प्रॅट, डांगे, मिरजकर, जोगळेकर इत्यादि इत्यादि ामगारांचें कडवे अग्रणी दत्तात्रय छापखान्यांत वरचेवर ये-जा करीत ासत. काकासाहेबांचें मजूर चळवळीस सर्वसाधारण सहानुभूतीचें धोरण । ह्या मजूरधुरीणांची त्यांच्या छापखान्यांत ये-जा यामुळें या दोहोंचा ांबंध सामिलकीचा असावा असा संशय मुंबई सरकारला व म्हणून ाध्यवर्ति सरकारलाही आला होता. त्यावेळीं हॉटसन साहेब मुंबईचे होम- ाबर होते. काकासाहेबांचें नांव सरकारच्या काळ्या यादींत फार जुन्या

काळापासून होतेंच. पण अजूनपर्यंत सरकारला त्यांच्या विरुद्ध आघात करण्यास संधि सांपडली नव्हती यामुळें सरकार आंतल्या आंत चरफडत असावें.

असंतोषाच्या सार्वत्रिक वावटळींत कामगारांचे संप सुरू झाल्यामुळें सरकारनें उग्र स्वरूप धारण करून या संपांना पायबंद पाडण्यासाठीं 'पब्लिक सेफ्टी बिल' मध्यवर्ति कायदे मंडळांत आणलें; अर्थातच यामुळें कामगार लोक अधिकच प्रक्षुब्ध झाले. हिंदु-मुसलमानांचे दंगे, पठाण मुलें पळवितात या गैरसमजांतून मुंबईत माजले व ते चिघळत चालले. सरकार त्यांस आटोक्यांत आणूं शकलें नाहीं. या परिस्थितीबाबत "या दंग्यांची जबाबदारी सरकारवरच आहे असें कां म्हणूं नये" असें खडखडीतपणें विचारणारा "मुंबईतील दंगे व बोलशेव्हिक बिल' या मथळ्याखालील अग्रलेख ता. ९ फेब्रुवारी १९२९ च्या नवाकाळांत प्रसिद्ध झाला. सरकारला निमित्तच पाहिजे होतें. खटाव मकनजी वाडींतून अनेक राजकीय पक्षांच्या वृत्तपत्रांना आधार देणारे काकासाहेब त्यास उचलून न्यावयाचे होते. यामुळें हा अग्रलेख प्रसिद्ध झाल्याबरोबर त्यांच्यावर खटला भरण्याचें सरकारनें ठरविलें.

वरील अग्रलेख व त्या दिवशींचीं एक दोन स्फुटें आक्षेपार्ह आहेत असें ठरवून सरकारानें काकासाहेबांच्यावर खटला भरला व ता. १४ फेब्रुवारी १९२९ रोजीं काकासाहेबांचेवर राजद्रोहाच्या आरोपाचें पकड वारंट घेऊन डे. पो. क. पेटीगारा हे आले व त्यांनीं काकासाहेबांना पकडून नेलें. मुंबईची त्यावेळची प्रक्षुब्ध स्थिति व त्यावरलि नवाकाळमधील लेख जरी एकतऱ्हेनें खळबळकारक होते तरी त्यावर लागलीच खटला केला जाईल अशी थोडीशीही कल्पना नव्हती. काकासाहेब त्या दिवशीं नित्याप्रमाणें आपल्या कचेरीच्या खोलींत चिंतनांत निमग्न होऊन फेऱ्या घालीत होते. चंची पुढें सुटलेली असून काकासाहेबांनीं हातांत थोडी तंबाखू धरली होती. इतक्यांत दारांत पोलीस अंमलदार हजर झाले. हातांतील तंबाखू

त्यांनीं तशीच टाकिली. हें काय प्रकरण आहे ह्याची कल्पना त्यांना तत्क्षणीं उमगली. ते शांतपणें बाहेर आले व त्यांनीं अंमलदाराशीं चौकशी केली. अंमलदारानें आपला उद्देश सांगतांच तसेच कपडे करून त्यांचे बरोबर निघण्यास ते सज्ज झाले. नवाकाळ कचेरींतील मंडळी दाराजवळ व आसपास दिङ्मूढ होऊन उभी राहिली होती. मि. पेटीगारा यांनीं कांहीं व्यवस्था व बोलणें चालणें करण्यास सवड देण्याची भाषा काढली पण काकासाहेबांनीं कोणाशीं एक अक्षरही न बोलतां आपली तयारी असल्याचें सुचविलें व तडक पोलीस अंमलदाराबरोबर नवाकाळ कचेरींतून ते बाहेर पडले.

काकासाहेबांच्या अटकेमुळें सर्वत्र खळबळ उडाली. घरींही कोणास या घटनेबद्दल कल्पना नव्हती. स्नेही मंडळीस लगेच तारा गेल्या. नवाकाळ कचेरी व दत्तात्रय प्रेसची झडती होऊन आक्षित लेखांचे अंक व आक्षित लेखांचीं हस्तलिखितें जप्त करण्यांत आलीं होतीं. त्या दिवसाचा अग्रलेख काकासाहेबांच्या हातचा नव्हता, तशाच स्फुट सूचनाही नव्हत्या. रात्रौ काकासाहेबांचे स्नेही श्री. नरिमन यांचे घरीं या लेखांबद्दल व खटल्यासंबंधींच्या कामाबद्दल चर्चा झाली. दुसरे दिवशीं सकाळीं सुमारें ६ वाजण्याच्या सुमारास वासुकाका जोशी पुण्याहून मुंबईस आले. त्यांना पाहतांच सौ. काकूंना जास्त धीर आला. वासुकाकांनीं त्यांना कोणत्याही तऱ्हेची काळजी करूं नका असें सांगितलें व ते लगेच बाहेर निघाले. 'जेवण करून जा,' या सौ. काकूंच्या शब्दावर "आतां कृष्णाजीपंतांच्या बरोबरच जेवायचें" येवढेंच उत्तर देऊन ते चालूं लागले.

काकासाहेबांना जामिनावर सोडविणें हें त्यांचें प्रथमचें काम होतें. सरकार या कामांत कदाचित् खुनशीपणा दाखवील अशी त्यांची अपेक्षा होती. फार मोठ्या रकमेचा जामीन मागतील अशी त्यांची कल्पना होती. त्यासाठीं फार पंचाईत पडेल अशी स्थिति नव्हती. पण कदाचित्

अडवणुकीदाखल मोठया रोख रकमेचा जामीन मागितला तर निष्कारण कालहरण होईल म्हणून वासुकाकांनीं आपल्या खादीच्या सदऱ्याचा खिसा जबर रकमेनें भरून आणला होता. याची कोर्टांत जरूर पडली नाहीं. डॉ. देशमुख यांचे चिरंजीव श्री. बाबुराव देशमुख, वासुकाका जोशी व स्वतः काकासाहेब अशा संयुक्त जामिनकीवर व जातमुचलक्यावर काकासाहेब सुटले व घरीं येऊन सुमारें तीन वाजतां वासुकाकांसह जेवले.

श्री. बाळासाहेब खेर यांच्या "मणिलाल खेर" या सॉलिसिटरामार्फत श्री. जी. एन्. ठाकोर यांनीं हायकोर्टापुढें अर्ज करून काकासाहेबांच्या खटल्याची तहकुबी मिळविली. यांनीं या खटल्यांत व नंतरही वेळोवेळीं अत्यंत आपलेपणानें काकासाहेबांस बिनावेतन मदत केली. वास्तविक मॅजिस्ट्रेट साहेबांपुढें रीतसर दुसरे दिवशीं प्रारंभींचा खटला सुरू झाला होता व ज्या १२४ अ व १५३ या दोन कलमांखालीं काकासाहेबांच्यावर आरोप ठेवण्यांत आले होते त्या कलमांखालीं हे मॅजिस्ट्रेट साहेबच या खटल्याचा पूर्ण निकाल देऊं शकत होते. पण खटला हायकोर्टांत ज्यूरीपुढें चालणेंच अधिक जनहिताचें आहे असा काकासाहेबांचा आग्रह पडल्यानें तसा अर्ज हायकोर्टचे न्यायाधीश न्या. मू. पाटकर यांच्यापुढें केल्यावर काकासाहेबांचा खटला सेशन कमिट व्हावा असा त्यांनीं निकाल दिला व त्याप्रमाणें मॅजिस्ट्रेटनें कज्जा सेशन कमिट केला.

### हायकोर्टांत चौकशी

सेशनची तारीख महिन्याभरानें होती. तथापि एका तऱ्हेनें खटल्याचा निकाल तो खटला चालण्यापूर्वीच दिसत होता. खटल्याचा बाह्य देखावाच फक्त व्हावयाचा होता. काकासाहेब मनांत हें पूर्ण जाणून होते. बाळासाहेब खेर यांच्या ऑफिसांत कज्जा चालविण्याच्या संबंधांत ज्यावेळीं चर्चा चालत त्यावेळीं काकासाहेब अत्यंत अलिप्तपणानें त्यांत भाग घेत. ते या खटल्याकडे प्राप्त कर्तव्याच्या दृष्टीनें पाहत होते. एक तऱ्हेनें त्यांना हा

उशीरा मिळालेला लाभ होता. लोकमान्यांना दोनदां त्यांच्या स्वतःच्या लेखामुळें शिक्षा झालेली होती. त्याबद्दल त्यांचें भक्तिप्रवण मनास नेहमीं टोंचणी असे. आज ज्या लेखांच्याबद्दल त्यांच्यावर खटला होणार होता तो लेख व तीं स्फुटें त्यांच्या हातचीं नव्हतीं. आपल्या हातून आपल्या गुरूंच्या संबंधांत पूर्वी जें कांहीं घडून आलें त्याचें या खटल्यानें परिमार्जन होणार होतें. स्वातंत्र्याच्या संग्रामांत गेलीं सुमारें बत्तीस वर्षे त्यांनीं आघाडीवर काम केलें होतें. आपली तेजस्वी लेखणी विविध क्षेत्रांत अखंड चालवून सुमारें तीन तपांची दीर्घ व उग्र तपश्चर्या केली होती. या खटल्याच्या निकालानें त्यांच्या तपाची यथोचित सांगता होण्याचाच योग असल्यामुळें काकासाहेब अत्यंत स्थिर मनानें या आपत्तीकडे पहात होते.

नवाकाळ नीट रीतीनें चालला होता. व्यवस्थापक खातें व संपादकीय खातें या दोन्ही खात्यांत नेमलेलीं माणसें आपल्या कामांत तयार होतीं. वृत्तपत्रावर आर्थिक बोजा बराच असला तरी प्रसंगीं त्यांतून मार्ग काढण्यास अनेक स्नेहीमंडळी पाठीशीं होती. फक्त आपल्या गैरहजेरींत आपल्या वृत्तपत्रांची संपादकीय जबाबदारी कोणावर सोंपवावी हा महत्त्वाचा प्रश्न त्यांना सोडवावयाचा होता. काकांना याचा निकाल करण्यास फारसा काळ लागला नाहीं. वासुकाका जोशी वगैरे खास स्नेह्यांशीं व संपादक मंडळींतील श्री. फाटक यांच्याशीं विचारविनिमय करून तातडतोब निर्णय घेतला व दुसरे दिवशीं आपले चिरंजीव अप्पासाहेब यांस नवाकाळचे संपादक म्हणून डिक्लेरेशन करून येण्यास सांगितलें.

हायकोर्टांत ता. २६ मार्च १९२९ रोजीं कज्जासुनांवणीस मि. ब्लॅकवेल हे न्यायाधीश असून त्यांचे मदतीस कॉमन ज्यूरी होती. काकासाहेबांच्या तर्फे ॲ. भुलाभाई देसाई काम करीत होते व सरकारतर्फे ॲ. ज. कांगा खटला चालवीत होते. नवाकाळचा आक्षिप्त अग्रलेख व २।३ स्फुटें व इतर रिपोर्ट्स पुरावा म्हणून दाखल करण्यांत आले.

ॲ. भुलाभाई यांनीं आपली बाजू उत्तम तऱ्हेनें लढविली: खटला ऐकण्यास कोर्टांत भयंकर गर्दी झाली होती. खटल्याच्या दुसऱ्या दिवशीं वकिलांच्या तक्रारी व न्यायाधीशांनीं ज्यूरीला कज्जा समजावून सांगणें वगैरे महत्वाचीं कामें होतीं व खटल्याचा निकालही लगेच लागण्याचा संभव होता.

दुसरे दिवशीं ता. २७ मार्च रोजीं सकाळीं काकासाहेब शांतपणें घरांतून कोर्टाकडे जावयास निघाले. घरांतील सर्वच मंडळींना आज काकासाहेब कोर्टांतून परत कसे येतील याची चिंता वाटत होती व सर्व मंडळी भावनावश झालीं होती पण त्यांनीं मात्र आपली शांतता सोडली नव्हती. निरवानिरव व इतर प्रापंचिक व्यवस्थेबद्दल चकार शब्दही ते बोलले नाहींत. कपडे चढवून ते घरांतून नित्याप्रमाणें बाहेर पडूं लागले. येवढ्यांत त्यांना देवाला नमस्कार करून जाण्याची सूचना करण्यांत आली. क्षणभर ते विमनस्क झाल्यासारखे दिसले. पण तत्क्षणीं मन सावरून ते झटकन देवापुढें गेले. नमस्कार केला नि तसेंच पायऱ्या उतरून खालीं अंगणांत आले व कोर्टाची वाट चालूं लागले. त्या दिवशीं सरकारतर्फे सरकारी वकिलानें आपली बाजू सजवून मांडल्यावर श्री. भुलाभाईनीं आपली बाजू इतकी कौशल्यपूर्ण रंगविली कीं ज्यूरीवर त्याचा जोराचा परिणाम होत आहे असें सर्व ऐकणारांना वाटूं लागलें. जज्जसाहेब मात्र शांत बसले होते. ज्यूरीवर परिणाम झाला आहे याची त्यांना जाणीव होती.

ॲ. भुलाभाईचें भाषण संपल्यावर न्या. मू. ब्लॅकवेल यांनीं ज्यूरीस खटला समजावून सांगण्यास सुरवात करून आक्षिप्त लेख कसकसे राजद्रोही आहेत व एक एक लेख न घेतां सगळ्या मिळून लेखांचा मथितार्थ व जनमनावरील परिणाम कसा विचारांत घ्यावयास पाहिजे याचें खूप विस्तारानें व बारकाईनें विवेचन केलें. त्यांच्या बोलण्याची धाटणी व प्रतिपादनांतील अट्टाहास पाहून कोर्टांतील प्रेक्षकांचीं मनें भीतीनें व्याप्त

होऊं लागलीं. ॲ. नरिमन, बाळासाहेब खेर, श्री. कोठारी, दादासाहेब करंदीकर, काकासाहेब गाडगीळ, तरुणांचे पुढारी श्री. मेहेरअली असे अनेक पुढारी व काकासाहेबांचेबद्दल आदर असणारा फार मोठा जमाव कोर्टामध्यें होता. ब्लॅकवेलसाहेबांचें ज्यूरीस उद्देशूनचें वक्तव्य ऐकून काकासाहेबांना ते मोठी शिक्षा सुनावणार याबद्दल कोणास शंका राहिली नव्हती.

ज्यूरी विचार करण्यासाठीं बाहेर गेली. काम चालू असतां काकासाहेबांना वकिलाचेजवळ बसण्यास परवानगी देण्यात आली होती. आतां निकाल जवळ आल्याकारणानें त्यांना आरोपीच्या पिंजऱ्यांत बसण्यास सांगण्यांत आलें. त्याप्रमाणें ते तेथें उठून जाऊन बसले. वातावरण अत्यंत गंभीर होतें. ज्यूरीची मंडळी विचारविनिमय करून परत आली. त्यांना त्यांचें मत विचारण्यांत आलें. त्यांच्यांत दोन मतें झालीं होतीं. बहुमताचा निकाल 'दोषी' असा होता. तो जज्जांना कळविण्यांत आला. ज्यूरीचें मत ऐकल्याबरोबर जज्जसाहेबांनीं आपला निकाल जाहीर केला. एक वर्ष साधी कैद व दोन हजार रुपये दंड ही शिक्षा जाहीर करून ते झटकन आपल्या चेंबरमध्यें निघून गेले. शिक्षा अपेक्षेपेक्षां कमी झाल्यानें सर्वांचें मन एकदम हलकें झाल्याप्रमाणें झालें व त्या अर्थाचे उद्गार कोर्टांत सर्व बाजूंनीं निघून त्यांनींच काकासाहेबांचें अभिनंदन केलें. 'दोन हजार रुपयांचा दंड मी नवाकाळवर पडूं देत नाहीं, तुरुंगांत मी नाटक लिहीन," असें काकासाहेबांनीं आपल्या स्नेह्यांजवळ उद्गार काढले. कैदेची गोष्ट अर्थातच निराळी होती. काकासाहेबांचें वय त्या वेळीं सुमारें ५८ वर्षांचें होतें. अशा उतार वयांत खुनशी परकीय सरकारच्या तुरुंगांतील एक वर्ष म्हणजे ती फार मोठी खडतर शिक्षा होती.

कोणीतरी विचारलें, 'मुलांना कांहीं निरोप आहे का?' काकासाहेबांचे दोघेही चिरंजीव कोर्टांत जवळच होते. भावनावश मनाला घातलेला

कणखरपणाचा बांध फुटण्याचा तो एक प्रसंग होता. ‘मुलांना कांहींएक सांगावयाचें नाहीं’ या स्पष्ट शब्दांत उत्तर देऊन काकासाहेबांनीं त्या प्रसंगावर मात केली. कोणाशींही एक चकार शब्दही न बोलतां ते तुरुंगाकडे निघून गेले. खटल्याचा निकाल होण्यास बराच उशीर झाला होता. कोर्टाबाहेर रात्रींपर्यंत हजारों लोक वाट पहात होते. काकासाहेब तुरुंगांत जातांना मेहेरअल्ली प्रभृतींच्या समवेत या लोकांकडून ब्रिटिश साम्राज्यशाहीच्या विरुद्ध धिक्काराच्या आरोळ्या सुरू होत्या.

## काकासाहेबांचा तुरुंगवास

पहिल्या रात्रीं काकासाहेब एस्पेनेड पोलीस कोर्टाच्या बंदीशाळेंत होते. दुसरे दिवशीं त्यांना ऑर्थर रोड जेलमध्यें नेलें. पुढें दहा दिवस ते भायखळा जेलमध्यें होते. तेथून त्यांना अहमदाबादच्या साबरमती जेलमध्यें नेण्यांत आलें. या स्थानांतराच्या बेताची माहिती एका गृहस्थाकडून घरच्या मंडळीस थोडी अगोदर समजली. ग्रँट रोड स्टेशनवरून त्यांना अहमदाबादेकडे नेण्यांत येणार होतें. घरची व कचेरीची मंडळी तेथें गेली तों काकासाहेब पोलीस पाहऱ्यांत एका बाकावर हातावर उपरणें टाकून बसले होते. गाडी सुटण्यास तासाभराचा अवधि होता. पुढें कांहीं वेळानें त्यांना बर्फ घातलेलें सोडालेमन देऊं केलें तेव्हां हातांतील कड्या वाजल्या त्याबरोबर त्यांना हातकड्या घातल्याचा प्रकार उघडकीस आला. पोलीसांस विचारलें तर त्यांनीं हें कृत्य करावयास सांगणाऱ्या अधिकाऱ्याचें नांव सांगण्याचें टाळलें. त्यावेळच्या पोलीस कमिशनरलाही हें कृत्य रुचलें नाहीं. त्यांच्याकडील चौकशीस असा जबाब मिळाला कीं ‘जेलचे पोलीस अधिकारी निराळे आहेत. त्यांच्या कृत्याची जबाबदारी आमच्यावर नाहीं.’ याबद्दल पुढें श्री. नरिमन यांनीं कायदे मंडळांतही सवाल टाकले. स्टेशनवरून विविध वृत्तपत्रांना ही क्षोभजनक बातमी लगेच पुरविण्यांत आली. पण तितक्यांत हॉर्निमन यांच्या इंडियन नॅशनल हेरल्ड कचेरींतील शिवजी

नामक एक फोटोग्राफर तेथें आले त्यांनीं काकासाहेब गाडींत बसल्यावर खिडकींतून आपल्या मंडळींना नमस्कार करीत असतांना त्यांचा मोठया शिताफीनें हातकड्यांसहचा फोटो घेतला. तो दुसऱ्या दिवशीं बऱ्याच वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाला. शिवजींनीं ही मोठी अमोल कामगिरी केली. हातबेड्यांनीं युक्त असे काकासाहेबांचें चित्र पाहिलें म्हणजे ब्रिटिशांच्या दंश धरण्याच्या सूडबुद्धीची कल्पना निराळी करावी लागत नाहीं. काकासाहेबांसारख्या सत्प्रवृत्त देशभक्तास रस्त्यानें जातांना हातकड्या ! केवढा उद्वेगजनक देखावा हा ! काकासाहेबांच्याही अंतःकरणास ही गोष्ट लागली असावी. पण त्यांनीं आपल्या चेहऱ्यावरील शांतता रेसभरही ढळूं दिली नाहीं. भेटीस आलेल्या मंडळीशीं थोडेंबहुत बोलून त्यांनीं सर्वांना गंभीरपणें निरोप दिला.

काकासाहेबांचा हा राजद्रोहाचा खटला, त्यावेळच्या राजकीय वातावरणांत चांगलाच गाजला. काकांच्या नवाकाळनें जनमनावर उत्कृष्ट परिणाम केला असल्यामुळें काकांचा तुरुंगवास हा त्यांच्यावरील लोकांचें प्रेम वृद्धिंगत होण्यास कारणीभूत झाला. ते बाहेर असते तर साहित्यिकांनीं तें प्रेम कसें प्रगट केलें असतें याविषयीं त्यासालीं बेळगांव येथे भरलेल्या 'महाराष्ट्र साहित्य संमेलना'चे अध्यक्ष दे. भ. शिवरामपंत परांजपे यांनीं काकासाहेबांबद्दल आपल्या अध्यक्षीय भाषणांत जे उद्‌गार काढले त्यावरून स्पष्टपणें दिसून येतें. दे. भ. शिवरामपंत व काकासाहेब यांचा एकमेकांबद्दल असलेला स्नेहयुक्त आदर या उद्‌गारावरून दिसून येतोच, पण त्यापेक्षांही काकांची त्यावेळची लोकप्रियताही दिग्दर्शित होते. दे. भ. शिवरामपंतांनीं त्या दिवशीं छापील अध्यक्षीय भाषणाची पुस्तिका हातीं घेऊन वाचनास आरंभ केल्यासारखें करून थांबून ते उद्गारले:—

"पुढील भाग वाचून न दाखवितां माझ्यापेक्षां दुसऱ्या अधिक लायक इसमाची या जागीं योजना व्हावयास पाहिजे होती असें मी जाहीर

करितों. मी हें कोणत्या गृहस्थांना उद्देशून बोलत आहे हें आपल्यापैकीं पुष्कळांच्या लक्षांत आलें असेल. कित्येकांच्या चेहऱ्यावरून त्यांना मी कोणाला उद्देशून बोलत आहे याची कल्पना आली आहे असें वाटतें. ते गृहस्थ म्हणजे श्री. कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर हे होत. आज या वेळीं वास्तविक ते बेळगांवीं असावयास पाहिजे होते; पण त्याऐवजीं सरकारनें त्यांना महाराष्ट्राच्या दुसऱ्या टोंकाला असलेल्या अहमदाबाद शहरीं ठेविलें आहे. इंग्रजी भाषेंत एक म्हण आहे. तिचा पूर्वार्ध Man proposes असा आहे. म्हणजे मनुष्य एक गोष्ट चिंतीत असतो—पण तिचा उत्तरार्ध--या परिस्थितींत गॉड ( God ) च्या ऐवजीं Government disposes. म्हणजे सरकार तिचा नाश करितें असा आहे. कारण हल्लीं परमेश्वर आहे कोठें? तेव्हां त्याच्याऐवजीं सरकार असें म्हणावयास हरकत नाहीं. तुम्हांला वाटतें त्यांनीं इकडे दक्षिणेंत यावें; पण सरकार त्यांना उत्तरेकडे नेत आहे. तुमची एक इच्छा तर सरकारची इच्छा निराळीच. या ठिकाणीं श्रीयुत खाडिलकर हे अध्यक्ष या नात्यानें, समर्थ रामदास स्वामींच्या भगव्या रंगाचे पोषाख केलेल्या स्वयंसेवकांच्या रांगांतून सलामी घेत गेले असते. त्याऐवजीं ते आज दुसऱ्याच कोठल्या तरी पंथाच्या कोठल्यातरी रंगाच्या पोषाखाच्या शिपायांच्या रांगेतून जात आहेत. ज्या ठिकाणीं त्यांच्या गळ्यांत पडलेले पुष्पहार हातावर घेऊन चालले असते त्या ठिकाणीं सरकार त्यांना मुंबईहून अहमदाबादकडे नेतांना लोखंडी बेड्या ठोकून नेत आहे.”

या उद्गारांत दिसून येणारें महाराष्ट्र जनतेचें मन अत्यंत प्रांजल आहे. काकासाहेबांना अहमदाबादच्या साबरमती तुरुंगांत पाठविणें म्हणजे त्यांना शिक्षेंत शिक्षा होती. कारण अहमदाबादचा उन्हाळा फार प्रखर असतो. काकासाहेब उन्हाळ्याच्या तोंडालाच त्या तुरुंगात जाऊन पोंचले. त्यावेळीं तुरुंगांत अ, ब, क, अशी वर्गवारी नव्हती. सगळे एका माळेंतील

गुन्हेगार! काकासाहेबांना दिलेली खोली–वॉर्ड–थोडी प्रशस्त होती. पण भयंकर कडक उन्हाळ्यामुळें त्यांना मुळींच चैन पडत नसे. अंगावरचे कपडे स्वतःचे होते. पण अंथरा-पांघरण्यास तुरुंगांतील एकेक ब्लँकीट असे. अंगावरच्या उपरण्यानें त्या ब्लँकिटापासून उन्हाळ्याच्या दिवसांत आपलें जेवढें संरक्षण करतां येईल तेवढें ते करीत असत. प्रारंभीं कांहीं दिवस त्यांना दूध मिळत असे. पण पुढें तेंही बंद झालें. सकाळीं व संध्याकाळीं दोन्ही वेळेस भाकरी मिळे. सकाळीं तोंडीं लावण्यास डाळ असे व सायंकाळीं कोठल्यातरी पाल्याची फक्त भाजीच मिळे. या सर्व गोष्टींमुळें त्यांना अत्यंत कष्ट होत होते. तथापि त्यांनीं याबद्दल एका शब्दानेंही तक्रार केली नाहीं. त्यांना तंबाखूची नेहमींची संवय होती, तीही त्यांना नडेल असा सर्वांचा समज होता. पण पहिल्या भेटींतच त्यांनीं आपणांस तंबाखूची आठवणही होत नाहीं असें सांगितलें. 'भाजी खूप शिजवितात. इतकी कीं त्यातील पानेंही दिसत नाहींत. त्यामुळें ती फार स्वादिष्ट लागते' असेंही ते पुढें पुढें सांगत असत.

काकासाहेब कर्मयोगी होते. तुरुंगाच्या कष्टांतून पळवाट काढून त्यांतून कसें तरी पार पडावयाचें असें त्यांनीं कधीं मनांतही आणलें नाहीं. तुरुं-गाला त्यांनीं शिस्तीच्या शिक्षकाचें रूप दिलें व आपले दैनंदिन व्यवहार बांधीव करून टाकले. प्रकृति चांगली राखण्यासाठीं ते नित्य थोडे नमस्कार घालीत. तसेच आपल्या खोलीपुढील मोकळ्या जागेचें अंदाजी माप काढून त्यांतील किती फेऱ्या म्हणजे किती मैलांचें चालणें याचें त्यांनीं एक कोष्टक बसविलें होतें. त्या कोष्टकाबरहुकूम ते फिरण्याचा व्यायाम घेत. तुरुंगाच्या तासांच्या ठोक्यावर त्यांचे ठरीव कार्यक्रम चालत असत.

त्यांच्या वॉर्डामध्यें साधारणतः ज्यास्त मुदतीचे कैदी ठेवलेले असत. या लोकांशीं बोलून त्यांचीं दुःखें समजून घेणें हा काकासाहेबांचा परिपाठ होता. ते सर्व यांना साधुबाबा म्हणत व यांच्याबद्दल फार आदर दाखवीत.

एका गुन्हेगारास रोज एकसारखे झाडावर चढतांना व उतरतांना पाहून त्यांनीं त्यांस विचारलें ' तूं सारखा हा उद्योग कां करतोस?' त्यानें उत्तर दिलें ' ह्या झाडाच्या टोकावरून तुरुंगाबाहेरचें जग थोडेसें दिसतें तें मी पहात असतों.' तुरुंगाच्या चार भिंतींत कोंडल्यानंतर बाहेरच्या जगाच्या दर्शनाची किती आतुरता उत्पन्न होते याची काकासाहेबांनाही हळू हळू कल्पना आली. काकासाहेब तुरुंगांतून सुटून आल्यावर त्यांच्या या वॉर्डोतील एक खुनी कैदी शिक्षा भोगून सुटला व तो त्यांचेकडे आला. त्यास काकासाहेबांनीं आपल्या छापखान्यांत नोकरीस ठेवून घेतलें. या मानाजीनें नवाकाळांत दहा वर्षे अत्यंत नेकीनें काम केलें व नंतर तो आपल्या गांवाकडील छापखान्यांत काम करण्यास गेला.

तुरुंगांत गेल्यावर काकासाहेबांनीं आपण होऊन काम मागून घेतलें. सुताच्या गुंड्या करण्याचें काम ते करीत असत. पण बराचसा त्यांचा वेळ गीतारहस्य, भागवत व ज्ञानेश्वरी या पुस्तकांच्या वाचनांत व चिंतनांत जात असे. सावित्री नाटकही ते मधून मधून लिहीत असत. दिवसाचा वेळ अशा कांहीं कामांत जात असे. पण सायंकाळीं कोठडींत त्यांना कोंडून ठेवलें म्हणजे त्यांचें मन खालीं वर होऊन जाई. त्यांना या कोंडण्यामुळें फार मनस्ताप होत असे. रात्रीच्या वेळीं अनेक विचार मन त्रस्त करीत व झोंप येत नसे. यावेळीं गीतेच्या तत्त्वज्ञानानें मनाला शांति मिळे असें ते सांगत. या कालांत काकासाहेबांनीं भागवताचा व ज्ञानेश्वरीचा खोल अभ्यास केला.

साबरमतीच्या तुरुंगांत काकासाहेबांची भेट घेण्यास अनेक वेळां सौ. काकू, आप्पासाहेब वगैरे आम्ही बंधू, तसेंच वासुकाका जोशी, गंगाधरराव देशपांडे, काकासाहेब कालेलकर इत्यादि मंडळी जात होतों. महात्माजी यांचा आश्रम तुरुंगाजवळच असे. ते काकासाहेबांच्या प्रकृतीविषयीं नेहमीं खबर काढीत. मुंबईच्या त्यांच्या यावेळच्या एका मुक्कामांत अप्पा-

साहेबांना त्यांनीं काकासाहेबांचे तुरुंगांतील कुशल सांगितलें व ' त्यांच्या तुरुंगवासानें त्यांच्या वृत्तपत्राचा खप वाढला आहेना ' असें विचारलें. खरोखरीच काकासाहेबांच्या खटल्यामुळें व तुरुंगवासामुळें सर्व महाराष्ट्रभर नवाकाळची फार प्रसिद्धि झाली होती. यामुळें काकासाहेबांच्या तुरुंगवासाच्या मुदतींत नवाकाळचें सर्व कर्ज फिटण्याची स्थिति आली होती.

काका तुरुंगांत असतांनाच त्यांचे मित्र शिवरामपंत परांजपे यांच्या दुःखद निधनाची वार्ता त्यांना समजल्यामुळें त्यांस फार दुःख झालें. त्यांना स्वतःस मधुमेहाचा थोडा विकार होता. अत्यंत उन्हाळ्या-मुळें एकदां त्यांच्या अंगावर फार पुरळ आले व अंगास फार खाज सुटूं लागली. मधुमेहाच्या अशाच रोग्याच्या कथा आठवून त्यांना मधून मधून आपण हा तुरुंगवास कडेपर्यंत धकून नेऊं असें वाटेना नसे. तथापि एखाद्या योग्याप्रमाणें ते तुरुंगवासाची आपली तपश्चर्या पार पाडीत होते.

## सुटकेचे समारंभ

ते सुटण्याचें नक्की झाल्याबरोबर महात्माजींनीं तुरुंगाचे अधिकाऱ्याकडे त्यांच्या सुटण्याचा दिवस व वेळ नक्की विचारली. कारण त्यांचे मनांत तुरुंगाबाहेर काकासाहेबांचें स्वागत करून त्यांना आश्रमांत आणण्याचे होते. सरकारनें तशी नक्की वेळ तर दिली नाहींच. पण सुटण्याच्या ठरलेल्या दिवसानंतर एक दोन दिवसांनीं अकस्मात् ता. १७–१–३० रोजीं दुपारीं अकराच्या सुमारास अपेक्षित वेळ चुकवून त्यांना तुरुंगांतून मुक्त केलें. थोडा वेळ स्वतःचें बोचकें स्वतःच घेऊन व नंतर वाटेंतील एका सद्गृहस्थांनीं बरोबर दिलेल्या गड्याजवळ तें देऊन काकासाहेब महात्मा-जींचे आश्रमांत आले. महात्माजींनीं त्यांचें प्रेमानें स्वागत केलें व दोन दिवस विश्रांति घेऊन मग स्वगृहीं जाण्याचा आग्रह केला. महात्माजींनीं



कारावासाच्या वाटेवर
( हातकड्यांसह )

कारावासांतून परत मुंबईंत स्वागत
श्री. वासुकाका जोशी, नरीमन, डॉ. वेलकर, घारपुरे वगैरेसह

आपण नुकत्याच केलेल्या सत्याग्रहाच्या निर्णयाबद्दल काकासाहेबांना मत विचारलें 'तो निर्णय आपणास पसंत आहे' असें काकासाहेबांनीं सांगितलें. त्यांचे चिरंजीव आप्पासाहेब त्यांना नेण्यास अहमदाबादेस आलेच होते. त्यावेळीं अहमदाबादेसच विद्यार्थीपरिषद सरदार वल्लभभाईच्या अध्यक्षतेखालीं भरली होती. काकासाहेब कालेलकर स्वागताध्यक्ष होते. या सभेंत काकासाहेबांचा सन्मान करण्यांत आला. तसेंच सायंकाळीं अहमदाबादच्या महाराष्ट्रीय समाजातर्फे त्यांचें प्रेमपूर्वक अभिनंदन करण्यांत आलें.

रात्रीच्या गाडीनें निघून काकासाहेब मुंबईस आले. त्यांच्या येण्याची बातमी अगोदरच गांवांत प्रसृत झाली होती. दादर स्टेशनवर स्वागताचा पहिला हार नवाकाळचे प्रख्यात विक्रेते श्री. बागवे यांनीं घातला. ग्रँटरोड स्टेशनवर मुंबई कॉंग्रेस कमिटीच्या प्रो. दत्तोपंत धारपुरे वगैरे पदाधिकाऱ्यांसह श्री. नरीमन यांनीं काकासाहेबांचें स्वागत केलें. स्टेशनपासून त्यांची प्रेमानें मिरवणूक काढण्यांत आली. मंगळवार तारीख २१-१-१९३० रोजीं काकासाहेबांचें मुंबईच्या कामगार वर्गातर्फे प्रचंड स्वागत करण्यांत आलें. टाइम्स ऑफ इंडियासह सर्व वर्तमानपत्रांनीं संपादकीय लेख लिहून देशकार्यासाठीं उतार वयांत त्यांनीं सोसलेल्या हालाबद्दल व दाखविलेल्या धैर्याबद्दल त्यांचें अभिनंदन केलें.

मुंबईस थोडे दिवस विश्रांति घेतल्यानंतर काकासाहेब आपल्या आतेष्ट स्नेहीसोबती यांच्या भेटीसाठीं पुणें, सातारा व सांगली या गांवीं गेले, व त्या प्रत्येक ठिकाणीं त्यांचे सन्मान-समारंभ झाले. पुण्यास कायदेभंगासाठीं पाहिली तुकडी जावयाची होती. तिला निरोप द्यावयाचा होता. नगरवाचनमंदिरांत कै. शिवरामपंत परांजपे यांचें तैलचित्राचा अनावरण समारंभ ठरला होता. हे जोड समारंभ काकांच्या उपस्थितीचा फायदा घेऊन त्यांच्याच अध्यक्षतेखालीं करण्यांत आले. यावेळीं चित्रमयजगत्‌चे संपादक व एक प्रमुख कॉंग्रेस कार्यकर्ते श्री. देवगिरीकर यांनीं जो

काकासाहेबांचा गौरवपर उल्लेख केला तो अत्यंत मार्मिक होता. ते म्हणाले:—

"शिवरामपंत परांजपे व कृष्णाजीपंत खाडिलकर लोकमान्यांच्याच परंपरेंतील असून, दोघांच्याही एका हातांत राजकारणाची तलवार व दुसऱ्या हातांत सरस्वतीचा वीणा आहे. दोघेही महात्माजींचे अनुयायी असा संबंध असल्यामुळें कै. परांजपे यांच्या तैलचित्राचें अनावरण करण्यास दे. भ. काकासाहेब खाडिलकर यांच्या इतका लायक दुसरा कोण? एक 'माजी काळ'चे संपादक तर दुसरे 'नवाकाळचे' संपादक! असा हा आज संबंध असून, कै. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या पुण्यतिथीचा दिवसही आजच आहे. कायदेभंगाला आजच आपली पहिली तुकडी रवाना होत आहे. असा आजचा अपूर्व योग आहे."

हा योग अपूर्वच खरा! एक तर काकासाहेब नगर वाचन मंदिराचे एका वेळच्या कार्यकारी मंडळांत होते. तसेंच काकासाहेबासारखे आपल्या राजकीय व सांसारिक तपश्चर्येची तुरुंगवासानें सांगता केलेले तपोवृद्ध पुढारी महाराष्ट्राच्या कायदेभंग करण्यास प्रवृत्त झालेल्या सत्याग्रहींच्या पहिल्या तुकडीस निरोप देण्यास लाभले त्यावेळीं काकांनीं प्रसंगोचित विचार मांडून म. गांधींच्या या नव्या सत्याग्रहमार्गाचें उत्कृष्ट विवेचन करून त्या तरुण सत्याग्रह्यांना 'यशस्वी व्हा' असा शुभाशीर्वाद दिला.

जें यश या नव्या सत्याग्रह्यांना मिळावयाचें ते यश आपल्या तुरुंगवासाच्या तपश्चर्येनें काकांनीं संपादिलें होतें. याच यशानें त्यांना अपूर्व यशोलाभ करून दिला व मनःशांतीची प्राप्ति झाली. याच यशानें त्यांचा नवाकाळ आता आर्थिक सुस्थितींत आला व त्या पत्राच्या स्थैर्याबद्दलचे त्यांचे तुरुंगपूर्व विचार मूर्त स्वरूपाला येऊन नवाकाळसाठीं स्वतःच्या मालकीची इमारत त्यांनीं विकत घेतली व लोकसेवेसाठीं अंगीकारलेल्या वृत्तपत्रव्यवसायाचा पाया दृढ झाला. 'न मे भक्तः प्रणश्यति' अशी निष्ठा

मनाशीं बाळगून स्वतःचें स्वतंत्र आसन १९२३ सालीं नवाकाळच्या रूपानें निर्माण केलें तें १९२९ चे अखेरीस खडतर तपश्चर्येनें अढळ केलें. ध्रुव कथेंत मातापित्यांच्या मांडीवरून ढळलेल्या ध्रुवानें दृढ भक्तीनें घोर तपाचरण केलें, संकटांशीं निग्रहानें झुंज दिली व अढळपद प्राप्त करून घेतलें. तसेंच काकासाहेबांच्या या तपश्चर्येच्या फळाबद्दल म्हणतां येईल.



: १४ :

## आदर्श संपादक



गुळगुळीत कागदावर रंगीबेरंगी बुळबुळीत मजकूर छापून लोकांचें रंजन करणें हें कांहीं वर्तमानपत्रकर्त्यांचें मुख्य कर्तव्य नव्हे.

लोकमताची जागृति करणें अथवा तें उत्पन्न करणें अशीं जीं वर्तमानपत्राचीं दोन मुख्य कामें आहेत तीं चांगल्या रीतीनें बजावण्यास निःस्पृह व कडक लेख लिहिणें अत्यंत जरूरीचें आहे.

—लोकमान्य टिळक.

काकासाहेब कारावासानंतर १९२९ साल अखेर सुटून आले तरी श्रीकृष्णानें ज्याप्रमाणें कृतकार्य झाल्यावर कधींच शस्त्रग्रहण केलें नाहीं, त्याप्रमाणें त्यांनीं जी एकदां संपादकीय लेखणी खालीं ठेविली ती पुन्हां स्वतः उचलली नाहीं. त्यांची संपादकीय कारकीर्द अत्यंत दीर्घ असून फारच उलाढालीच्या अशा काळांत झाली असल्यानें तिचें विस्तृत विवेचन

स्वतंत्रपणें या प्रकरणीं करणें अवश्य आहे. त्यांच्या संपादकीय सेवेचा काळ जवळजवळ तीन तपाइतका प्रदीर्घ असून परतंत्र राष्ट्राच्या स्वातंत्र्य-संपादनार्थ झालेल्या अनेक कठिणतर झगड्यांची पार्श्वभूमि यामागें आहे.

वृत्तपत्रीय प्रथेचा प्रारंभ या देशांत इंग्रजी अमलानंतर झालेला आहे. वृत्तपत्राची कल्पना परदेशांतून या देशीं आलेली आहे. येथें इंग्रजी राज्य सुरू झाल्यापासून १८९६ ला काकासाहेब वृत्तपत्रव्यवसाय स्वीकारीपर्यंत एकतंत्री परकीय राज्याच्या झगझगाटांत भारतीय जनतेचे डोळे दिपून त्यांच्या मनावर लोकशाही राज्यपद्धतीचे संस्कार अद्याप उत्पन्न व्हावयाचे होते. लोकांत शिक्षणाचा व ज्ञानाचा फैलावही फारच तोकडा होता. वृत्त-पत्राच्या भरभराटीस छापखान्याची वाढ कारणीभूत होते. पण ती कला भारतांत अगदींच नवखी होती. तिचा नुकताच जन्म झालेला होता. ती बाल्यावस्थेंत होती. अशा विशिष्ट परिस्थितींत काकासाहेबांनीं या व्यव-सायांत पाऊल घातलें व जेव्हां त्यांनीं संपादकीय लेखणी खालीं ठेविली तेव्हां तें स्वातंत्र्य व स्वराज्य स्थापन करण्यांत महत्त्वाची कामगिरी कर-णारे आदर्श संपादक म्हणून ख्यातनाम झाले होते.

## वृत्तपत्रांचा पूर्वेतिहास

स्वातंत्र्य संपादनापूर्वी अर्ध शतक काकासाहेब या व्यवसायांत पडलेले होते. यापूर्वीच्या अर्धशतकांत वृत्तपत्राच्या आवश्यकतेची जाणीव भार-ताच्या पुढाऱ्यांना होऊन इतर प्रांताप्रमाणें महाराष्ट्रांतही वृत्तपत्राचा प्रारंभ लोकनेत्यांनीं व परिस्थिति जाणत्यांनीं केला. त्या काळीं प्रारंभ झालेल्या वृत्तपत्रांपैकीं ज्ञानप्रकाश पत्रानें आपला शताब्दि महोत्सव नुकताच केला आहे. वर्तमानपत्राचें प्रमुख कार्य विविध आहे. जनतेंत राजकीय, सामा-जिक, सांस्कृतिक, धार्मिक व आर्थिक परिस्थितीचें ज्ञान व देशांत चालू असलेल्या घडामोडींची जाणीव यांचा प्रसार करून लोकमत तयार करणें,

व लोकपक्षांची बाजू कुशलतेनें राज्यकर्त्यांपुढें मांडणें व लोकजागृति करणें, वगैरे अनेक स्वरूपाचें हें कार्य असतें. या कार्याची सर्वांगीण वाढ होण्याला जनतेंत शिक्षणाचा फैलाव होणें अवश्य असतें. ही जाणीव व त्यासाठीं उपाययोजनेचे विचार त्या काळच्या विद्वान् देशप्रेमी पुढाऱ्यांत चालू झाले, व थोडीं थोडीं वृत्तपत्रें निघूं लागलीं.

१८८१ सालीं केसरीचा आरंभ करितांना त्यांच्या हेतूची कारणमीमांसा चिपळूणकर व टिळक यांनीं एका पत्रकांत अशाच खुलाशानें केली आहे. त्या वेळीं चालू असलेल्या इतर देशी वर्तमानपत्राप्रमाणें बातम्या व राजकीय प्रकरणें या नवीन पत्रांत येतीलच, पण त्याशिवाय या पत्राचें वैशिष्ट्य म्हणून लोकस्थितीवर निबंध, व ग्रंथाच्या टीकात्मक परामर्श वगैरे विषयही त्यांत प्रसंगानें येतील असें त्या पत्रकांत म्हटलें आहे. ' बादशाही अमलांत तोंडपुजेपणा वाढत चालला आहे. तो देशहितास विघातक आहे. तसें या पत्रांत होणार नाहीं, तर केसरी या नांवाप्रमाणें निर्भीडपणाचें व निःपक्षपात बुद्धीचें विवेचन या पत्रांत येईल, ' असें आपल्या पत्राचें धोरण त्या पत्रकांत त्यांनीं स्पष्ट केलेलें आहे. या पत्रकावरून त्या काळच्या वर्तमानपत्रांची व लोकस्थितीची यथार्थ कल्पना वाचकांस येईल. ज्या हेतूनें व उद्देशानें हें नवीन पत्र सुरू करण्यांत आलें त्या उद्देशाच्या सिद्धीसाठीं स्वार्थत्याग व देशसेवेचा पुरस्कार केसरींत त्या वेळच्या तरुण लेखकांनीं केला.

ज्ञानप्रकाश हें महाराष्ट्रांतील जुनें पत्र त्यावेळीं शिळाप्रेसवर छापलें जाणारें साप्ताहिक होतें. त्याचा दैनिक या नात्याचा संसार गेल्या ४० वर्षांचा आहे. शिळाप्रेसवरून टाइपाच्या स्वरूपांत छापखान्याच्या धंद्यांत सुधारणा झाली तरी शिक्षणप्रसार कमी असल्यानें वाचकवर्गाची वाढ अगदींच बेताबेतानें होत होती. काकासाहेबांच्या जन्माच्या वेळीं निघालेल्या निबंधमालेनें वाचकवर्गांत स्वाभिमानाची ज्योत पेटविली व राजकीय दृष्टि

उत्पन्न केली. या निबंधमालेनें सुरू केलेलें कार्यच पुढें केसरीनें उचललें व जोरानें चालवलें. बर्वे प्रकरणीं केसरीवर खटला होऊन कै. आगरकर व लोकमान्य तुरुंगांत गेले व त्यामुळें वर्तमानपत्राबद्दल कुतूहल व आत्मीय भाव जनतेंत वाढला. कै.हरि नारायण आपटे यांच्या करमणूक पत्रानें महाराष्ट्रांत वाचनाभिरुचि वाढविली.

काकासाहेबांच्या तरुणपणीं केसरी, ज्ञानप्रकाश, सुधारक व करमणूक हीं साप्ताहिक वृत्तपत्रें व मुंबईचें ‘ विविधज्ञानविस्तार ’ हें मासिक विशेष प्रचारांत होतीं. साप्ताहिक पत्राचे अग्रलेख निबंध पद्धतीचे असत. विविध-ज्ञानविस्तारांत अनेक विषयांवर अनेक विद्वान् लेखकांचे लेख दर महिन्यास येत. त्यांत पुढें नाटकेंही प्रसिद्ध केलीं जाऊं लागलीं. संपादकाशिवाय इतर विद्वानांचे लेख येत ते बहुशः निबंधात्मकच असत. काकासाहेबांच्या वृत्तपत्रलेखनासही एका निबंधानेंच सुरुवात झाली. बातम्यांना महत्त्व देऊन व त्यांना अनुसरून अग्रलेख वा स्फुटें लिहिणें ही प्रथा काकासाहेबांच्या केसरीप्रवेशानंतर विशेष वाढली. १८९८ सालीं दे. भ. शिवरामपंत परांजपे यांचें ‘ काळ ’ पत्र सुरू झालें. त्यांत ही ‘ व्याजोक्ति ’ हें लेखनाचें त्यांचें प्रबळ लेखनशस्त्र असलें तरी लेखनाला निबंधाचें स्वरूपच असे. काकासाहेबांचा कटाक्ष बातम्यांवर अधिक असे. त्यांनीं वर्तमानसार व तदनुषंगिक स्फुटें देण्याचा उपक्रम सुरू केला. या बाबतींत एक गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे. ती म्हणजे ती. काकासाहेबांची या व्यवसायास जरूर असणारी ज्ञान व अभ्यास याची पूर्व तयारी झालेली होती ही होय. याची साक्ष त्यांचा पहिलाच लेख अग्रलेख म्हणून छापला गेला यावरून दिसून येईल.

### केसरींतील कामगिरी

काकासाहेब ज्ञानसंपन्न होते तसेच कलासंपन्नही होते. ज्ञान-कलेचा हा अपूर्व मिलाफ त्यांच्या ठायीं झालेला होता. वृत्तांचा संग्रह करून या उपदेशपर निबंध लिहून वर्तमानपत्रांची लोकजागृतीची खरी व महत्त्वाची

कामगिरी पुरी होत नाहीं; कलात्मक रितीनें या सर्व लेखनसंभाराची मांडणी करून त्याच्या आकर्षणानें उद्दिष्ट साध्य झालें पाहिजे अशी त्यांची वृत्तपत्रसंपादनाची दृष्टि होती. यामुळेंच केसरीच्या संपादकवर्गांत दाखल झाल्यापासून आपल्या कलात्मकतेची छाप त्यांनीं केसरीवर पाडली. केसरींत लेख काका अत्यंत चिंतनपूर्वक लिहीत असत. त्यांच्या लेखांत ओजोगुण विशेष असे. अनेक वेळीं ते उपहासपद्धतीचा अंगीकार करीत. लेखाची मांडणी युक्तिवादपूर्ण, परिणामकारी व तत्त्वसिद्धांताचा खुलासा करणारी असे. त्यांच्या लेखांतील आवेश व जोष सामान्यवाचकांना मारून टाकीत असे, हें पुढील उताऱ्यावरून दिसून येईल. ‘ कायदा म्हणजे कृत्रिम न्याय. आणि न्याय हा स्वाभाविक कायदा होय. न्याय परमेश्वराच्या घरचा, आणि कायदा मनुष्याच्या पदरचा; न्याय जगाच्या कल्याणासाठीं, आणि कायदा विवक्षित समूहाच्या फायद्यासाठीं; न्याय सर्वांत राहतो आणि कायद्याची फक्त मृत्युलोकची वस्ती. न्यायाला पातक ठाऊक नाहीं; आणि कायदा पुण्य करण्याचा आव घालीत असतो. न्यायाच्या डोळ्याला सत्य तेवढें मात्र दिसतें; परन्तु कायद्याला वर्ण, धर्म, जात इत्यादीही दिसतात. ह्या जगांत न्यायाचा सगासोयरा, इष्टमित्र, नातेवाईक कोणी नाहीं, परंतु कायद्याला आहेत. तेव्हां अशा स्थितींत सामान्य लोकांना कायद्याचें विशेष महत्त्व न वाटलें तर त्यांत मोठें नवल नाहीं. सर्व लोक अंधारांतून चालले आहेत असें पाहून देवानें आणि राजानें मिळून एक कंदील तयार केला. राजानें चार भिंगें एका ठिकाणीं जुळवून बाहेरचा भाग तयार केला आणि त्यांत देवानें निर्माण केलेला प्रकाश ठेवून दिला; हीं भिंगें म्हणजे कायदा, आणि प्रकाश म्हणजे न्याय ! ’

नोकरशाहीच्या अपकृत्याविरुद्ध त्यांनीं लिहिलेल्या जळजळीत लेखांनीं लोकजागृतीचें कार्य सतत घडलें आहे. व लोकमान्यांचें राजकारण महाराष्ट्रांतील खेडोंखेडीं वाचकवर्गापर्यंत जाऊन भिडून केसरीचा लौकिक व

लोकप्रियता वाढली आहे. केसरींत लिहिण्यास प्रारंभ केल्यापासून १९१० पर्यंत त्यांच्या केसरींतील लेखनकौशल्याचा सूक्ष्म अभ्यास केला तर त्यांचा राजकारणाचा तत्त्वग्राही अभ्यास, परिस्थितीचें सूक्ष्म अवलोकन व ज्ञान, प्रभावी भाषाशैली, वगैरे अनेक संपादकीय गुण त्यांच्या या काळच्या लेखनावरून स्पष्ट होतील. विशेषतः परराष्ट्रीय राजकारणाचा त्यांचा तौलनिक अभ्यास वैशिष्ट्यपूर्ण होता. इतका खोल व संकलित अभ्यास दुसऱ्या कोणत्याही लेखकाचा त्या काळीं नव्हता.

परराष्ट्रांतील राजकीय घडामोडींचें संकलन करीत असतां या घटना-पासून भारतीय राजकारणधुरंधरांनीं काय शिकावें हें सांगण्याकडे त्यांचा कटाक्ष असे. बोअर युद्धाचा आढावा घेतांना त्यांची हीच दृष्टि होती व इतर महायुद्धाचें नित्य मासिक समालोचन करितांनाही पण हाच अनुभव त्यांनीं दाखविला आहे. रशियांत झारशाहीविरुद्ध चाललेली जनतेची चळवळ, छोट्या जपाननें बड्या रशियावर मिळविलेला दणदणीत विजय किंवा रशियाचें आक्रमण हिंदुस्थानावर होईल ही इंग्लंडची धास्ती या-सारख्या अनेक परराष्ट्रीय विषयावर त्यांनीं अभ्यासपूर्ण लिहिलेले लेख केसरीच्या वाढलेल्या महत्त्वास कारण झालेले आहेत. बाल्कन युद्धास सुरुवात झाल्यावर व पहिल्या महायुद्धावर काकासाहेबांनीं लिहिलेले लेख कौशल्यपूर्ण, स्वतंत्र घडणीचे व आदर्शवत् आहेत.

त्यांच्या वृत्तींत तत्त्वनिष्ठा कायमची ठिवली असल्यामुळें तत्त्वाचा प्रचार करण्याकरितां कोणत्याही विषयांवर जेव्हां ते लिहीत तेव्हां तें सर्वच लिखाण तेजस्वी, भरदार व प्रभावी होत असे.

खालील उतारा हें त्याचें उत्तम उदाहरण आहे—

‘ मालक कसें व्हावें हें त्यांना माहीत असतें, व गुलामाप्रमाणें कसें रावावें हेंहि त्यांच्या अंगवळणीं पडलेलें असतें. एक मालकीची स्थिति किंवा एक गुलामाची स्थिति, त्याहून तिसऱ्या अवस्थेची ह्यांना आयुष्यांत

केव्हांहि ओळख पटत नाहीं. स्वतंत्र मनुष्याचा चेहरा त्यांनीं पाहिलेला नसतो; बरोबरीचें नातें ह्यांच्या रक्तांत नसतें; व सारख्या दर्जाच्या लोकांची जूट बरोबरीच्या बळकट दोरानें तयार करणें त्यांना अशक्य वाटतें. हा मनाचा दोष नव्हे; ही बुद्धीची कमतरता नव्हे; हा व्यवसायाचा दुर्गुण आहे! खात असलेल्या अन्नाचें हें पाप आहे. जसलें अन्न तसलें मन, जसला व्यवसाय तसली बुद्धि! करडा मालक ( Despot ) व गुलाम, हीं एकच मनोवृत्तीचीं दोन स्वरूपें आहेत. उत्तम गुलाम करडा मालक होऊं शकतो, व मालक प्रसंग येतो तेव्हांच दीन गुलाम होतो. तेंच शरीर, तेंच मन, तीच बुद्धि, प्रसंगानुसार मालक व गुलाम ह्या नात्यानें प्रकट होत असते. नोकरीचीं कित्येक वर्षे गुलामाप्रमाणें वरिष्ठांची हांजी हांजी करण्यांत ज्यांचीं गेलीं तेच अधिकारारूढ होण्याबरोबर हाताखालच्या नोकरांवर एकदम गुरगुरूं लागतात. हें स्थित्यंतर एकदम कसें होतें? खालच्यांना लाथा मारणें व वरच्यांचे पाय धरणें हें रूपांतर हां हां म्हणतां कसें होतें? खरोखर विचार केला असतांना, ह्या अवस्था मुळींच होत नाहींत. एकच मनोवृत्ति, पण परिस्थिति बदलली कीं, ती इतरांना निराळी दिसूं लागते. मोगल बादशहाजवळचे गुलाम जोरदार पातशाही स्थापणारे एकेकाळीं झाले व कृष्णाकांठचा घोडा अटकेपलीकडे तोऱ्यानें नाचवणाऱ्या लोकांचे वंशज आज उत्तम कारकून बनले आहेत.'

आपणांस पटलेले सिद्धांत व तत्त्वें ठासून कशी प्रतिपादन करावी ही कला काकांच्या लेखांत पूर्णपणें भरलेली दिसून येते. यांत काकासाहेब अत्यंत कुशल होते. एकादी गोष्ट जनतेच्या मनावर जोरानें परिणाम करणारी व्हावी असें असेल तेव्हां त्यांची लेखणी तीरासारखी मर्मभेदी व तलवारीच्या धारेसारखी प्रखर चालत असे. त्यांच्या या तिखट, तीक्ष्ण व प्रतिपक्षास तिरिमिरी आणणाऱ्या लिखाणाचा नमुना 'बॉम्ब गोळ्याचा खरा अर्थ' ह्या १९०८ सालच्या लो. टिळकांवर झालेल्या खटल्याच्या

लेखांत सांपडतो. ध्वनीचा प्रतिध्वनि कसा निघतो असें सांगतांना ते या लेखांत लिहितात " जसें पेरावें तसें उगवतें. अधिकारी माथेफिरू झाले; बंगाली तरुणाहि माथेफिरू झाले. लपून छपून, खाजगी किंवा धार्मिक भांडणाचा फायदा घेऊन पर्यायानें बंगाल्यांना झोडपून काढण्याच्या, व भीतीनें गांगरून सोडून दरारा बसाविण्याचा, खाजगी द्वेषाच्या स्वरूपाचा आततायीपणाचा मार्ग कांहीं अधिकाऱ्यांनीं कॉमिल्लाचें वगैरे दंग्याचे वेळीं आक्रमिला; बंगाली तरुणांनींहि तोच आततायींचा मार्ग धरला. दोघांचीहि कृति एकच स्वरूपाची व दोघेहि सारखेच अपराधी. शांत व विचारी तत्त्ववेत्ते दोघांनाहि एकाच तराजूनें जोखणार आणि दोघांचीहि एकच किंमत ठरविणार. आग्यावेताळाचे संचाराचे वेळीं मागेंपुढें बॉम्ब-गोळे उडावयाचेच हा सृष्टीचा क्रम ठरलेला आहे. अशा वेळीं सृष्टीचें नियमन करणाऱ्या देवता बॉम्ब गोळे बंद कर म्हणून ब्रह्मदेवाची आराधना करीत नाहींत, तर आग्यावेताळाचा संचार बंद पाडून वेताळाला ठरवून दिलेल्या व नियमित केलेल्या देवळाचे चतुःसीमेंत बशीव म्हणून ब्रह्म-देवाची आराधना करीत असतात. लहरीमुळें जागा सोडून भटकणाऱ्या वेताळाच्या भयानक बुभुःकाराचा प्रतिध्वनि बॉम्ब गोळा होय. कर्कश व भेसूर ओरडण्याचा प्रतिध्वनि कर्णमधुर निघावा अशी पृथ्वीची रचना जगत्स्रष्टयानें केलेली नाहीं. जसा पहिला ध्वनि, तसाच प्रतिध्वनि; प्रति-ध्वनीच्या लाटा सूक्ष्म व गुप्त होत जातात एवढाच फरक. मधुर ध्वनीच्या प्रतिध्वनीला आलाप म्हणतात, व हे आलाप जसजसे सूक्ष्म व अव्यक्त होत जातात तसतसें श्रोत्यांचें मन अधिक प्रसन्न होतें; व भेसूर व भया-नक राजनीतीमुळें सूक्ष्म व गुप्त मंडळयांचें जाळें सभोंवारच्या गिरिकंदरांत पसरलें आहे, असा प्रतिध्वनि जेव्हां उमटूं लागतो, तेव्हां अधिकारी वर्गाचा कर्कश गर्दभी सूर केव्हां बंद पडेल असें सर्वांना होऊन जातें.

त्याच्या लेखणीनें बोअर युद्धाचें रणांगण महाराष्ट्रीय मनाच्या पुढें उभें

केलें. फ्रान्सच्या रणभूमीवर त्यांना नेऊन जर्मन हा विटझरच्या—शत्रूच्या तोफखान्याच्या माऱ्यांची फेर त्यांना दाखविली. बंगालच्या फाळणीनें उद्दीपित झालेल्या प्रक्षोभाला राष्ट्रीय आंदोलनाचें विराट स्वरूप दिलें व राष्ट्रसभेची स्वातंत्र्य संपादनाची चळवळ प्रखरपणें जनमनांत रोमरोमीं भिनवली अशी प्रभावी लेखणी काकासाहेबांच्या हातीं होती म्हणूनच त्यांचें लेखन अक्षरश्रेणींत श्रेष्ठत्व पावलें.

## दैनिकाचा नवा प्रपंच

१८९६ पासून १९२० पर्यंत दोन तपें केसरींत जी संपादकीय कामगिरी काकासाहेबांनीं केली त्याचीच परिणति त्यांनीं लोकमान्याची संपादनकार्याची धुरा घेतली किंवा स्वतःचें नवाकाळ पत्र काढलें. त्यावेळीं विशेषत्वानें झाली. लोकमान्य पत्राचें संपादन सुमारे १॥ वर्षें त्यांनीं केलें. पण त्या अल्पावधींत ही त्यांनीं आपलें संपादकीय व्यक्तिमत्त्व पूर्णपणें प्रस्थापित केलें. नवाकाळ चालवितांना हेंच आपलें संपादकीय शक्तिसर्वस्व त्यास प्रभावी दैनिक बनविण्याचें कामीं खर्च केलें. शंभर वर्षांपूर्वीं ज्ञानप्रकाश निघाला तो काळ, केसरी, काळ वगैरे पत्रें निघाली तो यापूर्वींचा पन्नास वर्षांचा काळ, त्यानंतर कांहीं वर्षांत निघालेला राष्ट्रमत, थोडा पुढचा अच्युतराव कोल्हटकरांच्या संदेश वर्तमानपत्राचा काळ, अशा विविध काळांतील वृत्तपत्रांच्या स्वरूपांत व वाचकवर्गांत बरेंच अंतर असतें. आजच्या काळांत तर तें अंतर जमीन अस्मानाइतकें आहे.

गेल्या ३०–४० वर्षांत मराठी वृत्तपत्रांत जीं स्थित्यंतरें व सुधारणा झाल्या त्यांत काकांच्या संपादनकौशल्यांत महत्त्वाचा वांटा आहे. लोकमान्य सुरू करतांना काकासाहेबांनीं पहिला महत्त्वाचा फरक केला तो म्हणजे देशी व परदेशी बातम्या, रायटर व असोसिएटेड प्रेस या बातम्या पुरवणाऱ्या जगव्यापी संस्थांकडून घेऊं लागले. देशी व परदेशी बातम्या यांची निवड करून त्यापैकीं कोणत्या बातम्यांना प्रामुख्य द्यावयाचें व तें

कसें द्यावयाचें याबद्दल ते योग्य ती दक्षता घेण्यास आपल्या सहकारी संपादकवर्गाला सांगत. त्यावेळीं हिंदुस्थानांत असहकारितेचा व परदेशांत आयर्लंडच्या स्वातंत्र्याचा लढा हा विषय सुरू झाला होता. या सर्व चळवळीच्या अद्यावत बातम्या व त्यांना धरून अग्रलेख व स्फुटें या केसरींत चालू असलेल्या प्रथेचा अंगीकार या पत्रांचे वेळींही केला होता. केसरींत चालू केलेलें संपादनाचें सूत्र लोकमान्यांच्या संपादनांतही होतें.

१९२३ सालीं रंगपंचमीस काकांचा ' नवाकाळ ' सुरू झाला, तेव्हां त्यांनीं मनांत कल्पिलेल्या वृत्तपत्रांतील सुधारणा तें पत्र स्वतःच्या मालकीचेंच असल्यानें विनायासें करितां आल्या व त्या त्यांनीं धडाडीनें करून दाखविल्या. इंग्रजी दैनिकांत विशेषतः लंडन टाइम्समध्यें जशी विशिष्ट ठिकाणीं विशिष्ट मजकूर छापण्याची पद्धति असते, तशाच तऱ्हेची पद्धति काकांनीं आपल्या नवाकाळ पत्रांत अमलांत आणली. वृत्तपत्रांत ज्ञान संपादनाच्या अनेक शाखांना वाव असणें लोकहिताचें असल्यानें तसा वाव अनेक विषयांना नवाकाळमध्यें काकांनीं दिला व ही प्रथा पुढेंही चालू झाली. इंग्रजी दैनिकांत चित्रें देण्यास सुरवात झालेली पाहून व त्याची उपयुक्तता लक्षांत घेऊन तशीं चित्रें देण्याचा खर्चाचा बोजा सहन करूनही ती देण्यासाठीं जरूर तीं यंत्रें खरेदी केलीं; सोयी केल्या व नवाकाळमध्यें चित्रें, व्यंगचित्रें व नकाशे घालण्यास सुरवात केली, यामुळें बातमीची आकर्षकता व वास्तवता वाढली, ' ग्रंथ–ग्रंथकार ' ' शेती व शेतकरी, ' ' व्यायाम आणि खेळ, ' व्यापारी आणि औद्योगिक,' ' मुंबईचे बाजारभाव ' इत्यादि विविध सदरें व आठवड्यांत एकादी लघुकथा देण्याची योजना काकांनीं आपल्या या नव्या वृत्तपत्रांत चालू केली व ती यशस्वी करून दाखविली.

कॉंग्रेसच्या चळवळीखेरीज इतर चळवळींना जास्त महत्त्वाची जागा देण्याचें त्यांचें धोरण नसे. केसरींत, नवाकाळांत वा लोकमान्यांत कॉंग्रेसच्या चळवळीचाच म्हणजे लोकमान्य टिळकांच्या व म. गांधींच्या चळवळीला

त्यांनीं तन्मयतेनें पुरस्कार केला. बहुजनसमाजामध्यें राजकीय जागृति झाली पाहिजे. त्या समाजानें राष्ट्राभिमानानें संघटित व प्रतिकारक्षम बनलें पाहिजे, परकीय राज्यकर्त्यांच्या बलाबलाकडे सावध चित्तानें लक्ष दिलें पाहिजे. हें जनतेस पटावें अशी काकासाहेबांची संपादकीय मांडणी असे. कॉंग्रेसच्या चळवळी, परदेशच्या राजकारणी घडामोडी यांचा पुरस्कार केवळ राष्ट्रीय दृष्टीनेंच ते करीत. समाजधर्म, अर्थकारण व राजकारण या बाबतींत रामायणमहाभारतांत वा गीताभागवतांत जी आर्य शिकवण आली आहे त्याच्याच अनुरोधानें त्यांनीं कॉंग्रेसच्या चळवळीचा देशभर फैलाव केला. आणि परराष्ट्रीय राजकारणाचें मूल्यमापन केलें. राजकीय चळवळीचें सर्व यश ज्या मूलभूत तत्त्वावर अधिष्ठित असतें त्या तत्त्वाचा परिचय प्रसंग आला कीं वाचकांना न चुकतां करून देण्याचा काकांचा कटाक्ष असे. ती मूलभूत गोष्ट स्पष्टपणें मांडून त्या सिद्धांताचा विस्तार पायरीपायरीनें, युक्तिवादानें व शास्त्रशुद्ध रीतीनें कोणालाही पटेल अशा पद्धतीनें ते करीत.

त्यांच्या लेखनांतील आणखी एक असामान्य गुण म्हणजे त्यांची तीव्र विवेचकता. विषय कोणताही असो, त्या विषयाच्या अंतरंगाशीं निगडित असलेले प्रश्नोपप्रश्न स्पष्ट करून त्यांचें विवेचन ते असें करीत कीं त्या विषयाच्या अंतर्गत भागाचें स्वरूप वाचकांच्या डोळ्यांसमोर ठसठशीतपणें उभें रहावें, त्यांच्या लिहिण्यांत उपमा, दृष्टांतादि अलंकार असतात. ते अलंकारानें भाषा सजवितात. पण त्यांचा अतिरिक्त उपयोग ते कधींच करीत नाहींत. एकेक मुद्दा चढ्या श्रेणीनें दोन दोन तीन तीन वाक्यांत आवेशानें ते असा मांडीत कीं त्याचा वाचकाचे मनावर हमखास परिणाम झालाच पाहिजे.

## नवाकाळांतील नवे पैलू

काकासाहेबांच्या लेखनशैलीचा एक नवा पैलू नवाकाळमध्यें विशेष तऱ्हेनें दिसतो. लक्षणेनें लिहिणाऱ्यांत शिवराम महादेव परांजपे व काका-

साहेब यांचा हातखंडा होता. हें लक्षणेनें लिहिलेलें लिखाण प्रश्नचिन्हांकित केलें तर त्यांत एक प्रकारची खुमारी येईल असें वाटल्यावरून प्रश्न-चिन्हांचा त्यांनीं कौशल्यपूर्ण उपयोग केला आणि नवाकाळच्या अग्रलेखाचा शेवट प्रश्नचिन्हांकित असावयाचा येथपर्यंत हें तंत्र त्यांनीं नेलें. विरोधी पक्षाचे आक्षेप प्रश्नरूपानें घेऊन त्यांना उत्तरें देण्यांत त्यांनीं आपल्या विवेचन पद्धतीला नवें वळण दिलें. स्क्रू पिळल्याप्रमाणें तें विवेचन पक्कें लोकांच्या मनाचा ठाव घेत असे. त्यांनीं मांडलेल्या सिद्धांतांच्या मालिकें-तील दुव्यासारखे हे प्रश्न शोभून दिसत आणि प्रतिपक्षास या मालिकेनें नामोहरम करीत. प्रतिपक्षावर बिनतोड प्रश्नाचा भडिमार करून त्याचें तोंड बंद करण्याची कलाहि त्यांनीं या प्रश्नचिन्हांनीं साधली.

"वेड्याचा चरखा" ह्या बेळगांव कॉंग्रेसवरील अग्रलेखांत त्यांनीं असेच प्रश्न विचारले आहेत. त्यांनीं सवाल केले आहेत, "महात्माजी एकटा वेडा असेल, पण बेळगांवला जमलेले दीड लाख लोक वेडे कसें झाले? महात्माजींच्या चरख्याला पूज्य मानण्याइतकें तरी वेड इतक्या संसारी व व्यवहारी लोकांना कसें लागलें? गतानुगतिक लोक आहेत असें म्हणावें, तर महात्माजींच्या मतांशीं गेलीं दोन वर्षे झगडा करीत असलेले स्वराज्य पक्षाचे प्रतिनिधि बेळगांवच्या कॉंग्रेसमध्यें भरपूर हजर होते. ह्याहि पक्षाच्या डोळ्याला चरख्याची भुरळ कशी पडली? आमचा तित-कासा भरंवसा खादीवर नाहीं. पण महात्माजींच्या म्हणण्याप्रमाणें वागण्यास आपण तयार आहोंत, अशी कबुली सब्जेक्टस् कमिटीमध्यें आणि भर कॉंग्रेसमध्यें स्वराज्य पक्षाच्या कित्येक पुढाऱ्यांनीं एकामागून एकसारखे उठून कशी दिली?" हा प्रश्नाचा भडिमार प्रतिपक्षास चीतच करीत असे.

प्रश्नांचा बिनतोड मारा ते जसा करीत असत तशीच प्रश्नमाला वाप-रून ते वाचकांना उद्दीतहि करीत असत. मुंबईच्या गव्हर्नरांना १९२३

ाळीं कॉर्पोरेशनमध्यें द्यावयाच्या मानपत्राबद्दल लिहितांना 'सन्मान ोणाचा करावयाचा?' या अग्रलेखांत यांनीं अशीच उद्दीपक प्रश्नमाला ापरली आहे. ते विचारतात, "महात्मा गांधींना सहा वर्षे शिक्षा ज्या व्हर्नरांचे कारकीर्दीत झाली त्या गव्हर्नरांना सन्मान करा म्हणून लोकांना ोणच्या तोंडानें कोण सांगणार? सिडनहॅम व हर्लींचे गव्हर्नर या जोडीच्या ांवाचा उच्चार करणें पाप समजलें जाईल, अशी स्थिति असतां सन्मान रण्यास कोण पुढें येणार? मुसलमानांनीं कोणाचा सन्मान करावयाचा? ली बंधू व इतर मुसलमान पुढारी यांच्यावरील कराचीच्या खटल्याची कीकत लोक विसरले आहेत काय? महात्मा गांधी यांचा कार्यक्रम ोकांच्या हातून पूर्णपणें पार पडत नसेल, पण ज्यांना आपण श्रेष्ठ साधु ुरुष समजतों त्यालाच गव्हर्नर साहेबांनीं तुरुंगांत टाकलेलें आहे, याची ाठवणही बुजून जाण्याइतकें बुद्धिमांद्य लोकांत आहे, असें गव्हर्नरसाहेब मजतात काय? धारवाड प्रकरणाचें स्मरण कर्नाटकांत होण्याचे दिवस ंघून गेले, असें अधिकाऱ्यांना वाटतें आहे काय? मुळशीच्या सत्याग्रही ांपैकीं टे. देव यांच्या पाठीवर ओढलेल्या फटक्यांचे वण अदृश्य होण्या- ूर्वीच महाराष्ट्रांतील लोक गव्हर्नरसाहेबांना मानपत्र कोणत्या करंडकांतून ावयाचें याचा विचार करण्यांत निमग्न होतील, असें अधिकाऱ्यांना वाटतें ाय?" या त्यांच्या सवालांनीं कराचीपासून–धारवाडपर्यंतचे त्या वेळचे ोक मानपत्राविरुद्ध उद्दीपन होतील असें प्रश्न–कौशल्य काकासाहेबांनीं ा ठिकाणीं वापरलें आहे.

उपरोधी प्रश्न टाकण्यांत तर त्याचें प्रावीण्य होतें. 'वेड्याचा चरखा' ाच अग्रलेखांत त्यांनीं असा प्रश्न विचारला आहे, "जितका अधिक ेद्वान् तितका व्यवहारांत अधिक निरुपयोगी, जितका अधिक स्वार्थ- ्यागी, जितका व्यवहारांत अधिक कुचकामी, अशी या धूर्तांची विचार- ारणी आहे. कांहीं छक्के पंजे पाहिजेत, थोडी लबाडी पाहिजे, आपमत-

लब्रहि साधला पाहिजे, एरव्हीं राजकारणांत लोकसंग्रह कसा होणार ? ” या भेदक प्रश्नानें प्रतिपक्षी चीत झाला नाहीं तरच नवल !

उपरोधक प्रश्नाप्रमाणेंच सूचक प्रश्न टाकण्याची त्यांची हातोटी होती. मिठावरील करवाढ झाली तर जनता चळवळ करील असें शेठ जमनादास द्वारकादास यांनीं १९२३ मध्यें असेंब्लीमध्यें सांगितलें होतें. त्यानंतर सहा महिन्यांनीं मिठावरील कर वाढूनहि चळवळ झाली नाहीं म्हणून असेंब्लीमध्यें नोकरशाहीतर्फे “ कुठें आहे तुमची चळवळ ? ” असा सवाल केला होता. या सवालाला उत्तर देतांना आपल्या अग्रलेखांत काकासाहेबांनीं प्रश्न विचारला होता, “ प्रल्हादाला हिरण्यकश्यपूनें कुठें आहे तुझा देव असें विचारलें असतां त्याला देव कुठें तात्रडतोब दाखवितां आला ! ” या प्रश्नांतील सूचकता मोठी मार्मिक नाहीं काय ? अग्रलेखाच्या शेवटीं प्रश्नाला होकारार्थी उत्तर येईल असेच सवाल टाकून ते वाचकांकडून त्याचें उत्तर होकारार्थ मिळवीत. यांच्या प्रश्नचिन्हाच्या उपयोजनेचा गाभा ज्यांना कळला नाहीं अशा कांहींना प्रश्नचिन्हें आवडत नसलीं तरी रसिक वाचक या प्रश्नचिन्हांतील मर्म जाणूनच नवाकाळाचे अग्रलेख गोडीनें वाचीत.

काकासाहेबांचे अग्रलेखाचें विवेचन बांधेसूद असे. पहिल्या प्रवेशांत ते जशी नायिका वा नायक प्रभावीपणानें रंगभूमीवर आणत असत, त्याचप्रमाणें पाल्हाळ न लावतां पहिल्या वाक्यांतच ते विषय–प्रवेश उठावदारपणानें करीत असत. त्यानंतर विवेचन करून ते एकादा विश्वमान्य सिद्धान्त मांडत असत. हे असे सिद्धान्त म्हणजे त्याच्या लेखननैपुण्याचा कळस असे. असे विश्वमान्य सिद्धान्त त्यांच्या अग्रलेखांतून वेचून काढले तर तो एक शाश्वत सिद्धान्तांचा उत्कृष्ट संग्रह होईल. मुमताज बेगमच्या खटल्यावर अग्रलेख लिहितांनाहि त्यांनीं असाच सर्वमान्य सिद्धान्त मांडून सामान्य विषय एकदम उच्च पातळीला नेला आहे. मुमताजला इंदुरांत झालेली मुलगी नर्सकडून मारविण्यांत आली याचा उल्लेख करून त्यांनीं

लिहिलें आहे " आपल्या मुठींतील बटीक झाली काय किंवा पैशाच्या जोरावर गुलामाप्रमाणें राबलेली रखेली झाली काय, बायकांच्या अंतःकरणांतील मातृपदाच्या आकांक्षा राजसत्तेच्या व राज्यवैभवाच्या शृंखलांनीं बांधल्या जाऊं शकत नाहींत. अंतःकरणांतील नैसर्गिक प्रवृत्तीचा जोर श्रीमंतीच्या किंवा राजसत्तेच्या कृत्रिम भिंतींना जुमानीत नाहीं आणि एकदां अंतःकरण दुखावलें गेलें म्हणजे नंदनवनासारखे ऐषआरामहि विषासारखे कडू लागतात ! " त्यांनीं मांडलेल्या या सिद्धांतामुळें या अग्रलेखास जी उच्च पातळी आली तीच काकासाहेबांच्या उच्च विचारसरणीची व वरच्या पातळींत भरारी मारण्याची मोठी कौशल्यसीमा होती.

'दैनिकांतील' अग्रलेख लहान असल्यामुळें एकच उपमा सर्व अग्रलेखभर खेळवून ती त्या प्रसंगाला चापून चोपून अगदीं बेतलेल्या कपड्यासारखी बसविण्यांत काकासाहेब तरबेज होते. " असेंब्लीला धाब्यावर बसविली " या अग्रलेखांत ' धाब्यावर बसविणें ' ही उपमा त्यांनीं अगदीं शेवटपर्यंत खेळवून अशा धाब्यावरच स्वतःचें स्वराज्य-मंदिर बांधण्याचा स्वावलंबांचा आदेश शेवटीं वाचकांस दिला आहे. त्यांच्या ह्या शैलीमुळेंच काकासाहेबांचे अग्रलेख लोक मोठया आवडीनें वाचीत असत.

काकासाहेबांच्या तिखट लिखाणाची धार नवाकाळमध्येंहि कमी झाली नव्हती. १९२४ मध्यें दे. सुभाषचंद्र आदि ७२ जणांना अटक करून बंगालमध्यें वरवंटा सुरू झाला तेव्हां लिहितांना काकासाहेबांनीं नोकरशाही दंडपशाहीच्या काळसर्पाचे विषय चवाठ्यावर मांडले. 'वरवंटा फिरूं लागला'या लेखात ते लिहितात "स्वराज्याचें हक्क जर दिले नाहींत तर अत्याचारावरील लोकांची आजची प्रवृत्ति वाढेल, ह्या सिद्धांताला अनुसरून भविष्यकाळाची ही प्रवृत्ति हाणून पाडण्यासाठीं आजचा भयंकर जुलूम नोकरशाही करीत आहे. तूं नाहीं तुझ्या बापानें पाणी गढूळ केलें असेल असें म्हणून इसापनीतींतील लांडग्यानें कोकराला खाऊन टाकलें;

तशाप्रमाणें तूं नाहीं तुझा मुलगा पाणी गढूळ करील असें म्हणून बंगाल्यांतील शांतताप्रिय व निरुपद्रवी लोकरांना आज बळी देण्यांत येत आहे! स्वराज्याच्या हक्काकरितां झगडणाऱ्या राजकीय चळवळीला दडपून टाकण्याकरितां हा वरवंटा फिरत आहे. आज प्रत्यक्ष अत्याचार घडून आल्याची सबब कांहीं दाखवितां येण्यासारखी नाहीं. तुम्हांला स्वराज्याचे हक्क देत नाहीं ते नाहींच पण असल्या जुलमामुळें उत्पन्न होणाऱ्या नैसर्गिक असंतोषालाहि आगाऊच आम्ही दडपून टाकतों, असें ह्या वरवंट्याचें स्वरूप आहे. राजकीय चळवळ करणारा कोणताहि पक्ष असो, नेमस्तांचा पक्ष असो किंवा सरकारी बगलबच्च्यांचा असो, सर्वांनाच हा वरवंटा सारखा जाचक होणार आहे. विषानें भरलेल्या बाटल्या सर्वांच्या पुढें ठेवण्यांत आल्या असून जबरदस्तीनें कोणाला हें विष पाजण्यांत येईल ह्याचा बिलकूल नियम राहिलेला नाहीं. ह्या विषाच्या हंड्या घराबाहेर फेकून देणें प्रत्येकाचें पवित्र कर्तव्यकर्म आहे. आम्ही नोकरशाहीच्या विश्वासांतले, म्हणून कोणीहि ह्या वेळीं स्वस्थ बसतां कामा नये. कारण विष कोणत्या वेळीं कोणाच्या अन्नांत घालण्यांत येईल हें कोणासहि समजणार नाहीं. सख्ख्या भावानेंहि सख्ख्या भावाचा ह्या कामीं विश्वास धरूं नये. हें विष घरांत आहे तों कोणासहि झोंप येणें शक्य नाहीं. हें विष घरांतून बाहेर कसें काढावयाचें, हा सर्व हिंदुस्थानपुढें आज मुख्य प्रश्न होऊन बसला आहे. आपल्या विषारी दांतानें चावा घेत ७२ सद्गृहस्थांना विषानें घायाळ करून, जुलमी अत्याचारांचा काळसर्प बंगाल्यांत सहा महिने एकसारखा फिरावयाचा आहे. आपल्या विषारी दंशाचें काम बंगाल्यांत चालू असतांना, इतर ठिकाणीं हा ऑर्डिनन्स काळसर्प फिरणार नाहीं, असें कोणत्याहि राजकीय संस्थेनें किंवा प्रांतानें ह्यावेळीं मानतां कामा नये. "

## प्रचाराचे नेम

आपलें वृत्तपत्र हें जनतेच्या बाजूचें, जनतेच्या हिताचे व

स्वराज्यासाठीं आहे हा विवेक त्यांनीं दक्षतेनें आपल्या संपादकीय जीवनांत सतत दृष्टीपुढें ठेविला होता. लोकहिताचा कोणताहि विषय एकदां निश्चित झाल्यावर त्याला बाधक असा कोणताहि मजकूर वृत्तपत्रांत येतां उपयोगी नाहीं, असा त्यांचा कठोर दंडक असे. हे राजकीय विषय मांडण्याचें मर्म केसरींत असल्यापासूनच काकांनीं आत्मसात् केलें होतें. विषयांतील दुसरी बाजू अपुऱ्या माहितीनें मांडली तर असा दोष उत्पन्न होतो कीं सामान्य वाचक विषय समजून घेतांना साहजिक गोंधळून जातो. जनतेस स्वातंत्र्यप्रवण करतांना त्यामध्यें आत्मविश्वास वाढेल असेंच लेखकानें लिहिलें पाहिजे असें काकांचें ठाम निश्चित मत होतें. त्याप्रमाणें ते आपलें लेखन करीत असत. त्यामुळें त्यांची लेखणी स्वातंत्र्याचें ध्येय गांठण्याकरितां तत्पोषक जे जे मुद्दे असतील त्यांवर काकांची लेखणी तीक्ष्ण तलवारीप्रमाणें सफाईदारपणें चालत असे.

वृत्तपत्राचें लेखन वकिली कौशल्यानें लिहिलें जावें असें ते निश्चितपणें समजून चालत. त्यामुळें वाचकांचा आपल्या पक्षाविषयीं कधींही बुद्धिभेद होतां कामा नये, असा त्यांचा आग्रह असे. त्याचप्रमाणें वृत्तपत्राच्या धंद्यांतही आपल्या पक्षाशीं व त्यांच्या मतप्रणालीशीं एकजीव होऊन वृत्तपत्रानें आपली बाजू लोकांपुढें मांडली पाहिजे, आपल्या पक्षाच्या भूमिकेस यत्किंचितही बाध येईल अशी कोणतीहि गोष्ट आपल्या पत्रांत कोणत्याहि स्वरूपांत कोठेंही येतां कामा नये याकडे ते डोळ्यांत तेल घालून पाहत असत. लोकशाहीच्या नव्या जमान्यांत याविषयीं तर फारच दक्ष असावें असेंच काकांचें आपल्या पत्राविषयींचें धोरण होतें. निवडणुकीच्या वेळीं जाहिरातीचा आश्रय घेऊन कित्येक लोक आपला प्रचार करण्याचा प्रयत्न करितात. जाहिरात खात्याकडून न कळत तसा मजकूर येऊन जाण्याचा संभव असतो. काकासाहेब असा मजकूर कोणत्याहि स्वरूपांत येऊं देत नसत. काकासाहेबांच्या या पद्धतीमुळें त्यांना सांगावयाचें असलेल्या मुद्यांचें विवेचन

सामान्य वाचकांनाही त्वरित पटत असे व पक्षाच्या मतांचा प्रचार व प्रसार अतिशय परिणामकारक व विस्तृत होत असे.

काकांनीं आपल्या पक्षाच्या मतांचा जो विस्तृत व शाश्वत परिणामकारी प्रचार केला तो कांहीं काळ साप्ताहिकांतून व कांहीं काळ दैनिकांतून. साप्ताहिक व दैनिक वृत्तपत्राच्या लेखन संपादन पद्धतींत फरक असतो. साप्ताहिक पत्राच्या वाचनमननाला वाचकांना बराच अवधि मिळत असल्यानें या पत्रांतून स्वपक्षाचें मंडन व परपक्षाचें खंडन करणारी चर्चात्मक स्फुटें व विस्तृत निबंधवजा अग्रलेख लिहिले तरी चालतात. आठवड्यांत घडलेल्या घटनांचा वृत्तविशेष या सदरीं साकल्यानें विचार संकलित करावा लागतो. पण दैनिकांत रोज रोज नव्या ताज्या बातम्या देतांना त्यांची निवड व त्यांना देण्यांत यावयाचें महत्त्व व स्थान याकडे लक्ष पुरवावें लागतें. त्या बातम्यांच्या अनुषंगानें त्वरित परिणामकारी त्रोटक स्फुटें लिहिणें अवश्य असतें. या बातम्यांना आकर्षक मथळे देऊन वा कांही कलाकुसर करून त्यांचें महत्त्व वाचकांना पटवावें लागतें. काकासाहेबांनीं साप्ताहिक व दैनिकपत्रांतून जें लेखन केलें त्यांत यावरील फरकांचें अनुसंधान उत्तम रीतीनें साधलें आहे.

साप्ताहिकांत पूर्वी मोठमोठे निबंधवजा लेख लिहिले जात तशा पद्धतीचे विस्तृत लेख काकांनीं अनेक लिहिले आहेत. विषय महत्त्वाचा व एक दोन लेखांनीं भागणारा नसला तर त्यांनीं लेखांकही लिहिले आहेत. याविषयीं, 'गनिमी काव्याची लढाई' यावरील ९ लेखांक, 'सर्गांत पुढें मुंबईच कां या विषयावरचे ५ लेखांक व लॉर्ड कर्झन' यावरील ३ लेखांक उदाहरणादाखल आहेत. काकांनीं लोकमान्यांत व नवाकाळांत, 'टिळक व गांधी,' 'खादीचें तत्त्वज्ञान' इत्यादि अशाच पद्धतीच्या लेखमाला लिहिल्या आहेत. विशेष प्रसंगीं असे विस्तृत लेख वा लेखमाला लिहिल्या गेल्या तरी लेखांच्या मर्यादेला कात्री लागली पाहिजे, छोटे व तत्त्वग्राही, त्वरित परि-

णामकारी स्फुटवजा लेख व अग्रलेख वाचकांना सहज पटतात म्हणून काकासाहेबांनीं आपल्या पत्रांतून तसे छोटे लेख लिहिण्याची पद्धति सुरू केली व तिचा स्वीकार अन्य पत्रांतूनहि झाला.

## संपादनपद्धतीचीं वैशिष्ट्यें

यापेक्षां भिन्न पद्धतीचें पण वैशिष्ट्यपूर्ण पद्धतीचे प्रभावी लेखक मराठी पत्रकारांत झाले आहेत. त्यांत विशेष नमूद करण्यासारखी करामत 'काळ'-कर्ते परांजपे यांनीं केली. काळकर्त्यांची वक्रोक्तिपूर्ण कलात्मक लेखनशैली एकमेकाद्वितीय आहे. 'केसरी'तून साहित्यसम्राट न. चिं. केळकर व केसरींतील इतर संपादक यांनींहि आपल्या लेखनशैलीचा ठसा मराठी वृत्त-पत्रसृष्टीवर उमटविला आहे. 'भालाकार,' भोपटकर व 'संदेशकार' अच्युतराव कोल्हटकर हीं नांवें सर्वतोमुखीं झालीं होतीं. भालाकार भोपट-करांनीं आपलें साप्ताहिक व अच्युतराव यांनीं अनेक वेळां आपलें दैनिकांत कित्येक स्तंभांचे एकटांकी लेखन केलें आहे व आपलें कौशल्य दिग्दर्शित केलें आहे. अच्युतराव कोल्हटकर यांनीं तर दैनिक आकर्षक करण्याचे कामीं आपल्या विशिष्ट पद्धतीनें चांगलेंच यश मिळविलें होतें. महाराष्ट्रांत दैनिकपत्र वाचनाची गोडी वाढविण्यांत त्यांची ही कला उपयोगी पडली. त्या पद्धतीनें वाचकांना दैनिकांची ओढ लागून राहिली व उत्कंठा वाढली.

या विषयाचा शास्त्रीय पद्धतीनें विचार करून साप्ताहिक वा दैनिक पत्रें यशस्वी करण्याची शास्त्रसिद्ध व स्थिर अशी पद्धति काकासाहेबांनीं आपल्या संपादकीय कौशल्यानें घातली. विषय कोणत्या वर्गासाठीं लिहा-वयाचा त्या वाचकवर्गाच्या ज्ञानाची उंची विचारांत घेऊन त्याचें लेखन केलें पाहिजे अशी त्यांची शिकवण होती. आपणांस या जनतेला जागृत करून, स्वहितासाठीं दक्ष बनवावयाची आहे, यावर लक्ष ठेवून लेखकानें आपल्या विषयाची मांडणी व प्रस्ताव सोप्या व जोरदार भाषेंत केला पाहिजे, असा त्यांचा आग्रह असे. १९०८ सालीं सीतारामपंत दामले

यांच्या संपादकत्वाखालीं राष्ट्रीय मंडळींनीं काढलेलें 'राष्ट्रमत' दैनिक व त्यानंतरच्या काळांत निघालेल्या साप्ताहिक व दैनिक पत्रांतील बऱ्याच संपादकांनीं याच काकांनीं अंगीकारलें पद्धतीचें अनुकरण व स्वीकार केला आहे.

उत्कृष्ट व परिणामकारक लेखन यांत जसें संपादकाचें कर्तृत्व व कौशल्य दिसून येतें, तसेंच वृत्तपत्राच्या व्यवसायांत यशस्वी होण्यास योग्य मदत-निसांची निवड व योजना, वृत्तपत्राची आकर्षक मांडणी व पद्धतशीर व्यवस्था करण्याचें कुशलत्व संपादकाजवळ असावें लागतें. उत्कृष्ट व यशस्वी संपादनाचा तो एक महत्त्वाचा व अत्यवश्य भाग आहे. काकांचे ठायीं हें कौशल्य प्रकर्षानें होतें हें ते केसरींत संपादनकार्य करतांना, लोकमान्य चालवतांना व आपल्या नवाकाळचा संसार थाटतांना दिसून आलेंच आहे. काकासाहेबांची गंभीर व मितभाषणी प्रवृत्ति व वरवर दिसणारा तापट परस्वभाव यामुळें वृत्तपत्रांतील संपादक व कामगारवर्गाचें सांघिक बल आपल्या कार्यी कसे लावूं शकतील अशी शंका त्यांच्या विरोधकांना वाटे. पण प्रत्यक्षांत दैनिक लोकमान्य व नवाकाळ हीं पत्रें यशस्वी करण्यांत त्यांनीं जें ठसठशीत यश संपादन केलें त्यानेंच त्यांच्या विरोधकांना चोख उत्तर मिळालें आहे.

केसरीच्या वेळीं मदतनिसांची योजना लोकमान्यांनीं केली पण पत्राच्या व्यवस्थेंत काकांचा महत्त्वाचा भाग होता. नवाकाळ दैनिकांत वरील सर्वच बाबींबद्दल संपूर्ण जबाबदारी सर्वस्वीं काकांचेवरच होती व ती त्यांनीं यशस्वीपणें पार पाडली. संपादकीय व व्यवस्था खात्यासाठीं माणसें निवडतांना ते विशेष काळजीं घेत. निवडलेल्या नवे होतकरू व कार्य-कर्त्या तरुणांना त्यांनीं आपल्याजवळ केलें व आत्मीयतेनें त्यांना तयार करून हेंही संपादकीय यश मिळविलें. या दृष्टीनें ते नव्या संपादक पिढीचे पितामह आहेत असें मानण्यास हरकत नाहीं. लोकमान्य व

नवाकाळ या वृत्तपत्रसंस्थेंत काकांनीं तयार केलेल्या तरुणांनीं स्वतंत्रपणें कार्य करून वृत्तपत्रव्यवसायांत व इतर क्षेत्रांत नांव मिळविलें आहे. याचें श्रेय काकांच्या श्रेष्ठ संपादकत्वाला आहे.

संपादकीय जबाबदारीचें वर्णन करतांना आणखी एका दृष्टीनें याकडे पाहिलें पाहिजे. इतर सुधारलेल्या व स्वतंत्र देशांतील संपादक व पारतंत्र्यांत सांपडलेल्या व स्वातंत्र्यासाठीं झगडा करणाऱ्या व जनतेची जागृति करणारा संपादक यांमध्यें असलेला फरक स्पष्ट लक्षांत येण्यासारखा आहे. काकासाहेबांच्या संपादकीय मोठेपणाचा विचार करतांना वृत्तपत्राच्या संपादकाचें असिधाराव्रत स्वीकारून स्वातंत्र्यासाठीं झगडतांना अनेक आपत्ति व अडचणी यांना पुरून ते उरले यामुळें त्यांचें कर्तृत्व व कौशल्य जास्तच उज्ज्वल झालें आहे. १८९६ सालीं काकांनीं ही देशसेवेची दीक्षा घेतली त्या वेळेपासून सर्व तऱ्हेच्या आपत्तींची लटकती तलवार आपल्या शिरावर राहणार हे समजूनच ते वागले. आणि म्हणूनच त्यांनीं 'ज्या देशांत धर्मश्रद्धा नष्ट झाली आहे, ऐहिक सुखाची पराकाष्ठा हेंच संसाराचें मुख्य ध्येय होऊन बसलें आहे, तेथें धनाच्या व ऐषआरामाच्या एकीकरणामुळें निर्धन व श्रीमंत यांच्यामधील भेद तीक्ष्ण होत जाऊन बोल्शेव्हिकांचा रोग समाजाला जडतो.' असा स्पष्ट इषारा आपल्या एका लेखांत दिला आहे.

वृत्तपत्रव्यवसाय द्रव्यैकदृष्टीनें त्यांनीं केव्हांच पत्करला नाहीं. इतकेंच नव्हे तर परकी सत्तेनें आपला वृत्तिच्छेद केव्हांही होईल, अशी सदोदित भीति त्यांच्यापुढें होती. 'मनुष्यबल व द्रव्यबल गोळा करून स्वदेशीच्या व्रताची वारंवार आठवण करून देणें हें आमचें जन्मसिद्ध काम आहे,' हेंच फक्त ते ओळखीत असत. ज्या समाजाच्या उन्नतीसाठीं प्रयत्न करावयाचा तो समाज राजकीयदृष्ट्या अगदींच मागासलेला व अज्ञानी, आपल्या प्रयत्नाला यश कसें मिळेल ही सतत चिंता, स्वतःची आर्थिक परिस्थिति

अगदींच बेताची, आपापसांतील पक्षोपपक्ष व त्यामुळें वाटणारे गैरसमज, अशा सर्व अडचणींच्या परिस्थितींत राष्ट्रोद्धाराला पोषक व समाजाच्या अखेरच्या थरापर्यंत जागृति करणारें प्रचारवाङ्मय निर्माण करणें किती जबाबदारीचें व कठीण असलें पाहिजे याची कल्पनाच केलेली बरी !

प्रारंभीं पि. कोड व रेग्युलेशनखालीं राजद्रोहाचे खटले घालून वा हद्दपार करून सरकारानें पुढारी पत्रकाराचा छळ केला. पुढें १९१० सालीं प्रेस ॲक्ट जन्माला आला. त्या वेळच्या राजकीय चळवळींत राष्ट्रीय पक्षाच्या सर्वच पत्रांना त्या कायद्याचा त्रास झाला. पुढें १९३०।३१ सालीं सरकारानें काढलेल्या प्रेस ऑर्डिनन्समध्यें जामिनकीची रक्कम भरण्याचा हुकूम करण्याची नवी तरतूद झाली. यानंतर वृत्तपत्रें मेटाकुटीस आलीं. शेंकडों वृत्तपत्रांकडून हजारों रुपयांच्या रकमेची जामिनकी मागण्यांत आली व त्यामुळें नाइलाजानें कित्येक वर्तमानपत्रें बंद करावीं लागलीं. काकासाहेबांना केसरींत संपादकीय जबाबदारी पत्करल्यापासून नवाकाळांत संपादकीय लेखणी खालीं ठेवीपर्यंत वरील सर्व तऱ्हेच्या आपत्तींतून, संकटांतून व दडपशाहींतून त्यांस जावें लागलें आहे.

सांपत्तिक आपत्ति, पक्षोपपक्षांतील उत्पन्न होणाऱ्या चढाओढी व हेवेदावे यांमधून मार्ग काढण्यांत काकासाहेबांनीं अत्यंत कौशल्य दाखविलें आहे. वर्तमानपत्री लेखनामुळें अब्रूनुकसानीच्या कलमाखालीं त्यांना मोठमोठ्या रकमा दंडादाखल भराव्या लागल्या. जामिनकीसाठीं हजारों रुपये सरकारांत ठेवावे लागले व ते जप्तही झाले. त्यांनीं काढलेलें ‘ स्वाधीन भारत ’ हिंदी दैनिक तर त्यांना याच कारणासाठीं बंद करावें लागलें. राजद्रोहाच्या खटल्यांत त्यांना स्वतःला शिक्षाही भोगावी लागली. पण या सर्व आपत्तींशीं लोककल्याणासाठीं शौर्यानें झुंज देऊन त्यांनीं संपादकीय कार्य यशस्वी केलें.

लोकमान्य टिळकांसारख्या सरकारी दोषास पात्र झालेल्या पुढाऱ्याचें शिष्यत्व पत्करून देशसेवेच्या कांटेरी मार्गांत त्यांनीं पाऊल टाकिलें व केसरीच्या संपादकाचें खडतर व्रत स्वीकारलें. तेंच व्रत आपल्या अंगच्या धाडस, शिस्त, स्वावलंबन, चिकाटी, सततोद्योग व लेखनकौशल्य यांनीं अखंड चालविलें, व आपल्या उतारवयांतही या गुणांच्या जोरावर नवा-काळ दैनिक महाराष्ट्र वृत्तपत्रांत आदर्शपत्र केलें. मराठी वृत्तपत्रव्यवसायाला आज जें वैभवशाली व भारदस्त स्वरूप प्राप्त झालें आहे, त्यास कारणीभूत असलेल्या संपादकांत काकासाहेबांचें स्थान फारच श्रेष्ठ आहे. फक्त व्यवसाय म्हणून ते संपादक बनले नाहींत तर धर्म म्हणून त्यांनीं तें व्रत स्वीकारलें व आमरण आचरिलें.



: १५ :

## कृष्णाकांठचें दत्तमंदिर



धरणीवरि धैर्याचा कैवारी, अंतरिक्षि उद्योगा रक्षी,
दिंवि दिव्य दिवा, दत्तगुरु भक्ताची संपदा ॥
नमिलें गुरु दत्तपदा ॥

—काकासाहेब खाडिलकर, त्रिदंडी संन्यास.

काकासाहेब सुमारें नऊ महिने साबरमतीच्या तुरुंगांत होते. त्यांच्या आयुष्याच्या ओघाचा साकल्यानें विचार केला म्हणजे हा काळ त्यांच्या एक तऱ्हेच्या पुनर्जन्माचाच काळ म्हटला पाहिजे. गर्भवाससदृश सर्व दुःखें त्यांना कारावासांत भोगावीं लागलीं. तुरुंगांतील सर्व बाजूंनीं कोंडलेल्या परिस्थितींत आधिभौतिक दुःखांची आंच लागल्यामुळें त्यांची आध्यात्मिक ज्ञानाची आर्तता वाढत जाऊन त्यांचें प्रथमपासूनचें अंतर्निष्ठ व तत्त्वज्ञानी मन अधिकच अंतर्निष्ठ झालें. तुरुंगांतील कदान्न आणि अहमदाबादचा भयंकर उन्हाळा या उभयतांच्या संयोगानें त्यांचें शरीर

अत्यंत जर्जर होऊन गेलें. त्यांना तुरुंगांत भेटावयास गेलें म्हणजे ते कधींही आपल्या शारीरीक व्याधीबद्दल अगर तुरुंगांतील अन्नाबद्दल फारसें बोलत नसत. आपणास कांहीं नवीं पुस्तकें हवीं असल्यास त्याबद्दल ते भरपूर सूचना देत. तसेंच नवाकाळ, कुटुंबीय व इतर मंडळींच्या खुशालीबद्दल ते आपल्या ठराविक पद्धतीप्रमाणें चौकशी करीत. पण स्वतःबद्दल मात्र 'ठीक आहे' 'बरें आहे' यापलीकडे फारसें सांगत नसत. तुरुंगांतील सर्व हाल त्यांनीं अत्यंत करारीपणानें तुरुंगाची सर्व शिस्त पाळून बिनतक्रार सोसले. तुरुंगांतील भेटीच्या वेळीं त्यांचे अंगांत त्यांचा नित्याचा पोशाख असे व काकासाहेब आपल्या स्वतःच्या हालाबद्दल कधीं फारसें बोलत नसत. पण तुरुंगांतून ते घरीं आले व त्यांनीं आपला अंगरखा काढून ठेवला. त्यावेळीं त्यांच्या छातीचा अस्थिपंजर आणि भकाळीस गेलेलें पोट हें जेव्हां दृष्टीस पडलें तेव्हां आजपर्यंत निर्विकारपणानें पडद्यामागें ठेवलेल्या शारीरिक क्लेशांच्या लढतीचें समग्र वर्णन त्यांच्या आप्तजनांना निमिषार्धात झालें.

## तुरुंगांतून पुनर्जन्म

तुरुंगांत कोंडलें गेलों ही मानसिक भावना त्याना अत्यंत तापदायक वाटत होती. बाहेरच्या जगाचें वृत्त त्यांना फारसें कळत नव्हतें. सरकारची वाढती दडपशाही, नेहरू रिपोर्टानंतरचे मतभेद, विलायतेंत पहिल्या गोलमेज परिषदेचा फार्स, वल्लभभाईंचा बारडोलीचा वीर संग्राम, महाराष्ट्रांतील दे. भ. शिवरामपंत परांजपे व वासुकाका जोशी यांच्या जोडीस नव्या दमाच्या शंकरराव देव, जेधे, गाडगीळ यांचें भावी लढ्याचे पूर्वतयारीचें कार्य इत्यादि माहिती काकासाहेबांना तुरुंगाच्या नियमास धरून कांहीं थोडीबहुत मिळूं शकत असली तरी त्यांचें स्वतंत्र मानी मन भोंवतींच्या वातावरणानें फार विद्ध होत असे. अशांत शिवरामपंत परांजपे यांच्या निधनाच्या वार्तेनें आपल्या मनास कशा वेदना झाल्या त्याचें चित्र

त्यांनीं आपल्या आत्मचरित्रात्मक आठवणींत थोडक्यांत दिलें आहे. ते म्हणतात—

"त्यांच्या मृत्यूची बातमी मी तुरुंगांत असतांनाच समजली. वार्ता ऐकून मी रडलों. एक महान् लेखक, प्रसिद्ध वक्ता आणि आमच्या पक्षाचा योग्य नेता नाहींसा झाला! याचें मला फार वाईट वाटलें! तुरुंगांत जातानांची त्यांची माझी भेट ही शेवटचीच भेट ठरली! सेशन कोर्टांत कज्जा चालण्याचे पूर्वी ते मला भेटावयास आले होते. कज्जासंबंधीं किरकोळ बोलणें झाल्यावर त्यांनीं मला विचारलें होतें कीं, 'कांदा तुम्हांस चालतो काय?' त्यांना स्वतःला कांद्याचा वास खपत नसे आणि तुरुंगांत असतांना कांद्याच्या पायीं त्यांची स्थिति अत्यंत दुःखद झाली होती, असें वर्णन कै. वासुकाका जोशी करीत असत. त्यांनीं विचारलेल्या प्रश्नाचा रोख मला तत्काळ समजला आणि 'कांदा चालतो मला' असें उत्तर मीं दिलें. 'मग कांहीं हरकत नाहीं' असें दे भ. परांजपे यांचें उत्तर आलें नि आम्ही दोघे हसलों. दे. भ. शिवरामपंतांची ती हंसतमुख मूर्ति मला अद्याप आठवत आहे." या निवेदनांतील काकासाहेबांच्या हृदयांतील निर्मळ करुण रस तो मजकूर वाचणारांच्या हृदयाला तात्रडतोब प्रतीत होतो.

शारीरिक व मानसिक वातावरण त्यांच्या अध्यात्मविषयक विचारांना अनुकूल होतें. सरकारनें त्यांना भरपूर एकान्त दिला होता. ज्ञानेश्वरीचा त्यांचा सूक्ष्म अभ्यास चालू होता. ज्ञानदेवांनीं योगाभ्यासाचें स्वानुभविक सविस्तर विवेचन आपल्या दिव्य रसाळ वाणीनें केलेलें आहे. काकासाहेब लहानपणापासून श्रद्धावान् ईश्वरभक्त. तत्त्वज्ञान विषयाचे पदवीधर. मन एकाग्र करून चिंतन करणें हेंच त्यांचे नित्याचें जीवन. मनाचा परमेश्वराच्या ठिकाणीं पूर्ण लय लावण्याचा त्यांचा तरुणपणापासून प्रयत्न असे. अशा स्थितींत तुरुंगांतील या विषयाला अनुरूप

वातावरणामुळें काकासाहेबांची ध्यानधारणेकडे अधिक प्रवृत्ति वळावली व येथें त्यांनीं हा अभ्यास पुष्कळ वाढविला.

काकासाहेब कारावासांतून बाहेर आले व त्यांच्या सन्मानाच्या एका सभेंत त्यांनीं आपल्या नऊ महिन्यांच्या कारावासास उद्देशून आपला एक तऱ्हेनें पुनर्जन्म झाल्याचें जें सांगितलें तें त्यांच्या वर निर्दिष्ट केलेल्या मानसिक जीवनाच्या दृष्टीनें पाहतां सत्यच नव्हतें काय ? त्यांनीं आपल्या जीवनास आध्यात्मिक कल दिला होता. तत्त्वचिंतन हेंच त्यांच्या मनाचें जीवन व तत्त्वप्रचार हेंच त्यांच्या जीवनाचें कार्य यापुढें राहिलें होते. त्यांनीं तुरुंगांत जातांनाच सांगितल्याप्रमाणें तेथील निवासाच्या कालांत आपलें " सावित्री नाटक " लिहून काढलें. या नाटकांतील सूत्रधाराच्या तोंडीं नाटकाच्या सुरवातीलाच काकासाहेबांनीं जें वाक्य घातलें आहे त्यावरून त्यांनीं गत जीवनांतील आस्थापूर्वक केलेलें कार्य व व्याप आणि त्यांचें पुढील भवितव्य यासंबंधीं त्यांची भावपूर्ण स्थिर मनःस्थिति स्पष्ट झालेली दिसते. सूत्रधार म्हणतो–' पुढील पिढी नजरेखालीं ठेवून, विटेवरी उभी असलेली ही सांवळी मूर्ति डोळ्यांपुढें आली म्हणजे आपल्या उद्योगाची व सांप्रदायाची हेळसांड पुढील पिढीकडून होईल किंवा कसें याविषयींची भीति मनांत शिल्लक उरत नाहीं. "

काकासाहेबांनीं आपली संपादकीय जबाबदारी तुरुंगांत जातांनाच नवाकाळमधील नव्या पिढीवर सोंपविली ती पुन्हां कधींच स्वतः अंगीकारिली नाहीं. ही घटना काकासाहेबांच्या एकंदर मनःस्थितीची द्योतक आहे. तीन तपें त्यांनीं आपली लेखणी वर्तमानपत्रांसाठीं अखंडपणें चालवून महाराष्ट्राची एक पिढी राष्ट्रकार्यप्रवण करून सोडली. केसरी, लोकमान्य अगर नवाकाळ या तीनही ठिकाणीं ते अशा अभिनिवेशानें लिहीत कीं त्यांच्या हृदयांतील राष्ट्रप्रेमाची जागती ज्योत वाचकांचे हृदयांत संक्रांत होत असे त्यांच्या विचारांची, त्यांच्या मांडणीची व त्यांच्या भाषेची

बैठक विशिष्ट दृष्टिकोनाची असे व तो दृष्टिकोन आपल्या विचारांभोंवतीं व आचाराभोंवतीं ठांसून बसला पाहिजे असा त्यांचा प्रयत्न असे. हा छाप आपल्या प्रत्येक लिखाणावर पाडण्याची ते विशेष काळजी घेत असत.

नवाकाळ कचेरींत त्यांनीं आतां आपले सहकारी तयार केले होते. त्या मंडळींनींही शक्त्यनुरूप काकासाहेबांच्या लिखाणाचें मर्म जाणवून घेतलें होतें. ही सर्व मंडळी काकासाहेबांचे हाताखालीं बरींच वर्षें कामगिरी करीत होती. त्यांच्यापुढें बारीकसारीक बाबतींतही काकासाहेब कसें वागतात, कसे विचार करतात याचें प्रत्यक्ष उदाहरण होते. त्यांच्या चिंतनशील उदात्त हृदयाची सर्वांच्या मनावर मोठी छाप होती. यामुळें त्यांचे सहकारी काकासाहेबांच्याबद्दल भक्तिपूर्ण आत्मीयता दाखवीत, अभिमानयुक्त प्रेमादर बाळगीत. या मंडळींनीं काकासाहेबांच्या गैरहजेरींत नवाकाळ उत्तम तऱ्हेनें चालविला व आपल्यांतील उच्च कर्तृत्व सिद्ध केलें. या काकासाहेबांच्या कारावासाच्या काळांत नवाकाळ अत्यंत लोकप्रिय होऊन त्याचा खप चांगलाच वाढला. याचें श्रेय जसें जनतेंतील काकासाहेबांबद्दलच्या प्रेमाला आहे तसेंच ते तत्कालीन संपादकीय मंडळींच्या कौशल्यालाही आहे.

काकासाहेब तुरुंगाबाहेर आले ते शरीराच्या अत्यंत जर्जर स्थितींत आले. मनाचा खंबीरपणा होता म्हणूनच ते शरीर टिकवून बाहेर आले. यामुळें बाहेर आल्यावर त्यांना प्रथम जे हवें होतें तें, म्हणजे शारीरिक विश्रांति हें होय. मुंबईस घरीं परत आल्यावर त्यांनीं कांहीं काल तेथें राहून नवाकाळच्या सर्वसाधारण व्यवस्थेची चौकशी केली. नंतर ते पुणें मुक्कामीं येऊन आपलें स्नेही वासुकाका जोशी यांचे घरीं कांहीं काल राहिलें. त्यानंतर ते साताऱ्यास गेले. तेथे दादासाहेब करंदीकर, भाऊसाहेब सोमण वगैरे सन्मित्रांच्या सहवासाचा लाभ घेऊन ते सांगलीस गेले. या सर्व ठिकाणीं नागरिकांनीं त्यांचा अत्यंत आदरपूर्वक जाहीर सत्कार केला.

सांगलीच्या मुक्कामांत एक दिवस मुद्दाम ते नरसोबाच्या वाडीस जाऊन दत्ताचें दर्शन घेऊन आले.

हिंदुस्थानांत त्यावेळीं सत्याग्रह चळवळ जोरांत सुरू होती. काकासाहेब तुरुंगांतून बाहेर आले आणि महात्माजींच्या आश्रमांत त्यांनीं पाय ठेवला तोंच तेथील आश्रमवासीयांनीं महात्माजींच्या सत्याग्रहाच्या निर्धाराची वार्ता त्यांचे कानावर घातली व पुन्हां तुरुंगांत सर्वांना जावयाचें आहे असें सांगितलें. त्याबरोबर 'हें बोचकें खालीं न ठेवतां हवा तर असाच परत जातों' असा काकासाहेबांनीं विनोद केला. हा महात्माजींच्या सत्याग्रहाचा निर्धार आतां दृश्य स्वरूपास आला होता व काकासाहेबांनीं सत्याग्रह्यांची महाराष्ट्राची पहिली तुकडी पुण्याहून आशीर्वादपूर्वक लढ्यासाठीं पाठविली होती. नवाकाळचा दुंदुभी जोरांत वाजत होता. त्याच्या खपानें उच्चांक गांठला होता.

**नवाकाळ वाडी**

काकासाहेब मुंबईस विश्रांति घेऊन परत आले तों नवाकाळचा व्याप फारच वाढलेला त्यांस दिसला. नवाकाळच्या लोकप्रियतेमुळें त्यांची आर्थिक बाजूही चांगली भक्कम बनली होती. कोणताही मोठा व्याप उभा केला म्हणजे भाड्याची जागा त्यास कधींच पुरत नाहीं. शिवाय त्यांत बोचणाऱ्या अनेक गोष्टी नेहमीं असतातच. त्यांतून महत्त्वाकांक्षी मनानें कांहीं करूं म्हटलें तर ते भाड्याच्या जागेंत करणें अत्यंत गैरसोईचें होतें आणि म्हणून त्या गोष्टी प्रसंगीं सोडून द्याव्या लागतात. 'लोकमान्य' स्थापन केला त्यावेळीं प्रथमतः सर्व चांगलेच होतें. लोकमान्यांनीं जसें केसरी ऑफीस हें हिंदुस्थानच्या राजकारणाचें आपल्या पक्षापुरतें पुण्याचें केंद्र बनविलें तसें 'लोकमान्य' हें मुंबईचें केंद्र व्हावें अशी त्यांची फार इच्छा होती. सर्व गोष्टी अनुकूल असूनही परावलंबित्वामुळें ती गोष्ट त्यावेळीं होऊं शकली नाहीं. आपली स्वतःची जागा असेल तर आपण पुष्कळ गोष्टी करूं शकतों.

काकासाहेबांच्या मनापुढें लोकमान्य टिळक, आगरकर यांनीं जेसुइट पंथाच्या नमुन्यावर काढलेली डेक्कन एज्युकेशन सोसायटी होती. नामदार गोखले यांचा भारत सेवक समाजही त्यांच्या डोळ्यांपुढें होता. त्यामुळें 'नवाकाळ' वर्तमानपत्रांत लिहिण्यासाठीं व इतर व्यवस्थेसाठीं जी संपादकीय मंडळी तयार करण्यांत आली होती त्यांनीं ज्यास्तींत ज्यास्त वेळ या कार्यांत घालवावा, अनेक विषयांचा व्यासंग व अभ्यास करावा आणि मोठे मोठे कर्तृत्ववान् देशभक्त नवाकाळच्या संपादकवर्गांतून उत्पन्न व्हावेत ही कल्पना त्यांच्या हृदयांत नेहमीं वास करून होती. नवाकाळ स्थापन झाला तेव्हां इंदुप्रकाश छापखान्याजवळच एक जागा घेऊन तेथें नवाकाळच्या परिवाराच्या सर्व लोकांची जास्तींत जास्त सोय करण्याचा काकासाहेबांनीं प्रथम प्रयत्न केला होता. पण खटाव मकानजी वाडींत नवाकाळ आल्यावर जागेच्या अभावीं हें सर्व बाजूस राहिलें.

या कारणासाठीं काकासाहेबांच्या मनांत नवाकाळसाठीं चांगली जागा घेण्याची पूर्वींची कल्पना बळावली. मोठी स्वतःची जागा ही आपल्या धंद्याच्या वाढीस जशी पोषक आहे तशीच ती तो धंदा स्थिर पायावर नेऊन बसविते, स्वतःच्या जागेमुळें धंद्याची जनतेंतील प्रतिष्ठा वाढते वगैरे विचारही त्यांच्या मनांत होते. जागा आपल्या धंद्यास व आपल्या वरील कल्पनांना अनुरूप अशी असावी अशी त्यांची इच्छा होती. काकासाहेब दूरवर विचार करणारे व मागचा पुढचा अंदाज बांधण्यास न चुकणारे असत. प्रत्येक गोष्टींत ते पुढें काय होईल हें पहात असत. जसे उत्तम बुद्धिबळें खेळणारे लोक पुढचे चार डाव मनाशीं योजतात व त्या पुढच्या डावांच्या प्रतिक्रियाही अजमावतात तसें काकासाहेबाचें असे. महायुद्धावर लेख लिहीत असतां भविष्यकाळांत बिनचूक उडी घालण्याची ही त्यांची कलाच त्यांना सर्वत्र लोकप्रिय करीत होती, त्यांची कीर्ति पसरवीत होती.

नवाकाळसाठीं इमारत घेण्याच्या वेळीं त्यावेळच्या नवाकाळच्या बैठकीच्या हिशोबांत काकासाहेबांनीं पुढचें हिशोब करून व आडाखे बांधून मोठें धाडस करण्याचें ठरविलें व कांदेवाडीच्या नाक्यावर असलेली खूप प्रशस्त इमारत विकत घेतली. या जागेंत तोंडाशीं थोडी दुमजली इमारत होती. मागें बरीच मोकळी जागा पटांगणासारखी होती. व एका बाजूनें तीन मजली खूप मोठी इमारत होती. असा पूर्वीचा मांड होता. होती अशी इमारतसुद्धां काकासाहेबांना राहण्यास व नवाकाळच्या त्या वेळच्या व्यापास खरें पाहतां पुरेशी होती. पण काकासाहेबांना आतां सर्व आदर्श करावयाचे होते. त्यांच्या मनांत आजपर्यंत दडपून राहिलेल्या इच्छांना आतां पूर्ण वाव द्यावयाचा होता. ‘ नवाकाळ ’ या नामवंत वृत्तपत्राला साजेसें सर्व करावयाचें होतें. नव्या नव्या कल्पना त्यांच्या मनांतील व्याप वाढवीत होत्या. या सर्वांना पुरेशी जागा त्यांना हवी होती.

यामुळें नव्या जागेच्या मध्यावर जें पटांगण मोकळें होतें त्यावर स्वतंत्र एक मोठी तिमजली इमारत बांधण्याचें काकासाहेबांनीं मुक्रर केलें. या इमारतीच्या खालच्या बाजूस दत्तात्रय छापखान्याचा सर्व यंत्रसंभार, दुसऱ्या मजल्यावर कचेरीचें कामकाज व तिसऱ्या मजल्यावर संपादक मंडळी अशी मनाची आखणी करून त्यांनीं नवी इमारत बांधली. पटांगणासमोरील तिमजली इमारतीच्या वरच्या मजल्यावर स्वतःचें बिऱ्हाड केलें व बाकीची खालची जागा व बाजूची इमारत त्यांनीं आपल्या संपादकवर्गातील मंडळींना बिऱ्हाडासाठीं देऊन टाकली.

तुरुंगांतून बाहेर आल्यावर संपादकीय लेखन आपण करावयाचें नाहीं असें काकासाहेबांनीं ठरविलें असलें तरी नवाकाळच्या नव्या इमारतीचा आणि नव्या व्यवस्थेचा व्याप कांहीं कमी नव्हता. या कामांत ते नित्यशः उभे असत. याचे जोडीस लोकजागृतीच्या विस्तृत क्षेत्राकडेही त्यांचें लक्ष होतें. तुरुंगांत जाण्याच्या अगोदरपासून त्यांच्या मनांत आपल्या कार्याचें

क्षेत्र विशाल करण्याचें होतें. यासाठीं एकाद्या इंग्रजी मासिकाची जोड नवाकाळास दिली असतां सर्व हिंदुस्थानांतच नव्हे तर त्याबाहेरही आपणांस जागृतीचें काम करणें सोपें जाईल असें त्यांना वाटत होतें. यासाठीं त्यांनीं सर्व बारीकसारीक गोष्टींचा विचार करून साधनांची जुळणीं पण करून ठेवली होती. या मासिकाच्या संपादकाचें नांवही त्यांच्या डोळ्यांपुढें होतें. पण तेवढ्यांत त्यांना तुरुंगांत जावें लागलें व त्यांच्या मनांतील कल्पना जरा मागें पडल्या, तथापि त्या अजिबात नामशेष झाल्या नव्हत्याच. परिस्थितीच्या नव्या वळणानुरूप त्यांच्या या कल्पनांना जरा मुरड पडून त्यांनीं याच कार्यासाठीं आपलें एक नवें हिंदी दैनिकच काढण्याचें ठरविलें. आतां इमारत मोठी होती. छापखाना पुरेसा होता. छपाईसाठीं डबल फिटर मशीन व इतर पुष्कळ सिलेंडर मशीन्स सज्ज होतींच. अनुरूप संपादकीय मदत मिळतांच काकासाहेबांनीं आपलें स्वतःचें नवें हिंदी दैनिक पत्र काढण्याचें ठरवून त्याची पुढीलप्रमाणें तारीख ४–६–१९३० च्या नवाकाळांत जाहिरात दिली.

"**स्वाधीन भारत—**

**मुंबईसे राष्ट्रीय हिंदी दैनिक**

**आगामी सात एप्रिल सोमवारसे प्रकाशित होगा.**

प्रधान संपादकः–**निरंजन शर्मा अजित.**

सं. संपादकः–**क. काशीप्रसादसिंह वर्मा.**

बंबई सदृश राजनैतिक और व्यापार प्रमुख केंद्र से एक उच्च कोटी को राष्ट्रीय हिंदी दैनिक पत्र की आवश्यकता बहुत दिन से अनुभव जा रही थी। और विशेषतः महात्माजी के राष्ट्रीय महासंग्राम के समय इस रणभूमी में इस का अभाव बहुत ही खटकता था। इस अभाव की पूर्ती के लिये राष्ट्रीय

यज्ञ में भाग लेनेवाले हिंदी भाषा भाषियों तथा राष्ट्रभाषाप्रेमी जनता को शुद्ध राष्ट्रीय संदेश सुना कर उन्हे कर्तव्य पथपर अग्रसर करने के लिये यह आयोजन किया है।

संचालक—कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर,
नवाकाळ ऑफिस, मुंबई.

काकासाहेबांच्या मनांतील जोरदार राष्ट्रकार्याची ऊर्मि या हिंदी जाहिरातींत प्रतीत होत असल्यामुळें ही जाहिरात सहेतुकपणें येथें संपूर्णपणें उद्धृत केली आहे. काकासाहेबांनीं संपादक म्हणून जरी काम सोडलें होतें तरी संचालनाचें काम करीत ते राष्ट्रीय रणभूमीवर उभेच होते. स्वतः हातांत शस्त्र घेऊन ते लढाईत पडत नसले तरी लढवय्यांच्या कार्याला जुंपलेल्या मंडळींना संचालना देण्याचें काम ते करीतच होते. सुदर्शन-चक्रधारी कृष्ण जरी ते राहिले नाहींत तरी पार्थसारथि कृष्ण म्हणून ते रथावर अधिष्ठित होते. लोकजागृतीच्या पवित्र कार्याचें सूत्रचालकत्व त्यांच्या हातांत होतेंच.

याच सुमारास त्यांच्या थोरल्या नातवाचा जन्म झाला. त्यामुळें त्यांना विशेष समाधान वाटत होतें. पुत्रपौत्र हे आपल्या परंपरेचे ध्वज पुढें पुढें नेऊन त्यास सातत्य देत असतात. काकासाहेबांना या पौत्रजन्मामुळें भविष्यकाळ उज्ज्वल दिसला तसाच भूतकाळही आठवला. आपल्या वडील बंधूंचा आसरा आपणांस अत्यंत जिव्हाळयाचा होता ही जाणीव त्यांचे मनांत तीव्र होती. नातू झाल्याबरोबर त्यांनीं त्याचें नांव हरी तथा तात्या असें ठेवलें व या नांवांतील गत जिव्हाळा नव्यानें उभा केला.

१९०७।८ सालीं झालेल्या विनायकाच्या जन्मानंतर पुत्रजन्माचा आनंददायक सोहाळा आज कित्येक वर्षांनीं लाभला. त्यांत नातवाचा जन्म! यामुळें सौ. काकूंना फार आनंद झाला. त्यांनीं अगदीं जुन्या पद्धतीनें त्याचे जन्मसोहाळे यथास्थित व यथासांग केले. चि. अप्पाचा

संसार असा योग्य वाढीस लागलेला होता. नवाकाळचें संपादकत्वच त्याचें-कडेच होतें. त्याचप्रमाणें दुसरा मुलगा विनायक टिळक विद्यालयाची प्रवेश परीक्षा पास होऊन नवाकाळच्या व्यवस्थापन विभागात काम करूं लागला होता. आपले दोनही पुत्र नवाकाळची जोपासना व संवर्धन उत्तम तऱ्हेनें करीत आहेत व संसार वृद्धिंगत होत आहे हें दृश्य कोणत्या मातेचें हृदय निववणार नाहीं. सौ. काकू यामुळें पूर्ण आनंदांत होत्या.

## नवे व्याप नव्या चळवळी

छापखाना वाढविणें, त्यांत नवीं खातीं व नवीं यंत्रें यांची व्यवस्था लावून देणें, संपादकवर्गाशीं मनमोकळेपणानें चर्चा करून त्यांच्या संपादकीय कामांत योग्य तें मार्गदर्शन करणें, इतर सर्वत्र बारकाईनें लक्ष घालून सर्व कामावर लक्ष ठेवणें वगैरे काकासाहेबांचें काम चालू असतांना बाहेर सत्याग्रहाचें आंदोलन आपल्या पूर्ण वेगांत आलें होतें. महात्मा गांधीच्या सुप्रसिद्ध 'दांडी यात्रे'चा प्रारंभ झाला मात्र सर्व देश उत्साहानें फुलून निघाला. सर्वत्र त्याच्या लाटा पसरल्या. सर्वत्र रणदुंदुभी वाजूं लागल्या. जागोजागीं युद्धमंडळें बनविण्यांत आलीं. सभा व मिरवणुकी यांच्या गजबजाटानें सर्व दशदिशा दणाणून गेल्या. सभांना पटांगणें पुरेनात आणि मिरवणुकींना रस्ते पुरेनात, प्रभातफेऱ्यांनी तर सर्व गांवें दुमदुमून रहात असत. महिलांचा कोमल आवाज राष्ट्रप्रेमाची जळती मशाल झाली. ठिकठिकाणीं युद्धस्थानें ठरविण्यांत आलीं आणि ठिकठिकाणीं संग्राम-शिबिरें निघालीं. महाराष्ट्रांत शिरोडा, रत्नागिरी व विलेपार्ले अशा अनेक ठिकाणीं सत्याग्रहाच्या हालचाली सुरू झाल्या. या सत्याग्रहांत नाना, महाशब्दे व धुरंधर इत्यादि नवाकाळांतील अनेक मंडळींनीं भाग घेऊन कारागृहवास पत्करला. स्वतः काकासाहेबही इतर पुढाऱ्यांसमवेत बाजारांत जाऊन बेकायदा मीठ विकून आले. पण सरकारनें त्यांना पकडलें नाहीं. महात्माजी तुरुंगांतच होते व बाहेर सत्याग्रहाच्या प्रचंड लाटा ब्रिटिश राजवटीच्या

नौकेस धडका देत होत्या. सप्रू व जयकर यांच्या जोडीनें शिष्टाईचे प्रयत्न करून पाहिले पण सत्याग्रहाचा पुरा जोर होता. अनिश्चित व अपुऱ्या सुधारणा पत्करून तडजोड करण्याच्या मनःस्थितींत कोणीच पुढारी नव्हते.

१९३० सालीं पहिली गोलमेज परिषद लंडन येथें सरकारनें दाबून भरवून पाहिली. या परिषदेस कॉंग्रेसचा एकही प्रतिनिधी हजर नव्हता. सरकारकडून 'लब्ध होती प्रतिष्ठा ज्यांना' असे पुष्कळ इतरेजन हजर होते. रामावीण रामायण अगर प्राणाविना देह तसाच हा प्रयत्न होता. सगळे निमंत्रित एकत्र आले आणि वाटोळे बसले. पण जगाचा ते हास्य-विषयच झाले होते. सरकारला तें समजलें. सरकार आतां तडजोडीस तयार झालें. कॉंग्रेसच्या कार्यकारी सभेचे सर्व सभासद सरकारनें बंधमुक्त केले, नव्हे मीठसत्याग्रहांतील सर्व राजबंदीही त्यांनीं सोडून दिले. कराचीस महासभेचें प्रचंड अधिवेशन भरलें. दुसऱ्या गोलमेज परिषदेला महात्माजींना हिंदुस्थानचा एकमेव प्रतिनिधी म्हणून पाठविण्यांत आलें. लंडनमध्यें राजकारणाचे डाव जोरांत चालले. पण तेथील दरबारांत शकुनीमामांचे प्रस्थ जोरांत होतें. जातीयतेच्या मंत्रानें त्यांनीं आपले फांसे भारावले होते. हिंदपुत्रांतच त्यांनीं परस्पर द्वेषाचे सुरुंग लावले होते. राष्ट्रीय स्वातंत्र्याच्या नौकेच्या मार्गांत त्यांनीं फितुरांच्या खडकांचे गुप्त डोंगर उभे केले होते. गोलमेज परिषदेचें तारूं या खडकावर हापटून फुटलें. महात्माजींची लंडन-यात्रा निष्फळ ठरली. ते गेले तसेच परत आले. त्यांची फार निराशा झाली.

सरकार पुन्हां भ्याले. महात्माजींची प्रचंड शीतल शक्ति मोकळी राहणें त्यांना धोक्याचें वाटलें. लॉर्ड आयर्विनसारखा किंचित् मऊ व्हॉइसराय आतां नव्हता. गांधीजींच्या सतशक्तीला तुडविणारा कोणी दुःशासनच हवा होता. लॉर्ड विलिंग्डन त्यावेळीं आपल्या कामावर रुजूं होते. महात्माजी हिंदुस्थानांत पोंचतात न पोंचतात तोंच ४/६ दिवसांच्या अवधीं-

तच त्यांना पुन्हां तुरुंगांत डांबण्यांत आलें. सर्वत्र पुन्हा सनसनाटी उत्पन्न झाली. विजा चमकूं लागल्या, मेघ गर्जू लागले. पुन्हां कायदेभंगाचे आंदोलन सुरू झालें. यावेळीं सरकारनें सर्व कॉंग्रेस कमिट्या वटहुकुमानें बेकायदेशीर ठरविल्या आणि त्यांचे सभासद तुरुंगात डांबले. या दडपशाहीस जनता किंचितही भ्याली नाहीं. बत्तीस सालच्या या चळवळींत जनता हजारांनीं तुरुंगांत गेली. सर्व ठिकाणचे तुरुंग स्वार्थत्यागी देशभक्तांनीं तुडुंब भरून गेले. यांत नवाकाळ कचेरींतील मंडळीही पण कांहीं होतीच. देशभक्तांच्या कारावासांतलि हालअपेष्टांच्या इंधनामुळें जनतेच्या हृदयांतील राष्ट्रप्रेम तापून उसळून वर येत होतें.•

## सत्कार नाकारला!

याच वर्षी म्हणजे १९३२ सालीं काकासाहेबांच्या वयाला साठ वर्षें पूर्ण झालीं. काकासाहेब म्हणजे महाराष्ट्राचे वीर पुत्र. लोकमान्यांच्या धडाडीच्या राजकर्तृत्वाचे वारस. त्यांनींच लोकमान्यांच्या मनांतील लढाऊ राष्ट्रप्रेम आपल्या वर्तमानपत्रांच्या व नाटकांच्या द्वारें महाराष्ट्राच्या कोन्याकोपऱ्यांत पसरविलें, अनेक हालअपेष्टा व अडचणी यांना न जुमानतां, 'न मे भक्तः प्रणश्यति' या विश्वासावर आपल्या कार्याचा ध्वज खालीं होऊं दिला नाहीं व शेवटीं तुरुंगाचा खडतर देहदंड देशकार्यार्थ भोगला. या सर्वांबद्दल महाराष्ट्र जनता त्यांचेवर अत्यंत प्रीति करीत होती. त्यांची फार ऋणी होती.

त्यांच्या वयाला साठ वर्षें पूर्ण झालीं. हा लोकांना आनंदाचा दिवस होता. परमेश्वराचे त्यांना आभार मानावयाचे होते. आपल्या ऋणाईत हृदयानें काकासाहेबांना ओवाळावयाचें होतें. जनतेच्या या उत्सुकतेप्रमाणें षष्ठ्यब्दि समारंभ मोठा व्हावा म्हणून बाहेर प्रयत्नास सुरवात झाली. ठिकठिकाणीं अभिनंदनाचे समारंभ करावे, विविध वृत्तपत्रांनीं व नियतकालिकांनीं आपले विशेष अंक काढावे अशा तऱ्हेच्या अनेक सूचना येत

होत्या. या कार्यासाठीं प्रा. न. र. फाटक, प्रो. द. रा. धारपुरे वगैरेंचा समावेश करून बऱ्याच कमिट्याही स्थापन झाल्या होत्या. पण काकासाहेबांनीं अशा कोणत्याही तऱ्हेचा सत्कारसमारंभ करून घेण्याचें साफ नाकारलें.

एक तर स्वभावतः काकासाहेब प्रसिद्धिविन्मुख असत. खाजगी अगर सार्वजनिक व्यवहारांत ते कधींच अशा कामीं पुढें नसत. शिवाय देशाची त्यावेळची परिस्थितीच अशी होती कीं अशा तऱ्हेच्या समारंभांत आपण आनंद मानावा हें त्यांना पसंत पडणारें नव्हतें. राष्ट्रांतील वीरवृत्ति सरकारनें तुरुंगांत करकचून बांधली होती, महात्माजींसारखे राष्ट्रनेते परक्यांच्या तळघरांत होते, महाराष्ट्रांतील सर्व त्यागी कार्यकर्ते तुरुंगांत पिचत होते. 'अशा वेळीं वास्तविक मी त्यांच्यांत असावयाचा' ही जाणीव ज्यांस होती असे काकासाहेब आपल्या साठावीचा आनंदोत्सव कसा साजरा करून देतील? सत्कारसमितीची मंडळी त्यांचेकडे आली असतां त्या सर्व मंडळींना 'कॉंग्रेस तुरुंगांत असतांना आपले सत्कारसमारंभ करून घेण्यास' काकासाहेबांचा तीव्र विरोध असल्याचें दिसून आलें. मित्र-मंडळींनीं आंखलेल्या सर्व योजना त्यांनीं अत्यंत कडक रीतीनें मोडून काढल्या व कोणताही समारंभ होऊं दिला नाहीं.

### श्रीदत्त मंदिराची स्थापना

सांगलीस कांहीं घरगुती समारंभाचें निमित्त करून ते पुण्यास व साताऱ्यास कांहीं दिवस राहून सांगलीस आले. ते सांगलीस आले ते या खेपेस साधे आले नाहींत. आध्यात्मपूर्ण हृदय घेऊन ते या खेपेस सांगलीस आले होते. तुरुंगांतून सुटल्यावर दोन वर्षे ते सर्व तऱ्हेनें कार्यरत होते खरे, पण त्याची दिशा वेगळी होती. त्यांचा तत्त्वज्ञानाचा अभ्यास अधिकाधिक खोलपर्यंत पोंचत होता. गीतारहस्य व ज्ञानेश्वरी यांचा अभ्यास त्यांना योगाकडे अधिकाधिक झुकवीत होता. कोणतेंही कार्य हातीं घेतलें कीं,



सांगलींतील कृष्णाकांठचें
खाडिलकरांचें श्रीदत्तमंदिर
व
श्रीदत्तात्रयमूर्ति



त्यांत ते तन्मयतेनें पडत व तल्लीन होऊन जात. ही त्यांची पूर्वीपासूनची वृत्ति अभ्यासानें अधिकाधिक वाढली होती. योगाचा अभ्यास ते शास्त्रीय पातळीवरून न करतां प्रत्यक्ष अनुभवाच्या पायरीवरून करूं लागले होते. योगांच्या सिद्धि प्रत्यक्ष रोजच्या जीवनांत कोठपर्यंत प्रत्ययास येतात याचा त्यांचा अनुभविक शोध चालू होता. त्यांचा असा अनुभव होता कीं, बुद्धि-स्पर्शाची दृष्टि अभ्यासानें जास्त कार्यक्षम करतां येते. अशी जर करतां आली तर संसारांत त्याला फार महत्त्व आहे. ही सूक्ष्म दृष्टि मनाची शक्ति आहे. ती मनाला साधली पाहिजे व यासाठीं योगाचा अभ्यास करणें जरूर असतें असें त्यांचें मत होतें. रोजच्या कार्यांत तरबेजपणा आला म्हणजे सहजच मनाचा कल योगाकडे जातो व ही योगप्रवृत्ति चित्तवृत्तिनिरोधाकडे लावली म्हणजे मनाचे संकल्प शिवस्वरूप धारण करतात. काकासाहेब या गोष्टी आपल्या आचरणांत प्रत्यक्ष आणून दाखविण्याच्या प्रयत्नांत होते.

काकासाहेब या कालांत निवृत्त कर्मयोग्याच्या पायरीवर होते. प्राप्त कर्तव्याचा पसारा दक्षतेनें व कुशलतेनें मांडीत असतांनाही मन अंतिम साध्याच्या ध्रुव ताऱ्याकडे अचल ठेवण्यासाठीं जें मनःस्थैर्य लागतें तें प्राप्त करून घेण्याच्या मार्गावर काकासाहेब होते. लहानपणापासूनच त्यांचा ईश्वरभक्तीकडे कल होता. त्यांची वृत्ति मननशील होती. ते दत्तभक्त होते.

तत्त्वज्ञानानें प्रकाशित व भक्तिभावानें आर्द्र झालेल्या हृदयानें काकासाहेब यावेळीं सांगलीस आले होते. १९२९–३० सालाच्या सुमारास सांगलीस मोठा प्लेग झाला होता. त्यावेळीं झोपड्या बांधण्यासाठीं सांगलवाडीकडील कृष्णाकांठच्या मळ्या उपयोगांत आणल्या गेल्या होत्या. त्यांचे भाचे सांगलीचे इंजिनियर रावसाहेब भावे यांनीं त्या जागेंतील एक मळी खरेदी करून त्यावर एक छोटीशी बाग तयार केली होती. कृष्णाकांठचा तो भाग काकासाहेबांच्या मनांत भरला. कृष्णाकांठ त्यांना फार प्रिय असे. ती त्यांची कर्तृत्वजननी होती. बाहेर खेळून दमल्यावर जशी

लहान बालकें आईकडे धाव घेतात तसें काकासाहेबांचें होतें. कृष्णेकडून मिळविलेली स्फूर्ति त्यांनीं सर्व महाराष्ट्रभर पसरून दिली होती, तिनें दिलेलें तेज त्यांनीं आपल्या सर्व देशबांधवांच्या हृदयांत प्रस्थापित केलें होतें. कृतकार्य होऊन ते परत मातेकडे तिच्या प्रेमळ सहवासासाठीं आले होते. यामुळें ते यावेळीं सांगलीस आले असतां कृष्णाकांठीं श्री दत्ताची स्थापना करावी अशी त्यांच्या मनाची स्फूर्ति होऊन त्यांनीं आपल्या मनांत पसंत झालेली जागा खरेदी केली व तेथें एक छोटेसें मंदिर बांधून त्यांत त्रिमूर्ति दत्तात्रयाची विधियुक्त स्थापना केली.

ते जन्मापासून दत्ताचे उपासक होते. ही त्यांची हृदयस्थ भावना त्यांच्या जीवनांत वरचेवर प्रगट होत होती. या आपल्या दत्तभक्तीबद्दल काकासाहेबांनीं आपल्या आत्मनिवेदनपर आठवणींत पुढीलप्रमाणें उल्लेख केलेला आहे.

‘ माझे वडील व त्यांचे बंधू काशिनाथपंत यांनीं देशावर येतांना नरसोबाच्या वाडीस दत्ताचें दर्शन घेतले व हें दर्शन घेण्याचा रिवाज पुढें सतत पाळला. माझ्या वडिलांनीं गुरुचरित्राची हस्तलिखित प्रत तयार केली होती. ती अद्याप आमच्या घरीं आहे. काशिनाथपंतांच्या पहिल्या कुटुंबाच्या एका चिरंजीवांचें—वासुअण्णांचें—लग्न झालें नव्हतें. त्यांनीं नरसोबाच्या वाडीस मोठी तपश्चर्या केली आणि त्यानंतर त्यांना माझ्या वडील बंधूंनीं व्हॅक्सिनेटरची जागा मिळवून दिली. ते सांगलीस असतांना दर शनिवारीं वाडीस दत्ताची पालखी निघत असे. आमच्या घराण्यांत मूळ दत्तभक्ति होती. वासुअण्णामुळें माझ्या ठिकाणीं तिचा उद्भव झाला व वयाच्या साठाव्या वर्षी सांगलीवाडीस मीं दत्ताचें मंदिर बांधलें. ’

काकासाहेबांच्या जीवनाची व कर्तृत्वाची बैठक प्रथमपासूनच भारतीय संस्कृतींतील उदात्त मूल्यावर अधिष्ठित झाली होती. म्हणूनच त्यांनीं अखंड देशसेवेचें खडतर व्रत स्वीकारलें व संपादकीय व नाट्यविषयक

कर्तृत्व लोककल्याणासाठींच उपयोजिलें. साबरमतीच्या कांठच्या कारावासां-तील तत्त्वज्ञानाच्या दीर्घ अभ्यासानें त्यांच्या मननशील प्रवृत्तीस नवी दिशा लागली. त्यांनीं वैदिक वाङ्मयाचा वैशिष्ट्यपूर्ण दृष्टीनें व चिकित्सक बुद्धीनें अभ्यास केला. काकासाहेबांच्या जीवनांत मननाला आजपर्यंत प्राधान्य होतें. पण तुरुंगांतील ज्ञानेश्वरीच्या योगाभ्यासाच्या प्रकरणांनीं त्यांचें मन इतकें आकृष्ट केलें कीं त्यांना पुन्हां आपले अभ्यासू तरुण विद्यार्थीजिवन आठवलें. या विषयावरच्या आपल्या कल्पनांच्या स्पष्टीकरणार्थ त्यांनीं अनेक संस्कृत मराठी व इंग्रजी ग्रंथ बारकाईनें अभ्यासून टाकले व या अभ्यासाच्या परिपूर्त्यर्थ आपल्या घरीं ज्ञानेश्वरीवर रोज सायंकाळीं या-प्रमाणें सुमारें आठ महिने प्रवचनें दिलीं.

या खोल चिकित्सक व अनुभवपूर्ण अभ्यासाचा परिपाक त्यांचे तत्त्व-ज्ञानग्रंथावलींत सुस्पष्ट रीतीनें दिसून येतो.

सार्वजानिक कार्यांतून जरी ते निवृत्त झाले होते तरी आपलें लोकजागृतीचें कार्य तत्त्वज्ञानावरील प्रवचन रूपानें साधण्याचें त्यांनीं मनाशीं निश्चित केलें होतें. त्यांच्या मनामध्यें उत्पन्न झालेली वैराग्यवृत्ति कर्मसाफल्यांतून निर्माण झालेली होती. त्यामुळेंच विरागी ऋषींचे लोककल्याणाचे मार्ग त्यांनीं पूर्णपणें अनुसरले. वैदिक वाङ्मयाच्या आधारानें समाजाचें सामु-दायिक जीवन मंगलमय होईल अशी शिकवण देण्याची त्यांची तयारी चालू झाली. लोकजागृतीचें व देशसेवेचें अखंड व्रत त्यांनीं स्वीकारलें तें संपादकीय लेखनानें व परिणामकारक नाट्यकृतीनें त्यांनीं आजपर्यंत चाल-विलें होतें. हा मार्ग आपल्या मागून येणाऱ्या पिढीवर सोंपवून पुढच्या पायरीच्या अधिक उज्ज्वल अशा आध्यात्मिक मार्गानें तेंच कार्य करण्याचें आतां त्यांनीं ठरविलें. सांगलवाडीच्या श्रीदत्त मंदिराची स्थापनाही या सर्व उच्च मानसिक विचारांच्या सिद्धीची नांदी होती.



: १६ :

## वैदिक तत्त्वज्ञानाचा प्रसार

'मधु ( वक्ष्यामि ) जगांत मधु सर्वत्र रहावा ही आमची अंतःकरणापासून प्रगट होणारी प्रवृत्ति आहे. या मधूचा सर्वत्र फैलाव व्हावा म्हणून बोलूं, प्रचार करूं, दुसऱ्यांना सांगूं हेंच काम जिकडे तिकडे होईल व देवांनाही पसंत पडेल असें करूं आणि म्हणून देव आमचें रक्षण करोत, आमचे पूर्वज ही आमची कृति पाहून आनंदानें धन्योद्गार काढोत व आमचें कार्य सुशोभित करोत.'

—खाडिलकरांचा रुद्र.

काकासाहेबांचें मन तत्त्वज्ञानांत रममाण होत होतें. कोणत्याही गोष्टीकडे ते उच्च तात्त्विक भूमिकेवरून पाहात व त्या अनुरोधानें त्याचें स्पष्टीकरण करीत. याच वेळीं गंधर्व नाटक मंडळीनें त्यांचें सावित्री नाटक रंगभूमीवर आणलें. त्यांत काकासाहेबांचा तात्त्विक दृष्टिकोन किती परिणत दशेस आला होता याचें प्रत्यंतर पहावयास मिळतें. सावित्रीनें यमधर्म मृत्यूस आपल्या सतीत्वानें जिंकलें ही भारतीय पौराणिक कथा अत्यंत रम्य आहे.

काकासाहेबांनीं हें सहज रम्यत्व आपल्या तत्त्वज्ञानप्रधान लेखणीनें अत्यंत परिणामकारक व रसभरित केलें आहे. आपल्या पतीला जिवंत करण्याची दैवी शक्ति पौराणिक सावित्रीप्रमाणें खाडिलकरांच्या सावित्रींत तिच्या पतिनिष्ठेंत आहे. पण त्यांनीं आपल्या सावित्रीची पतिनिष्ठा सत्यवानाच्या बाह्यगुणांपेक्षां त्याच्या मातृपितृसेवेच्या गुणवैशिष्ट्यावर आधारलेली दाखविली आहे. यामुळें मृत्यूवर जय मिळविण्याचें अवघड तत्त्वज्ञान त्यांनीं व्यावहारिक स्त्रीपुरुषांस कळण्याइतकें सोपें व आकर्षक केलें आहे. वर संशोधनार्थ निघालेल्या सावित्रीला सत्यवानाचें दर्शन झाल्याबरोबर सावित्रीच्या मुखांतून ही भाषा बाहेर पडते—

'हीच, हीच ती मूर्ति ! माझ्या मनांत ठसलेली हीच ती मूर्ति ! नारदमुनींनीं बाबांच्या सांगण्यावरून भागवतधर्माचा उपदेश करतांना भगवानाच्या ज्या मूर्तीचें ध्यान मला शिकविलें तीच ही मूर्ति ! परमेश्वर मूर्तिमंत पुढें अवतरला आहे असें वाटतें ! बायकांना पतीवांचून अन्यदेव नाहीं म्हणतात त्याची सत्यता यावेळीं पूर्णपणें या मूर्तीनें मला पटविली आहे.'

आदर्श वधू म्हणून सावित्री रंगवीत असतांनाच ती हिंदुसंस्कृतींतील स्त्रीहृदयाची एक प्रतीक, अशी दाखविली आहे. ती धर्माधर्म जाणून वागते. कायावाचामनानें एकदां त्रिकरणपूर्वक पतिनिश्चय झाल्यावर जरी तिला सत्यवानाच्या मृत्यूची सूचना मिळाली तरी ती यत्किंचितही विचलित झाली नाहीं. तिनें आईबापांनां व नारदमुनींना 'माझें प्रेम मृत्यूसकट तिकडच्या चरणांचा स्वीकार करीत आहे,' असें धीरोदात्त उत्तर दिलें. नारदमुनींनींही 'याच तपश्चर्येच्या जोरावर तुला यमधर्माचें दर्शन घडेल आणि तुझ्या इच्छेविरुद्ध तुझ्या नि सत्यवानाच्या प्राणांची ताटातूट यमही करूं शकणार नाहीं' असा आशीर्वाद दिला. नारदमुनींच्या आशीर्वादानें सत्यवानाचे हरण झालेले प्राण यमधर्मापासून परत मिळविण्यास समर्थ झालेली सावित्री पुढें त्याच्याच तत्त्वाला अनुसरून आपलें कार्य सिद्धीस नेते.

यमधर्माकडून त्यांनीं दिलेल्या वरांची पूर्तता करून घेत असतांना तिनें

प्रथम सत्यवानाच्या प्राणाची भिक्षा मागितली नाहीं हें लक्षांत घेण्यासारखें आहे. तिनें प्रथम त्याच्या शीलाची भिक्षा मागितली.

'आईबापांची सेवा हेंच त्यांचें मुख्य व्रत. त्यांनीं जें मागितलें असतें तेंच मी आतां मागून घेतें.'

असें म्हणून तिनें प्रथम आपल्या सासऱ्याची नष्ट झालेली दृष्टि व गेलेलें राज्य परत मागितलें. नंतर स्वतःच्या आईबापांना पुत्रपौत्राचें सुख मागून घेतलें. आणि शेवटीं आईबापांबद्दलच्या श्रद्धायुक्त भावनेनें लीन होऊन 'आपल्या पतीचे प्राण व आपल्याला पुत्रपौत्रांचें सुख मिळावें' असा आशीर्वाद तिनें मिळविला. सतीधर्माच्या आचरणानें तिनें हें साधलें. साध्वी स्त्रीच्या उच्च मनोवृत्तीचें हें भावदर्शक चित्र, त्याच्या मागील तत्त्वज्ञान ठसठशीतपणें रंगवून काकासाहेबांनीं अत्यंत उठावदार केलें आहे. काकासाहेबांचें हें नाटक १९३३ च्या मार्च महिन्यांत रंगभूमीवर आलें.

मे महिन्याच्या सहा तारखेस म्हणजे वैशाख शुद्ध एकादशीस सांगलीस कृष्णाकांठीं श्रीदत्ताची विधिपूर्वक स्थापना झाली. श्रीदत्तमंदिरापुढें सभामंडप असून सभोंवतीं फळाफुलांची बाग केली आहे. तसेंच जवळच स्वतःच्या राहण्यासाठीं त्यांनीं एक बंगलीवजा लहानशी पर्णकुटी तयार करविली आहे. दत्ताची मूर्ति जयपुराहून मुद्दाम सुंदरशी मागवावी असें त्यांच्या मनांत होतें. एक दिवस वासुकाका जोशी यांचा मुक्काम मुंबईस असतां हा विषय निघाला. ताबडतोब ते बाजारांत गेले. चौकशी करतां जयपूरहूनच आणलेली एक सुंदर मूर्ति त्यांना मूर्ति विकणाऱ्याकडे मिळाली. मूर्ति पाहून काकासाहेबांच्या कविमनाला आनंद झाला. तीच मूर्ति विकत घेण्यांत आली व तिची सांगलीस मंदिरांत रीतसर स्थापना झाली. श्रीदत्त स्थापनेच्या दिवशींच त्यांचें पहिलें प्रवचन दत्तापुढील सभामंडपांत झालें.

## वैदिक वाङ्मयाचें परिशीलन

साबरमती कांठच्या सरकारी आश्रमांत असतां काकासाहेबांनीं ज्ञानेश्वरीचीं पारायणें केलीं. ती वाचीत असतां त्यांना असें आढळून आलें

कीं ज्ञानेश्वरीसारखा अमोल ग्रंथ निर्माण करण्याच्या अगोदर ज्ञानेश्वरमहाराजांनीं प्रत्यक्ष उपनिषदांचें व षड्ग्रंथांचें परिशीलन केलेलें असलें पाहिजे. हें लक्षांत आल्यावर त्यांनीं स्वतः या ग्रंथांचा अभ्यास तुरुंगाबाहेर आल्यावर सुरू केला. त्यांत योगवासिष्ठासारख्या प्रचंड ग्रंथाचा त्यांनीं साकल्यानें अभ्यास पुरा केला. यानंतर त्यांचें लक्ष रुद्राकडे गेलें. रुद्र हें उपनिषद असून सर्व नित्यनैमित्तिक खटाटोपांतून मुक्त झालेल्या संन्याशांनींही त्याचें पठण करावें अशी माहिती त्यांना उपनिषदांत आढळली. तेव्हां त्यांनीं रुद्राची संथा घेण्यास आरंभ केला. सकाळीं संथा व दुपारीं भाषांतराची व तद्विषयक कल्पनेसंबंधीं संशोधनात्मक पुस्तकें वाचावयाचीं, असा काकासाहेबांचा नित्यक्रम असे. रुद्रामागून पुरुषसूक्त व ऐतरेय, ईशावास्य, तैत्तरीय वगैरे उपनिषदें तसेंच बृहदारण्यकांतील याज्ञवल्क्य मैत्रेयी संवाद, संध्यावंदन, त्रिसुपर्ण, ॐकारोपासना वगैरे वैदिक वाङ्मयांतील प्रकरणांचा त्यांनीं एकामागून एक असा खोल अभ्यास केला.

वैदिक वाङ्मयाची त्यांना अत्यंत गोडी लागून या जगदुद्धारक तत्त्वज्ञानाचा प्रचार करणें हेंच त्यांनीं आपलें जीवनकार्य ठरविलें. दत्ताचे मंदिरांत सांगलीस त्यांचें पहिलें प्रवचन झालें. या त्यांच्या कार्याचा प्रथमारंभींचा ॐ कार होता. जीवनाचें रोजचें तत्त्वज्ञान त्यांच्या दृष्टीनें भिन्न नव्हतें. तत्त्वज्ञानाची बैठक आपल्या सर्व तऱ्हेच्या व्यापारांना यशस्वी करते ही त्यांची श्रद्धायुक्त विचारसरणी होती. ज्ञानेश्वरी, उपनिषदें इ० वेदान्त विषयावर जरी त्यांचीं प्रवचनें चालत तरी तीं समजावून सांगतांना चालू राजकारणांतील घडामोडींचीं उदाहरणें ते आपल्या प्रभावी भाषाशैलीनें देत असत.

ता. ८ मे १९३३ रोजीं महात्मा गांधींनीं तुरुंगांत हरिजनांच्या सेवेसाठीं आत्मशुद्ध्यर्थ २१ दिवसांचा उपवास सुरू केला होता. त्या प्रसंगाच्या अनुरोधानें काकासाहेबांनीं आपल्या एका प्रवचनांत म. गांधींचें तत्त्वज्ञान

इतकें सुस्पष्ट, उद्बोधक व तन्मयतेनें मांडिलें कीं त्यांची स्मृति त्या काळच्या श्रोत्यांना कायमचीच राहिली आहे. महात्माजींचें हें उपोषण चालू झाल्याबरोबर सरकाला अशी धास्ती बसली कीं, या उपोषणानें गांधीजींना मृत्यु येईल. पण त्यांची पुण्याई इतकी अल्प नव्हती. त्यांचा संकल्प पुरा झाला. उपोषण निर्विघ्नपणें पार पडलें. पण सरकारनें गांधीजींना सोडून दिलें. सुटल्याबरोबर पुण्यास सर्व काँग्रेस कार्यकर्त्यांची सभा भरविण्यांत आली. परिषदेंत काँग्रेसनें सामुदायिक कायदेभंग बंद करावा व त्याऐवजीं वैयक्तिक कायदेभंग सुरू करून त्याचें मार्गदर्शन महात्माजींनीं करावें असें ठरलें. काकासाहेबांनीं आपल्या प्रवचनांत या सर्व घटनांची सांगोपांग चर्चा केली व यामागील भव्य व तेजस्वी तत्त्वज्ञान श्रोत्यांच्या पुढें मांडलें. काकासाहेबांचीं प्रवचनें सर्वथा लोकजागृतीसाठींच होतीं. ते लोकांत असूनही बाह्य-विषयांपासून निवृत्त अशा मुनिवरांसारखे होते.

## नागपूर साहित्यसंमेलन

याच सालच्या डिसेंबर महिन्यांत नागपूरच्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष-स्थानीं त्यांची एकमतानें निवड झाली. तेथें जें त्यांचें अध्यक्षीय भाषण झालें त्यावेळीं एक प्रथितयश नाट्याचार्य अगर एक कर्तृत्ववान् पत्रपंडित बोलत आहेत असें न वाटतां एक कृतकार्य तपस्वी मराठी वाङ्मयाच्या त्रिकाला-बाधित स्थितीचें व कार्याचें तत्त्वज्ञानच सांगत आहे असें वाटलें.

काकासाहेबांच्या नागपूर साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदामागें थोडा इतिहास आहे. सन १९२१ सालीं बडोद्याच्या साहित्यसंमेलनांत नागपूर-करांतर्फे पुढील संमेलनाचें आमंत्रण देण्यांत आलें. पण संमेलनाचें अध्यक्ष-पद कोणास द्यावें याबद्दल निष्कारण मतभेदाचें वादळ इतकें तीव्र वाढलें कीं अखेरीस नागपूरचें संमेलनच रहित करावें लागलें. नागपूर वऱ्हाडांत पूर्वीपासूनच काकांच्याबद्दल अतिशय प्रेमादर वसत होता. यामुळें नागपुरास होणाऱ्या साहित्यसंमेलनाचे अध्यक्षस्थानीं काकासाहेबच आले पाहिजेत असें

त्यांचें आग्रहाचें सांगणें होतें. वीर वामनराव जोशी, लोकनायक मा. श्री. अणे, 'महाराष्ट्र'चे ओगले, बामणगांवकर, प्रो. बेहेरे व तरुण माडखोलकर इत्यादि सर्व वृद्धतरुण साहित्यिकांना काकासाहेबांविषयीं नितांत आदर वाटत होता. अनेक राष्ट्रीय पक्षांतील मंडळींनाही पण काकासाहेब प्रिय व हें प्रेम कायम स्वरूपाचें, यामुळें त्यावेळीं रहित झालेलें साहित्यसंमेलन पुढें बरोबर एक तपानें नागपुरासच करण्याची वेळ येतांच काकांची अध्यक्षपदाची निवडणूक जवळजवळ जिंकिल्यासारखीच होती. आणि प्रत्यक्ष निवडणुकींत खरीच ठरली.प्रचंड बहुमतानें एकमतानेंच म्हणाना का त्यांचीच निवड झाली व नागपूर साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदाचा मान काकांना मिळाला.

काकांची लोकप्रियता त्यांच्या वीर वृत्ति, स्वातंत्र्यप्रेम व निर्भय तत्त्वज्ञानावर आधारलेली होती. त्यागाचे भूमिकेवर त्यांच्या तत्त्वज्ञानाची उभारणी झाली आहे. फळाची पर्वा न करितां कर्तव्यकर्म करण्यास प्रवृत्त करणारे तेजस्वी तत्त्वज्ञान त्यांचें होतें. ईश्वरी प्रेरणेनें नटलेले तेजस्वी तपस्वी वाङ्मयसेवक काका असल्यानें नागपूरच्या तरुण वृद्ध साहित्यिकांनीं अत्यंत प्रेमादरानें त्यांचीच निवड अध्यक्षपदासाठीं केली. स्वतः काका या मानसन्मानांत अगदींच निरिच्छ होते, त्याच्या अतीत होते. आपल्या६०वर्षांच्या समारंभाला ते विरोधक होते. तो समारंभ सुतराम् होऊं दिला नाहीं. पण साहित्यसंमेलनाच्या अध्यक्षपदांत मानसन्मानापेक्षां कर्तव्यबुद्धीचा भागच जास्त होता. त्या काळीं काका ज्या एका विशिष्ट मनःस्थितींत होते त्या मनःस्थितींत आपल्या हातून हें अध्यक्षपदाचें कार्य–कर्तव्य कितपत पार पडतें अशी शंका त्यांना वाटत होती. आपल्या भाषणांत त्यांनीं ही शंका व्यक्त करून आपण कोणत्या भावनेनें हें स्थान स्वीकारलें याबद्दल पुढीलप्रमाणें चिकित्सा केली आहे.

“ माझ्या मागें गेल्या ३०।४० वर्षांतील निरानिराळ्या प्रकारच्या उद्योगाची बरीवाईट ओझीं आहेत, आणि त्यांतील कांहीं कांहीं ओझीं

फार जड असून सोबतीच्या संतांच्या पाठीवर तीं लादल्याशिवाय मला कोण-ताच मार्ग पाय न अडखळतां किंवा ठेंच न लागतां आक्रमितां येत नाहीं. माझी स्वतःची दुबळेपणाची अशी स्थिति असल्यामुळें दुसऱ्यास त्रास द्याव-यास बाहेर जा कशाला?अशा तऱ्हेचा घरकोंबडेपणा मला स्वीकारावा लागत आहे. पण इतिहासप्रसिद्ध भोसल्यांच्या नागपूरचे लोक वीरवृत्तीचे अस-ल्यामुळें नागपूरच्या कर्तबगारीवर भिस्त ठेवून माझ्यांतील दोष आपण सहज गतीनें खालीं दडपून टाकाल आणि संमेलनाचें कार्य निर्विघ्नपणानें आपण तडीस न्याल असा मला भरंवसा आहे."

त्यांनीं आपल्या भाषणांत साहित्यसेवकांना पुढील मार्ग दाखवतांना सारस्वत आणि जीवन यांची फारकत झाल्यास काय परिणाम होतात याची चिकित्सा केली आहे व ती करितांना ज्ञानेश्वरीपासूनच्या वाङ्मय इति-हासाचें विहंगमदृष्ट्या तत्त्वावलोकन केलें आहे. ज्ञानेश्वरीच्या कार्याबद्दल काकासाहेबांच्या भाषणांत पुढील उद्गार आहेत—

"आपल्याजवळील समाधिस्वरूपाचें धन ज्ञानेश्वरमहाराजांचें हातीं देतांना भक्तिमार्गातील तत्त्वविचारांचा व मराठी भाषेंतील सर्व निवडक शब्द-रत्नांचा आणि साहित्यांचा मोठा पाऊसच आपणांवर गुरूंनीं पाडला आणि त्या तीर्थोदकाचा आपण केलेला निवडक सांठा म्हणजेच आपला ग्रंथ होय, असें ज्ञानेश्वरीच्या प्रेरणेसंबंधाचें वर्णन ज्ञानेश्वरमहाराजांनीं केलें आहे. मोठा आणीबाणीचा प्रसंग आला आहे, आणि या प्रसंगीं सामान्य जनसमूहाला जागृतावस्थेंत ठेवण्याचा जर उपाय योजला नाहीं तर बहुजनसमाजाचा म्हणजे 'जगाचा' नाश होईल, ही महत्त्वाची प्रेरणा म्हणजे नाथसंप्र-दायाचा आदेश किंवा संस्कृत विद्येंत ज्ञानदेवांना तयार केल्यावर निवृत्ति-नाथांनीं त्यांना दिलेली दीक्षा होय! ही दीक्षा आपण पाळली आणि आपल्या सांप्रदायानें व गुरूनें आपणाला निमित्त करून जगाचें संरक्षण केलें, अशा तऱ्हेचे उद्गार प्रेरणेसंबंधाच्या विवेचनांत ज्ञानेश्वरमहाराजांनीं काढले आहेत."

लोकसंग्रहार्थ भाषेची उत्पत्ति आहे या मुद्याची मीमांसा त्यांनीं अशी केली आहे. " बहुजनसमाजास जागें करण्याचा प्रसंग कर्त्या विद्वानांवर येऊन पडलीं म्हणजे त्या त्या वेळच्या त्या समाजाच्या बोलत्या-चालत्या भाषेला शरण जावें लागतें. ही शरण जाण्याची स्थिति–तदर्थ, तन्निष्ठ आणि तत्परायण–ही स्थिति प्राप्त होण्यास त्या त्या भाषेंतील हरेक तऱ्हेच्या गोडीशीं लेखकाचें तादात्म्य व्हावें लागतें. गोडी नाहीं तर समाजाच्या अंतःकरणापर्यंत शब्दच पोंचत नाहींत ! त्यांतच सर्वस्व सुख पाहण्याची संवय मनास लागल्याशिवाय-त्या त्या भाषेंतच मन बांधलें गेल्याशिवाय–म्हणजे मनाचा देशबंध होऊन धारणा शक्ति उत्पन्न झाल्याशिवाय-आणि या बंधाला प्रेमाचें स्वरूप येऊन वृत्ति तल्लीन झाल्याशिवाय किंवा ध्यान लागल्याशिवाय, कार्यनिष्पत्ति किंवा समाधि प्राप्त होत नाहीं. भाषेची उत्पत्तिच मुळीं गोडीकरितां म्हणजे धारणेकरितां, ध्यानाकरितां म्हणजे तल्लीनतेकरितां आणि कार्यनिष्पत्तीकरितां म्हणजे समाधिधनाकरितां होय. शेंदोनशें वर्षांच्या काळानंतर छाप पाडणारे ग्रंथकार अशा समाधिधनानेंच परिपूर्ण असतात. त्यांत नटावें म्हणजे तत्त्वप्रसाद होतो ! मोठमोठ्या क्रांति घडवून आणणाऱ्यांचे ग्रंथ प्रासादिक असतात हें खरें आहे. कारण गोडी व प्रसाद यापासूनच भाषेची उत्पत्ति झाली असें कृष्णयजुर्वेदांत वर्णन आहे."

मराठी भाषेच्या इतिहासांत संतमहंतांचें कार्य वर्णन करितांना श्रीगुरुदत्तात्रेयाचे अवतार श्रीनरसिंहसरस्वती यांचेबद्दल विशेष उल्लेख पुढीलप्रमाणें केला आहे."बैरागी,जोगी व संत महाराष्ट्रांत मंत्रकर्ते म्हणजे लोककर्ते आणि दीक्षाकर्ते म्हणजे मार्गकर्ते, या नात्यानें मुसलमानी अमलांत जोरजोरानें पुढें येत असतांना, शंकराचार्यांनीं संस्कृतांत निर्माण केलेले संन्यासी आपोआपच अस्तास जाऊं लागले. हा संन्याशांचा वर्ग अस्तास न जातां लोकसंग्रहाचें व दीक्षाकाराचें काम त्या वर्गाच्या हातून व्यवस्थित रीतीनें

पार पडावें म्हणून मुसलमानी अमलांतच वऱ्हाड प्रांतांत कारंजें येथें श्रीगुरुदत्तात्रेयाचा अवतार नरसिंहसरस्वतीच्या रूपानें झाला.

श्रीगुरुचरित्रांत या अवताराचीं कारणें सांगतांना हा पुरुष दीक्षाकार होणार आणि एक विचारानें भरलेल्या मंडळ्या स्थापून कलीचें पुढें पडत चाललें पाऊल मागें हटविणार, अशा तऱ्हेचें वर्णन करण्यांत आलें आहे. कृष्णातटाकाच्या एका ठिकाणीं स्नान, दुसऱ्या ठिकाणीं भोजन तर तिसऱ्या ठिकाणीं शयन, असें चळवळीच्या चपलपणाचें वर्णन आहे. असल्या चपळपणाशिवाय फैलावाचें काम त्या त्या प्रसंगाच्या बंधनांतून मुक्त होऊं शकत नाहीं. यवनराजांना त्यांचे रोग बरें करून व त्यांच्यावर अनुग्रह करून आपल्या चळवळीला मदत घेण्यास कृष्णातटाकाच्या दत्तसंप्रदायानें मागें पुढें पाहिलें नाहीं. अंत्यजोद्धार हें महाराष्ट्रांतील संतांचें प्रमुख काम होतें. आणि संस्कृत संप्रदायांतील अत्यंत सोवळ्या व विरक्त संन्याशांच्या समूहाला बौद्धाच्या महायानमार्गाप्रमाणें लोकसंग्रहाच्या कार्यास जुंपीत असतांना नरसिंहसरस्वती योगीराजांनीं 'अंत्यजाचें मुखीं निगमसंपूर्ण' असा चमत्कार केल्याबद्दल जयजयकाराची आरती श्रीगुरुचरित्राचे ग्रंथकार गंगाधरतनय यांनीं केली आहे."

स्वार्थत्यागाची व स्वावलंबनाची दीक्षा जो ग्रंथ देऊं शकतो तो ग्रंथ, त्या भाषेची आई किंवा ती भाषा बोलणाऱ्यांचें शास्त्र आपोआप होतो असें तत्त्व ज्ञानेश्वरी व गीतारहस्याचें वर्णन करतांना सांगून गीतारहस्याची कामगिरी पुढील तऱ्हेनें वर्णन केली आहे. "तत्त्वाबद्दलचा दृढ निश्चय, स्वार्थत्याग व स्वावलंबन या तीन धर्मांचा प्रचार करून ज्ञानेश्वरीनें व संतमंडळीनें मराठी भाषेवर जे उपकार केले, तेच उपकार इंग्रजी विचार पद्धतीच्या सांच्यांत पडलेल्या आजच्या नव्या महाराष्ट्रावर व मराठी भाषेवर गीतारहस्यानें केलेले आहेत ! नव्या आणीबाणीच्या प्रसंगीं हे 'संसाराचें शास्त्र' मी लोकांपुढें ठेवीत आहे असे उद्गार लोकमान्य

टिळक यांनीं गीतारहस्याच्या प्रस्तावनेंत काढले आहेत. हें शास्त्र म्हणजे लाखों लोकांच्या प्रेरणेची आई आहे. गेल्या कांहीं वर्षांच्या विलक्षण चळवळीमुळें महाराष्ट्रांत हजारों लोकांनीं व त्यांच्या लाखों इष्टमित्रांनीं स्वार्थत्यागाच्या व स्वावलंबनाच्या ज्या हालअपेष्टा सोसल्या त्या हालअपेष्टा गीतारहस्यांतील उपदेशानें महाराष्ट्रांतील लाखों लोक आज गोड करून घेत आहेत.

लोकमान्य टिळक यांनीं गीतारहस्यांत कर्मयोगाचा जो सिद्धांत लोकांपुढें मांडला तोच बरोबर असून इतर कोणीही मला दूर लोटलें तरी गीता माउली मला दूर लोटीत नाहीं, इतकेंच नव्हे तर आईप्रमाणें आपल्या मांडीवर डोकें घेऊन थोपटलें अशा तऱ्हेचे उद्गार म. गांधी यांनीं काढले आहेत. ' आणीबाणीच्या प्रसंगीं लाखों लोकांना मनाची शांति देण्याचें सामर्थ्य गीतारहस्यांत आहे. " असें गीता माउलीबद्दल म. गांधींचें मत या चर्चेच्या विवेचनांत दिल्याचें काकासाहेबांच्या मनांतील टिळक गांधी तत्त्वज्ञानाचा समन्वय फार गोड रीतीनें स्पष्ट झाला आहे.

भाषणाच्या शेवटीं, नागपूर विद्यापीठ देशी भाषांचें विद्यापीठ होईल व तसें झाल्याची शुभवार्ता परमेश्वर आपल्या कानीं घालील असा भरंवसा व्यक्त करून व कणखर व समर्थ शरीरानें मराठी भाषेची सेवा करण्याची संधि सर्व तरुणांना मिळावी अशी परमेश्वराची प्रार्थना करून, शांतीच्या मंत्रानें त्यांनीं आपलें भाषण संपविलें. अशा रीतीनें ज्ञानेश्वरीपासून गीता-रहस्यापर्यंत संतमहंत साहित्यिक या सर्वांच्या अवताराचें कार्य एकच म्हणजे ' लोकसंग्रह ' असें तत्त्व विवेचन करून, महाराष्ट्रांतील विचारी सारस्वत भक्त पूर्वीप्रमाणें लोकसंग्रहप्रधान उद्योग जेव्हां करूं लागतील तेव्हांच महाराष्ट्रीय जीवनाला जोराची भरती येईल असा स्फूर्तिदायक आशावाद त्यांनीं या भाषणाच्या निमित्तानें प्रगट केला.

उपनिषदादि तत्त्वज्ञानाचा अभ्यास व प्रचार चालूं असतां नवा-काळचा वाढता व्याप काकासाहेबांनीं आप्पा व त्यांचे सहकारी यांच्यावर

सोंपविला होता. ते मुंबईस असत त्यावेळीं प्रथम प्रथम महत्त्वाच्या प्रसंगीं धोरणाविषयीं संपादक मंडळींशीं चर्चा करीत. पण अग्रलेख वाचून घेणें हें काम मात्र नियमित होत असे. आर्थिक व्यवस्था त्यांना वेळोवेळीं कळविण्यांत येई. स्वाधीन भारताचा संसारही त्यांच्या निदर्शनास आणला जात असे. तो व्याप फारसा लाभदायक नव्हताच यामुळें सरकारनें दडपशाहीच्या वरवंट्यांत जेव्हां स्वाधीन भारताकडून जबर जामीन मागितला तेव्हां तें पत्र काकासाहेबांना बंद करणें भाग पडलें.

दरम्यानच्या काळांत जुनी दडपशाही जोरानें चालूच होती. या काळांत प्रेस ॲक्टचे दोन तडाके नवाकाळास खावे लागले व पांचदहा हजारांचे भरलेले जामीन जप्त झाले. नवाकाळवाडी विकत घेण्यास धाडसानें मोठें कर्ज काढलें होतें. तें डोईजड होत चाललें होतें. काकासाहेब धीर गंभीर वृत्तीनें या घटनांकडे पहात होते.

या काळांत आनंददायक गोष्टी घडल्या त्या म्हणजे दोनच. काकासाहेबांचे द्वितीय चिरंजीव विनायकराव यांचें लग्न व आप्पासाहेबांच्या द्वितीय चिरंजीवांचा जन्म. याचे नांव नीलकंठ ठेवण्यांत आलें. विनायकरावांचें लग्न म्हणजे काकासाहेब व सौ. गौरकाकू यांच्या आयुष्यांतील शेवटचें आनंदाचें कार्य होतें. इचलकरंजीचे श्री. मराठे यांची कन्या कु. यमुताई यांना वधू नेमस्त केलें होतें. कार्य मोठ्या थाटानें पार पडलें. अर्थात् काकासाहेब या सर्व गोष्टीकडे निवृत्तपणें पहात असत.

या सुमारास काकासाहेबांनीं आपलें ‘ बायकांचें बंड ’ हें नाटक सुलोचना संगीत मंडळींकरितां संगीत करून दिलें. यानंतर त्यांनीं लिहिलेलें ‘ त्रिदंडी संन्यास ’ हें नाटक सुलोचना संगीत नाटक मंडळीनें सोलापूर मुक्कामीं रंगभूमीवर आणलें. यापूर्वीच जाहीर झालेलें ‘ देवकी ’ नाटक काकासाहेब पुढें लिहूं शकले नाहींत त्यामुळें हें ‘ त्रिदंडी संन्यास ’ नाटक काकासाहेबांचें शेवटचें नाटक ठरलें. सुभद्राहरण हा सुपरिचित पौराणिक

सौ, गौरकाकू
व सुना



सौ. गौरकाकू



सौ. कमल



सौ. यमुना

कथाभाग आहे. अण्णासाहेब किर्लोस्करांचे याच कथाभागावरचें ' सौभद्र ' नाटक सतत लोकप्रिय होऊन चालू असलेलें असें असूनही काकासाहेबांनीं तेंच कथानक आपल्या वैशिष्ट्यपूर्ण निराळ्या दृष्टीनें नाट्यरसिकांपुढें मांडलें. धनुर्धार अर्जुन व त्याच धनुर्विद्येंत निष्णात झालेली सुभद्रा या परस्पर समगुणामुळें अर्जुन सुभद्रा यांना एकमेकांचें आकर्षण व प्रेम वाटतें व अशी स्थिति असूनही तात्पुरता संन्याशाचा वेश घेऊनच विशिष्ट परिस्थितींत सुभद्रेची कशी प्राप्ति होते हें अगदीं नव्या तत्त्वज्ञानाच्या पद्धतीनें पण नाट्यपूर्ण रीतीनें काकासाहेबांनीं दाखविलें आहे हें नाटक बसवण्याच्या कामीं काकासाहेबांनीं आपल्या विरक्त मनःस्थितींत शक्य तेवढें लक्ष दिलें.

**संकटपरंपरा**

यानंतर थोड्या दिवसांतच काकासाहेबांच्या विरक्त मनालाही कालानें एक मोठा धक्का दिला. यावेळीं काकासाहेब सांगलीस एकटेच आले होते. व नित्याप्रमाणें आपल्या दत्त मंदिरांतील सभामंडपांत त्यांचीं प्रवचनें चालू होतीं. ' सौ. गौरकाकू आजारी असून भीतिदायक परिस्थितींत आहेत. तातडतोब निघून या ' अशी मुंबईहून त्यांना सांगलीस तार आली. लगेच दुसरे दिवशीं मी व काकासाहेब मुंबईस जाण्यास निघालों. सौ. गौरकाकूंना प्रथम पायास टाचरूं झालें होतें. तें साधें टाचरूं समजून बरेंच दिवस औषधोपचार सुरू होते. पण ते बरेंच होईना म्हणून डॉक्टरांना शंका आली. सूक्ष्म तपासाअंतीं त्यांना मधुमेह विकार असल्याचें समजलें. हें ध्यानीं येईपर्यंत पाय घोट्यापासून गुडघ्याच्या वरपर्यंत रोगव्याप्त झाला होता व ऑपरेशन सत्वर करणें हाच उपाय त्यावेळीं डॉक्टरांना दिसत होता. म्हणून काकासाहेबांना तार केली होती. जीवित रक्षणास त्यांचा पाय कापणें येवढाच इलाज असल्यानें काकासाहेब मुंबईस आल्याबरोबर त्यांच्या संमतीनें ऑपरेशन केलें. पाय गेला पण जीव वांचला असें कांहींसें समाधान काकासाहेबांस होतें. पण ' पाय गेलेल्या स्थितींत जिवंत राहिलें '

डगमगले नाहींत नवाकाळवाडी विकून कर्ज निवारण करण्याचें त्यांनीं निश्चित केलें. सुदैवानें त्यांची वृत्तपत्र तपश्चर्या फळास आली. ईश्वरी कृपेनें नवाकाळवाडीस चांगली किंमत आली त्यांतून बहुतेक कर्ज निवारतां आलें व पुन्हां शेणवी वाडींत दुसरी एक पूर्वापेक्षां जरा लहान जागा खरेदी करतां आली. यामुळें एका तऱ्हेनें एका जागेंतून दुसऱ्या स्वतःच्या मालकीच्याच जागेंत नवाकाळचें स्थलांतर झालें. या जागीं नवाकाळचा संसार नेण्यांत आला सर्वांच्या मनाला जरा बरें वाटलें. जीवनांतील या अत्यंत क्लेशदायक कठीण प्रसंगांतून काकासाहेब आपल्या स्थिरबुद्धीनेंच पार पडले.

## प्रवचनांचे दौरे

आर्थिक व इतर प्रापंचिक अडचणींना अशी शौर्यशाली धडक देत असतां काकासाहेबांची उपनिषदादि वैदिक विषयावरील प्रवचनें देण्याचें कार्य चालूच होतें. नवाकाळवाडी स्वतःची झाल्यापासून नवाकाळ तर्फे स्वतःचा गणपती-उत्सव वाडींत साजरा होत असे व त्या उत्सवाचे वेळीं दरसाल काकासाहेब आपलीं प्रवचनें देत असत. पुढें सांगलीस दत्त-मंदिराची स्थापना करून तर काकासाहेबांनीं आपल्या तत्त्वप्रचारासाठीं स्वतंत्र व्यासपीठच निर्माण केलें होतें. तथापि येवढ्यानें त्यांचें समाधान होणें अशक्य होतें. त्यांना आपल्या ज्ञानाचा जनतेस अधिकाधिक फायदा करून द्यावयाचा होता. पारमार्थिक तत्त्वज्ञानाच्या बैठकीवर इहलोकांतील आपला साधा संसार कसा मंगलमय करतां येतो, कसा यशस्वी करतां येतो याचा जास्तींत जास्त प्रचार त्यांना करावयाचा होता. उतारवयाकडे न पाहतां, कोणत्याही गांवाहून त्यांना व्याख्यान देण्यास आमंत्रण आलें असतां ते तावडतोब होकार देत. सातारा आणि सोलापूर या दोन्ही ठिकाणीं त्यांनीं वैदिक उपनिषदांच्या विषयावर व शतपथ रुद्रावर अकरा अकरा व्याख्यानें दिलीं. १९३६ सालीं बालाजी मंदिरांत नाशिक मुक्कामीं काकासाहेबांची ॐकाराची उपासना या विषयावर सात व्याख्यानें झालीं. इंदुरासही ते प्रवचनें देऊन आले.

सांगली हायस्कूलच्या १९३७ सालच्या संमेलनप्रसंगीं काका प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. त्यावेळीं श्रीमंत राजेसाहेब र या प्रसंगीं उपस्थित होते त्यांनीं विद्यार्थ्यांना उपदेश करण्यासाठीं ि हा विषय घेतला. या वेळच्या त्यांच्या विवेचनांत वैदिक तत्वज्ञ व्यवहारांत उपयोग करून घेण्याची त्यांची जी विशेष दृष्टि असते उत्तम प्रत्यय येतो. या व्याख्यानांत त्यांनीं आपल्या पूर्वायुष्यांतील लींत घालविलेल्या काळांचे आत्मनिवेदनपर उल्लेख पुष्कळ केले व पण त्यापेक्षां विद्यार्थ्यांच्या पुढें त्रिसुपर्ण विषय निवडण्याच्या कार त्यांनीं जी मीमांसा केली ती अत्यंत उद्बोधक व तरुण पिढीला मार्ग अशी होती. त्यांनीं पुढीलप्रमाणे विवेचन केलें—

' त्रिसुपर्णावरील सायनाचार्यांच्या भाष्याचा प्रारंभच त्यांनीं असा आहे कीं, विद्या संपादन करण्यांत आपल्या पापाकडून जे अडथळे ते दूर करण्यास या मंत्राचें पठण उपयोगी पडतें. ज्ञान प्राप्त व्हावें आपण आरंभ करतों पण तें प्राप्त होत नाहीं. तें कां होत नाहीं कारणें सांगतांना त्या गोष्टीचा कंटाळा येतो असें कारण सांगितलें या कंटाळ्यालाच फेरबदल, पाप किंवा लहानसा मृत्यु असें म्हणता पाप दूर कसें होईल, ज्ञानप्राप्तीच्या मार्गांतील हा अडथळा कसा न होईल हेंच या मंत्रांत सांगितलें आहे तेंच आज मी तुम्हां विद्या सांगणार आहे. त्यामुळें तुमचेंही कार्य होईल व माझेंही कार्य होईल.

असा प्रारंभ करून व आपल्या वेळच्या व आतांच्या विद्यार्थीद फरक सांगून पराक्रमाला हल्लीं किती वाव आहे याचें त्यांनीं त्रिसुप ऋचांचा अर्थ उलगडून दाखवून विवेचन केलें. शेवटीं त्यांनीं पुढील विद्यार्थ्यांना संदेश दिला—' तरुणांनो, विद्यार्थ्यांनो, तुम्ही आत्मयज्ञी ही त्रिसुपर्णाची तेजस्वी शिकवण मनांत बाळगा, म्हणजे ती तु अंतःकरणांत शांति व सत्कार्याची गोडी निर्माण करील.'

प्रवचनांची त्यांच्या मनाची ओढ अशी वाढत होती तर संसारांतील त्यांचे मानसिक क्लेशही वाढत होते. विनायकरावांचें दुखणें फारसें कमी झालें नव्हतें म्हणून सौ. गोरकाकू व विनायकराव यांच्यासह ते सांगलीस दत्त मंदिरांत येऊन राहिले. तुरुंगांत त्यांना अत्यंत खडतरपणांत दिवस काढावे लागले होते व त्यामुळें त्यांची शरीरप्रकृति अगदीं ढासळून गेली होती. ती जी एकदां ढासळली ती पुन्हां पूर्ववत् होऊं शकली नाहीं. त्यांत त्यांना स्वतःला किंचित् मधुमेहाचा विकार होतांच अशा शारीरिक स्थितींत प्रवचनाच्या दौऱ्यांचा त्यांच्या प्रकृतीवर अनिष्ट परिणाम झाला. सांगलीच्या उष्ण हवेनेंही त्यास हातभार लावला. तो १९३८ चा एप्रिल महिना होता. सांगलीस आले ते आसपासच्या गांवीं प्रवचनाच्या दौऱ्यास गेले. त्यांनीं आपल्या उगार खुर्द गांवास भेट देऊन चि. नानांचें कार्य पाहिलें व मंदिरांत प्रवचन दिलें. त्यांना उगार नागरिकातर्फे मानपत्र देण्यांत आलें. फाल्गुन शुद्ध ११ स त्यांचे कृष्णातीर नरसिंहवाडीस श्रीदत्तमंदिरांत प्रवचन झालें तेंच त्यांचें बऱ्या प्रकृतींतील शेवटचेंच प्रवचन ठरलें. दुसरेच दिवशीं स्वतःच्या मळींतील दत्तापुढें नित्याप्रमाणें फेऱ्या घालीत असतां त्यांना एकाएकी अर्धांगाचा झटका आला. याचा अंदाज प्रथम लागला नाहीं, पण पुढें तो जोराचा नव्हता असें दिसून आलें. त्यांच्या वाचाशक्तीवर त्याचा परिणाम झाला. जीभ झटकन वळेना व शब्द नीट आठवेनात आपली वाक्शक्ति विकल झालेली पाहून त्यांना फारच वाईट वाटलें. निग्रहपूर्वक प्रयत्न व औषधोपचार यानें ती व्यथा नाहींशीं करितां येईल अशी त्यांना खात्री वाटे ते प्रयत्नास लागले. यापुढें आपण वैदिक वाङ्मयाच्या प्रचारार्थ जीवंत आहों व तेंच कार्य करीत राहावयाचें असें त्यांनीं निश्चयपूर्वक ठरविलें होतें व निग्रहपूर्वक प्रयत्नानें तशाही स्थितींत त्यांना थोडें यश आलें.



*

## : १७ :

# स्थितप्रज्ञ



दुःखेषु अनुद्विग्नमनः सुखेषु विगतस्पृहः ।
वीतरागभयक्रोधः स्थितधीः मुनिरुच्यते ॥

—भगवत्गीता.

काकासाहेबांना अर्धांगाचा झटका आला म्हणजे त्यांच्यावर एक मोठाच दैवी आघात झाला यांत शंका नाहीं. त्यामुळें त्यांचें शरीर बलहीन झालें आणि वाचाशक्ति त्रुटित झाली. महत्त्वाकांक्षी व मानधन मनाला या घटनेचा जबरदस्त धक्का बसण्यासारखा हा प्रसंग होता. अशावेळीं किंकर्तव्यता व औदासीन्य यांचा पगडा व्याधिग्रस्त मनावर शारीरिक रोग अधिकाधिक वाढविण्यास कारणीभूत होतो. काकासाहेबानांही हा धक्का कमी जाणवला असें नाहीं. पण त्यांचें जीवनच आजपर्यंत अशा अनेक धक्क्यांनीं भरलेलें नाहीं का ? प्रत्यक्ष त्यांच्या जन्माची कथा, त्यानंतरचें त्यांचें शिक्षण, लोकमान्यांशीं जोडगण व त्यांचा तुरुंगवास, नेपाळचा अज्ञातवास, लोकमान्यांचा दुसरा तुरुंगवास व केसरींतून तात्पु-

रतें निघणें, लोकमान्यांचें निधन व केसरीशीं कायमचा संबंध तुटणें मग लोकमान्यांतील शह, मग नवाकाळची सांपत्तिक आपत्ति !—त्यांचें जीवन म्हणजे सततच्या आणीबाणीच्या लढ्यांची एक मालिकाच आहे ! काकासाहेब लहानपणापासूनच श्रद्धावान् तत्त्व विवेचक होते. लहानपणची श्रद्धायुक्त गुरुभक्ति नंतर गीतेचा व इतर तत्त्वज्ञानाचा तौलनिक अभ्यास व पुढें लोकमान्यांचा पवित्र सहवास यामुळें ते मनाच्या वरच्या वरच्या पायऱ्या चढत होते. त्यांच्या जीवनांतील एकेक नवी आपत्ति त्यांच्या तत्त्वज्ञानी मनाला एकेक नव्या धड्यासारखीच उपयोगी पडत असे. सर्व ऐहिक झगड्यांकडे ते उच्च भूमिकेवरून पाहात. त्यांचें जीवन स्वतःसाठीं नव्हतें. त्याचे तत्त्वज्ञानी मन, स्वतः जीवनालाच एक अखंड झगडा समजे. लोकहितार्थ झटणाऱ्या देशसेवकासही स्वतःशीं व अन्यांशीं नेहमीं युद्ध करीतच रहावें लागतें असें ते म्हणत असत.

ही युद्धाची कल्पना काकासाहेबांनीं रुद्रावरील आपल्या एका प्रवचनांत एकाच वाक्यांत सांगितली आहे. ' विश्वांतील लढाई ऊर्फ पराकाष्ठेचा उद्योग राष्ट्रांतील लढाई—व्यक्तीची स्वतःशीं लढाई—अशा तीन नात्यांनीं रुद्र ही देवता युद्धाची आहे. '' या त्रिविध समरप्रसंगांतून काकासाहेबांना जावें लागलें. अशा युद्धांत यशस्वी होण्यास लागणारे गुण व अस्त्रें त्यांच्याजवळ होतीं. तीं वापरून ते यशस्वी झाले. कर्मयोगाच्या मार्गानें प्राप्तकर्तव्याचें आचरण करून ते स्थितधी झाले, मुनिवर झाले. त्यागी वृत्ति लहानपणापासून त्यांचे अंगीं मुरली होती. करारी बाणा व वीरवृत्ति हा त्यांचा पिंड असल्यामुळें लोकमान्यांच्या केसरींत त्यांनीं शूरपणानें उडी घेतली व देशसेवेचें खडतर व्रत आमरण आचरिलें. नाटकांची निर्मिति केली ती देशसेवेसाठीं, लोकजागृतीसाठीं, श्रेष्ठ ध्येयवादाकरितां, पत्रकार झाले ते लोककल्याण साधावें म्हणून, देहदंड सोसला तोही देशासाठींच ! देश हाच त्यांनीं देव मानिला.

हृदयाच्या असल्या अत्यंत उच्च स्थितीस पोंचण्याला स्वार्थनिरपेक्षतादि चारित्र्य त्यांचे ठायीं भरपूर होतें. तें त्यांनीं मनोनिग्रहरूप खडतर तपश्चर्येनें मिळविलें होतें. त्यांनीं जणूं कांहीं षड्रिपूवर जय मिळविला होता ! लोकमान्य टिळक मंडालेच्या तुरुंगांत गेले त्यावेळेपासून त्यांनीं संपूर्ण ब्रह्मचर्याचा स्वीकार केला होता. त्यांचे दुसरे चिरंजीव विनायकराव हे त्यांचें शेवटचें अपत्य ! काकासाहेब व सौ. गोरकाकू यांच्या आयुष्यांतील अनेक घटनांकडे पाहतांना ही एक गोष्ट लक्षांत घेतली म्हणजे हीं दोघें किती उंच पातळीवरून लौकिक व्यवहार करीत होती याची कल्पना येते. नाटकासारख्या व्यवसायांत राहून व्यसन असें त्यांना यत्किंचितही नव्हतें. तंबाखूची संवय मध्यंतरीं थोडी होती ती प्रसंगानें त्यांनीं विनाआयास सोडून टाकली. रसनादि इंद्रियांचे आधीन ते कधींच गेले नाहींत. अशा तऱ्हेनें त्यांनीं काम जिंकला होता.

ते क्रोधी होते. पण त्यांचा राग क्षणिक असे. त्यांनीं कोणाचेंही नुकसान केलें नाहीं. दिसतांना जरी ते उग्र वाटत व अनेकांना त्यांच्याजवळ जाण्यास जरी फार भीति वाटत असे तरी ते अत्यंत सौजन्ययुक्त होते असेंच सर्वांच्या अनुभवास येई. रागाच्या सपाट्यांत एकदम ते कावते. पण लगेच मिनिटाभरांत आपल्या रागाचें कारण ते युक्तिवादानें नीट समजावून सांगत असत. आपणास राग चुकीनें आला असल्यास तसेंही ते सांगण्यास कमी करीत नसत.

कोणत्याही विषयांत त्यांना लोभ नव्हता. ज्या ज्या व्यक्तींशीं त्यांचे संबंध आले त्या त्या व्यक्तींनीं त्यांच्या निर्लोभ वृत्तीची एकमुखानें स्तुतीच केली आहे. लोकमान्यांचे जवळ असतां त्यांनीं पगाराबाबत त्यांचेशीं कधींहीं भाषण केलें नाहीं. नाटकांचे पैसे ठरवितांना नाटक कंपनीची आर्थिक स्थिति ते स्वतःच पहात व त्या हिशेबांतच त्यांस पैसे देण्यास सांगत. ‘लोकमान्यांत’ मूळ-

पगार रु. ५०० ठरला असतांही ते त्या वृत्तपत्राची प्राथमिक स्थिती लक्षांत घेऊन आपणहून रु. ३०० च घेत. नवाकाळसाठीं तर अनेकांनीं अनेक वेळेला त्यांना हजारों रुपये देऊं केले. पैशाची फार गरज असतांही या मोहाला बळी न पडतां त्यांनी या सर्व वेळीं अत्यंत कठोर अशा निस्पृहपणानें आपला नकार जाहीर केला.

मत्सर हा त्यांस माहीतच नव्हता. राजकारणाच्या धकाधकींत त्यांनाही अनेकांवर कडकपणानें टीका करावी लागली. तुटून पडण्याच्या त्यांच्या विशिष्ट पद्धतीमुळें अशी टीका प्रसंगीं खूप कडक असे व टीकाविषय झालेली व्यक्ति अगदीं जर्जर होऊन जात असे. पण या हल्लयांत मत्सराची बारीक छटाही कोणास आढळून येणार नाहीं. आपल्या धंद्यांतील सर्व लोकांना त्यांची अत्यंत मोकळेपणानें मदत असे. त्यांच्या समकालीन एकूणएक सर्व नाटककारांना त्यांनीं पुढें येण्यास मदत कली आहे. अनेक नाटक कंपन्या, नट व वृत्तपत्रें यांना त्यांच्याकडून प्रोत्साहन मिळालें आहे. स्वतःवर होणारी मत्सरी टीका माहीत असतांही त्यांनीं आपलें उदात्त मन या विषयांत कधींही घातलें नाहीं व खाजगी भाषणांतही कोणाबद्दल ते कधींही वाईट बोलले नाहींत.

जीवनांतील अनेक संकटप्रसंगीं त्यांनीं कधींही भय दाखविलें नाहीं. कोणत्याही प्रसंगाशीं अगर कोणत्याही प्रश्नाशीं ते वीरवृत्तीनें सामोरे जात असत व हिरीरीनें झुंजून यशही मिळवीत असत. प्रसंगीं त्यांना अपयशही आलें नाहीं असें नाहीं, पण त्यांच्या धैर्यशाली झुंजीमुळें हीं अपयशस्थळेंही त्यांनीं आपल्या आयुष्यांतील तेजस्वी स्थानें बनवून ठेवलीं आहेत. नित्य व्यवहारांत ते अनेक बऱ्यावाईट लोकांशीं अत्यंत निष्कपटपणानें वागत असत.

याप्रमाणें कामना व जीवाभिलाषा जिंकून लोकव्यवहार करीत असतां ते सिद्धावस्थेला पोंचले होते. त्यामुळें संत तुकाराम महाराजांच्या उक्ती-

प्रमाणें ' तुका म्हणे आतां उरलों उपकारापुरतां ' । असाच भाग त्यांच्या पुढील जीवनाबाबतचा होता. ते स्थितप्रज्ञ होते. साधकावस्थेंतील प्रेरणा त्यांच्या अंगीं मुरली होती. समाजाच्या गरजेचा प्रवाह चालूच असतो. तो त्यांच्याकडून काम करवीत होता. स्थितप्रज्ञांच्या हातून होणारा लोकसंग्रह त्यांच्या आत्मज्ञानानें होत असतो. काकासाहेबांचें ऐहिक जीवन या जन-हितबुद्धीच्या प्रेरणेचें होतें. त्यामुळें त्यांच्यावर येणाऱ्या नव्या नव्या आपत्ति पाहून परिवर्तिजनांचीं हृदयें जरी कळवळून जात तरी अशा आपत्तींच्या वर्षावांत काकासाहेब अलोट धैर्यानें त्यांना एकसारखें तोंड देत असलेलेच दिसत.

अर्धांगाच्या झटक्यांतून ते बरे होत होते. सांगलीस थोडे औषधोपचार झाल्यानंतर त्यांना मुंबईस नेण्यांत आलें. कांहीं महिन्यांनंतर त्यांना थोडी थोडी प्रकृतींत सुधारणा वाटूं लागली. गेलेली शक्ति पुन्हां मिळवीनच अशा निग्रहानें ते औषधोपचार करीत. ते कालांतरानें किंचित बोलूं लागले, व त्यांना नित्यव्यवहारापुरती बोलण्याची अडचण हळूं हळूं कमी झाली तरी त्यांचें बोलणें बरेंच निर्बल व एकेरी स्वरूपाचें असे.

' संध्याकाळ '

या वेळीं दुसरें महायुद्ध चालू झालें. लढाई कलाकलानें वाढत होती. नव्या घडामोडी होत होत्या. नवाकाळचा खप वाढत होता. प्रांतिक स्वायत्ततेखालीं कॉंग्रेसनें अधिकारग्रहण केल्यानें मुंबईप्रांतांतही कॉंग्रेसमंत्रि-मंडळ झालें व त्यांनीं लागलीच कॉंग्रेसचा महत्त्वाचा दारूबंदीचा कार्यक्रम अंमलांत आणण्याचें ठरविलें. या सरकारी धोरणास पोषक अशीं वर्तमान-पत्रें निरनिराळ्या भाषेंत निघून या विषयाचा त्या त्या विशिष्ट लोकांत प्रचार होणें जरूर होतें. या दृष्टीनें ' नवाकाळ ' नें आपलें ' सायंकाळ ' नामक संध्याकाळचें दैनिक काढलें व त्यांत कॉंग्रेसच्या धोरणाचा पाठपुरावा

व प्रचार धडाक्यानें सुरू केला. नवाकाळला स्वतंत्र रीतीनेंच आपला अंक सायंकाळींही निघावा असें वाटत होतें. ही गरज 'सायंकाळ'नें पुरी केली.

या वेळीं माझे बंधु नाना प्रकृतिस्वास्थ्यासाठीं मुंबई सोडून सांगली, उगार येथें येऊन राहिले होते. संध्याकाळचे संपादक होण्यासाठीं त्यांना परत बोलावून घेण्यांत आलें. 'सायंकाळ' या नांवाबद्दलही चर्चा झाली. पण शेवटीं 'संध्याकाळ' हें नांव पसंत करण्यांत आलें. या नांवाची पसंती काकासाहेबांच्या मनांत दुसऱ्याच एका अर्थानें झाली. या दैनिकाच्या अग्रलेखावरील वचन त्यांनीं जें निश्चित केलें आहे, त्यावरून ही गोष्ट स्पष्ट होते. 'तमसो मा ज्योतिर्गमय' हें अग्रलेखावर वचन असून बाहेरील बाजूवर संध्येंतील मंत्र आहेत.

नानांच्या प्रकृतीस मुंबईची हवा व राहणी मानवतच नाहीं, असें ठरलें म्हणून नाइलाजानें ते परत उगारला आले व त्यांचे जागीं माझे भाचे श्री. पुरुषोत्तम वासुदेव लिमये यांना नियुक्त करण्यांत आलें. 'संध्याकाळ' निघाल्यामुळें नवाकाळ काढल्यावर काकासाहेबांच्या मनांत त्याच्या उत्कर्षाबद्दल ज्या कल्पना होत्या त्यांतील सायंपत्राची कल्पना सफल झाली. 'नवाकाळ' सायंकाळीं 'संध्याकाळ'च्या रूपानें लोकांच्या उत्सुक हातांत पडूं लागला. ही उत्सुकता दुसरें महायुद्ध सुरू झाल्यानें त्यावेळीं सारखी वाढत होती.

स्वतः 'नवाकाळ' चा खपही युद्धपरिस्थितीमुळें जोरांत होता. शिवाय सरकारी कागदाच्या नियंत्रणामुळें सर्वच पत्रांना आकार व किंमत यांच्या ठराविक चौकटींत बसावें लागलें. नवाकाळची आर्थिक बैठक आतां ठीक बसूं लागली.

## कौटुंबिक आपत्ति

काकासाहेब अर्धांगामुळें उत्पन्न झालेली शरीराची अपंगता कमी करण्याचे उपचार करीत व नित्यक्रम म्हणून प्रवचनें देण्याचा प्रयत्न करीत

असतां दुसऱ्या कौटुंबिक आपत्ति वेगानें येत होत्या. त्यांची थोरली सून सौ. कमलावहिनी या सुमारास एकाएकी आजारी पडल्या व अनेक महिन्यांच्या आजारानंतर त्यांना सर्व तऱ्हेचे उपाय करूनही उपचाराला यश न येतां भरल्या संसारांतून त्या निघून गेल्या. त्यांचें आजारीपण चालू होतें. त्यावेळीं विनायकरावांचें आजारीपणही जोरांत होतेंच. त्या वेळीं काकासाहेबांना भेटावयास जावयाचें म्हणजे जाणाराचें मनही या आपत्तींचा सर्व बाजूंनीं, काकासाहेबांभोंवतींचा घेर पाहून, भीतीनें दडपून जात असे. पत्नीचा पाय तुटलेला, एक सून मरणोन्मुख, एक मुलगा दिवसा दिवसाला बेशुद्ध होत असलेला, स्वतःला अर्धांगाचा विकार असे हे सर्व बाजूंनीं त्यांच्यावर भाले रोखलेले पाहिले म्हणजे पंचाग्निसाधन करणाऱ्या तपस्व्यांची आठवण होई. या कालांत ते कोणाशींही बोलूं लागले म्हणजे गहिंवरत. आपत्तींच्या जाळाचे चटके त्यांना आंतपर्यंत बसत होते, हें यावरून दिसून येई. पण अशा स्थितींतही ते आपलें नित्याचें कार्य व अध्यात्मचिंतन करीतच असत.

थोरल्या सूनबाई सौ. कमलाबाई यांच्या मृत्यूनें त्यांच्या घरांतील कोमल सौभाग्य नाहींसें झालें. त्या अत्यंत भारदस्त, प्रेमळ व शांत स्वभावीच्या होत्या. गोडव्यानें सर्वांशीं वागण्याची त्यांची हातोटी फार लक्षांत येण्यासारखी होती. हिंद महिला समाजांत त्या आस्थेनें चिटणिसीचें काम करीत. कोणत्याही परिस्थितींत त्यांच्या चेहऱ्यावर प्रेमळ हास्य विलसत असे. अगदीं मृत्युशय्येवर असतांही त्यांच्याकडे भेटण्यास जाणाऱ्यांचें त्या सादरहास्ययुक्त स्वागत करीत असत. त्यांनीं आपल्या वृत्तींतील गोड आनंदीपणा प्रत्यक्ष मृत्यु पुढें उभा असतांही कायम टेवल्याबद्दल यमधर्म त्यांचेवर प्रसन्न होऊन त्यानें त्यांना स्वर्गांत विशेष सन्मानाचें स्थान खास दिलें असेल.

सौ. कमलावहिनींच्या मृत्यूमुळें सौ. गौरकाकूंच्या मनोयातना परा-

कोटीस गेल्या. अप्पासाहेबांचा संसार उध्वस्त झाला. दोन मुलें आईविना पोरकीं झालीं. सौ. गौरकाकू स्वतः व्याधिग्रस्त होत्याच. त्यांत अशा सर्व बाजूंनीं संकटांनीं त्यांच्या भोंवतीं गर्दी केल्यामुळें अगोदरच्याच अपंग स्थितींत त्यांना स्वतःला अर्धांगाचा झटका आला. घरांत कोणाचें कुणी समाधान करावयाचें अशी स्थिति होती! सौ. गौरकाकूंची चरख्यावरील भक्ति फार मोठी होती. महात्मा गांधींच्या हृदयांत त्यांच्याबद्दल मान वसत होता. यामुळें १९४० च्या सप्टेंबर महिन्यांत महात्मा गांधी ऑ. इं. कॉं. कमेटीच्या कामासाठीं मुंबईस आले असतां सौ. गौरकाकूंची वरील अवस्था ऐकून ते सौ. प. पू. कस्तूरबांच्यासह सौ. गौरकाकूंना भेटण्यासाठीं त्यांच्या घरीं आले व १५।२० मिनिटें बसून त्यांची चौकशी करून गेले. त्या वेळीं नित्याप्रमाणें त्यांना सौ. काकूंनीं स्वतः कातलेल्या सुताची धोतरजोडी व काकासाहेबांचे रुद्रावरील पुस्तक अर्पण केलें.

असें कांहीं चालू आहे तों काकासाहेबांचे दुसरे चिरंजीव विनायकराव वारले. त्यांच्या मृत्यूनें सौ. गौरकाकू व विनायकरावांच्या पत्नी यमूताई यांच्या दुःखास सीमा राहिली नाहीं. यमूताईनीं विनायकरावांची सेवा अचंबा वाटण्याइतक्या धैर्यानें व आदर्शवत् केली. शेवटीं विनायकरावांना घेऊन त्या नरसोबाचे वाडीस जाऊन देवाची सेवा करीत राहिल्या होत्या. सर्व उपायाप्रमाणें याही उपायाचा उपयोग झाला नाहीं, व नरसोबाचे वाडीसच विनायकरावांचा अंत झाला. टिळकविद्यापीठाची प्रवेश परीक्षा पास झाल्यापासून ते नवाकाळची व्यवस्था पहात असत. औदार्य, उत्साह आणि सर्व विषयांची हौस हा त्यांच्या स्वभावाचा विशेष गुण असे. नवाकाळांत ते क्वचित् गोष्टीही लिहीत असत. त्यांच्या मृत्यूमुळें त्यांची पत्नी मातुश्री व काकासाहेब यांच्यावर केवढा आघात झाला हें लिहून कितीसें दर्शवितां येणार?

कौटुंबिक आपत्तीचें दुःख व नवाकाळच्या सुस्थितीचें सौख्य दोन्ही

समान मानून काकासाहेब कालक्रमणा करीत होते. अर्धांगवायूवरील उपचारानें तो दिने दिने कमी होत चालला होता. पण पूर्ववत् शक्ति त्यांना पुढें कधींच आली नाहीं. सांगलीस पूर्वीप्रमाणें दरसाल नियमानें ते यापुढें येऊं शकले नाहींत. ते देहाच्या अशा स्थितींतही १५।२० मिनिटें प्रवचन करण्याचा प्रयत्न मुद्दाम करीत. असे प्रयत्न नवाकाळच्या गणेशोत्सवांत अगर सांगलीच्या दत्तमंदिरांतच ते करीत असत, अन्य कोठें-ही नाहीं. शरीराच्या अशा विकल स्थितीमुळें ते कोठेंही अन्य ठिकाणीं वा परगांवीं जाण्यास कबूल नसत.

### नाट्यमहोत्सव

याप्रमाणें मुंबईस काकांचा जीवनक्रम चालू असतां १९४३ सालीं नोव्हेंबरांत सांगलीस नाट्यशताब्दि महोत्सव व त्याबरोबर महाराष्ट्र साहित्य-संमेलन व नाट्यसंमेलन भरवण्याचें निश्चित करण्यांत आलें. नाट्यशताब्दि महोत्सवाचे अध्यक्ष स्वातंत्र्यवीर सावरकर, साहित्यसंमेलनाचे प्रा. माटे व व नाट्यसंमेलनाचे ‘ माईसाहेब ’ कर्ते श्री. ना. वि. कुळकर्णी असे अध्यक्ष नियुक्त केले होते व त्याचप्रमाणें स्वागताध्यक्षपदीं अनुक्रमें काकासाहेबांचे भाचे राव. वासुदेवराव भावे, श्री. गोपाळराव मुजुमदार तथा साधुदास, व श्री. बन्याबापू कमतनूरकर, यांची निवड झाली होती. मराठी रंगभूमीचे आद्य प्रवर्तक विष्णुदास भावे,‘ शारदा ’ कर्ते गोविंदराव देवल व नाट्या-चार्य काकासाहेब खाडिलकर यांसारखे नामवंत यशस्वी नाटककार कृष्णा-तीर सांगलीचेच असल्यानें हा शताब्दि महोत्सव सांगलीसच होणें उचित होतें. व सांगलीकर मंडळींनीं हा समारंभ मोठया प्रमाणावर करण्याचें ठरवलें होतें. भव्य नाट्यमंदिर उभें करण्यांत आलें होतें. त्यावर “ नाट्या-चार्य खाडिलकर नाट्यमंदिर’ असें नांव दिलें होतें. या अभूतपूर्व उत्स-वास काकासाहेब जातीनें उपस्थित राहावें अशी सर्वांची अपेक्षा असणारच ! काकांच्या विशिष्ट शारीरिक परिस्थितींत ते परगांवीं जाणेंच शक्य नव्हतें.

ते या उत्सवास येणें शक्य नाहीं असें आम्ही निकटवर्ती मंडळींनीं कितीही सांगितलें तरी कोणास पटेना. महोत्सवाचे प्रतिनिधि स्वतः आमंत्रण देऊन घेऊन येण्यास गेले, पण त्या प्रयत्नास यश येणें अशक्यच होतें ! नाट्यप्रेमी जनतेची नाट्यचार्य काकासाहेबांविषयीं काय भावना होती त्याचें प्रतिबिंब महोत्सवाचे स्वागताध्यक्ष विष्णुदासांचे नातू वासुदेवराव यांच्या स्वागत भाषणांत दिसते. त्यांत ते म्हणतात--

" कै. विष्णुदासांच्या भगीरथ प्रयत्नानें महाराष्ट्र रंगभूमीवर अवतरलेल्या नाट्यगंगेला गेल्या शंभर वर्षांत अनेक लहानमोठे प्रवाह मिळून तिच्याकडून महाराष्ट्राचें नाट्यकलोद्यान रमणीय व सुगंधित ठेवण्याचें काम अखंडित चालू आहे. या कार्यांत सांगलीच्या ज्या नाट्यसेवकांनीं आजवर भाग घेतला आहे, त्यांत माझे मामा ती. काकासाहेब खाडिलकर यांच्या उज्ज्वल कामगिरीची आपणास मी ओळख करून द्यावयास पाहिजे. अशांतला भाग नाहीं. कै. विष्णुदासांनीं नाट्यदेवतेच्या मंदिरांत लावलेला, पूर्वजांच्या पराक्रमाची स्मृति नित्य जागृत ठेवणारा नाट्यकलेचा नंदादीप आजवर ती. काकासाहेब खाडिलकर यांनीं अखंड प्रज्यलित ठेविला आहे. "

या उत्सवांत शताब्दि महोत्सवाचा भाग म्हणून आठ गुण श्रेष्ठांना चांदीच्या नटराजाच्या प्रतिमा अर्पण करून सन्मान करण्याचें योजिलें होतें. यासही काका उपस्थित राहूं शकले नाहींतच. त्यांचा ' नाट्याचार्य ' म्हणून सन्मान करण्यांत आला. आपल्या सांगलीला नाट्यशताब्दि महोत्सव साजरा होत आहे याबद्दल त्यांना आनंद वाटत होताच. या समारंभासाठीं त्यांनीं जो संदेश लिहून पाठविला होता त्यांत त्यांनीं आपल्या जीवनाचा व नाट्याचा संबंध किती जिव्हाळ्याचा आहे हें दर्शविलें आहे. महोत्सवाला पाठविलेला काकासाहेबांचा संदेश पुढीलप्रमाणें आहे.

### नाट्याचार्यांचा संदेश

' माझा जन्म सांगलीचा. माझी हौस नाटकें पाहण्याविषयींची इतकी होती कीं इंग्रजी शाळेंत गेल्यावर चार वर्षें दशावतारी नाटक मंडळी सांगलीस आली असतांना मी खेळास हजर राहिलों नाहीं असें क्वचितच व्हावयाचें. मी इंग्रजी तिसरींत असतांना एक नाटक लिहिलें होतें. श्रीमंत राजे अप्पासाहेब सांगलीकर यांनीं कळकळीनें आस्थापूर्वक सुचविल्याप्रमाणें कवि विष्णुदास भावे यांच्या शतसांवत्सरिक उत्सवास आपण सर्व जमलेले असतांना मी उत्सवांत भाग घेण्यास आपखुषीनें यावयास पाहिजे होतें. पण प्रकृति अस्वस्थ असल्यानें मला हजर राहतां येत नाहीं. **मी नाटकी प्रथम आहें व पत्रकार मागूनचा आहें,** हें विसरूं नका. मी गैरहजर आहें म्हणून तुमचा राग नसावा. आपण या उत्सवाचे प्रसंगीं नेमलेले तीनही प्रसंगांचे स्वागताध्यक्ष व अध्यक्ष हे कर्तबगार असल्यानें हे समारंभ उज्ज्वल कीर्तीनेंच पार पाडतील असें मला वाटतें. हें माझें शुभ चिंतन आहे.'

—कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर.

खुद्द मुंबईस झालेल्या उत्सवाचें आमंत्रणही त्यांनीं कधीं स्वीकारलें नाहीं. केव्हांही व कोठेंही ते उपस्थित रहात नसत. त्यांच्या वयाला सत्तर वर्षें संपलीं त्यावेळीं किंवा त्यानंतरही कोणी एकाद्या समारंभाला हजर राहण्याचा काकासाहेबांना आग्रह केला तरी ते निश्चयपूर्वक त्या आग्रहाला नाकारीत असत.

### अध्यात्मग्रंथमाला

आपण ज्या तत्त्वज्ञानाचें चिंतन केलें व मनन केलें त्याचें शिक्षण जगाला मिळावें म्हणून मात्र ते अशा स्थितींतही फार दक्ष असत. अत्यंत पद्धतशीरपणानें वागून आलेलें रोगाचें संकट त्यांनीं बव्हंशीं निवारलें. अर्धांगामुळें जे परिणाम त्यांच्या शरीरप्रकृतीवर झाले होते, ते त्यांनीं बरेच कमी केले. प्रकृतींत जसजशी सुधारणा होऊं लागली, तसतशी तत्त्वचिंतनांत

सुचलेल्या विचारांचीं विवेचनात्मक टिपणें ते लिहूं लागले. ॐकाराची उपासना या विषयावरील टिपणें त्यांनीं या सुमारासच लिहिलीं. तैत्तिरीय उपनिषदांतील ज्या विषयावरचीं प्रवचनें त्यांनीं पूर्वी दिलीं नव्हतीं त्या विषयावरही विवेचनें त्यांनीं लिहून काढलीं. तैत्तिरीय उपनिषदाच्या उपोद्घातांत काकासाहेबांनीं पुढील माहिती दिली आहे.

"चार वर्षांत उत्सवांत मी हें उपनिषद् तीन हप्त्यांनीं संपविलें. १९४० सालीं उत्सवप्रसंगीं मी सांगलीस होतों. १९४२ सालीं मी सांगलीस असतांना पुस्तकरूपानें तैत्तिरीय उपनिषद् छापून काढण्याचा मी विचार करीत असतांना 'आनंदवल्ली' वरील माझीं प्रवचनें नवाकाळांत प्रसिद्ध झालेलीं नाहींत हें माझ्या ध्यानीं आलें आणि मी 'आनंदवल्ली' वर प्रवचनाचे ऐवजीं विवेचनें स्वतः लिहून काढलीं. प्रवचनात्मक व विवेचनात्मक मूळ प्रत तयार होण्यांत अशा रीतीनें पांच वर्षांचा काळ लोटला आहे."

अर्धांगाचा झटका आल्यानंतरच्या या सुमारें पांच वर्षांवरीलच्या काळांत काकासाहेब अत्यंत कांटेकोरपणानें वागून आपली प्रकृति सुधारण्याचा निग्रहपूर्वक प्रयत्न करीत होते, तरी त्यांची वाचाशक्ति पहिल्यासारखी ओघवती राहिली नाहींच. शरीरांतही कमालीचा अशक्तपणा होता. आपण जगलों ते वैदिक तत्त्वज्ञानाच्या प्रचारासाठीं ही भावना मात्र त्यांचे हृदयांत सदोदित होती. त्यामुळें आपलें यासंबंधींचें कार्य प्रवचनरूपानें करण्याचें सोडून उपनिषदांवर विवेचनें लिहून काढून तीं छापून प्रसिद्ध करण्याच्या रूपानें त्यांनीं सुरू केलें. त्यांच्या शारीरिक निःशक्ततेमुळें हें कामही ते किती मंदगतीनें करीत हें वरील उताऱ्यावरून स्पष्ट दिसत आहे.

या काळांत त्यांनीं प्रवचनात्मक व विवेचनात्मक टिपणें जीं प्रसिद्ध केलीं तीं 'खाडिलकरांची अध्यात्मग्रंथमाला' या नांवानें प्रसिद्ध झालीं. तत्त्वज्ञान व नित्य व्यवहार यांची कौशल्यपूर्ण सांगड घालण्याची काकासाहे-

वांची वैशिष्ट्यपूर्ण शैली आहे. यामुळें त्यांनीं या मालेंतील प्रत्येक पुष्पाला 'खाडिलकरांचा रुद्र' 'खाडिलकरांचें पुरुषसूक्त' अशीं सार्थ नांवें दिलीं आहेत. आपल्या या सर्व वाङ्मयांतून काकासाहेबांनीं 'माणसाच्या जीवनाचा समाजाच्या एकंदर सामुदायिक जीवनाशीं समन्वय होऊन अखेरीस सर्व विश्वाचें कल्याण व्हावें अशी वैदिक वाङ्मयाची–वेदान्ताची–विशाल मंगलमय शिकवण आहे,' हें प्रभावीपणें दिग्दर्शित केलें आहे. वैदिक वाङ्मयांतील काकासाहेबांनीं निवडलेलीं प्रकरणें मनुष्याच्या नित्यक्रमांत समाजहिताचा कांहीं विशेष बोध रुजविण्यासाठीं आहेत. देवाचें खरें स्वरूप त्यांना समजावें व त्यांच्याशीं येणाऱ्या संबंधांतून उत्पन्न होणारीं सात्त्विक स्वोद्धाराचीं कर्तव्यें भारतीयांना सुलभ रीतीनें समजावीं व त्यांच्या आटोक्यांत तीं यावीं हा काकासाहेबांचा या प्रचारांतील प्रमुखत्वाचा प्रयत्न आहे.

### सौ. गौरकाकूंचें निधन

काकासाहेबांचें आध्यात्मिक जीवन असें चालू असतां त्यांचें सांसारिक जीवन घड्याळाच्या ठोक्याप्रमाणें अगदीं ठरीव अशा एका पद्धतीनें चालू होतें. उठल्यापासून झोपेपर्यंतच्या त्यांच्या सर्व क्रिया अगदीं ठरीव असत व त्या घड्याळाच्या कांट्याकडे बघून बरोबर वक्तशीरच चालत. मध्यंतरींच्या काळांत त्यांच्या डोळ्यावर सारा वाढला होता. त्यामुळें त्यांचें दिसण्याचें मान कमी झालें होतें. अशा वेळीं त्यांचें नित्याचें वाचन ते दुसऱ्याकडून करवून घेत. सौ. गौरकाकू स्वतः अपंग झाल्या तरी मधून मधून त्यांची प्रकृति सुधारे व तशा अवस्थेंतही त्या काकासाहेबांची जमेल ती सेवा करीत असत. काकासाहेबांची प्रत्येक गोष्ट ठरीव पद्धतीनेंच व्हावी लागे. जेवतांना वाटी, तांब्या इत्यादि सर्व जिनसांचीं स्थळें ठरलेलीं तींच असावीं लागत व खाण्याचे जिन्नस व त्यांच्या वाढण्याचा क्रम ठरलेला असेल तोच यावा लागे. जेवण झाल्यावर हात धुण्यासाठीं त्यांचे

हातावर पुढें पुढें पाणी घालावें लागे. त्या वेळीं चुळासाठीं घालण्याचें पाणी फक्त ठरीव वेळांच घालणें जरूर असे. वर्तमानपत्रें वाचण्याची त्यांची ठरीव वेळ असे. बरोबर त्या ठोक्याला ते वर्तमानपत्र वाचण्यास सुरवात करीत. त्याचे अगोदर दहा पंधरा मिनिटांपासून त्यांची किती वाजले अशी चौकशी सुरूं असे व अगदीं दोन मिनिटें शिल्लक आहेत असें सांगितलें तरी ते दोन मिनिटें वाट पाहून मगच वर्तमानपत्र वाचीत.

सौ. गौरकाकूंची प्रकृति पुढें पुढें फार बिघडत चालली. पाय गेलेला, त्यांत अर्धांग. त्यांचें सगळें लोकांनींच करावें लागे. त्यांना वाचनाचा फार नाद असे. पण एकामागून एक घरगुती आपत्तींचे डोंगर त्यांच्यावर कोसळल्यामुळें त्यांचें मन सुंद झाल्याप्रमाणें झालें होतें. पुस्तक घेऊन एकादें पान वाचीत त्या बसल्या तर प्रसंगीं तासनूतास तें उघडलेलें पानच त्यांच्या हातांतल्या पुस्तकांत दिसे. वेळ जाण्यासाठीं त्या वहीवर अगर त्यांच्या अंथरुणाच्या बाजूच्या भिंतीवर राम, राम असें लिहून ठेवीत. रामाक्षरांनीं भरलेल्या भिंतींनीं त्यांच्या भोंवतालचें वातावरण त्यांनीं राममय करून टाकलें होतें. स्वतः काकासाहेब त्यांच्याकडून स्वतः सांगून जप करवून घेत असत. त्यांचें दुखणें शेवटीं विकोपास गेलें व शेवटीं १९४५ च्या मार्च महिन्यांत त्या निधन पावल्या.

त्यांचें सर्व आयुष्य तेजस्वी कर्तृत्वांत गेलें होतें त्यामुळें गेलीं बरींच वर्षें अपंग होऊन पडल्यावर त्यांच्या मनाचे फार हाल झाले. एक सून व एक पुत्र यांच्या निधनामुळें तर या दुःखाची परिसीमाच झाली होती. नाहीं म्हणावयास लढाई सुरू झाल्यानंतर नवाकाळ बरा चालला होता व व नुकतेंच त्याचें सर्व कर्ज फिटलें होतें. त्या दिवशीं सर्वांना फार आनंद वाटला होता. सौ. गौरकाकूंनींही यानिमित्त सत्यनारायण करवून टाकला. सौ. गौरकाकू म्हणजे वात्सल्य आणि औदार्य यांची मूर्तिच असत. त्यांच्या घरांत कोणीही यावो त्यांना त्या आपल्या मोकळ्या व प्रेमळ वागणुकीनें

आपण आपल्या स्वतःच्या घरींच आहों असें वाटावयास लावीत, त्यांचे घरांत अनेकांनीं आपलें शिक्षण पुरें केलें, त्यांनीं अनेकांचा संसार थाटण्यास मदत केली. काकासाहेबांच्या जीवनाच्या सरोवराचें तीर पक्कें बांधून काढलेलें होतें. पण सौ. गौरकाकूंनीं त्याच पाण्यांत खूप उंच उडत वर राहून एकाद्या कारंज्याप्रमाणें काकासाहेबांच्या जीवनास साथ दिली व सर्वत्र रम्यता आणली. निरलसपणा, कामांतील धडाडी व स्वाभिमान हे त्यांच्यांतील गुण शेवटपर्यंत सर्वांच्या अचंब्याचे विषय होते. चरख्याला त्यांनीं आपल्या जीवनाचा भागच करून टाकलें होते. 'थकल्या भागल्या जीवाला चरख्यामुळें विरंगुळा वाटतो' असें त्या म्हणत. आपल्या दोन नातवांकडे पाहून त्या शेवटीं शेवटीं जगत होत्या व त्यांच्याकडे पहात पहात त्या निजधामाला गेल्या.

सौ. गौरकाकूंच्या निधनानें घराचें घरपण गेलें. सर्वांचें सर्व गेलें. तिच्या दृष्टीनें सोनें झालें असलें तरी कुटुंबियांना जीवनाचा आधार गेलासा वाटला.

काकासाहेब आपल्या भावना क्वचितच व्यक्त करीत. सुखदुःखसमानतेच्या पायरीवर ते होते. अनेक दुःखांच्या प्रसंगानंतर त्यांच्या नित्याच्या कार्यक्रमांत कधीं खंड पडला नाहीं अगर डोळ्यावाटे कधी त्यांनीं पाणी काढलें नाहीं. रात्रीं झोपण्याच्या अगोदर ते चार दोन चौकशीचे ठरीव प्रश्न अप्पासाहेबांस विचारीत. खिडक्या झाकल्या कां, पाणी ठेवलें कां, मुलें निजलीं कां, विनायक झोपला कां (हा प्रश्न पुढें बंद झाला), तुझ्या आईची प्रकृति कशी आहे!' या दिवशीं रात्रीही त्यांनीं हे सर्व ठरीव प्रश्न विचारले. शेवटचा प्रश्न विचारल्यावर 'हा प्रश्न आतां संपलाच' इतकेंच म्हणून ते नित्याप्रमाणें झोपी गेले.

तथापि प्रो. दत्तोपंत धारपुरे समाचारास आल्यावेळीं त्यांनीं "तिचें लग्न तिच्या आठव्या वर्षी झालें तेव्हां पासून आजपर्यंत आम्ही एकमेकांस

सोडून कधीं राहिलों नाहीं. तिच्या जोरावर मी राजकारणांत व नाट्य लेखनांत निष्काळजीपणानें काम करूं शकलों " असे उद्गार काढून आपलें सौ. गौरकाकूंच्या बद्दलचें हृदय व्यक्त केलें. सौ. गौरकाकूंच्या निधनाची वार्ता ऐकून महात्माजी एप्रिलच्या पाहिल्या आठवड्यांत काकासाहेबांच्या समाचाराला आले. या वेळेस त्यांच्या बरोबर कस्तुरबा तरी कुठें होत्या ? त्या दिवशीं त्यांच्या मौनाचा दिवस होता. त्यानीं सांत्वनपर वाक्यें एका कागदावर लिहिलीं व ती. काकासाहेबांना वाचून दाखविण्यांत आलीं. त्या मजकुराचा मराठी भावार्थ पुढें दिला आहे.

" अवंतिकाबाईच्या कडून हकीगत कळली. त्या आल्या त्यावेळीं मीं म्हटलें, मी येईन. आपण तर ज्ञानी आहांत हें मी जाणतों. मग आपलें सांत्वन तें काय करावयाचें ? मी आपणांस भेटण्यासाठीं आलों. आतां आपण दोघे एकसारखे झालों आहोंत. "

महात्माजींचें शेवटचें वाक्य वाचून दाखविण्यांत आलें तेव्हां त्यांतील करुण भावना हजर असलेल्या सर्वांना जाणवल्याखेरीज राहिली नाहीं.

**शेवटचा आघात.**

ती. काकूंच्या निधनानंतर काकांच्या दिनक्रमांत कांहींच फरक झाला नाहीं. सुखदुःखाच्या भावनांच्यावर त्यांनीं जय मिळविला होता, हेंच त्याचें खरें कारण होय. तरी शारीरिक शक्तीवर थोडासा परिणाम झालाच. ते नित्यक्रमाप्रमाणें रोज कचेरीच्या जागेंत येऊन बसत व सायंकाळीं कचेरीच्या खालील मोकळ्या जागेंत थोडे फिरत. पुढें कांहीं दिवसांनंतर हें फिरण्याचें मान कमी होत गेलें. नित्याचें लेखनही कमी होऊं लागलें. मात्र रोजचें ईशचिंतन, ध्यानधारणा व सायंकाळचें भजन यांत कांहींच फरक पडला नाहीं. या सुमारास दैनिक नवाकाळ सुरू होऊन २४वर्षें पूर्ण झालीं होतीं. पुढील सालीं त्याचा रौप्य उत्सव करण्याचा सुप्रसंग होता. त्याबद्दलचे आपले विचार क्वचित् प्रसंगीं काका प्रदर्शित करीत. त्यांच्या वयालाही

७४ वें संपून ७५ वें लागत होतें. ते आपल्या स्वतःविषयीं कोणताहि समारंभ करूं देत नसत. भाषांही काढूं देत नसत. या सालच्या वाढ-दिवशीं नवाकाळ कचेरींतील मंडळी, मुंबई पत्रकार परिषदेचे सभासद, जुने नवे नाट्यव्यवसायी, व स्नेहीमंडळी आपणहूनच घरीं आली. त्यांचा योग्य तो सन्मान केला. या समारंभप्रसंगीं जमलेल्या सर्व मंडळींचे मनः-पूर्वक आभार मानतांना व उत्तर देतांना त्यांनीं नवाकाळाचा रौप्यउत्सव साजरा करण्याचा मनोदय व्यक्त केला. पण हें घडून येणेंचें नव्हतें! विधि-घटना निराळीच होती!!

या संकल्पित उत्सवाची भाषा बोलली जात असतांना त्यांचा आवडता नातू 'तात्या' तथा हरी यास १९४७ फेब्रुवारींत विषम-ज्वरानें गांठलें. दोन तीन आठवड्यांच्या या आजारांत प्रकृतींत सुधारणा दिसत असतां, आशेचे अंकुर पल्लवीत होत असतां, भावी मनोरे रचिले जात असतां त्याच्यावर निर्घृण काळानें झडप घातली!! काका-साहेबांसारख्या संयमी स्थितप्रज्ञालाही हा दुःखावेग सहन करणें अत्यंत अवघड गेलें. मग पिता आप्पा यांची मनःस्थिति काय सांगावी! त्यांच्या शोकाला तर पारावारच नव्हता. सौ. कमलावहिनींच्या मृत्यूनंतर या पुत्रांना तेच कायमचे पितृमातृस्थानीं होते. या मातृहीन बालांच्या भावी उत्कर्षावर आप्पा नजर लावून एकाकी जीवन कंठित होते. मुलांच्या भावी कर्तृत्वाचे पतंग मनाकाशांत डोलते पाहून समाधान मानून त्यांचें भावी जीवन आशेनें पहात होतें. त्या आशेचे मनोरे भंगले! हरी–तात्या अतिशय खिळाडू, उमदा व होतकरू तरुण होता. वयाला नुकतेंच सोळावें वर्ष लागलेलें. बालवयांतच कांहीं लघुकथा, लघु-निबंध लिहून लेखनकौशल्याची चुणूक त्यानें दाखविली होती. 'यशवंत-कुमार' या नांवाखालीं त्याचें लेखन नवाकाळपत्रांत येत असे. 'सुवर्ण-कण' या सदरांत त्यानें उत्तमोत्तम अस्सल कणांची भरती त्यानें अनेक

वेळां घातली होती. आपल्या दिलदार वृत्तीनें तो सर्वांना प्रिय झाला होता. काकांचा तर तो अत्यंत आवडता होता. तात्याचे कागदी पतंग काकांच्या कचेरींतच राहिले नि काळानें तात्याच्या आयुष्यपतंगाची दोरी मध्यंतरीं तोडली नि त्याला देवाघरीं नेला ! ! काका या आघातानें विव्हळ झाले.

अगदीं हातातोंडाशीं आलेल्या—लौकरच विकसित होणाऱ्या कमलाप्रमाणें वाटणाऱ्या—आपल्या नातवाच्या मृत्यूनें काकासाहेबांसारख्याच्या तत्त्वज्ञानी विरक्त मनावरही फार परिणाम केला. ‘ मरणं प्रकृतिः शरीरिणाम् ’ हें तत्त्वज्ञान अंगीं बाणलेल्या व खुद्द स्वतः मृत्यूचें स्वागत करण्याच्या तयारींत असलेल्या तपस्व्याच्या डोळयांतूनही नातवाचे निधनानें अश्रुधारा आल्या. अकालीं मरण हें दुःखदायकच ! तरी पण नातवाच्या मृत्यूचे दुसरेच दिवशीं त्यांनीं आप्पास, ‘ लोकमान्यांचें उदाहरण मनापुढें ठेव व प्राप्त कर्तव्य करूं लाग; त्यांतच दुःखाला विरंगुळा मिळतो ’ असा उपदेश केला. काकासाहेब स्थितप्रज्ञ म्हणूनच हा उपदेश चिरंजीवास करूं शकले !





लेखकाच्या तीन पिढ्या

१ काकासाहेब
२ श्री. अप्पा व विनायकराव
३ हरी ऊर्फ तात्या व नीळकंठ







: १८ :

# मुक्ति

जयन्ति ते सुकृतिनो रससिद्धाः कवीश्वराः ।
नास्ति येषां यशःकाये जरामरणजं भयम् ॥

—भर्तृहरि.

काकांची आतां शारीरिक व मानसिक स्थिति पूर्ण निवृत्तीची होती. यापुढें ते जगले ते मरणाच्या पूर्ण तयारीनेंच! तारुण्यांत व वृद्धावस्थेंत त्यांनीं आपल्या क्रांतिवृत्तीचा चांगलीं कामें करण्याकडे उपयोग केला होता. क्रांति अनुभवून पुढच्या मार्गाकडे त्यांनीं आपली दृष्टि लावली होती. मरणाशीं दृष्टि भिडली होती. त्यांनीं आपला दैनंदिन जीवनक्रम जरी यथापूर्व चालविला होता तरी

त्र्यंबकं यजामहे सुगंधिं पुष्टिवर्धनम् ।
उर्वारुकमिव बंधनान्मृत्योर्मुक्षीय मामृतात् ॥

'या मृत्यूच्या जबड्यांतून आम्हांस मुक्त कर, आम्ही मेलों तरी आम्ही अमृत व्हावें, जगतांना अमृत आमच्यांत आहे, मेल्यावर तें अखंड रहावें,' अशी ते रोज प्रार्थना करीत असत. तेवढाच विचार त्यांच्या मनांत आतां राहिला होता असें वाटे. त्यामुळें लौकिक व्यवहारांत पूर्ण निर्लेपतेनें ते वागत. त्यांनीं षड्रिपूशीं व्यक्तिगत लढाई पूर्णतया जिंकली होती तसेंच राष्ट्राच्या स्वातंत्र्ययुद्धांत यश प्राप्त झालें होतें. राष्ट्र स्वतंत्र झालें होतें.

सन १९४७ ऑगस्ट १५ रोजीं भारतमाता पारतंत्र्यांतून मुक्त होऊन त्या शुभदिनीं स्वतंत्र झाली. ज्यासाठीं काकांनीं सर्व जन्मभर विरोधी शक्तीशीं लढा दिला होता तें स्वातंत्र्य आज प्राप्त झालें. लढा यशस्वी झाला. आपल्या नेत्रांनीं भारतवर्ष स्वतंत्र झालेलें त्यांनीं पाहिलें. साहजिक ते मनाच्या सुखदुःखातीत आनंदमय स्थितींत होते. 'आज माझी माता स्वतंत्र झाली; भारत स्वतंत्र झाला' असे समाधानपूर्ण उद्गार त्यांनीं काढले; त्यावेळीं त्यांच्या चक्षूपुढें सर्व पूर्वेतिहासाचा कार्यपट उभा राहिला असला पाहिजे. त्या सर्व सुकृतींना आज स्वातंत्र्यरूपी यशःफल आलें होतें. देशभर बांधलेलीं तोरणें नि राष्ट्रीय निशाणें काकांसारख्या अनेकानेक देश-भक्तांनीं केलेल्या आत्मयज्ञाच्या पूर्तीचीं यशश्चिन्हें होतीं. त्या दिवशीं मुंबापुरीनें अभूतपूर्व उत्सव केला. काकांचें कविमन पूर्व स्मृतींनीं उचंबळून आल्यानें त्यांनीं आप्यास वाहन आणण्यास सांगितलें व ते मुंबईच्या कांहीं भागांत फेरी मारूनही आले. त्या दिवशीं मुंबईनगरीनें तेजाळलेल्या विद्युत्-दीपांचा अपूर्व सोहळा त्यांना उपभोगावयाचा नव्हता, कार्यपूर्ततेचा तो कविमनाचा सात्त्विक आनंद होता. हा भारतस्वातंत्र्यसुखसोहळा भोगण्याचें भाग्य फारच थोड्या देशभक्तांना—काकासाहेबांसारख्या वयोवृद्ध देशभक्तांना—लाभलें. देशाच्या अवघड परिस्थितींत काकांसारखे तरुण देशभक्त स्वातंत्र्याच्या लढ्यांत तनमनधनेंकरून ज्यावेळीं पडले त्यावेळची देशस्थिति पाहतां हें यश या भक्तांना आपल्या वृद्धावस्थेंत लाभेल अशी

आशाही कोणी केली नसती—करणें शक्यही नव्हतें. तो मुक्तीचा ब्रह्मानंद काकासाहेबांना लाभला. भारत स्वतंत्र झालेला त्यांनीं 'याच देहीं याच डोळा' पाहिला !

यासाठीं काकासाहेबांनीं जे अनेक व्याप केले ते त्यांच्या पुरते पूर्ण झाले होते. मात्र एकच गोष्ट पूर्ण करण्याची राहिली होती. सांगलीस कृष्णाकांठीं श्रीदत्तमंदिर त्यांनीं स्थापिलें होतें. त्याच्या व्यवस्थेची योजना मनांत तयार करून ठेविली होती ती एक व्यवस्थापत्र करून कायम स्वरूपांत आणावयाची होती. ज्या मळींत दत्तमंदिर आहे ती व त्याशिवाय कांहीं रोख रक्कम देवाच्या व्यवस्थेसाठीं दिली गेली असून नित्यपूजाअर्चा व नैमित्तिक कथाकीर्तन, उत्सवादि कार्यें त्यांनीं ठरविलेल्या योजनेप्रमाणें व्हावीं यासाठीं दोन विश्वस्त नेमिले आहेत. या काळांत काकांची देहप्रकृति अगदींच क्षीण झालेली होती, तरी कांहीं काल पुण्यास विकत घेतलेल्या घरांत राहण्याचा व सांगलीस दत्तदर्शनासाठीं येण्याचा क्रम ते आग्रहानें पुरा करीत असत.

याप्रमाणें काका कालक्रमणा करीत असतां एक अघटित घटना दिल्लीस घडली. ३०-१-४८ रोजीं दिल्लीस प्रार्थनेच्या स्थळीं म. गांधी यांचा अमानुष वध करण्यांत आला. हें अघोर कृत्य कल्पनातीत होतें. काकासाहेबांसारख्यावरही त्या कृत्याचा परिणाम झाला. म. गांधींच्या जीवनाबद्दल काकांचे विचार अनेक वेळां त्यांनीं आपल्या प्रवचनामध्यें सांगितले, ते काकांनीं 'याज्ञवल्क्य—मैत्रेयी संवाद' या उपनिषत्प्रकरणाच्या विवेचनांत त्यांनीं १९४७ सालीं नमूद केले आहेत.

" समाजाच्या हिताला धरून वागत असतां वैयक्तिक असें स्वतःचें सुखदुःख कसें शिल्लक राहात नाहीं, आणि साधुत्वाच्या कोटीला मनुष्य कसा पोंचतो, याचें जागतें उदाहरण म्हणजेच म. गांधींचें चरित्र होय. रंजल्या गांजल्यांना त्यांनीं आपलें म्हटलें आणि समाजासही तसेंच वागा-

वयास सांगितलें. आत्मतत्त्वाच्या प्रेरणेला अनुसरून वागतांना सद्‌गुणांचा विकास कसा होतो आणि आत्मतत्त्वापासून स्फुरणारें प्रेम सबंध समाजाला व विश्वाला व्यापणारें व त्याला हितकारक कसें होतें हें महात्माजींच्या चरित्रावरून कळणारें आहे. आत्मतत्त्वाकडून मिळणाऱ्या प्रेरणांना अनुसरूनच जीवन प्रेममय बनवितांना मानव विश्वाचा मित्र कसा बनतो आणि साधूच्या किंबहुना परमेश्वराच्या पायरीपर्यंत कसा जातो हें महात्माजींच्या जीवनावरून ध्यानीं येणारें असल्यामुळें तिकडे लोकांचें लक्ष जावें तेवढें थोडेंच आहे. ''

या दुःखद घटनेनंतर कांहीं दिवसांनीं काका मुंबईहून पुण्यास आपल्या घरीं राहण्यास आले. दत्तमंदिराच्या व्यवस्थेचें कार्य त्यांनीं पुरें केलें होतेंच, तसेंच आणखी एक कार्य अपुरें राहूं नये असें त्यांना वाटत होतें. त्यांनीं लोकजागृतीसाठीं निर्माण केलेलें संपादकीय वाङ्मय पुनर्मुद्रित होणें अवश्य होतें. त्यांचे लेख त्यांनींच दाखविणें जरूर होतें. या कामीं केसरी कचेरींतील केसरींच्या फाइलींचें साहित्य मिळविणें अगत्याचें होतें. त्यानिमित्तानें लोकमान्यांचे नातू श्री. जयंतराव टिळक हे काकांना भेटण्यास स्वतः आले. हा छोटा प्रसंग अपूर्व झाला. आपले गुरु लोकमान्य टिळक यांचा नातू आपल्यापुढें उभा आहे हें पाहून त्यांच्या सर्व पूर्वस्मृति उचंबळून आल्या. त्यांच्या वृत्ति जागृत झाल्या. त्यांनीं आपल्या गुरूचें भक्तियुक्त अंतःकरणानें स्मरण केलें. "मी टिळकाइट होतों व अद्यापही आहें." असे ते सद्गदित वाणीनें ज्यावेळीं म्हणाले त्यावेळीं त्यांनीं आपलें जीवनरहस्य एकाच सूत्रमय वाक्यांत दिग्दर्शित केलें.

यानंतर ते सांगलीस दत्तमंदिराच्या वाढदिवशीं आले. यापूर्वी सांगलीस येत असलेले काका व यावेळीं आलेले काका यांच्या मनःस्थितींत पडलेला फरक कोणासही स्पष्ट दिसून येत होता. आप्तस्वकीयांशीं यावेळीं जे उद्गार त्यांनीं काढले व श्रीदत्तदर्शन घेऊन परत निघतांना 'आतां पुन्हां दत्तदर्शन

नाहीं' असें म्हटलें, त्यावरून त्यांच्या मनांतील फरकाची सर्वांनाच पूर्ण कल्पना आली.

हें सूचक वाक्य उच्चारून ते मुंबईस गेले. त्यांचा मृत्यु नजीकच आला आहे असें आम्हा कोणाच्याही ध्यानींमनीं नव्हतें. मुंबईस त्यांचा नित्यक्रम यथापूर्व चालू होता. कांहीं वाचन, थोडेसें आत्मनिवेदनाच्या लेखनाचीं टिपणें सांगणें, सायंकाळीं भजन व थोडा वेळ ध्यानधारणा असा कार्यक्रम बेताबेतानें चालला होता. यापूर्वी कांहीं महिने त्यांनीं आत्म-चरित्रपर टिपणें नियमितपणानें सांगितलीं होतीं, तशीं पुन्हां सांगण्या-इतपत स्थिति त्यानंतर राहिली नव्हती. तरीही ता. १ ऑगस्ट १९४८ रोजीं लोकमान्य पुण्यतिथीनिमित्त त्यांचें मुंबईच्या नभोवाणीवर भाषण व्हावें अशी सूचना श्री. फाटक यांचेमार्फत आली. त्या दिवशीं काकांनीं आपल्या गुरूची पुण्यस्मृति असल्यानें तसें भाषण करण्याचें कबूल केलें. हें भाषण संवादरूपाचें होतें. मृत्यु समीप आला होता तरी आपल्या गुरूबद्दल आत्मस्फूर्तीनें जे विचार त्या संवादांत काकांनीं प्रदर्शित केले ते त्यांच्या जीवनाच्या वैशिष्टयावर त्यांच्या शब्दानें प्रकाश पाडणारें असल्यानें आम्ही तें जसाचें तसें याखालीं देत आहों.

श्री. फाटक यांनीं प्रश्न केले व त्यांस काकांनीं उत्तरें दिलीं असें हें प्रश्नोत्तररूपी भाषण आहे.

**प्रश्न १ ला :** लो. टिळकांच्या सान्निध्याचा आपल्या जीवितावर काय परिणाम झाला ?

**उत्तर :** देशसेवेची लहानपणापासून आकांक्षा होती. तिच्या प्रेरणेनें 'स्वप्नांत' दोनदां आणि जागेपणीं एकदां 'केसरी' हीं अक्षरें दिसून माझा व लो. टिळकांचा संबंध घडून आला आणि त्यामुळें लो. टिळक मला नांवें ठेवतील असा त्यांचा धाक मला वाटूं लागला. पुढें नाटकी मंडळींचा सहवास घडल्यामुळें तेथील ठळक ठळक दोष मला लागावयाला

पाहिजे होते. पण लो. टिळकांच्या दराऱ्यामुळें आणि त्यांनीं मला 'केसरीकार' ह्या नात्यानें त्यांच्या बरोबरीच्या उन्नतीच्या मार्गाला लावल्यामुळें नाटकी मंडळींच्या अंगच्या ठळक ठळक दोषांपासून माझा बचाव झाला, हे लो. टिळकांचे माझ्यावर उपकार झाले आहेत.

**प्रश्न २ रा :** लोकमान्य टिळकांच्या कामगिरीचा विशेष आपणांस कोणता वाटतो ?

**उत्तर :** निद्रित देशाला जागे करणें, आणि योग्य दिशेकडे तोंड फिरवून जरूर ती शिधासामुग्री त्याजबरोबर देऊन त्याला मार्ग आक्रमण करावयास शिकविणें; ही कामगिरी अत्यंत दुर्घट आहे. लोक जागेच होत नाहींत; जागे झाले तरी डोळे उघडीत नाहींत; डोळे उघडले तरी नीट पहात नाहींत; पाहिलें तरी हातपाय हालवीत नाहींत; उभे रहात नाहींत; या सर्व क्रिया करण्यास लहान मुलास अत्यंत ममताळूपणानें, एकनिष्ठेनें आणि पुढील धोरणाच्या विश्वासानें, आई ज्याप्रमाणें शिकविते, त्याप्रमाणेंच पुढाऱ्यांनीं देशाला वाढीस लावावें लागतें. आपले पूर्वज मोठे होते, आणि चिमुकलें अर्भकहि त्याच मोठेपणास चढणार आहे, अशी दृढ निष्ठा जशी वीरमातेच्या अंगीं असते, तशीच दृढ निष्ठा लोकमान्यांच्या अंगीं होती. आयुष्यभर त्यांनीं जें पाळलें तें या सत्याचें व्रत पाळलें! आपत्कालचा पुढारी सतीचें व्रत रक्तांत भिनलेल्या वीरमातेसारखा असावा लागतो. लो. टिळक तसेच होते. नव्या जोमाचा हिंदुस्थान त्यांनीं जन्मास घातला, आणि तो तारुण्याच्या कल्याणप्रद अवस्थेच्या जवळ पोंचविला, असे जे त्यांच्याबद्दल उद्गार काढण्यांत आले आहेत ते अक्षरशः खरे आहेत. मातेचा स्वार्थत्याग त्यांच्या अंगीं पूर्णपणें भिनलेला होता. ह्या स्वार्थत्यागाचा प्रवाह सर्व आयुष्यभर रोजच्याही नित्यक्रमांत एकसारखा वाहत होता. आपलें शरीर जितकें देशकार्यार्थ झिजवितां येईल तितकें झिजविलें आणि लहानथोर, खाजगी किंवा सार्वजनिक हरएक प्रसंगीं तीच

[वृ]त्ति कायम ठेवली पाहिजे, एरवीं स्वार्थत्यागाचें वळण सर्व देशाकडून [गि]रविलें जावयाचें नाहीं, असें त्यांचें ठाम मत होतें आणि त्याप्रमाणें ते [वा]गतही होते.

निरंतर एकसारख्या वाहणाऱ्या या स्वार्थत्यागाच्या प्रवाहाला वीर-वृत्तींची योग्य प्रसंगीं जोड देण्यास लोकमान्य कधींही चुकले नाहींत. सरकारी नोकरी करून फावल्या वेळांत देशकार्य करण्याची रूढी हिंदुस्थानच्या मनांतून खाडकन् उतरून टाकण्याकरितां अत्यंत साधेपणानें आणि मूठभर वस्तूवरच उपजीविका करण्याचें तापसांचें व्रत त्यांनीं ऐन तरुणपणीं वीर वृत्तीनें स्वीकारलें. असल्या वीरवृत्तीमुळेंच स्वार्थत्यागी होण्याच्या धड्याकडे हिंदुस्थानचें लक्ष आपोआपच लागलें. सरकारशीं झगडत असतांना अंगांत संचार झाल्यासारखे ते उसळत असत, आणि सरकारच्या शक्तीमुळें त्यांना कारागृहवासाचे तीन प्रसंग आले असतांही पुनः तसल्या प्रसंगास कवटाळण्यास ते प्रेमानें धांवत जात असत; यांतलें इंगित झालें तरी त्यांच्या रक्तांत भिनलेली महाराष्ट्राची वीरवृत्तीच होय! स्वतःच्या लोकांकडे बघण्याची त्यांची दृष्टि आईची होती, आणि राज्यकर्त्यांकडे पाहण्याची त्यांची नजर वीराची होती. तीन लेखांमुळें ते तीनदां तुरुंगांत गेले; सदर तीनही प्रसंगांचे लेख त्यांच्या हातचे नव्हते. आपल्या हातचे हे लेख नव्हते याबद्दल तक्रारीचा एकही शब्द त्यांनीं कधीं उच्चारलेला नाहीं. हुकूम होतांच शूर शिपायानें ज्याप्रमाणें लढाईच्या गर्दीत शिरावें आणि आपलें सर्वस्व स्वदेशास अर्पण करण्यास तयार व्हावें, त्याप्रमाणें दुसऱ्यांचे लेख असतांही परमेश्वरी कार्य तडीस नेण्यास ही चांगली संधी आपणास मिळाली आहे असें समजून, लोकमान्यांनीं जाणून बुजून तुरुंगाचा रस्ता पत्करिला.

लो. टिळक यांचें चरित्र भूतकालाला व्यापून पुढील इतिहासावर पसरलेलें दिसत आहे. ह्याचें कारण तत्त्वज्ञानाचा अभ्यास, लढत असतां-

नाही उज्ज्वल राहण्याइतकी परमेश्वरी भक्ति त्यांच्या अंतःकरणांत अखंड वसत होती, हेंच होय! 'गीतारहस्य' हें पुस्तक त्या भक्तीचें फळ होय! हिंदुस्थानच्या अभ्युदयाचीं गोड फळें उपभोगण्याचा काळ आल्यावर त्यांच्या चरित्रांतील लढाया आजच्याइतक्या प्राधान्येंकरून लोकांच्या नजरेपुढें उभ्या रहाणार नाहींत.

प्रश्न ३ रा : नाटकांच्याबद्दल लोकमान्यांचें मत काय होतें?

उत्तर : नाटक हें राष्ट्रास योग्य असें शिक्षण देणारें साधन आहे असें लो. टिळक समजत असत. त्यांनीं माझें "विद्याहरण" नाटक शेवटपर्यंत पाहिलें होतें.

नाटक चालू असतां एकदां रंगपटांत येऊन बालगंधर्वांजवळ सीनसीनरीविषयीं कांहीं मार्मिक सूचना लो. टिळकांनीं केल्या व नंतर ते म्हणाले,—"आमच्या कृष्णाजीपंतांनीं अशींच नाटकें लिहिलीं तर हल्लींच्या परिस्थितींत त्यांचा विशेष उपयोग होणार आहे. जर्मनींत तर कांहीं विशिष्ट हेतूनेंच नाटकें लिहिलीं जातात व करमणुकीबरोबर राष्ट्रास योग्य असें शिक्षण देण्याकडे त्यांचा कटाक्ष असतो. आमच्या व्याख्यानास जसे ठराविक लोक येतात तसाच तुमच्या नाटकाचाही ठराविक प्रेक्षकवर्ग आहे. ज्ञान देण्याच्या बाबतींत त्याची उपेक्षा होतां कामा नये."

हीं प्रश्नोत्तरें चालू असतां काकासाहेबांनीं आपलीं उत्तरें इतक्या तन्मयतेनें व स्फूर्तीनें दिली कीं, तरुणपणचे काकासाहेब आज आपल्यापुढें प्रत्यक्ष उभे राहून स्फूर्तिदायक संदेश आपल्या तारुण्यांतलि वक्तृत्वांत देत आहेत असें क्षणभर जुन्या माहीतगार श्रोत्यांस वाटलें.

लोकमान्यांच्या पुण्यतिथीला नभोवाणीवर भाषण करण्याइतकी शक्ति त्यांना वाटत होती, इतकेंच काय पण त्यानंतरही शेवटच्या क्षणापर्यंत त्यांचा दैनंदिन कार्यक्रम नित्याप्रमाणें चालला होता. मध्यंतरीं मुंबईचे पंतप्रधान श्री. बाळासाहेब खेर त्यांच्या भेटीस आल्यावेळीं त्यांचेशीं

प्रांताच्या राज्यकारभाराची चौकशी त्यांनीं केली. ज्या दिवशीं मध्यरात्रीं त्यांचे देहावसान झालें त्या दिवशीं २६ ऑगस्ट रोजीं सर्व दिवसाची दिनचर्या पुरी करून रात्रौ चिरंजीवांनीं नवाकाळच्या अग्रलेखाचें प्रुफ नित्याप्रमाणें वाचून दाखविलें, तें त्यांनीं मननपूर्वक ऐकलें. आप्पा प्रुफ घेऊन खालीं कचेरीकडे गेले व काका अंथरुणावर आडवे झाले. त्यांना तासा अर्धा तासांत डुलकी लागली. तींतून ते जागे झाले तों त्यांना किंचित् मळमळ वाटूं लागली. त्यांनीं सुनेस हाक मारली व तस्त घेतलें. ओकारीनंतर त्रास कमी झाला. तेव्हां सुनबाईस झोंपण्यास सांगून ते पुन्हां आडवे झाले. श्वासोच्छ्वास जड होऊं लागला ! कचेरींतून आप्पांना बोलावून आणलें. डॉक्टरना आणविणें बरें असें वाटल्यानें डॉ. सी. का. गोखले यांना फोनवरून बोलावण्यांत आलें. डॉ. गोखले त्याप्रमाणें लागलीच आले. डॉक्टरांना काकांनीं स्वतः आपणांस त्रास फारसा होत नाहीं असें सांगितलें. आपणांस खरें काय झालें तें डॉक्टरांना काका सांगूं लागले. " आपण नित्याप्रमाणें झोंपण्यापूर्वी प्राणायाम करितो व तो पुरा झाल्यावर झोंपीं जातों. आज कांहींतरी चूक झाली व प्राणायाम सुरू असतांनांच झोंप आली असावी त्यामुळें त्रास होत आहे. यावेळीं रात्रीचे बारा झाले होते. डॉक्टर काकांची प्रकृति तपासीत होते. विशेष कांहींच बिघाड झाल्याचें दिसेना. हृदय मात्र अतिशय अशक्त झाल्याचें दिसत होतें. त्यावर उपाय करण्याइतकी स्थिति आहे का नाहीं असा डॉक्टर विचार करीत आहेत, तोंच काका बसलेले होते ते ' आडवा होतों ', असें म्हणून ते निजले आणि मिनिटभरांत व शांतपणें त्यांचें प्राणोत्क्रमण झालें. काकांची प्राणज्योत मिमाली ! योग्याचें मरण काकांना आलें. अनायासेन मरणम्. सर्व उपाधी तोडून ते अनंतांत लीन झाले. मोक्षाप्रत गेले ! ते मुक्त झाले ! भारत स्वतंत्र व मुक्त झाल्यानें त्यांचें लौकिक कार्य तडीस गेलें होतें. आतां त्यांचें तेजस्वी कर्तृत्व यशाच्या मार्गानें ईश्वरी तेजांत विलीन झालें ! ! !

त्यांच्या देहाच्या अन्त्यसंस्कारास मुंबई नगरी लोटली. पंत प्रधान खेर आले. सरकारतर्फे त्यांच्या शवावर त्यांनीं हार घातला. मोठमोठ्या पुढाऱ्यांनीं दहनभूमीवर त्यांच्या गौरवपर भाषणें केलीं. देशांतील प्रांताप्रांतांतून, शहरांशहरांहून देशभक्तांची व मुंबईचे प्रांताधिप ना. महाराजसिंग, ना. अणे यांसारख्या उच्चपदस्थ अधिकाऱ्यांकडून सांत्वनपर संदेश आले. मुंबईचे मेयर व इतर पुढारी अंत्यविधीस हजर राहून गौरवपर भाषणें झालीं. देहाला अग्निसंस्कार झाल्यावर त्यांच्या अस्थि कृष्णा—गोदावरीसारख्या पवित्र नदी-प्रवांहांत विसर्जन केल्या गेल्या. काकासाहेबांच्या देहाचे हे संस्कार कालांतरानें विरून जातील पण काकांच्या उज्ज्वल गुणसमुच्चयाची ध्वजा अखंड फडकतच राहील !

काकांचा पार्थिव देह नष्ट झाला पण काकासाहेब अमर आहेत. त्यांचें वाङ्मय अक्षर आहे. कवि कृष्ण, नाट्याचार्य कृष्ण, तत्त्वज्ञानी कृष्ण अमर आहे ! नव्या पिढीला व नव्या जगाला त्यांचें चरित्र व चारित्र्य मार्गदर्शक होईल ! इति शम्.



नवाकाळची इमारत.




खाडिलकर रस्ता.

मुंबई कॉर्पोरेशननें काकासाहेबांच्या प्रथम पुण्यतिथीच्या पूर्वीच जुन्या 'कांदेवाडी' या गिरगांव भागांतील महत्वाच्या रस्त्यास 'खाडिलकर' रस्ता असें नांव दिलें आहे.

## परिशिष्ट—अ

# कै. दे. भ. कृष्णाजी प्रभाकर ऊर्फ काकासाहेब खाडिलकर

## यांची निरयन जन्मलग्नकुण्डली.

( मूळ कुण्डलीचा उतारा )

श्री. शालिवाहन शके १७९४ अंगिरा नाम संवत्सरे मिति कार्तिक कृष्ण दशमी घ. ४५।२५ चन्द्रवासर सूर्योदयादिष्ट घ. २६ प. ०० उत्तराफाल्गुनी जन्म नक्षत्र. ४ चरण. चन्द्र कन्याराशिस्थ.

इंग्रजी ता. २५।११।१८७२. दिनमान २७।४४.




स्पष्ट ग्रह. ( मूळ कुण्डलीची नक्कल )

अथ रव्यादिचलित स्पष्टग्रहाणि लिख्यते

| | र. | चं. | मं. | बु. | गु. | शु. | श. | रा. | के. | ल. | द. | अय-नांश |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| रा. | ७ | ५ | ५ | ८ | ४ | ८ | ८ | ०१ | ७ | ०० | ९ | |
| अं. | ११ | ०७ | ०५ | ०२ | ०० | १५ | २४ | १० | १० | २८ | १७ | २२ |
| क. | १८ | ४७ | ५१ | १९ | १६ | ३१ | ४३ | ५१ | ५१ | ५८ | १३ | ३० |
| वि. | २७ | ५५ | ५० | २६ | १८ | ४१ | २० | २७ | २७ | ३३ | १७ | दि.मा. |
| क. | ६१ | ७४६ | ३३ | ३५ | ०२ | ७४ | ०३ | ०३ | ०३ | ०० | | २७ |
| वि. | ५१ | ५० | ५० | ०८ | ४८ | ०० | ११ | ११ | ११ | ०० | | ४४ |

बृहज्जातकोक्त योग : अनफयोग : निरोगी; प्रख्यात; कीर्ति; प्रभु.

उत्तराफाल्गुनी जन्मनक्षत्रफल : सुभाग्य-विद्योपार्जित धन.

कन्याराशीफल : कवित्व; लेखक-चन्द्र-मंगळ योग : मातेस अनिष्ट.

बुधशुक्रयोग : वक्ता.

## कै. दे. भ. कृष्णाजी प्रभाकर ऊर्फ काकासाहेब खाडिलकर यांची (सायन) जन्मलग्नकुंडली.

श्री. शा. श. १७९४।८।२।१० मी. सूर्योदयादिष्ट घ. २५प.४९वि.३७

A. D. 25-11-1872.at ( $\frac{4}{4}$H $\frac{29}{29}$M $\frac{49}{49}$SD P.M.L.T. )
Local Time.

( ५ वाजून १ मि. २५ से. ) सायंकाळीं स्टॅंडर्डटाइम.

जन्मस्थळ : सांगली. अक्षांश : १६°५२' रेखांश ७४° पूर्व ३६'

सूर्योदय. ६ ता. ९ मि. ५८ से. [४ ता. ५८ मि. २४ से.]

+ ३१ मि. ३६ से. स्टॅंडर्ड वेळेकरितां.

### सायन-भावचलित-स्पष्टग्रह जन्मलग्नकुंडली.

ख-स्वस्तिकांश

(२० ता. ४८ मि. ४० से. ३१२°· १०-'-००")




चन्द्रसूर्यान्तर ६५° ०४' २२" ($\frac{१}{२}$) ३२° ३२' ११"

**टीपः** ग्रहराफेलच्या सन १८७२ च्या 'ग्रहास्थितिपत्रकान्वयें स्पष्ट केलेले असल्याकारणानें कला-विकलांत थोडें अन्तर राहील; त्याचप्रमाणें जन्मलग्न व दशमखेरीज इतर सर्व भावांचेंहि समजावें.

## सायनपद्धत्यनुसार ग्रहयोगफलें. ( स्थूल विवरण )

लग्नः वृषभ. स्वामी शुक्र दृष्ट-( नवमस्थ ) प्रकृति-निकोपः दीर्घायु, ललितकला विषयाची आवड-त्यामुळें भाग्योदय-धनलाभ-कीर्तिलाभ.

दशमः कुम्भ. सन्मुख हर्शल ( सतमदृष्टि ) पितृसुखास विघातक. क्वचित् जन्मकालचे सुमारास पितृनिधन. चन्द्र-मंगळ-बुध-शुक्र यांनीं दृष्टः विद्वान्-विद्याव्यासंगी-लेखक-लोकप्रिय-कीर्तिमान्. व्यवसाय : लेखन.

चन्द्र-मंगळयोगः मानी-करारी. संकटांस न जुमानणारा. साहसी, संततीस मारक. तल्लख बुद्धि-जहालपक्षी ( पन्थी )-ज्वलज्जहाल लेख.

रवि-शनि-कुयोगः कारागृहवास-राज्यकर्त्यांची अवकृपा.

धर्मस्थानाधिपति शनि धर्म ( नवम ) स्थानीं : देवधर्मसम्बन्धीं श्रद्धा-उत्तरायुत सक्रियता म्हणजे मन्दिर-बांधणें. धार्मिक तत्त्वज्ञानविषयक लेखनव्यवसाय.

अष्टमेश गुरु शनीच्या कुदृष्टियोगांत-षष्ठेश शुक्र-शनीच्या राशींत शनि-सन्निधः अर्धांगवायु पीडा निदर्शक. आयुर्दाय ७५ वर्षांच्या जवळपास.

गुरु-कन्येचा पंचमांत-ज्ञानार्जनाचा हव्यास-भाषापारंगत सन्मार्गगामी-सत्यभाषी-विवेकी-विचारी-पुत्र-पुत्री संततियुक्त.

चतुर्थेश रवि-गुरुगृहीं-गुरुदृष्ट-कुलदीपक-उद्धारक. ऐश्वर्यसंपन्न्-अन्त-कालः स्वगृहीं-स्वपरिवारीं-सर्वांमुखीं नांव-निरिच्छ-शान्तचित्त-बोलतां-चालतां-देहावसान.

## स्पष्टीकरण

नेपच्यून, हर्शल, शनि, मंगळ हे अशुभ काल दर्शवितात.

गुरु, शुक्र शुभकालदर्शक होत.

रवि, चन्द्र, लग्न व दशम हीं स्थानें कुंडलींत अत्यंत महत्त्वाचीं मानलीं जातात. त्यांशीं होणारे शुभाशुभ योग पुढील सनावळींत.

कै. काकासाहेबांच्या आयुष्यांतील घडलेल्या महत्त्वाच्या घटनांना वरील ग्रहाचे शुभाशुभ योग कसे कारणीभूत होत आहेत हें फलज्योतिषाच्या अभ्यासकांना उपयोगीं पडावें म्हणून सालवार जंत्री मुद्दाम तपशीलवार तयार केली आहे.

| | | |
|---|---|---|
| { रवि ४५° शनि | २५।११।१८७२ | जन्म. |
| { दशम सन्मुख हर्शल | | जन्मपूर्व ४ महिने पितृनिधन. |
| जन्मस्थ चन्द्र युति मंगळ (भूभ्रमणदशा) | १८७५ | उंचावरून पतन पायांत व्यंग. |
| ,, सूर्य त्रिकोण गुरु (चालित) | १८९२ | बी. ए. |
| ,, शुक्र सन्मुख गुरु ,, | १८९५ | सवाई माधवराव नाटक लिखाण. |
| ,, दशम सन्मुख गुरु ,, | १८९६ | 'केसरी संस्था'–प्रवेश. |
| ,, चन्द्र युति गुरु ,, | १८९७ | 'केसरी' संपादकीय लेख. |
| ज. नवमस्थानीं गुरुप्रवेश (च.) | १९०२।०३ | नेपाळांत वास्तव्य. |
| ज. चन्द्र षडाष्टक शनि (च.) | १९०४ | मलेरियाचा ताप. |
| ज. शुक्र सन्मुख गुरु (च.) | १९०७ | नाट्यसंमेलनाध्यक्षपद. |
| { ज. दशम सन्मुख गुरु (च.) { चन्द्र युति गुरु (च) | ७।१९०८ ते १९१० | 'केसरी' संपादक म्हणून नामोल्लेख. |
| ज. शुक्र-अर्ध त्रिकोण गुरु (च.) | ३।१९११ | संगीत मानापमान-रंगभूमीवर |
| मातृस्थान सन्मुख हर्शल | ३।१९१४ | मातामृत्यु. |
| जन्मलग्न युति गुरु (च.) | १९१७ | नाट्यसंमेलनाध्यक्षपद. |
| ज. दशम त्रिकोण गुरु | ३।१९१८ २२।६। ते २० | 'केसरी' संपादक नात्यानें नामोल्लेख. |
| ज. चन्द्र युति शनि (च.) | उत्तरार्ध १९२० | 'केसरी' संस्थात्याग. |
| ज, ,, ,, ,, पंचमांत संततिनाश | २२ | कन्यामृत्यु. |
| सप्तमांत गुरुप्रवेश | ७।३।१९२३ | 'नवाकाळ' वर्तमानपत्र चालू. |

सप्तमांत शनिप्रवेश १९२६ सोलापूर डी.एस्.पी. यांची अब्रुनुकसानीची फिर्याद १००० रु. दंड.

ज. चन्द्रकेंद्रीं शनि, मंगळ मार्च १९२९ राजद्रोहाबद्दल अटक व शिक्षा १ वर्ष

ज. सूर्य-सन्मुख गुरु (च.) १७।१।१९३० कारागृहवासांतून सुटका, कर्जमुक्त.

ज. दशम-शनिप्रवेश १९३२ नवाकाळ पत्रासंबंधीं जामिनकी.

ज. चतुर्थ-गुरुप्रवेश १९३३ दत्तमन्दिर स्थापना.

ज. चन्द्र युति गुरु १९३३ मराठी साहित्यसंमेलनाध्यक्ष.

ज. दशम युति गुरु १९३८ जामीन रक्कम परत मिळाली.

ज. शनि (नवम) त्रिकोण गु. ह. श. लग्नीं १९४०।४८ अध्यात्म-विषयक लेखन.

ज. चन्द्र युति नेपच्यून १।९।१९४१ विनायकराव मृत्यु. (द्वि.चिरंजीव)

ज. रवि त्रिकोण गुरु ८।१९४३ कर्जमुक्त (नवाकाळ).

ज. शुक्र सन्मुख मं. केन्द्रीं नेपच्यून ४।१९४४ सौ. गौरीबाई (पत्नी) मृत्यु

कुटुम्बस्थानीं हर्शल १९४७ नातू–मृत्यु.

ज. चन्द्र केन्द्र हर्शल }<br>ज. सूर्य केन्द्र शनि } २६।२७।८।१९४८ निर्याणकाल.

विष्णु गोविंद गुर्जर, मुंबई.

☆ ☆

## परिशिष्ट ब.

# 'इंडियन अनरेस्ट' मधील उतारा

लंडन टाईम्समध्यें किंकेड साहेबांनीं कीचकवध नाटकावर टीका केली; त्याचा उतारा चिरोलसाहेबांनीं इंडियन अनरेस्ट या पुस्तकांत दिला आहे. त्यांतील महत्त्वाचा भाग खालीलप्रमाणें:—

These things are an allegory. Although his na nowhere uttered on the stage or mentioned in the printed play, every one in the theatre knows that Kichaka is really intended to be Lord Curzon, that Draupadi is India, and that Yudhistira is the Moderate and Bhima the Extremist Party. Every now and again unmistakable clues are provided. The question, indeed, admits of no doubt, for since the play first appeared in 1907 the whole Deccan has been blazoning forth the identity of the characters. Once they have been recognized, the inner meaning of the play becomes clear. A weak Government at home, represented by King Virata, has given the Viceroy a free hand. He has made use of it to insult and humiliate India. Of her two champions, the Moderates advocate gentle—that is, constitutional—measures. The Extremists, out of deference to the older party, agree, although satisfied of the ineffectiveness of this course. Waiting until this has been demonstrated, they adopt violent methods, and everything becomes easy. The oppressor is disposed of without difficulty. His followers—namely, the Anglo-Indians—are, as it is prophesied in the play and as narrated in the Mahabharata, massacred with equal ease. And the Extremists boast that, having freed their country, they will be able to defend it against all invaders, thus averting the calamities which, according to Lord Morley, would overtake India on the disappearance of the British.

It may be said that all this is mere fooling. But no Englishman who has seen the play acted would agree. All his life he will remember the tense, scowling faces of the men as they watch Kichaka's outrageous acts, the glistening eyes of the Brahmin ladies as they listen to Draupadi's entreaties, their scorn of Yudhistira's tameness, their admiration of Bhima's passionate protests, and the deep hum of satisfaction which approves the slaughter of the tyrant.



परिशिष्ट क

# — तारीखवार जंत्री —

| तारीख, महिना किंवा सन | वृत्तांत |
|---|---|
| २५-११-१८७२ | वडिलांच्या मृत्यूनंतर चार महिन्यांनीं सांगली येथें जन्म. |
| १८७३ ते १८८९ | सांगलीस बालपण व विद्यार्जन, इ. ३ ऱ्या वर्गांत असतांना एक कादंबरी व इंग्रजी ४ थ्या वर्गांत असतांना एक नाटक लिहिण्याचा प्रयत्न. इ. ५ वींत वक्तृत्वाचें पहिलें बक्षीस. |
| १८८९ | मॅट्रिक परीक्षा पास. श्री. गणपतराव लागू, रहाणार कोल्हापूर यांचे मुलीशीं लग्न. सासरचें नांव गौरीबाई. |
| जानेवारी १८९० | पुण्यांत फर्ग्युसन कॉलेजमध्यें प्रवेश. |
| ” १८९१ | पुण्यांत डेक्कन कॉलेजमध्यें प्रवेश. |
| १८९२ | “तत्त्वज्ञान” विषय घेऊन बी. ए. परीक्षा उत्तीर्ण होऊन सांगली हायस्कूलमध्यें शिक्षकाची नोकरी. |
| १८९३ | पहिली मुलगी गंगूचा जन्म. |
| १८९३ | ‘सवाई माधवराव यांचा मृत्यु’ या नाटकाचें पहिलें लेखन. |
| १८९४ | सांगली हायस्कूलमधील त्यांचे एकवेळचे शिक्षक व त्यावेळचे सहकारी श्री. कोल्हटकर यांना मागें टाकून रा. खाडिलकरांना बढती देऊन त्या जागे-वर कायम करण्याचें घाटत असल्यामुळें सांगली |

| | |
|---|---|
| | हायस्कूलमधील मास्तरची नोकरी सोडली. या अवधात पोहणें व कुस्ती यांचा विशेष व्यासंग केला. |
| १८९५ | मुंबईस एल्एल्. बी.चा अभ्यास. ‘सवाई माधवराव यांचा मृत्यु’ या नाटकाचें श्री. कोल्हटकर यांच्याजवळ वाचन व त्यानंतर त्याची विविधज्ञानविस्तार मासिकांत प्रसिद्धि. |
| ऑगस्ट १८९६ | विविधज्ञानविस्तारामध्यें प्रसिद्ध झालेल्या ब्राह्मण व त्यांची विद्या या ग्रंथावरील त्यांच्या टीकात्मक निबंधामुळें खाडिलकरांच्या लेखनकलेची लो. टिळकांना झालेली जाणीव. कै. नारायण बापूजी कानिटकर पुणें यांचेमार्फत लो. टिळकांशीं प्रथम परिचय व केसरीशीं पहिला संबंध. |
| सप्टेंबर १८९६ | १ सप्टेंबर केसरींत “राष्ट्रीय महोत्सव” हा पहिला अग्रलेख व ८ सप्टेंबर दुसरा अग्रलेख. |
| नोव्हेंबर १८९६ | दुष्काळ-निवारण-प्रयत्नासाठीं सोलापूर व विजापूर जिल्ह्यांत प्रवासानिमित्त प्रयाण. विजापूरचा मोडकळीस आलेला किल्ला बघून कांचनगडच्या मोहनेची कल्पना. |
| फेब्रुवारी ते एप्रिल १८९७ | प्लेग सुरूं झाल्यामुळें सांगलीस वास्तव्य व तेथें रा. वारखणकर जोशी यांचे घरीं कांचनगडची मोहना नाटकाचें ७–८ दिवसांत लेखन. |
| मे १८९७ | लोकमान्यांच्या निरोपावरून केसरीसाठीं पुण्यास परत आगमन. |
| २२।६।१८९७ | रँडचा खून. |

| | |
|---|---|
| २७।७।१८९७ | लो. टिळकांना अटक. |
| १४।९।१८९७ | लो. टिळकांना शिक्षा. |
| २८।९।१८९७ | काकासाहेबांचा लो. टिळकांना झालेल्या शिक्षेबद्दल लेख. |
| ८।२।१८९८ | द्रविड बंधूंचा खून. |
| ८।९।१८९८ | कांचनगडची मोहना छापून प्रसिद्ध. |
| २४।१२।१८९८ | सोशल क्लब पुणें यांचा नगर मुक्कामीं आनंदनिधान नाटकगृहांत कांचनगडच्या मोहनेचा पहिला प्रयोग. |
| १९०० | सेकंड एल्एल्. बी.चा अभ्यास व बोअर युद्धावरील लेखनव्यवसायामुळें पुढें तो अभ्यास कायमचा बंद. |
| १९०१ | ‘ गनिमी काव्याचें युद्ध ’ लेखमाला. |
| २४।१२।१९०१ | शाहूनगरवासी नाटक मंडळीचा कांचनगडच्या मोहनेचा प्रथम प्रयोग. |
| १९०२ | कौलाच्या कारखान्याच्या निमित्तानें शस्त्रनिर्मिती-साठीं नेपाळकडे गमन. |
| १९०३ | दुसरी मुलगी शांता इचा जन्म. |
| १० सप्टेंबर १९०४ | कांचनगडच्या मोहनेच्या प्रथम प्रयोगानें ( विजयानंद नाटकगृह पुणें ) महाराष्ट्र नाटक मंडळीची सुरवात. |
| प्रारंभींचे कांहीं महिने १९०५ | आजारीपणामुळें नेपाळांतून परत सांगलीस आगमन व मुक्काम. |
| ऑगस्ट १९०५ | पुण्यास सदाशिव पेठेंत श्री. भाऊसाहेब गोखले यांचे घरीं प्रथम बिऱ्हाड करून वास्तव्य. ( येथें ते १९११ पर्यंत होते ). |

| | |
|---|---|
| जानेवारी १९०६ | थोरला मुलगा यशवंत ऊर्फ अप्पा याचा जन्म. |
| १७ फेब्रुवारी १९०६ | 'सवाई माधवराव यांचा मृत्यु' नाटकाचा महाराष्ट्र नाटक मंडळीकडून इंदूर येथें बारोडें नाटकगृहांत पहिला प्रयोग. |
| २३ फेब्रुवारी १९०७ | 'कीचक-वध' नाटकाचा विजयानंद थिएटर पुणें येथें म. ना. मंडळीकडून प्रथम प्रयोग. |
| १५ मे १९०७ | 'बायकांचें बंड' नाटकाचा विजयानंद थिएटर पुणें येथें म. ना. मंडळीकडून प्रथम प्रयोग. |
| मे १९०७ | तिसऱ्या नाट्य-संमेलनाचे अध्यक्ष. |
| जुलै १९०८ | लो. टिळकांवरील राजद्रोहाचा खटला व सहा वर्षे काळ्यापाण्याची शिक्षा झाल्यामुळें केसरीचें संपादकत्व घेतलें. दुसरा मुलगा विनायक याचा जन्म. |
| आक्टोबर १९०८ | 'मराठ्या'चे संपादक. |
| १८ सप्टेंबर १९०९ | 'भाऊबंदकीचा' सोलापूर येथें मेकानकी थिएटरांत म. ना. मंडळीकडून पहिला प्रयोग. टिळकांच्या मृत्युपत्राप्रमाणें केसरी—मराठा संस्थांचे ट्रस्टी. |
| १० जानेवारी १९१० | केसरीचें संपादकत्व सोडलें. |
| फेब्रुवारी १९१० | 'कीचक-वध' नाटकाला सरकारकडून बंदी व जप्ती. |
| २४ डिसेंबर १९१० | 'प्रेमध्वज' नाटकाचा पुणें येथें किर्लोस्कर नाटकगृहांत म. ना. मंडळीकडून प्रथम प्रयोग. |
| १२ मार्च १९११ | 'मानापमान' नाटकाचा किर्लोस्कर संगीत मंडळीकडून मुंबईत प्रथम प्रयोग. |
| १९१२ | आळवणी यांच्यां वाड्यांत वास्तव्य. ( १९२१ अखेर ) |

| | |
|---|---|
| ३१ मे १९१३ | 'विद्याहरण' नाटकाचा किर्लोस्कर संगीत मंडळीकडून पुणें किर्लोस्कर नाटकगृहांत प्रथम प्रयोग. |
| १९१३ | बाल्कन युद्धावरील लेखमाला. |
| १९१४ | लोकमान्य टिळकांची सुटका. |
| २० सप्टेंबर १९१४ | 'सत्त्वपरीक्षा' नाटकाचा नागपूर तुळशीराम नाटकगृहात महाराष्ट्र नाटकमंडळीकडून प्रथम प्रयोग. |
| १९१४ | चित्रमयजगतमध्यें महायुद्धावरील लेखमाला लिहिण्यास सुरवात. |
| मार्च १९१४ | आईचा मृत्यु. |
| १९१५ | उभयतां मुलें, अप्पा व विनायक यांच्या मुंजी. |
| १९१५ | केसरी-प्रवेश. |
| १९१६ | बेळगांव कॉन्फरन्स व होमरूल चळवळ. |
| १० डिसेंबर १९१६ | स्वयंवर नाटकाचा मुंबई एल्फिन्स्टन थिएटरामध्यें गंधर्व नाटक मंडळीकडून प्रथम प्रयोग. |
| १९१७ | दुसऱ्या मुलीचें -शांताचें—लग्न. |
| १९१७ | अथणी परिषदेचे अध्यक्ष. |
| ४ जून १९१७ | पुण्यास नाट्यसंमेलनाचे अध्यक्ष. |
| मार्च १९१८ | लो. टिळक व केळकर विलायतेस गेल्यामुळें केसरीचें संपादकत्व घेतलें. |
| नोव्हेंबर १९१९ | लो. टिळक विलायतेमधून परत आले. |
| जून १९२० | द्रौपदी नाटक लिहिण्यासाठीं ४ महिन्यांची रजा घेतली व रजेच्या मुदतीपुरतें केसरीचें संपादकत्व सोडलें. |
| १५ जुलै १९२० | वडील बंधु हरिपंत यांचा मृत्यु. |

| | |
|---|---|
| जुलै १९२० | डेमॉक्रॅटिक पक्षातर्फे मुंबई कौन्सिलासाठीं उमेदवार म्हणून उभे राहिले. |
| १ ऑगस्ट १९२० | गुरु लोकमान्य टिळक यांचा मृत्यु. |
| १० ऑगस्ट १९२० | केसरींतील शेवटचा लेख व पुढें केसरीशीं संबंध कायमचा सुटला. |
| सप्टेंबर १९२० | लो. टिळकांचा मृत्यु झाल्यानंतर सप्टेंबरमधील कलकत्ता कॉंग्रेसच्या ठरावाप्रमाणें कौन्सिल उमेदवारी परत घेतली. |
| १२ डिसेंबर १९२० | द्रौपदी नाटकाचा मुंबई एल्फिन्स्टन थिएटरमध्यें गं. ना. मंडळीकडून प्रथम प्रयोग. |
| ९ मार्च १९२१ | मुंबईस 'लोकमान्य' दैनिकाचें संपादकत्व. |
| १।८।१९२१ | कॉंग्रेसचा असहकार पुकार. काकांनीं पगडी बाजूस ठेवून खादी टोपी वापरण्यास सुरवात केली. |
| १४।४।१९२२ | पेणच्या महाराष्ट्र प्रांतिक परिषदेचे अध्यक्ष. |
| जानेवारी १९२२ | म. गांधींनीं बार्डोलीचा सत्याग्रह मागें घेतला. |
| १९२३ | 'लोकमान्य' पत्राचें संपादकत्व सोडलें. |
| ७ मार्च १९२३ | स्वतःच्या संपादकत्वाखालीं स्वतःच्या 'नवाकाळ' दैनिक पत्राची सुरवात. |
| सप्टेंबर १९२५ | आठवड्याचा 'नवाकाळ' सुरू. |
| नोव्हेंबर १९२५ | दत्तात्रय छापखाना व नवाकाळ खटाव मकनजी वाडींत आला. |
| २२ एप्रिल १९२६ | मेनका नाटकाचा मुंबई रिपन थिएटरांत गंधर्व नाटक मंडळीकडून प्रथम प्रयोग. |
| १९२७ | अमेरिकेंत मानापमान नाटकाचा प्रयोग. |

